# दोन शब्द

साहित्य हा राष्ट्राचा एक अमोल सांस्कृतिक ठेवा असतो. त्याचे जतन करणे हे अर्थातच त्या राष्ट्राचे एक आद्य कर्तव्य ठरते. छपाईची कला अस्तित्वात आल्यानंतर साहित्य पुस्तकात साठवून ठेवता येऊ लागले. पण त्याच्यापूर्वी जे साहित्य किंवा वाङमय पिढयान्‌पिढया केवळ मुखोद्‌गत होत आले त्याची गणतीच करता येणार नाही. हा फार मोठा वारसा आहे.

या वाङमयाचे वैशिष्टच हे की, ते अपौरुषेय आहे. म्हणजे त्याचा कर्ता सांगता येत नाही. आणि दुसरी गोष्ट म्हणजे त्याची मालकी एका व्यक्तीची नाही, सबंध समाजाची ती आहे. म्हणूनच ते खऱ्याखुऱ्या अर्थाने लोकसाहित्य आहे. ते सामान्य लोकांच्या जीवनातून उपजले, त्यांच्याच तोंडी खेळले, वंशपरंपरा पाठांतरातून चालत आले आणि त्यांच्या जीवनाशी एकरूप झाले. कोणतेही साहित्य जेव्हा जीवनाशी एकरूप होते तेव्हा ते जिवंत ठरते. म्हणूनच लोकगीते ही जिवंत वाटतात. हे समाजाचे धन असते. राष्ट्राची संपत्ती असते.

जुने प्रकाशित वाङमय शोधून काढणे हे त्या मानाने कमी कष्टाचे काम आहे. परंतु फक्त जिभेवर वस्ती करून राहिलेले लोकसाहित्य शोधून काढून ते वेचून प्रकाशात आणणे हे अतिशय खडतर असे कार्य आहे. ते खडतर असले तरी ते कुणी तरी चिकाटीने, आस्थेने व सातत्याने करायला पाहिजे. कारण तत्कालीन सामाजिक मूल्ये, रीतिभाती, सवयी, इत्यादींचे अचूक प्रतिबिंब या लोकसाहित्यात पडलेले असते. सामाजिक इतिहासाचे धागेदोरे त्यात दिसून येतात. आपल्या संस्कृतीचा वारसा या लोकसाहित्यात ग्रथित केला गेला असल्याने आजच्या व उद्याच्या पिढयांना त्याची ओळख होणे आवश्यक आहे.

मराठी लोकगीतांतून व लोककथांतून मराठी भाषेचे सौष्ठव, सौंदर्य आणि झेप यांचा फार चांगला साक्षात्कार घडून होतो. मराठी भाषेचा अस्सल गोडवा, अस्सल कणखरपणा आणि अस्सल रसाळपणा लोकगीतांइतका इतरत्र क्वचितच सापडेल. मराठी भाषेचे हे रूप सतत डोळ्यांपुढे रहाणे आवश्यक आहे.

डॉ. सरोजिनी बाबर यांनी आजपर्यंत लोकसाहित्याचा शोध घेऊन ते प्रकाशात आणण्याच्या बाबतीत फार मोलाची मेहनत केली आहे. लोकगीते व लोककथा वेचून आणण्याचे काम त्यांनी निष्ठेने केले आहे. हे एक फार मोठे व व्यापक असे कार्य आहे.

मराठी भाषेतील लोकसाहित्य हा एक अतिशय समृद्ध असा वारसा आहे. या साहित्याची आजच्या व भावी पिढ्यांना ओळख व्हावी या उद्देशाने डॉ. सरोजिनी बाबर यांच्या 'मराठीतील स्त्रीधन' ह्या ग्रंथाच्या प्रकाशनाचे कार्य महाराष्ट्र शासनाने हाती घेतले आणि वाचकांनी या कार्याला उत्स्फूर्त प्रतिसाद दिला. मराठीतील स्त्रीधनाची दुसरी आवृत्ती प्रकाशात आल्यानंतर वर्ष-दोन वर्षांतच संपून गेली. त्यामुळे आता तिसरी आवृत्ती अधिक आकर्षक स्वरूपात रसिकांना सादर करण्यात येत आहे. ह्या तिसऱ्या आवृत्तीचेही वाचकवर्ग आपुलकीने स्वागत करतील अशी मला उमेद आहे.

ही तिसरी आवृत्ती तयार करताना डॉ. सरोजिनी बाबर यांनी मूळ ग्रंथात आवश्यक तेथे सुधारणा करून काही भरही घातली आहे. त्यांनी या कामासाठी जे परिश्रम घेतले त्यांचा येथे गौरवपूर्ण उल्लेख केल्यास तो अप्रस्तुत ठरणार नाही.

१५ ऑगस्ट १९७३

**दा. रा. सामंत**
प्रसिद्धी संचालक, महाराष्ट्र शासन

# अनुक्रमणिका

# कुळाचार

**उगवत्या** उषेच्या देखणेपणानं, भुईतून वर येतेल्या कोंबाच्या रुबाबानं, गरजत्या पावसाच्या मुसळधारीनं, झणकारत्या पायांच्या डौलानं, हसऱ्या बाळराजाच्या समाधानानं आणि मनात पिंगा घालायच्या ईर्षेनं घरी येतेल्या भाग्याच्या दर्शनामुळं जीव भुलून जातो. त्यातलंच काही तरी सामान्य मंडळींच्या बोलण्यातलं कानावर आलं म्हणजे तारुण्याला कधी म्हातारपणाचा वारा लागूच नये असं वाटतं. असली चिरकाल टिकणारी कल्पना घेऊन येणारी ही भाषा मी मी म्हणणाऱ्याला थक्क करून सोडते. वाटतं की, हे माणूस दिसायला तर साधं आहे पण याला एवढं चांगलं बोलणं जमतंच कसं? ज्याला साहित्यशास्त्र ठाऊक नाही, जो कधी कुठं काही शिकायला गेला नाही, त्याच्या समोर सारे रस मर्यादेनं उभे तरी कसे रहातात आणि उपमा दृष्टांतांची लयलूट करीत बोलणं त्याला सुचतं तरी कसं? पण या कोड्याला उत्तर मिळतच नाही!

त्यामुळं 'पांढरं वावर काळं बी, चतुर म्हणतो पेरीन मी' हे हुमान घातल्यानंतर त्याच्या उत्तराचा धनी होणं चटकन कुणाला जमत नाही. 'लेखक' म्हणून उत्तरात गवसणारी या बोलण्यातली गंमत आपल्या मनानं

चाखता यायचं जाऊदेच पण ती कुणी सांगितली तरी ताबडतोबीनं कळली तर नशीब म्हणायची वेळ येते! त्याकारणानं बुद्धिमत्तेची चाचणी घ्यावी या हेतूनं एकमेकांना असली कोडी टाकीत, हुमनं घालीत, तासन्‌तास आपली अक्कल चालवीन म्हणणारी माणसं 'आधी गोल गोल, मग लाल लाल, मग थैय्यम थैय्या' ही भाषा करावी म्हणतात. उखळातील मिरचीत नाचणाऱ्या मुसळागत ते आपल्या कल्पनेला घुसळण घालू देत. एवढंच नाही तर कोडी घालणारे बहाद्दर भेटले म्हणजे 'अख्ख्या दुनियेत एकच तळं न् त्यात दिसली दोनच फळं' या दिमाखात वेळकाळ सोडून भुलूनही जातात. "चंद्रसूर्य मग उगवूंदेत न् मावळूंदेत किती पण" असं म्हणत वेळकाळ विसरावी म्हणतात! आणि मग 'जमिनीवर पडला, कोनीकोपरी दडला, हाती तर येत नाही असा चमत्कार घडला' याचा अनुभव घेत त्यांची ब्रह्मानंदी टाळी लागते. त्यामुळं उजेडात आणि काळोखातही आपलं सारखंच चित्त लागलं होतं म्हणून मोकळे होतात...

अशा वेळी 'पाणी नाही, पाऊस नाही, रान कसं हिरवं, कात नाही चुना नाही, तोंड कसं रंगलं' या रीतीनं बोलून त्यातलं 'पोपट' हे उत्तर घेत आपलं तोंड ही माणसं वाटेल तितकं चालवतील! आणि मग आपल्यालाही त्यातलं काही उमगावं म्हणून 'दोन जिभांची नारी, राही मेरूच्या शिखरी, भल्या भल्यांची सेवा करी' हिच्याशीही संगत धरायला धजतील! या कल्पनेतली लेखणी घेऊन तोंडानं काढलं जाणारं हातानं पेरीत सुटतील. त्यांचं शहाणपण ईर्षा घेऊन उठेल. आपल्या मराठमोळ्या गावरान भाषेचा हा घनसर अलंकार धारण करीत गावभर ते मिरवतील. त्यासाठी आपले आप्तेष्ट, गणगोत, इष्टमित्र, पावणेरावळे, भाऊबंद, ओळखीतले, ऐकिवातले अशा कोणाकोणाला भेटायला ते कमी करणार नाहीत. आपल्या मोठेपणाचंच हे एक लक्षण समजून ग्रामधर्माचा हा कुळाचार मोठ्या आनंदानं, भक्तिभावानं, हौसेमौजेनं पाळावा म्हणतील. अशा वेळी हार खाणं त्यांना परवडणार नाही, किंवा विजयोत्सवानं नसती ऐटी मिरवणंही त्यांना खपायचं नाही. सगळं काही खेळीमेळीनं होऊदे म्हणतील. आपल्या बुद्धीला धार यावी म्हणून जिवापाड खटपट करतील. त्यामुळं अशा बैठकी देहभान हरपणाऱ्या तर ठरतीलच पण विचारवंतांनाही शहाणपण शिकवून मोकळ्या होतील. म्हणून शिक्षित आणि अशिक्षित इथं

कोणी कोणाला ठरवायचं हेही एक कोडंच होऊन बसेल! त्याकारणानं, 'मूठभर तांदूळ घ्यावेत, शिवराईची सुपारी घ्यावी, गंध-फूल घ्यावं, बेलाची पानं घ्यावीत, मनोभावे पूजा करावी'...असली व्रतवैकल्याची कास धरायचा मोह माणसाला झाल्याशिवाय रहायचा नाही. 'नावडतीची आवडती कर रे महादेवा' असा शिवदेवाला आग्रह धरायचीही इच्छा त्याच्या मनात बळावेल. एवढंच नाही तर, 'उष्टं माष्टं खायचं नाही, दिवसाढवळच्या निजायचं नाही, दिवसभर उपवास सोडायचा नाही, संध्याकाळी आंघोळ करायला विसरायचं नाही' अशापैकी शिवामुठीच्या कहाणीतील वसा घ्यायला-देखील तो मागंपुढं पहायचा नाही! चारचौघांत आपणही शहाणं ठरावं म्हणून त्याची धडपड चालूच राहील. त्यातूनच अशानं असं झालं म्हणून आपल्यापैकीच कुणाला तरी झालं गेलं सांगायचा मोह होऊन त्याच्या मुखी कहाणी रुळत जाईल. सांगण्या ऐकणारांच्या कुवतीवर आणि संस्कृतीवर मग त्या कहाणीची जोपा होईल. त्यावेळी त्याचं मन विसावेल. न सुटणाऱ्या कोडयांच्यामुळं मनावर पडलेला ताण सैल होऊन तो सुखावेल आणि 'ऐका गोपद्मांनो तुमची कहाणी. स्वर्गलोकी इंद्रसभा, चंद्रसभा, कौरवसभा इत्यादी सभा बसल्या आहेत. ताशेतर्फे वाजत आहेत. रंभा नाचत आहेत...' असल्या गोष्टीत तो पूर्ण रमून जाईल. अद्‌भुतात शिरायचा मोह होऊन मनोमनी शंकराची पूजा बांधीत जे प्रत्यक्षात घडत नाही पण तेच अप्रत्यक्षात का होईना घडूदे या कल्पनेनं, 'काकणलेल्या लेकी दे, मुसळकांडचा दासी दे, नारायणा-सारखे पाच पुत्र दे, दोन कन्या दे, कुसुंबीच्या फुलांसारखं स्थळ दे...' ही धरित्रीच्या कहाणीतील रंगत पुनःपुन्हा आपल्या मनात खेळू देईल. घरातील मुलाबाळांना असल्या गोष्टी ऐकवून वळणदार करण्यासाठी त्याचं मन अखंडपणे प्रयत्न करील. अशा वेळी, 'कोरान्न मागत असस. तेव्हा दर सोमवारी उपास करीस. भिक्षेस जास, पाचच घरी कोरान्न मागस. स्वयंपाक करून महादेवास नैवेद्य दाखवीस' ही सोमवारच्या कहाणीतील क्रियापदांची ठेवण त्याच्या बोलण्यात आवर्जून येईल. शिवाय सचील स्नान (वस्त्रासहित स्नान), उतरंडीचा मोती (वेजी उतरलेला मोती), पाटाव (पैठणी), खुलभर (चुळकाभर), फसकी (पस्त), ताशामर्के (ताशा नगारे), पावा (खडावा),

नागाणे (फुटाणे) इत्यादी अलंकारिक विशेषणे वापरून आपली छाप इतरांचेवर पाडावी या अहंकारालाही तो बळी पडेल.

अशीही आज कित्येक दिवसांची गोष्ट चालू आहे. कित्येक पिढ्यांनीही तेच अनुभवलंय. पण म्हणून या गोष्टीत कधी खंड पडला नाही का अशा करणीला कोणी नावंही ठेवली नाहीत ! उलट अशा गोष्टी साठा उत्तरांच्या कहाणीत जमा होऊन पाचा उत्तरी सुफळ संपूर्ण झाल्या आहेत. एवढंच नाही तर ज्याच्याजवळ अशांपैकी काही वानवळा गवसणार नाही त्याला हाकारा घालीत, त्याच्यासाठी डांगोरा पिटीत, या कामी तो उपाशीतापाशी रहाणार नाही याची काळजी घेतली गेली आहे ! महानुभवांच्या लीळाचरित्रात यातला काही पुरावा पहायला मिळतो. श्रीचक्रधर स्वामींनी सारंग पंडिताची मुलगी 'धानाई' हिला तिनं रडून रडून आकांत मांडल्याकारणानं गोष्ट सांगून गप्प बसविल्याची माहिती उपलब्ध झालेली आहे. ती हकिगत अशी :

'सर्वज्ञे भणितले : बाई : तथा धाइया : हे तुम्हा कहाणी साधैल : आली : पासी बैसली : साळैचे घर मेणाचे : काउळयाचे घर सेणाचे : पाउसाळा काउळयाचे घर पुरे जाय : साळैचे घर वाचे : मग उगीची राहिली : . . .'

आजदेखील हेच होतं. 'एक होता कावळा न् एकी होती चिमणी. कावळ्याचं घर शेणाचं, चिमणीचं घर मेणाचं. खूप खूप पाऊस आला, कावळ्याचं घर वाहून गेलं' . . .ही गोष्ट मोठ्या उत्सुकतेनं मुलं ऐकतात आणि त्यांना बरं वाटावं म्हणून वडीलधारीही ती रंगवून सांगताना दिसून येतात. अशा गोष्टींतून माणसाचं मन बांधलं जातं. सद्‌विचार तिथं पेरले जातात. माणुसकीचा गहिवर समजावून दिला जातो. म्हणून बायकामाणसं ज्याप्रमाणे व्रतवैकल्यं पार पाडताना 'उतशील, मातशील, घेतला वसा टाकून देशील. उतत नाही, मातत नाही. घेतला वसा टाकीत नाही' या खूणगाठेशी निष्ठेनं रहातात त्याच निष्ठेचं बीज या ना त्या रूपानं मुलांच्या मनावर बिंबवलं जातं. त्यासाठी चातुर्मास साजरे केले जातात. श्रावण हा श्रवणाचा महिना ठरतो. जे काय सांगायचं ते उघड उघड सरळ न सांगताना गोष्टींच्या रूपानं ऐकवायची कल्पना फलद्रूप होते. मनोरंजनाबरोबर बोधही साधला जातो. त्या धांदलीत गोरगरिबांच्या मुली राजघराण्यात विवाहित होतात

आणि राजांच्या राण्या घरकाम करताना आढळून येतात. सामान्य मनाला ते बरं वाटतं. पुन:पुन्हा ऐकायची लहर येते. त्यामुळं कथाकारांची कधी वाण पडत नाही की, श्रोत्यांच्या अभावी कुठं काही अडल्याचंही ऐकिवात येत नाही. त्याचा परिणाम म्हणून मग पशुपक्ष्यांच्या, राजाराणींच्या, देवादिकांच्या, कर्तबगार राजपुत्रांच्या, राक्षसांच्या लढाईच्या, पऱ्यांच्या राज्यांच्या, अद्भुत नगरीच्या, नवलाईच्या अशा गोष्टींचा झपाट्यानं उपसा होत जातो आणि संध्याकाळच्या वेळी आजोबा आजींच्या अगर वडीलधाऱ्यांच्या पुढ्यात मुला-बाळांचे घोळके बसलेले आढळून येतात. अशा वेळी 'आटपाट नगर होतं,. . . एक होता राजा,. . .असंच एक गाव होतं,. . .एकदा काय झालं,. . .आता त्या गोष्टीला फार दिवस झाले. . .' या थाटानं सुरू होणारी कथा तासन्‌तास रंगते आणि आपली तहानभूक हरपून टाकीत जिवाला चटका लावून संपून जाते. अशा वेळी ऐकली कथा ऐकणाराच्या मनात घुंगुरमाळांगत किणकिणत रहाते आणि माणूस त्या ऐकल्या वातावरणातच एकजीव होऊन जातो. त्यामुळं तो तो घडता प्रसंग साक्षात त्याच्या नजरेपुढं येत रहातो आणि मग,

'आटपाट नगर होतं. वाऱ्यानं पायात पैंजण बांधले होते. कोकिळेला कंठ फुटला होता. गंगामाईला हसू आवरत नव्हतं. धरणीचं अंगण खेळायला पुरत नव्हतं. झाडाझुडपांचं हसणं खिदळणं संपत नव्हतं. तर अशा वेळची गोष्ट. गंगेच्या स्नानासाठी माणसांची रीघ लागली होती. पुण्य पदरात पडावं म्हणून पाप धुतलं जात होतं. कैलासावर ही वार्ता गेलेली. पार्वतीदेवीनं हा चमत्कार पाहिलेला. पापपुण्याची भाषा ही कसली म्हणतेली ती! त्या गर्दीनं तिचा जीव गुदमरून गेलेला. तशी शंकराला तिनं विचारलं, "देवा, याचा अर्थ लावावा. गंगा पाप पदरात कशी घेणार न् पुण्य तरी कशी देणार या माणसाला?" शंकरानं उत्तर केलंच नाही याउप्पर. खरं खोटं बघ चल म्हणून तिला स्वत:ला नेली गंगातीरी. सोन्याची केली शिळा. हिला केली बारकी मुलगी. बसवली त्या शिळेवर. स्वत: जख्खड म्हातारा झाला. दिलं एका खोल खड्डयात अंग झोकून. लागला कोण दिसेल त्याला हाकारा घालायला न् डांगोरा पिटायला. "मला वर काढा बाबांनू देव तुमचं भलं करील! . . ." पण ह्याचं ऐकतो कोण? . . . कुणी लक्ष देईल तर शपथ अगदी! आणि ज्यानं पहावं त्यानं

"मर थेरड्या!" म्हणून घालून पाडून बोलायला केली की सुरुवात! अरे देवा! पार्वती गेली भांबावून. हे काय म्हणाली न् लागली शंकराला वर या म्हणायला! तेवढ्यात तिकडून एक तरणाबांड माणूस धावत आला. त्यानं शंकराची हाळी ऐकली. अंगावरचं नेसूचं गच्च बांधलं. खांद्यावरचं दिलं फेकून न् टाकली त्या खड्ड्यात उडी! त्यासरशी "शाबास!" म्हणून शंकरांनी आपलं खरं रूप धारण करीत त्याला पोटाशी धरलं. "तुझं चांगलं होईल" म्हणून त्याला आशीर्वाद दिला. तशी मग त्यांनी पार्वतीला म्हटलं, "हा खरा पुरुषोत्तम. पाप-पुण्याची फिकीर याला नाही. बाकीचे सारे ढोंगी. कळलं?" तिला आनंद झाला. कळलं म्हणाली. शंकर पार्वती मग कैलासाला गेले. लोकांचे दुःख हरण करावं म्हणून जागोजाग संचार करायचा त्यांनी बेत केला. आमची कहाणी संपली. तिनं राया इंद्राची गोष्ट दिली'...

अशा गोष्टीएकी मन रुंजी घालीत सुटतं. माणसाला आपला तपास घ्यावासा वाटतो. इतरांच्याबद्दल खरंखोटं करावंसं वाटतं. कहाणीतलं शहाणपण आपल्यालाही सुचावं हा ध्यास त्याच्या जिवाला लागतो न् आपणाला पण कैलासाच्या शंकर-पार्वतीचं रूप धारण करता यावं या मोहानं तो पछाडला जातो! त्या नादात गोष्ट सांगावी न् गोष्ट ऐकावी हे ज्ञानसत्र अखंडपणे घरोघरी उघडलं जातं. आपल्याला कहाणीचं वेड आहे न् त्याची मूळ बैठक आपल्या स्थायीभावातच सामावलेली आहे याची जाणीव यावेळी त्याला होते. त्याचा जीव मग सुखावतो आणि ऐकलेली गोष्ट दुसऱ्याला देण्यासाठी म्हणून तो राजीखुषीनं तयारीला लागतो.

जुन्या काळी असल्या कहाण्या सांगण्याचं काम घरच्या वडीलधाऱ्या माणसांच्या बरोबरीनं कथा-पुराणांनीही केलं. शाहिरांनी, कथेकऱ्यांनी, गोंधळ्यांनी, बारीक मोतीरामांनी, कीर्तनकारांनी, पुराणिकांनी त्यांना हातभार लावला. साहित्यलक्ष्मीनं माणसांच्या कंठात वास करावा म्हटलं न् जनजागरणांनी सरलेल्या रात्री मुक्त कंठानं प्रशंसिल्या गेल्या. त्यातल्या मांगल्यानं माणूस पुनीत झाला आणि येतेली कहाणी स्वतःजवळच लोणचं घालून न ठेवताना त्यानं ती दुसऱ्याला देतेवेळी गावोगावच्या बोलीभाषेचं माध्यम स्वीकारलं. स्थळकाळातील मालमसाला त्यात घुसडला गेला आणि मग अशा गोष्टी थोड्या फार

करकानं ज्याच्या त्याच्या तोंडी जात सर्वांच्या मालकीच्या ठरल्या. कर्तेपणाचा ासही त्यांना कुठं लागला नाही, की हे माझे आहे असा दावाही त्यांच्याबद्दल ुणी केला नाही. या गोष्टींनी त्या त्या भू-भागाचं समाजजीवन सांगितलं, तिथली तिथली संस्कृती जोपासली. अशा वेळी धार्मिक व सामाजिक भाव-ावनांचा चित्ताकर्षक आविष्कार होत गेला आणि कथाविश्वाचं एक नवीन ालन माणसानं आपल्या रोजच्या आयुष्यात सजवून टाकलं. आमचा मराठी ुलुख आणि आमचा भारत देश त्यायोगे एवढा श्रीमंत ठरला की, ह्या ाग्यशाली कथाभांडारातील मौलिक रत्नं उभ्या दुनियेनं केव्हाच उचलली मूळ घराण्याचे मालक आम्ही होऊ शकलो.

या सुश्राव्य कथांनी आमच्या सामान्य माणसाला नीतिमान करण्याची हान कामगिरी बजावली आणि अक्षरओळख नसलेल्या माणसांना विद्यादान रण्याचा मोका साधू दिला. लहान लहान सुटसुटीत वाक्यरचना, सोपी रगुती भाषा, आंदोलन निर्माण करणारा लयबद्ध भावनाविष्कार, ठराविक ब्दांची होणारी पुनरावृत्ती आणि मनाला चटका लावून सोडणारी कथन-द्धती या वैशिष्टयांनी नटलेल्या लोककथांनी मानवी जीवनाला विलक्षण वश्रांती दिली. माणसांच्या कल्पना गतिमान होतील हे पाहिलं. या सहज सुलभ चनाविष्कारानं पिढ्यान्‌पिढ्यांच्या माणसांच्या मनावर मोहिनी घातली ाणि लोकांच्या आचारविचारांना इष्ट ते वळण देत आपलं म्हणून स्थान ानवी जीवनात कायमचं निर्माण करून टाकलं. म्हशीची शिंगं म्हशीला जड ोत नाहीत म्हणतात, त्याप्रमाणं शेकडो कहाण्या मनात धराव्या लागल्या री मग कुणी तो भार बोलून दाखवला नाही का त्या ओझ्याखाली कोणी बूनही गेला नाही! दिली ती गंगा न् राहिलं ते तीर्थ या भावनेनंच हा थाविश्वाचा संसार तगला. कहाणीमुळं माणूस शेलकं बोलायला शिकला. चक शब्दांचं माध्यम त्यासाठी त्यानं स्वीकारलं. मात्र शब्दांचा सुकाळ होत सताना त्यांचा वापर करतेवेळी बुद्धीचाही दुष्काळ पडणार नाही याबद्दल ानं आवर्जून खबरदारी घेतली.

कहाणीची जोपा करीत असतानाच बोलण्यावरून बोलणं निघाल्यावर ापल्या घरधन्याची ओळख कुणाला करून द्यावयाची वेळ येईल तेव्हा

आमच्या बायकामाणसांनी उखाण्यात बोलायची तालेवारी पदरी बाळगली. झाकली मूठ सव्वा लाखाची असावी त्याप्रमाणं उघड उघड असं पतीचं नाव सांगणं त्यांनी नाकारलं. तसं झालं तर पतीचं आयुष्य कमी होईल या भोळ्या श्रद्धेची कास धरली. उखाणा घेऊन हेच काम केलं तर वाडीदिडीनं सौभाग्य उपभोगता येईल असा विचार केला. त्यासाठी तरत-हेची अक्कल चालवली. सणवार, नातीगोती, रीतीरिवाज, कुळाचार, करणी-धरणी, मानपान, इतिहास-भूगोल, गावशीव असल्या अनेक गोष्टी आधार म्हणून उपयोगात आणल्या. त्यामुळं, त्या त्या उखाण्यात गोवलं गेलेलं समाजजीवन परिणामकारक रीतीनं इतरांच्यापुढं येत गेलं. आणि 'पाऊस पडला झिरीमिरी, मूठ धरली चाड्यावरी, शिवार झालं गार, शेतात घातला विळा, बांधला पेंडीचा आळा, केलं रान गोळा, बुचाड रचलं नानापरी, तिवडा रवला येसूसरी, बोलीवल्या नगरच्या नारी, तिवड्याला घालते आकडी, आकडीला आकडी भिडं, मदनात बैल बुडं, रास मोजताना × × × रावांच्या हातात चमाकलं सोन्याचं कडं.'

. . .शेतवाडीबद्दलचं हे शब्दांकित चित्र आत्ताच्या आत्ता समोर घडावं तसं नजरेत भरू शकलं. उखाणा घालणारी शाबास ठरली. त्याच वेळी,

'सोन्या-मोत्यांचे सागरगोटे,पडले माझ्या पातळाच्या घोळात × × × रावांचं नाव घेते मैत्रिणींच्या मेळ्यात.'

असला एवढा तेवढा डामडौल सांगण्यापेक्षा चंद्रमौळी घरात सुखानं नांदत्या लक्ष्मीनं—

'चांदीचं घंगाळ आंगुळीला, चंदनाचा पाट बसायला, जरीकाठी धोतर नेसायला, केशरी गंध लावायला, सान येवल्याची, खोड बड्याचं, शिवपूजेला पाणी गंगाभागीरथीचं, चांदीचं ताट, आंबेमोहराचा भात, वर केशरी वरण दाट, पानदान बिदलीचं, डबा म्हादुलीचा, डब्या गजनीच्या, कात कोकणचा, चुना भोकरचा, पान रामटेकचं, जायपत्री जयगावची, लवंग विजापूरची, चिकणी सुपारी सोलापूरची, लाल गादी मुंबईची, लोड सातारचं, उशी पुण्याची किनखापाची, पलंग कराडचा मोराचा, रंगम्हालाचा थाटमाट, हंड्या झुंबरांचा, हि-या-माणकांचा लखलखाट न् × × × रावांच्या जिवावर हळदीकुंकवाचा जर दाट.'

अशी ऐटी मिरवली तर ती वाखाणली गेली. शून्यातून विश्व उभं करीत मनातील ऐश्वर्य भोगायची तिची ही कल्पना अठरा विश्वे दारिद्रच असलेल्या घरातही स्वीकारण्याजोगी ठरली. त्याचप्रमाणं वरचेवर माहेरचं मूळ येऊनही माहेरी पाठविताना काचकूच करणाऱ्या शंकराच्या साक्षीनं जर कधीमधी,

'वटसावित्रीचा पुजते वड, बेंदरानं केला चड, बेंदराची घेते काव, नागपंचमीचा जाव, नागपंचमीच्या दिवशी करते न्ह्यारी, आली गवराय गणपतीची स्वारी, गवराय गणपतीला वहाते दूर्वा, गवराय गणपतीचं घेते दोरं, आलं म्हाळाचं म्हईनं म्होरं, म्हाळाच्या म्हईन्याची निवडते डाळ, आली घटाची माळ, घटाच्या माळेला देते गाठी, शिलंगनाची झाली दाटी, शिलंगनाचं घेते सोनं, दोन्ही दिवाळयांनी केलं येणं, दिवाळीची पाजळते पंती, आली सक्रांत नेन्ती, संक्रांतीचं पुजते सुगड, आली माही पुनव दुगड, माही पुनवेची पुजते ओंबी, शिमगा खेळे झोंबी, शिमग्याची करते पोळी, आली रंगपंचीम भोळी, रंगपंचमीचा उधळला रंग, पाडवा आला टोलेजंग, पाडव्याची उभारते गुढी, आखितीनं मारली उडी, आखितीची पुजते करा, दिवाळी ह्योस्तोवर दम धरा मग मी येईन × × × राव तुमच्या घरा.'

एखादीनं असा दणका उडवून दिला तर हास्याचा गदारोळ उसळून गेला. मनावरचा जडभार सैल झाला. एकदम हास्यविनोदाची कारंजी फुलली. आणि मग एकनाथांच्या रुक्मिणी स्वयंवरातील,

**रेवती म्हणे जी यादवा । आधि घ्या ईचीया नांवा ।**
**हळदी मग ईसी लावा । देवाधिदेवा श्रीकृष्णा ।।**

हा आधार घेत अशा गोष्टी अनेक वर्षे चालल्या असाव्यात याची आवर्जून नोंद घेतली गेली. पति-पत्नींमधील संबंध आणखीनच सुखावले. आणि नाव घे म्हटल्याबरोबर 'नाटकांत नाटक सुभद्राहरण × × × रावांच्या नावाचं आज काय कारण' असं डोळे वटारीत दटावणारी रंभा हौसेमौजेनं राजीखुषीनं सांगून मोकळी झाली की,

'पंढरीच्या देवळाला सोन्याचा कळस × × × रावांचं नाव घ्यायला मला नाही आळस.'

अशा वेळी, 'आत्तीसाब मायाच्या, मामासाब प्रेमाचे, बाईसाब सुगरीण, दिरभाऊजी हौशी × × × रावांचं नाव घेते हळदीकुंकवाच्या दिवशी' हे सुख सांगणारी मैना अवचितच सासुरवासाची आठवण आल्यामुळं एकदम कोमेजून गेली. तिच्या लग्नाच्या वेळी कुणी तरी उडवून दिलेला,

'आला आला रुखवत, दनानलं जोतं, आत उघडून बगतीया तर साखरेचं पोतं.'

हा दणका तिच्या कानात घुमला. पण त्याच वेळी अधल्यामधल्यांनी याच सुखाचा विचका करीत,

'आला आला रुखवत, रुखवतात गाजराचा पाला, दीड दिवस झाला न्हाई सजूरी देऊन तर एवढ्यात कशाला आला?'

असली भाषा करून रंगाचा बेरंग उभा केल्याची आठवण तिच्या मनात ताजी घोळली. या माणसांनी असं करायचंच नाही असं तिच्या माहेरच्या-प्रमाणं अजूनही तिला वाटतं. त्याकारणानं रुखवताचा डामडौल कितीही केला होता तरी त्या दिवशीचं रुसणं फुगणं न् उणंदुणं बोलणं झाल्यावर उखाळ्या-पाखाळ्यांना ऊत येऊ देत केलेली,

'कोरी तवली कुंभाराची, विहीन बोलं टचकाऱ्याची, चितांगाचा फासा, विहिनीला दात घासायला अख्खी तुळी तासा, विहिनीबाई पलंगावर बसा, व्याह्यांनी विहीन घेतली कडेला, नेली हलवायाच्या पेढीला, तिथं बांधले जिलेबीचे पुडे, विहीन फुंदूफुंदू रडे, मला तिकडेच न्या म्हणे . . . व्याह्यांनी मग विहीन नेली आंब्याच्या बनी, तिथं आंथरला गंजीखाना, विहिनीच्या व्याही आला मना, बसायला दिला पाट, तोंड धुवायला दिलं घंगाळ, आता मातूर विहीन कडाडली की, व्याही हाई लई वंगाळ.' ही टोलेजंग बोलणी आणखी होऊ देत असं तिच्या मनानं घेतलं. तेवढ्यात कुणी तरी त्यावेळी मध्येच केलेली,

'समोरच्या कोनाड्यात ठेवलं फूलपात्र, नवरी आहे नक्षत्र पण नवरा मिळाला मेषपात्र' ही फोडणी देणारी भाषा लक्षात येऊन तिचा जीव काहीसा सुखावला. आपल्या बाळपणी चारचौघी मैत्रिणींच्या घोळक्यात आपण मोठ्या ऐटीनं फुगडी खेळताना जातं घालीत ठसक्यानं घातलेला,

'तुझ्या घरी माझ्या घरी आहे बिंदली सरी न् फुगडी खेळताना बाई नको तालेवारी' हा उखाणा तापल्या तव्यात लाही फुटल्यागत तिच्या ओठांवर

खेळला. मग तिला आणखी हलकं हलकं वाटलं. अशा वेळी काही तरी पोटभर बोलून मोकळं व्हावं असं तिला मनापासून वाटू लागलं, म्हणून एकांत गाठून ती आपल्याशीच बोलत सुटली. जात्या देवाला ईश्वर मानून तिनं त्याच्यापुढं आपलं मन मोकळं केलं. कसलीही भाडभीड मनात न आणताना सुचेल ते पोटभर बोलून घ्यायचा डाव तिनं साधला. त्यासाठी आपल्या घरच्या कित्येक डुयांनी मुक्त कंठानं गायिलेल्या ओव्या तिच्याही ओठावर तरंगल्या. जात्याच्या सुरात आपला सूर मिसळून घेत तिनं ही गीतं गायिली. तिच्या घरात मग भल्या पहाटेला, तिनीसांजेला, फावल्या वेळेला, दळपातले पारवे घुमू लागले.

त्यावेळी आपल्या चोळीच्या बाहीला, पायातल्या जोडव्याला, हातातल्या बांगडीला, कानातल्या झुब्याला, पाठीवरच्या वेणीच्या गोंडयाला आणि कुंकवाच्या करंडयाला दीड दीड लाख मोती गुंफणाऱ्या केशीराजाच्या रुक्मिणीगत त्यांनी स्वतःला मनोमनी सजवलं. फुलांची कवलं घातलेल्या घराच्या कवाडातून आपल्या मनमोराला खुशाल झेपावत उघडचा आभाळात सोडून दिलं आणि

**उगवला नारायण पिवळ्या झाल्या भिंती**
**हळदीकुंकवाला औक मागाया उभी होती**
**उगवला नारायण माज्या वाडयाला येऊयीनी**
**बाळराजाच्या आयुक्षाची देतो पत्रिका लिहूयीनी**
**सकाळच्या पारी हात माजा ग जुंधळयात**
**देव नारायण उगवले कंबळात**

या समाधानाचा आस्वाद घेत त्यांनी आपला कंठ मोकळा केला. धारदार आवाजानं नाना कळा उभे करणारे स्वर आळविले. हृदयाची भाषा करणाऱ्या भावभावनांचे आपल्याच कल्पनेवर गिलावे चढविले. जन्मोजन्मींच्या भावनाविष्कारानं साजिवंत झालेला अमृतकुंभ रिता होऊ दिला. नेत्रीचे अंजन घेऊन, हाताची लेखणी करून आणि काळजाची घडी उलगडून त्यावर त्यांनी आपल्या सुखदुःखांची पत्रिका मांडली. देवळाच्या सभामंडपातील मध्यभागी फुलांच्या पायघडीवर हरिकीर्तन चालावं आणि सामोरे गाभाऱ्यातील नंदादीप पाजळल्याकारणानं सोन्याच्या उजेडातील प्रकाशानं मन समाधानानं पावावं तशापैकी

लक्ष लक्ष मोती आपल्या कुंकवाच्या करंड्यात साठविणाऱ्या सख्या साजणींनी मनसोक्त ओवी गायिली.

**माझे तान्हे बाळ देवाचे मंगल**
**अमृताचे फळ संसाराचे**
**अंथरूण केले जाई मोगऱ्याचे**
**सख्या गोजिऱ्याचे अंग मऊ**
**आकाशात तारे त्यांचे ओठ का हालती**
**संगीत गाणी गाती बाळराजा**

आपल्या बाळराजाबद्दल अशा भावना प्रकट केल्या. नेत्रांचा दिवा, दंडांचा पाळणा आणि मांडीचा चौरंग त्याच्यासाठी उभा करून आपल्या सहस्रधारांनी त्याची भूक भागविणाऱ्या आईनं बाळाला पालखात निजवून अंगाई म्हटली. त्यावेळी आपला बाळ भगवान श्रीकृष्णासारखा व्हावा म्हणून गोकुळातील बाळलीलांची पारायणं करीत आपलं साजिरं गोजिरं वाढविलं. इंद्रसभेचे सोनार बोलावून घेत त्याच्यासाठी बाळलेणी घडविली! आणि

**पालख पाळणा मोत्यांचा खेळणा**
**जोजविते आत बाई लाडका चिमणा**
**शिंपांचा मळा बाई स्वातीनं शिंपला**
**मोती मोती टिपुन तुझ्या छताला गुंफीला**
**सागर सांडूनी माणिक धुंडूनी**
**चंद्रसूर्य जडविले इवल्याशा गगनी**

हे वैभव अनुभवावं म्हटलं. हत्तिणी दातांचा पालख, राघूमैनांचा खेळणा, मऊ रेशमी गादी, जरतारी लोड हे सारं बाळराजासाठी आणून हौस भागविण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी आईची माया पान्हावली आणि काया सुखावली. रत्नदीपांच्या तोलाच्या आपल्या नेत्रांनी तिनं हा ऐश्वर्याचा सागर न्याहाळीत दिव्यानंदानं रोमांचित होणाऱ्या स्वतःला तुझ्यासारखी सुखी तूच म्हटलं! . . . अशा वेळी ह्या आईनं आपल्याशीच गुजगोष्टी करताना कानीचा झुबा हलू दिला. सोन्याचा लिंबू अंबाबाईच्या कळसाला वाहिला. देवीच्या अठरा भुजांची काचोळी शिवली, सर्पाचा कासरा हाती घेतला आणि गाडीला वाघ-सिंह

जुंपीत या बाळासह देवदर्शनाला जायचा विचार केला. ते बघून मेघाजींच्या दारी ढगांचा डफ वाजला आणि सूर्यासमोर दिलेल्या डेऱ्यातून बाहेर पडणारे पाऊस पाव्हणे दारी आले. त्या मोत्यापोवळ्यांच्या जलधारांनी हिची पायघडी सजविली आणि हिच्या बाळाच्या पंक्तीला दुधातुपाच्या न्याहारीचे वेळी उगवता नारायण आवर्जून आला !

पण बाळाचं कवतिक एकटीनं करून होतं का कधी कुठं ? आकाशी चंग लावून सोडलेल्या वावडीच्या (पतंगाच्या) कारणानं मामारायांची नगरी वेढली जाते याची आठवण मनात डोकावताच लोकांच्या घरचं आपल्याही घरी होऊदे म्हणून तिनं आपल्या माहेरच्या चंद्राला सांगावा दिला. लहानपणी तिची आई या बहीणभावांच्याबद्दल असंच म्हणायची ते तिच्या मनात घोळलं. जाई मोगऱ्याच्या उपमा दृष्टांतांनी परवंटी साडीतील या साळूला आणि भुईला शेमला लोळवीत विटीदांडू खेळतेल्या राघूला आपल्या आईनं आपलंही बाळपण आठवीत कसं झोकात वाढवलं हे तिच्या ध्यानात घुसळून उठलं. म्हणून मग गंगेच्या पाण्यापरी पवित्रता धारण करणाऱ्या या चाफाचंदनाच्या एकी तिनं कोणताही स्वार्थ मनात ठेवून बोलावणं केलेलं नाही याची साक्ष देण्याची खटपट केली.

**नको धन नको मुद्रा, नको मोतीयांचे हार**
**देई प्रेमाश्रूंची धार भाईराया**
**माझ्या ग दारावरनं शीतळ वारा गेला**
**सुखी मी आईकिला भाईराया**

होता होता मग हा सुखाचा सागर रुणझुणत्या पाखरांचा सांगावा ऐकून आपल्या चिरेबंदी वाड्याच्या कमानी दरवाजातून बाहेर पडला. एवढंच नव्हे तर अंजिरी चोळीचा खण खिशात घालून,

**गहू हरभऱ्याच्या गाड्या कशा येशीत थटल्या**
**सावळ्या बंधुजीनं दंडभुजांनी रेटील्या**

हा रघुनाथ आपल्या पागेतील शेलक्या वारूवर स्वार होऊन निघाला. आणि बोला फुलाला गाठ पडावी त्याप्रमाणे ह्या सखुबाईनं,

**बंधुजी पावयीना शेजी म्हणती कोण राजा**
**हिरवा मंदील तुरा ताजा**

या सुखाचा अनुभव घेतला. एका शिंपल्यातले मोती भेटले. सुखदु:खाच्या गोष्टी उकलल्या. आईवडिलांची सय निघाली. विचारपूस झाली. बाप्पाजी दयाळांच्या आणि गोंदण मालणीच्या आठवणीनं ऊर दाटून आला. बहिणीनं भावाला बजावलं,

**बाप्पाजी समींदर बया मालन व्हाती गंगा**
**दोगांच्या सावलीत कर आंगूळ शिरीरंगा**

आणि स्वत:च्याही कल्पनेला त्यातच सुस्नात हो म्हटलं,

**अंतरीची गोष्ट सये हुरदी साठविली**
**बया मालनी वाचुयीनी कोण काडील त्येची किल्ली**
**जिवाला माझ्या जड कसं कळालं माझ्या बापा**
**अंगणी होता चाफा कळचा पडती झपाझपा**

या अनुभवाची बेरीज त्यावेळी मांडली. चुकलंमाकलं सारं वजाबाकीत जमा झालं. उरीपोटी दाटलेला उमाळा या तीर्थाच्या सागराच्या चरणी समर्पित केला गेला. आणि मग,

**सासर एवडा वस नका करूसा सासूबाई**
**दारीच्या चाफ्यापाई दूर देशाची आली जाई**
**बंधुजी विचारीतो भैना सासुरवास कसा**
**चिताकाचा फासा गळी रुतावा जसा**
**बरम्या लिवून गेला तसा**
**आंब्याच्या सावलीत कोयाळ बोले राधा**
**घरी उतरंडी आगाशी उपाशी गेले दादा**

सासुरवासाच्या जाचाकाचानं कोपरापर्यंत गेलेली काकणं लक्षात येताच ही मखमल न् हा चाफा पार कोमेजून गेले. इथे शब्द थिटे पडले आणि भावना अबोल ठरली. अनुभवाला प्राधान्य मिळालं आणि समजुतीनं घेत मिळतं जुळतं ठेवीत नागाचा फूत्कार टाकणाऱ्या राजविलासी केवड्याला सांभाळलंच पाहिजे या कुळाचारानं मान वर काढली. काय वाटेल ते असलं तरी,

**रुसली रुक्मीन ती ग बसली खिडकीत**
**पिरतीचा पांडुरंग सारी पंढरी हुडकीत**

**रुसली रुक्मीन देवाजवळी बसायीना**
**अबीर बुक्क्याची गर्दी नारीला सोसयीना**
**रुसली रुक्मीन जाऊन बसली वाळवंटी**
**विठ्ठल देव बोलं जनजत्रा दोघांसाठी**

असली शोभा होऊ द्यायची नाही किंवा,

**एवड्या वनामंदी कोन रडतं आईका**
**सीताला समजाया बोरी बाभळी बायका**
**सीताबाई रडे हात लावूनी कपाळाला**
**तापले डोंगर खडे रुतती पायाला**
**सीता वनवासी दगडाची केली उशी**
**बोरी या बाभळी गोष्ट सांगती तिच्यापाशी**

अशी वेळही येऊ द्यायची नाही या इभ्रतीच्या पायावर आधारलेल्या निष्ठेनं, जिम्मेदारीनं आणि ईर्षेनं मग ठाण मांडलं. सोसता येईल तेवढं सोसलंच पाहिजे त्या वस्तुस्थितीनं दिलासा दिला गेला आणि

**सकाळी उठूनी हात सूर्याला जोडीते**
**चुड्याला चंद्रबळ औक बंधूला मागीते**

या कल्पनेनं गाडी रुळावर आणली. त्यामुळं रागलोभ आपले आपल्याला लखलाभ या समजुतीनं आयाबायांच्या घोळक्यात असताना आपण नेहमीच,

**थोरलं माजं घर हंड्या गल्लास लोंबत्याती**
**सासूबाईचं बाळराज धनी वाड्याला सोबत्याती**
**गोड भरतारायाचं सुख सये सांगता येता जाता**
**भर दिवसा डोलला ग वर सूरव्या पाणी पिता**
**माळ्याच्या मळ्यामंदी केळी नारळी जावा जावा**
**मधी गुलाबा तुझी हवा वास घेणार गेले गावा**

अशी बोलणी केली पाहिजेत न् आपला आब आपणच राखला पाहिजे ही मायमाउलीची शिकवण ध्यानीमनी गुंजारत राहिली. त्याचा परिणाम चांगला होऊ शकला. कधीमधी सुखाच्या राशीवर उभं रहात शिणगारलेलं मन एकदम गालात हसलं, आणि—

**हिरव्या चोळीनं दंड करीतो रसारसा**
**हावशा कांतानं छंद पुरवीला व्हावा तसा**

या मुग्ध शृंगारानं वातावरणात फरक उभा केला. मनी दाटदुटलेल्या दु:खावेगानं माघार घेतली. सुखाचा पानमळा पुढ्यात आला,

**भरल्या बाजारात उच्च किनाऱ्यामंदी पेरू**
**साऱ्या गोतात पिता थोरू**

या कुळशीलाच्या सौभाग्यानं समाधानानं हुंकार घातला,

**जावई राजईसू परसदारीचा मोगयीरा**
**माजी ती बाळीबाई जाई गुतली पदयीरा**

ही भावना असूदे असूदे म्हणत समजुतीनं घे म्हणाली त्यातच सारं काही आलं.

दळण कांडण करताना, झोपाळ्यावर बसताना, बाळाला निजवताना ओव्या गात जिवाला हुशारी आणायची ही कल्पना तशी फार जुनी आहे. चालुक्य वंशीय राजा सोमेश्वर ह्यानं शके १०५१ मध्ये लिहिलेल्या 'मानसोल्लास अथवा अभिलाषितार्थ चिंतामणी' या ग्रंथात महाराष्ट्रीय स्त्रिया कांडताना ओव्या गातात असं म्हटलं आहे. या ओव्या देशी भाषेतील आहेत, जनमनोहर आहेत. त्यांनी विविध छंद धारण केलेले आहेत. आपलं मन तिच्यातून प्रकट करताना जे काही उरलं सुरलं असेल ते आमच्या स्त्रियांनी सणासुदीच्या अगर संस्काराच्या मंगल प्रसंगी गायिल्या जाणाऱ्या गीतांतून सांगून टाकलं आहे. त्यासाठी चांगल्या सुरावटी वापरल्या आहेत. चित्ताकर्षक कथानकं निवडली आहेत. निरनिराळे खेळ खेळले आहेत. धावते प्रसंग टिपले आहेत. ओघवती आणि ठसकेबाज भाषा स्वीकारली आहे. रंगभूमीसाठी अंगणाचं व्यासपीठ तयार केलं आहे.

**वाजे चौघडा रुणझुण**
**आला ग हादगा पावणा**
**दारी तुळस दवणा**
**जाईजुई शेवंती दुपारी**
**फुले ग नाना परी**

**हार गुंफीते कुसरी**
**वहाते मी हादग्यापरी**
**हादगा देव मी पूजीते**
**लवंगा सुपाऱ्या वेल-दोडे**
**करून ठेवले विडे**
**आणखीन् दुधातले दुधपेढे**
**वहाते मी हादग्यापुढे**
**हादगा देव मी पूजीते**

पश्चिम महाराष्ट्रात लोकप्रिय असलेल्या हादग्याचं अगर भोंडल्याचं हे एक गीत आहे. खास लहान लहान मुलीबाळींनी हस्त नक्षत्राची पूजा बांधताना म्हणावयाची अशी कित्येक गाणी आहेत. चढत्या श्रेणीनं रोज ती म्हणावयाची असतात. घरोघरी जाऊन व फेर धरून ही गाणी एकीनं अगर दोघींनी अशी सांगावयाची व इतरांनी गोलाकार फिरत ती म्हणावयाची अशी पद्धत आहे. अशा वेळी पाटावर रांगोळीनं काढलेला हत्ती मध्य भागी ठेवण्यात येतो व आमोरासमोर तोंडात माळ घेऊन उभ्या असलेल्या दोन हत्तींचं चित्र भिंतीवर टांगून त्याला फळाफुलांच्या माळांनी सजविलेलं असतं. यावेळी म्हटल्या जाणाऱ्या गीतांचे विषय सासर-माहेर, हौसमौज, संसार, सुग्रीणपणा इत्यादी विविध प्रकारचे असतात. हादग्यादेवाच्या पूजेच्या मागं नव्या वर्षाचं मांगल्य घरी येवो, घराला सधनता प्राप्त होवो, सर्वत्र सुखसमाधान नांदो व म्हणून वरुणदेवाची पूजा होवो अशी कल्पना असते. गाणी संपल्यानंतर सहजासहजी कोणालाही ओळखू येऊ नये असा खिरापतीचा बेत असला म्हणजे खूप मजा येते.

नागपूर भागामध्ये याच वेळी भुलाबाईची पूजा होते. भुलाबाई म्हणजे देवी पार्वती. शिवशक्तीची उपासना व्हावी हा या पूजेच्या मागचा हेतू असतो. यावेळी देवीची सजावट चांगली करतात व निरनिराळी गाणीही म्हटली जातात. त्यावेळीही फेर धरला जातो. मात्र स्त्रीजीवनात येणाऱ्या नृत्य-गीतांची खरी लयलूट होते ती श्रावणातील मंगळागौरीच्या, नागपंचमीच्या व भाद्र्यातील महालक्ष्मीच्या पूजेच्या वेळी. या दिवसांतील रात्री खेळगाण्यांनी धुंद होऊन जातात. फुगडी, झिम्मा, लाटणी, घागर, सूप असे हरतऱ्हेचे खेळ अविश्रांत

खेळले जातात. फेर धरले जातात. गाणी गायिली जातात. त्यावेळी गरीब-श्रीमंत हा भेद सहसा रहात नाही. त्याचप्रमाणे वयाच्या हिशोबाचीही गरज निर्माण होत नाही. ज्यांना गाणी येतात त्या आणि ज्या खेळू शकतात अशा सगळ्याजणी या जनजागरणामध्ये हौसेनं भाग घेतात. काही काही गाणी व खेळही जेव्हा प्रश्नोत्तरांचं रूप धारण करतात तेव्हा खूपच मजा येते.

जुन्या काळी मुलींची लग्नं अगदी लहान वयात होत असल्यामुळं निरनिराळ्या खेळांच्या निमित्तानं म्हटल्या जाणाऱ्या गीतांतून सासर-माहेरमधील फरक फारच बहारीनं बोलून दाखविण्यात आलेला आहे. इथं सासरची माणसं माहेरी धाडीत नाहीत आणि खेळायला पाठवीत नाहीत म्हणून द्वाड मानली गेली आहेत आणि माहेरात ते नेमकं होतं म्हणून माहेर गोड ठरलेलं आहे! त्यामुळं या गाण्यांसाठी आलेली परंपरागत स्वररचना आणि खेळण्याची ठराविक पद्धत यामुळं निर्माण होणारा ताल फारच श्रवणीय व प्रेक्षणीय ठरला आहे.

**अंगणी उभी होते मी . . . हूं हूं . . .**
**तिकडून आले मामाजी . . . हूं हूं . . .**
**गुरगुर करीती मला जी . . . हूं हूं . . .**
**आई आंबाबाई पाव ग मला न्**
**आंधळा करावा याला जी . . . हूं हूं . . .**

झिम्मा घालते वेळी या रीतीनं म्हटलेलं हे गाणं सासरच्या इतर सगळ्या नातलगांचा निकाल लावीत शेवटी पतिदेवांशी मात्र ठीक वागणं भाग आहे या कल्पनेनं संपतं! अशा वेळी खूप हशा पिकतो आणि मग याच प्रकारची अशी अनेक गीतं तोंड वर काढीत पुढं येत गेल्यानं आपण किती वेळ खेळलो याचं भानही कुणाला उरत नाही! झिम्म्याच्या शेवटी लय वाढवीत गीत संपवून घुमणारा पिंगा तर फारच बहारदार असतो. चवळीच्या शेंगेगत खेळणाऱ्या बाईचं अंग लवतं जसं!

**कारल्याचं आळं लाव ग जू**
**मग जा तू तुपल्या माहेरा**
**कारल्याचं आळं लावलं वो फुईजो**
**बंधु आले न्यायजी**
**मी जाते मपल्या माहेरा . . .**

या गीतात कारल्याचं बी पेरल्यापासून तो थेट कारल्याची भाजी खाऊन होस्तोवर माहेरी जायला सासू परवानगी देत नसल्यानं चिडाचीड होते खरी पण मग तसं तोंडावर दिसून चालत नाही. म्हणून झिम्मा संपल्यानंतर सायंकाळच्या दिवसानं कोमेजावं तसं काहीसं घटकाभर होतं आणि खेळताना हे सगळं सोडून द्यायची भाषा होते. मात्र माहेरचं वैभव अशा वेळी धा धावून येतेल्या पावसाच्या सरीगत आळविलं जातं व समाधानाचा सुस्कारा टाकला जातो. कधीकधी तर,

**लाडक लेकी लाडक लेकी**
**साखळच्या लेवून जाय ग**
**आता लेवू माय कशी**
**शंकर गेला दूर ग**
**शंकर पुशी की म्हादेव पुशी की**
**लवलकीचा हार ग**
**चमेलीच्या झाडाखाली**
**फुलांचा भडीमार ग**

हे गाणं या धांदलीत असं ठेका धरतं आणि असं खुलतं की, जणू काय खरंच शंकर दारी उभा आहे आणि पार्वती तिच्या आईसमोर भांवावून गेली आहे याचं साक्षात दर्शन घडावं!

**गवरी ग बाई जागरान तुझं**
**जागता जागता पडल्या झापाडी**
**एवढ्या निजेची पिरत केवडी**
**सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी**
**नारळीच्या गोण्या झोकील्या अंगणी**
**सुपारीच्या गोण्या लुटील्या अंगणी**
**हळदीच्या गोण्या झोकील्या अंगणी**

गौर जागवताना वस्त्रगाळ केलेली राख पालथ्या परातीच्या पाठीवर पसरून त्यावरून डावीचा व रवीचा दांडा फिरवीत त्यायोगे श्रवणमधुर नाद उभा करून म्हटलं जाणारं हे गीत ऐकण्याजोगं असतं याची कल्पना हा प्रत्यक्ष अनुभव

घेतल्याखेरीज येणं कठीण आहे. म्हणून ज्या घरी अशी खेळ-गाणी चालतात त्या घरी लहान मोठ्या प्रेक्षकांची धमाल उडून जाते. त्यामुळं—

**तू रडतेस का गे बहिणी**
**तुला काय केले कोणी**
**तुला काय सांगू दादा**
**माझी घागर गेली बुडूनी**
**माझी नथ घे रे दादा**
**माझी घागर दे काढुनी**
**तुझी नथ नको गे बहिणी**
**तुझी घागर गेली बुडूनी**
**माझा चंद्रहार घे रे दादा**
**माझी घागर दे काढुनी**
**तुझा चंद्रहार नको गे बहिणी**
**तुझी घागर गेली बुडूनी**

(सर्व दागिने या रीतीने गोवीत हे गीत असेच लांवते.)

**माझे काळीज घे रे दादा**
**माझी घागर दे काढुनी**
**तुझे काळीज नको गे बहिणी**
**तुझी घागर देतो काढुनी**

मंगळागौरीच्या जागरणातील हे गीत संपता संपता काळजाचा ठाव घेतं आणि प्रेक्षकही आपला स्वर त्यात मिसळून देताना लक्षात येतात. त्याकारणानं अशा वेळी नादब्रह्मात विलीन होणारा आनंद कशा प्रकारचा असतो त्याची कल्पनाही केवळ अशा सांगण्यानं येणार नाही. त्यासाठी तिथंच गेलं पाहिजे, खेळलं पाहिजे, सर्वांच्या बरोबर गायलंही पाहिजे.

फेराची गाणीदेखील अशीच चटका लावून सोडणारी आहेत. एकेक ओळ दोन-दोनदा सांगायची आणि त्या ओळींची पुनरावृत्तीही तितक्याच वेळा व्हायची अशातला हा प्रकार असतो. पण कथानक धावतं रहातं व कथाभाग पौराणिक असतो म्हणून गाणं कितीही लांवलं तरी कंटाळा

येत नाही. अशा गीतांमधून प्रामुख्यानं भगवान श्रीकृष्णाच्या बाळलीला वर्णिलेल्या असतात आणि सासुरवासानं गांजलेल्या सासुरवाशिणींची हकिगत आलेली असते.

जोगवा अगर भिक्षा मागण्याच्या निमित्तानं दारी येणाऱ्या कोकेवाल्यांकडूनही अशी कथा-गीतं पुष्कळच ऐकायला मिळतात. त्यांपैकी उदाहरणादाखल म्हणून एक असं गीत—

**दोन पार रात रं झाली**
**स्वारी विठ्ठला तुझी आली**
**देव गेला जनीच्या म्हाली**
**जनाई म्हणून हाक दिली**
**जनाई आलो तुझ्यासाठी**
**जेवाय वाढावं विठ्ठलासी**
**जनाई गेली घरामंदी**
**कण्याकोंड्याचा केला मांडा**
**जेवा जेवा पांडुरंगा**
**दुबळ्या लेकीची लाज राखा**
**जनाई जेवलो तूपरोटी**
**जना झोप लागली मोठी**
**तीन पार रात देवा गमली**
**एक पार रात देवा उरली**
**नऊ लाखाचा हार पितांबर**
**ठेवला जनीच्या वाकळेवर**
**फाटकी वाकळ घेतली**
**देव गेला राऊळासी**
**दिवस उगवूनी रामपार झाला**
**आले बडवे पुंजायाला**
**देवा अलंकार करता**
**वाकळ अंगाव दिसली**

देवा दशा कुणी ही केली
दादा चोरी कशी झाली
पंढरीची गोपाळ पुरीची
झडती सव्र्यांनी घेतीली
देवाचा शालू तिथं न्हाई
सर्व्ये गेले जनाईच्या घरी
अग अग तू जनाई
चोरी देवाची केली कायी
देवाची चोरी न्हाई केली
शपथ विठ्ठलाची घेतली
जनाई घरची झडती घेतीली
वाकळ शालू तिथं घावला
देवा जनाई चोरटी
साऱ्या गावची तरा उफराटी
रांडा रंडक्या देवा तुज्या झाल्या
रशा बांधल्या दंडाला
मार देत्याती पाठीला
चंद्रभागेला सूळ रोविला
सुमरान इठ्ठलाचं केलं
तीन तुकडं फासाचं झालं
दुसरा फासा जनी लावीला
धावा विठ्ठलाचा तिनं केला
झाला वर जाळ फासाचा
तिनव्यानं फासा लावीला
जनी विनवी देवाला
फासाचं झालंया पाणी
जनाई उतरली खाली
विठ्ठलाची भक्ति तिनं केली

**गाव लोक चरणी लागिली**
**साडीचोळी म्हायार केलं**
**मोत्या पवळ्यांनी वटी भरिली**
**जनाई माघारी चालली**

अशा विविध प्रकारच्या गाण्यांमधून सारे रस मर्यादेनं वावरताना दिसून येतात. पण त्यातल्या त्यात भक्तिरसाची व शृंगाराची चढती कमान झालेली आढळून येते. त्याचप्रमाणं कधीकधी या गीतांचेमधून वत्सलता फुललेली दिसून येते तर कधीकधी कारुण्यानं मानवी मन काजळून गेलेलं पहायला मिळतं. कधी-कधी रागलोभ उसळलेले आढळून येतात तर अधूनमधून विनोदाचीही पखरण झालेली असते. माणसाच्या मनात येणाऱ्या सगळ्या बऱ्यावाईट भावभावनांचा फुलोरा इथं फुललेला असतो म्हणून ही प्रासंगिक गीतांची दुनिया आगळी ठरते, ऐकण्याजोगी असते. त्याकारणानं,

**यावे नाचत गौरीबाळा**
**हाती घेऊनी पुष्पांच्या माळा**
**सर्व ठायी मी वंदितो तुला**
**यावे नाचत गौरीबाळा**
**साही शास्त्रे अठरा पुराण**
**तुझ्यापासून झाले निर्माण**
**चार वेद हाती वेळोवेळा**
**यावे नाचत गौरीबाळा. . .**

कोकणातील पुरुष मंडळींच्याकडून कोकणी नाचाचे वेळी आपल्या सन्माना-साठी म्हणून गणपतीला यायला आवाहन करीत म्हटल्या जाणाऱ्या या गीताची जशी अपूर्वाई वाटते तशीच,

**सुंबरानं मांडीलं**
**बिरू त्या गा देवाचं. . .**

साताऱ्याकडील धनगरांच्या गजानाचाच्या वेळी आळविल्या जाणाऱ्या बिरूबादेवासंबंधीच्या प्रीतिगीताची ही चव आगळीच ठरून जाते. विशेषत: वेष बदलून प्रेयसीच्या शोधाला निघणारे देवाधिदेव आणि त्यांनी जंगलातील

रंगीबेरंगी फुलांचे विणलेले शालूशेले घेऊन जात आपल्या राणीची केलेली मनधरणी फारच चित्ताकर्षक असते. म्हणून पुरुषांकडून गायिली जाणारी अशा प्रकारची लोकगीतं आणखीनच वेगळं जग निर्माण करतात आणि मग गावोगावच्या आदिवासींच्या, शेतकऱ्यांच्या, कोळ्यांच्या आणि मागासल्या भागाच्या थव्यांतील नृत्यगीते संस्मरणीय ठरतात. अशा वेळी अत्यंत पुढारलेल्या व भारी शिक्षण घेतलेल्या कर्त्या माणसांनाही ही माणसं कुठं रहात असतील, काय खात असतील, कसलं जीवन जगत असतील यांबद्दल अचंबा वाटू लागतो. कारण त्यांची राहणी साधी असते. धार्मिक भावना बलवत्तर झालेली असते. श्रद्धा निष्ठावान ठरलेली असते. असेल त्यात भागवावं आणि नसेल त्याची फिकीर करू नये हा त्यांचा स्वभावही बनून गेलेला असतो. त्यामुळं,

**चांदणारी चांदणा टिपरुस चांदणा**
**निर्मळ अंगणा . . .**

या दिमाखानं डांग भागात घातली जाणारी भलरी शहाण्यासुर्त्यालाही विचार करायला तर लावतेच लावते पण या गीतातील भूभागावर येऊन जनलोकांच्या बरोबर नृत्य करणारे चंद्रसूर्य, त्यांचं गदाळलेलं शरीर, त्यांच्या स्नानासाठी निर्माण होणारा दूधसागर इत्यादी गोष्टी अशा काय भूल पाडतात की, घटकाभर आपली मती चालूच नये!

तर असल्या माणसांना धुंडाळीत मराठी मुलखातील गावं फिरत रहायची आणि त्यांच्या सवडीनं, त्यांच्या लहरीनं लोकसाहित्यातील काही पदरी पाडून घ्यायचं म्हणजे जिवाचा दांडगा आटापिटा होतो. स्वतःला विसरून वागावं लागतं. स्थळकाळाचं भान सोडावं लागतं. त्यांच्याशी एकजीव होत जगावं लागतं. त्यांच्याबरोबरीनं त्यांच्या कामाला हात लावावा लागतो. दंडबाह्या दुखस्तोवर दळणकांडण उरकावं लागतं. त्यांच्या सुरात सूर मिसळावा लागतो. त्यांच्यापैकीच एक व्हावं लागतं तेव्हा कुठं काही पदरात पडतं. कंटाळून भागत नाही. अडचणी सांगून चालत नाही. सगळं कसं नेट धरून हुशारीनं घ्यावं लागतं. कधीमधी वैताग आला तरी मूग गिळून गप्प रहावं लागतं आणि तेदेखील चेहऱ्यावर त्यातली एकही रेघ उमटणार नाही या बेतानं! म्हणून उपाशीतापाशी रहात, ऊनवारा खात, पाऊस-वादळं झेलीत, गावशिवांच्या पाणंदी तुडवीत आणि कडेकपारीतील

जंगलं पायाखाली येऊदेत स्नेहभावाला सोबतीला घेऊन पाय मोडस्तोवर भटकावं लागलं तरी सगळं सोसावं लागतं. उल्हासानं रहावं लागतं. तेव्हा कुठं,

**व्हलय रे नाखवा व्हलय रे ऽऽ**
**दर्यात मचवा झुलताय लाडके**
**सावला दीर तुझा येतांय गो ऽऽ**

सागर किनारीवरील ही गंमत अनुभवायला गवसते! सावळ्या दिरानं चिडविलेल्या नव्या नवरीच्या लाजऱ्या धांदलीची सुखद चित्रं टिपता येतात. अशा वेळी,

**आठशे खिडक्या नऊशे दार**
**कोण्या दरिवाजानं गेली गो नार**

अशा नखऱ्यानं आपलं मन भिरभिरतं . . . आणि

**पहिली माझी ओवी वहिला काळा दोरा**
**लिहिणाराचा हात गोरा राजबिंडा**

लोकगीतं देणाऱ्यांच्या मनातील या भावनेची जिम्मेदारी पत्करावी लागते. शिवाय त्यांनी दिलेलं टिपून घेत त्यांनाच वाचून दाखविताना,

**पोथी पुस्तक वाचताना बाई कानीचा डूल हाले**
**सावळा बाळराज सये कागदासंगं बोले**

हा डामडौलही सांभाळावा लागतो! त्यांच्या खात्रीला उतरावं लागतं! त्या परीक्षेत वरच्या क्रमांकानं पास व्हावं हाच मग आमच्याएकी कुळाचार ठरतो व या कुळाचाराशी इमानदारी ठेवीत जगणं आम्ही आमचं भाग्य समजतो!

■ ■ ■



# खेळ आणि गाणी

**माणसाला** खूप आनंद झाला म्हणजे त्या आनंदाचा आविष्कार त्याच्या बोलण्यामधून जसा प्रकट होतो, तसाच तो त्या वेळच्या त्याच्या शारीरिक हालचालींमधूनही व्यक्त होत असतो. एखाद्या लहान मुलाप्रमाणे वयस्कर माणूसही अशा वेळी मनमुराद नाचतो आणि आपल्या समाधानाला मोकळे सोडून देतो. त्याला वयाचे भान रहात नाही. खूप खेळावेसे वाटते. केवळ शरीराला व्यायाम घडेल आणि स्नायू पीळदार होतील म्हणून नव्हे, तर मनालाही विरंगुळा मिळावा म्हणून! इथे मनाचे समाधान हे पहिले. त्यामुळेच कामाचा तगादा मागे नसला म्हणजे मग माणूस फावल्या वेळी गायला आणि नाचायला उत्सुक असतो. अशा वेळी त्यालाही नकळत त्याच्या गळ्यातून गोड लकेर निघते आणि हातपाय त्या आवाजाप्रमाणे हालू लागतात. मन नाचू लागते. भावना खेळू लागते. आनंदाने शरीर आणि मनही जणू बेभान होऊन जाते. अशा वेळी स्थळकाळाचे भान म्हणून रहात नाही.

महाराष्ट्राच्या रानावनांतून, दऱ्याखोऱ्यांतून आणि खेड्यापाड्यांतून रहाणाऱ्या मंडळींना आपल्या कामातून सवड मिळताच रात्रीच्या वेळी मनमुराद नाचावेसे वाटते. दिवसभराचे, वर्षभराचेही म्हणूया पाहिजे तर, श्रम विसरता

यावेत आणि नव्या दमाने पुन्हा कामाला लागता यावे, म्हणून लोकगीतांच्या मोहक पार्श्वभूमीवर नाचतानाही माणसे बेभान होऊन जातात. पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेली लोकनृत्ये पुन्हा करून दाखवताना व त्यांमधील आनंद स्वत: उपभोगताना माणसाला विलक्षण समाधान वाटते. सामवेदाच्याही आधीपासून चालत आलेली आणि गाण्यावर आधारलेली ही लोकनृत्ये प्रेक्षणीय असतात. त्यांना पिढ्यान्‌पिढ्यांचा वारसा लाभलेला असतो.

वाटेल त्या वेळी आणि वाटेल त्या ठिकाणी करून घेता येणारी ही साधी करमणूक असते. तिला पोषाखाचे बंधन नसते. वाद्यांचे बंधन नसते. संख्येचेही बंधन नसते. हवे तर एकटे नाचावे, जमेल तर इतरांच्या बरोबरही नाचावे. पण बहुधा माणसाला एकलकोंडेपणा आवडत नाही. त्याला इतरांच्या सहवासात रहावेसे वाटते. त्यामुळेच लोकनृत्ये ही प्रामुख्याने सहजीवनावर आधारलेली दिसून येतात.

दिवसभर काम करावयाचे आणि शिवाय रात्री नाचावयाचे ! म्हणजे दुहेरी राब होतो. पण तो जाणवत नाही. गाणी गायची आणि त्या नादावर नाचावयाचे म्हणजे एक प्रकारचा विसावाच अनुभवावयाचा. कारण कंपयुक्त अशा विविध हालचालींनी स्नायू आणि मज्जातंतू यांना जणू झोपच मिळते ! विसावा मिळतो. नाचायचे म्हणजे फुकटचे अंगमर्दन करून घ्यावयाचे. मालिश करावयाचे. त्यामुळे रक्ताभिसरणालाही अभिनव व्यायाम लाभतो! शरीराला एक प्रकारचा आकर्षक असा डौलदारपणा येतो. स्नायू सुदृढ होतात. लवचिक होतात. त्यांना चांगला आकार येतो. निसर्गाच्या सहवासातील आपल्याच जीवनाची ओळख अशा वेळी मानवी मनाला होत असते. ही ओळख मेंदूबरोबरच आपल्या कंठाला आणि शरीरालाही लोकगीते करून देत असतात! आणि परंपरेने आपल्या पिढ्यान्‌पिढ्यांच्या चालीरीती या लोकगीतांमधून गोवल्या गेल्याकारणाने आपला जुना इतिहास, आपल्या मनाचे टप्पे, आपल्या रीतिभाती इत्यादींशी माणूस एकजीव होऊ शकतो. चालू परिस्थितीशी निगडित झालेल्या सामाजिक जीवनालाही लोकगीते नादरूप करीत असल्याने, त्यांमध्ये येणाऱ्या अनेक वेळच्या पुनरावृत्तीने माणसाची चित्तवृत्ती हेलावते. प्रफुल्लित होते. काही तरी जन्मोजन्मींच्या ओळखीचे भेटले या नादात बेभान होऊन माणूस ईर्षेने मग नाचू लागतो.

त्यामुळे त्याचे जीवनच जणू गतिमान होते. स्वराला धार चढते. पाय नाचू लागतात. मन स्फूर्ती घेऊन उठते. कल्पना तालबद्ध होते. विचार बेभान होतो.

अशा वेळी या गीत-नृत्यांवर सांस्कृतिक जीवनाची उटी चढविली जाते. घराण्याची चालरीत सांभाळण्याची कोशीस केली जाते. त्याकारणाने तहानभूक हरपून जावी एवढ्या बेहोशीने नाचणारा माणूस स्वत:लाही विसरून जातो आणि त्याचे सर्वांग जसे गदाळून उठते.

डांग भागातील गीत-नृत्यांतून भाग घेता यावा म्हणून प्रत्यक्ष सूर्यदेवही धरणीवर आल्याची आख्यायिका सांगतात आणि 'चांदणारी चांदणा टिपरुस चांदणा' या भावनेच्या भरात खूप वेळ नृत्य केलेल्या सूर्यदेवाला आंघोळीसाठी म्हणून भल्या पहाटेस आकाशात दूधसागराची निर्मिती झाल्याची अद्‌भुत कथाही ऐकविली जाते.

म्हणून या आगळ्या दुनियेत सगळेजण एकाच तोलामोलाचे मानले जातात. गरीब-श्रीमंत, लहानमोठा हा भेदभाव इथे थाऱ्यालाही उरत नाही. इथे फक्त भावनेला उरी कवटाळलेली कल्पना नृत्य करीत असते आणि जीवन काव्यमय होऊन जाते. त्यामुळे घराण्याची परंपरा राखणारा पोषाख व निसर्गाशी एकजीव होता यावे म्हणून रंगीबेरंगी पानांची त्याकरिता वापरलेली झालर नेत्रदीपक ठरते.

देवादिकांची महापूजा बांधावी आणि कुलदैवताला प्रसन्न करता यावे या हेतूने जन्म पावलेल्या या कलाविष्काराला आपला कुळाचार उत्तम समजतो. त्याकारणाने प्रत्येक भागातील पोषाख वेगळे, रंगसंगती निराळी, गाणी आगळी आणि लोकनृत्ये सगळ्यांत वेगळी अशी आढळून येतात. महाराष्ट्राच्या ठाणे जिल्ह्यातील डहाणू-जव्हारकडील आदिवासींचे 'तारपी' लोकनृत्य या संदर्भात अवश्य लक्षात घेता येईल.

या 'तारपी' नृत्यासाठी सामान्यत: २० ते २५ स्त्री-पुरुष सारख्या संख्येने भाग घेऊन अर्धगोलाकार असे उभे रहातात. यावेळी स्त्री-पुरुष हे एकमेकांसमोर उभे असतात. मध्यावर घुंगूर लावलेली काठी घेऊन नाचणारा म्होरक्या असतो. त्याच्या शेजारी गीते आळविणारा तारपी असतो. त्यांचे स्वरविलास चित्तवेधक असतात. पोषाख वाडवडिलार्जित असतो. गळचात रंगीबेरंगी मण्यांच्या माळा

व गेंडेदार फुलांचे हार असतात. पुरुषांच्या माथ्यावर रंगीत रुमाल बांधलेला असतो व स्त्रियांनी सुवासिक फुले माळलेली असतात. अशा वेळी आळीपाळीने डावी उजवीकडे झोकदार रीतीने वळणारी ही मंडळी एकमेकांच्या कमरेला विळखा घालतात. दंडभुजांनी एकमेकांना खेचून धरतात आणि तालस्वरांच्या झंकाराबरहुकूम नाचत रहातात. त्या वेळी—

**माजा नमीन रे धरतारी माथलं**
**माजा नमीन रे कनसरी मायलं**
**माजा नमीन रे पानया देवालं**
**माजा नमीन रे ईज का गाजलं**
**माजा नमीन रे मारवती देवालं**
**माजा नमीन रे गावका देवीलं**
**माजा नमीन रे गायका गूजीलं**
**माजा नमीन रे बसते सबलं**
**माजा नमीन रे माय बहेनीलं**

या आरंभाने सुरू होणारी आणि—

**पड पान्या पड पान्या**
**धरतारी सुकली रं**
**धरतारी सुकली रं**
**कनसारी कोमली रं**

असली माहिती देणारी अनेक गीते आळवीत स्थळकाळाचे भान विसरून आसपासच्या दुनियेला दुमदुमून सोडतात. अशा वेळी सर्वत्र समाधानाचे हुंकार घुमत रहातात.

पुरुष आणि स्त्रिया, मुलगे आणि मुली, तरुण आणि म्हातारे असे सगळेजण या लोकनृत्यामध्ये सामील होतात. वयाचे बंधन विसरून जणू सगळेजणच एकमेकांशी एकजीव होतात. कुणाला काही शिकवावे लागत नाही. कशाची तयारी करावी लागत नाही. ऐपतीची चौकशी करण्याची गरज भासत नाही. वाद्ये गोळा करावी लागत नाहीत. धरणी पायाखाली असते आणि हाताला हात भिडले की, नाच सुरू होतो. गळ्याला गळा मिळाला की, गीत लांबत जाते.

खेळाच्या जागी सगळी एकता. भेदाभेद म्हणून कसला तो नाहीच. त्यामुळेच महाराष्ट्राचे राऊळ अपुरे पडावे एवढ्या उमेदीने मराठी लोकगीतांनी सजलेली लोकनृत्ये आजही जिवंत आहेत. मात्र खेड्यांनी अभिमानाने मान उंच करावी आणि शहरांनी उदासीन राहून दुर्लक्ष करावे असा भाग या बाबतीत कधीकधी आढळतो! त्यामुळे सामान्य मनाला खेड्याची संस्कृती निराळी आणि शहराची संस्कृती वेगळी असे वाटू लागते! त्यासंबंधी अगदी खोलवर विचार करण्याची इथे गरज नसली तरी या संदर्भात एवढे म्हणता येईल की, खेड्याने ही लोकनृत्ये मोठ्या अभिमानाने जगविली आहेत. शहराचे मात्र त्याकडे दुर्लक्ष झाले आहे. तथापि अगदी अलीकडच्या काळात शहरातील शाळांतून या लोकनृत्यांचे थोडेफार पुनरुज्जीवन होत असल्याचे दिसून येते आहे. परंतु ही लोकनृत्ये सादर करते वेळी त्या त्या विशिष्ट जमातीच्या पोषाखापलीकडे त्यातले मूळचे स्वरूप फारसे राहिलेले आढळून येत नाही. त्यामध्ये नावीन्य निर्माण करण्यासाठी गीतरचनेसह प्रत्यक्ष नृत्यकलेतही एवढा बदल केलेला असतो की, जुन्या काळच्या केश व वेशभूषेवरूनच काय तो हे लोकनृत्य आहे याचा सुगावा लागावा!

शहरामधून आजकाल शास्त्रीय नृत्यकलेची जोपासना अधिक होत असल्या-कारणाने शहरात येऊ घातलेल्या लोकनृत्यांना तिचा स्पर्श चांगलाच जाणवतो आहे. आणि खेदाची गोष्ट अशी की, आजच्या सुधारलेल्या जगात या मिश्रणाची कदर फारशी कोणालाच वाटत नाही! उलट नव्या काळात असेच हवे, असा गैरसमज पसरू पहात आहे. पण त्यास वेळीच बांध घालणे जरुरीचे आहे.

नागपंचमीसारख्या सणासुदीच्या निमित्ताने बायका आणि मुली खेळायला जमल्या म्हणजे मग त्यांच्या खेळाचा आरंभ 'फुगडी'ने होतो. फुगडीचेदेखील अनेक प्रकार आहेत. त्यांपैकी सर्रास वापरात असलेला आणि सर्वांना सहजगत्या येणारा प्रकार म्हणजे दोघींची फुगडी. एकमेकींचे हात एकमेकींच्यामध्ये समोरासमोर धरून खाली आणि वर असे गुंफावयाचे आणि डावे पाय एकत्र करून उजवे पाय नाचवीत खेळावयाचे, असा हा प्रकार आहे. यावेळी कोणी कोणी 'जाते'ही घालतात. जाते घालावयाचे म्हणजे एकीने दुसरीला नेटाने ओढीत सावरायची व दुसरीने एक पाय मांडीवर घेऊन एकाच पायावर खेळा-वयाचे! या प्रकारच्या अनेक फुगड्या एकाच वेळी वेगळ्या वेगळ्या जोड्या

खेळत असतात. अशा वेळी 'फुगडी मुक्याने शोभत नाही' या भावनेने बायक
व मुलीबाळी 'उखाणे' घालतात :

- **फुगडी खेळता खेळता जमीन झाली लाल**
  **माझ्यासंगं फुगडी खेळतीस पक्वा तरी घाल**
- **पाऊस पडतो झिरीमिरी भिंती झाल्या काळ्या**
  **सोनाराच्या राधोच्या लांब भीकबाळ्या**
- **आम्ही दोघी मैत्रिणी जोडीच्या**
  **हातात पाटल्या तोडीच्या**
- **तुझ्या घरी माझ्या घरी आहे बिंदली सरी**
  **फुगडी खेळताना बाई नको तालेवारी**
- **खोल खोल विहिरीला उंच उंच चिरे**
  **तुझी माझी फुगडी गरगर फिरे**

त्यावेळी अशा प्रकारचे सरता सरू नयेत एवढे उखाणे घालीत तासन्तास ही फुगडी घुमत रहाते. उखाणा संपला की, 'पिंगा' घालण्यात येतो. त्यामुळे फुगडीला विशेष गोडी व गतीही येते. अशा उखाण्यांचा विचार उखाण्याच्या स्वतंत्र प्रकरणात मुख्यत: केल्याने इथे त्याविषयी अधिक चर्चा मुद्दामच केलेली नाही. तथापि एवढे म्हणता येईल की, हे उखाणे घरगुती जीवनातील निवडक प्रसंगांशी अतिशय निगडित आहेत. खेरीज त्यांचे अंतरंगही वेचक शब्दांनी नटवलेले असून त्यातून भरपूर सूचकता प्रकट झालेली आहे. प्रत्येक शब्द इथे एवढा शेलका उचलला गेला आहे की, ऐकता क्षणीच त्याचा अर्थ चटकन ध्यानात यावा.

**फुगडी खेळू यंकुटा भाऊ माझा धाकुटा**
**सोन्याचा करगुटा मोती किती लावू?**
**मामाची लेक आली नाव काय ठेवू?**
**खंडीभर दाण्याचं वाण काय देऊ?**
**टोचभर खणाची चोळी काय शिवू?**

फुगडी खेळायला चटकन कोणी शिणजोडीचे भेटले नाही, अगर जवळपास दिसले नाही म्हणजे हे गाणे म्हणतात. एकटीने काही फुगडी खेळता येत नाही

आणि फुगडी खेळायची तर हौस फार! म्हणून घरातल्या धाकट्या भावाला जवळ घेऊन हे गाणे म्हणायचे. हिरमुसलेल्या मनाला तेवढीच उभारी द्यायची. पण तेवढ्यात सोन्याच्या करगुट्याला मोती किती लावावेत म्हणजे भावाला तो शोभून दिसेल असा विचार मनात येतो! ... लगोलग मामाची मुलगी चुटकीसरशी घरात पाव्हणी होऊन येते! त्यामुळे एकदम सर्व वातावरणच बदलून जाते. मामाची चिमुरडी पोर बघून तिचे नाव काय ठेवावे, खंडीभर दाणे विकूनही तिला पाहुणेर काय करावा आणि टीचभर खणाची चोळी तिला कशी शिवावी याची पंचाईत पडते! त्यामुळे तिलाच पुढ्यात उभी करून खेळ खेळ खेळायची हौस भागवून घ्यावी लागते, अशी कल्पना या गाण्याच्या पाठीशी आहे.

एकमेकींच्या दंडावर एकमेकींचे हात धरून जी फुगडी खेळतात, त्या फुगडीला 'दंडाची फुगडी' असे नाव आहे. अशा वेळी पुढील गीत म्हणण्यात येते:

**दंड फुगडी दंडाची     बाई माझ्या लाडाची**
**लाडावरनं जाईन ग     पाच पानं खाईन ग**
**दिवाळीला बोली केली     दसऱ्याला येईन ग**

बरोबरीच्या मुलीशी वा बाईशी फुगडी खेळायला मिळाली म्हणजे मग तिचा व आपला ऋणानुबंध जवळचा आहे, हे दाखविण्यासाठी इथे लाडा-कोडाची भाषा केली आहे. लाडक्या मुलींनी काहीही म्हटले तरी खपते. दिवाळीच्या वेळी दसऱ्याला येईन म्हणून सांगावयाचे म्हणजे एक वर्षाचा अवधी पुढे ठेवायचा! वास्तविक या बोलण्याला तसा अर्थ नसतो. पण गंमत म्हणून दाबून बोलायचे इतकेच.

याच प्रकारचे आणखी एक गाणे असे आहे:

**दंड फुगडी दंडाची     बाई माझी धीराची**
**दंडावरनं जाईन ग     पाच पानं खाईन ग**
**घड घड रे सोनारा     माणीक मोती डोलारा**
**डोलाऱ्याला खिडक्या     आम्ही लेकी लाडक्या**

मागच्या गाण्याचाच आशय या गाण्यातही आहे. फरक एवढाच की, दागिने घडवायची गोष्ट नव्याने इथे आलेली आहे.

कधीकधी एकेकच हात एकमेकींच्या हातांत गुंफून व दुसरा कमरेवर ठेवू
फुगडी खेळतात. या फुगडीला 'एका हाताची फुगडी' असे म्हणतात. ही फुगडी
खेळताना जे गाणे मोठ्या ठेक्यात म्हटले जाते ते असे आहे :

**एका हाताची फुगडी मामा देतोया लुगडी**
**लुगडीला दोरा मामा माझा गोरा**
**मामी माझी काळी शेवंतीची जाळी**
**जाळीला खिडक्या आम्ही लेकी लाडक्या**
**मामी गेली दळायला पोरी आल्या खेळायला**

मामामामींबद्दलची भावनात्मक गोष्ट इथे खेळीमेळीने सांगितलेली आहे
आजोळची माणसे भाचरांचे अगर नातवंडांचे नेहमीच कौतुक करतात. त्या
कौतुकाची ही गोष्ट आहे. त्यामुळे त्याची विशेष आवड आणि गोडीही.

जशी उभ्याने फुगडी खेळतात तशीच बसूनही फुगडी खेळण्याचा ए
प्रकार आहे. या फुगडीला 'बसफुगडी' म्हणतात. ही फुगडी खेळताना सुरु
वातीला समोरासमोरच्या मुलींमध्ये अगर बायकांमध्ये हातवारे करीत पुढी
प्रश्नोत्तरे होतात :

**एवढी जागा सारवू का? नक्को.**
**एवढी जागा सारवू का? नक्को.**
**एवढी? नक्को.**
**एवढी तरी? सारवा.**

आणि मग गाणे सुरू होते :

**एवढी जागा सारूं गा सारूं गा**
**पाच खडे मारूं गा मारूं गा**
**एक खडा मोठा मोठा**
**सई आली पोटा पोटा**
**सईच्या कानी बुगड्या बुगड्या**
**आम्ही खेळू फुगड्या फुगड्या**

आणि त्यानंतर 'चुईफुई' म्हणत एकदा डावा व एकदा उजवा पाय लांबव
घसरीत ही फुगडी घुमते. याच बसफुगडीला कुणी कुणी पुढील गाणेही म्हणतात

**बस फुगडी बसूं गा**
**चतुर्भुंगा लाभूं गा**
**एक पाय खोलीत**
**सीताराम डोलीत**

म्हणजे चारी हातांनी खेळून येणार नाही एवढी मजा आणीत ही फुगडी खेळायचा विश्वास प्रकट करावयाचा. तसेच एक पाय अंगणातून खेळता खेळता खोलीपर्यंत जातो आणि डोलीत बसलेल्या राम-सीतेला पहातो ही कल्पनादेखील व्यक्त करावयाची.

फुगडीचा आणखी एक प्रकार आहे. त्याला 'नखुल्या' असे म्हणतात. म्हणजे दोघी बायकांनी एकमेकींच्या हातांच्या पंजांना आपापल्या नखाजवळ बोटांच्या खोबणीत अडकवून घ्यावयाचे आणि पुढील गाणे म्हणत एकदा डावा व एकदा उजवा हात पुढे करीत नाचावयाचे :

**नखुल्या बाई नखूल्या चंदनाच्या टिकूल्या**
**एक टिकली उडाली गंगेत जाऊन बुडाली**
**गंगेला आला लोंढा भिजला माझा गोंडा**
**गोंडयाच्या पदरी काडी भिजली माझी साडी**
**साडीच्या पदरी रुपाया भाऊ माझा शिपाया**
**शिपायानं बायको केली माणीक मोती ल्याली**
**ती बाई गेली ताकाला विंचू चावला नाकाला**

कोणी कोणी गौरीपूजनाच्या वेळी हाताला चंदनाची उटी लावतात. त्या उटीचा इथे उल्लेख आलेला आहे. या उटीपैकी एखादी टिकली म्हणजे ढलपा खेळताना उडून जातो आणि पवित्र अशा गंगेत जाऊन पडतो. त्यामुळे होते काय की, त्याच वेळी गंगेला लोंढा आला असला, तरी त्या ढलप्यामागे धावल्याने पाण्यामध्ये वेणीचा गोंडा आणि साडीही भिजते. त्याकारणाने भीती वाटते. कारण साडीच्या पदराच्या टोकाला एक रुपया बांधलेला असतो तो हरवण्याची भीती निर्माण होते. कारण शिपाई झालेल्या भावाने तो आपल्या मिळकतीतून दिलेला असतो ना! म्हणून त्या रुपयावर तर भारी प्रेम जडलेले असते. तशात आता या भावाने माणिक मोती लेणारी बायको केलेली असल्याने पुन्हा तो

मिळेल की नाही याची धास्ती वाटते! पण ही रुखरूख कमी व्हावी म्हणून भावजयीची खोडी काढण्यात येते की, ती ताक आणायला गेली असताना तिच्या नाकाला विंचू चावतो!! परंतु केवळ विनोद निर्माण करण्यापलीकडे या खोडीत विशेष काही साधलेले नसले तरी पण गंमत वाटते. या गाण्यातील जुन्या काळच्या भावाने शिपाई व्हावयाचे म्हणजे फार लौकिक मिळायचा अशी जी महत्त्वाकांक्षा होती, तिचाही इथे उल्लेख आलेला आहे.

फुगडीप्रमाणेच बायकांच्या खेळाचा दुसरा एक विशेष लोकप्रिय प्रकार म्हणजे 'झिम्मा' होय. हा खेळ दोघी दोघी, चौघी चौघी किंवा सहाजणीही खेळतात.

दोघीजणी बायका 'एक...दोन...तीन' असा इशारा देऊन झिम्मा खेळतात त्यावेळी सरळ समोरासमोर टाळ्या देताना चुटक्यांचा खेळही खेळतात. सुरुवातीला खांद्यावर आंगठे टेकून हात उभे करायचे आणि एक-मेकींच्याकडे झेप घेऊन नाचत चुटक्या वाजवायच्या. त्यानंतर आपल्याच भोवती फिरायचे आणि नंतर झिम्म्याची टाळी द्यावयाची. अशा वेळी नाचता नाचता म्हटले जाणारे गाणे स्पष्ट ऐकू यावे म्हणून इतर दोघीतिघीही हेच गाणे म्हणू लागतात. अशा वेळी म्हटल्या जाणाऱ्या गाण्यांपैकी एक असे आहे :

**पिंपळाखाली पार बांधिला**
**बंधूला माझ्या पुत्र झाला**
**नाव काय ठेवायचं रघुनाथ**
**अच्छेर साखर पदरात**
**ती साखर वाटा नगरात**
**जाऊन सांगा घरोघरी**
**जाऊनी सांगते शिंप्यायाला**
**अंगडंटोपडं दे बाळाला**
**जाऊनी सांगते सुताराला**
**पाळणा बांधुनी दे बाळाला**
**जाऊनी सांगते सोनाराला**
**सरी माटली दे बाळाला**

**जाऊनी सांगते आयाबायांला**
**चला ग सगळ्या बारशाला**

या गाण्यामध्ये भावाला झालेल्या पुत्राचा आनंद आणि त्याकारणाने झालेली सर्वांची गडबड वर्णन केलेली आहे. जुन्या काळच्या रीतीप्रमाणे सगळ्या संस्कारक्षम गोष्टींचा इथे उल्लेख आलेला आहे. त्यामुळे जणू काही आपल्याच घरात हे सगळे घडते आहे, असा भास हे गाणे म्हणताना निर्माण होतो; आणि आत्याच्या भूमिकेत समरस होऊन त्याची गोडी चाखता येते.

दोघीचौघी जमून एकेका हाताचा झिम्मा खेळत बायका फेर धरायला लागल्या म्हणजे पुढील गाणे सांगतात :

**टाळिया नंदा बाळा गोविंदा**
**बाळाच्या हाती रंगीत काठी**
**बाळ गेलं दिदी हरपली मुदी**
**मुदी कशाची मुदी माशाची**
**बाळ कशाचं बाळ नवसाचं**

हातात रंगीत काठी घेतलेले बाळ दिदी करीत घोडा खेळायला गेले आणि माशाचा छाप असलेली मुदी गमावून आले. त्यामुळे ब्रह्मानंदी टाळी लागेल एवढे सुख देणारे गुण्यागोविंदाचे बाळ रागे भरल्याने रडू रडू करते. अशा वेळी त्याच्या आईला शेजारणी पाजारणी दटावतात आणि म्हणतात की, 'एवढ्या नवसासायासाने मिळालेले बाळ अशाने हातचे गमावून बसलीस म्हणजे मग? बाळापेक्षा मुदी का मोलाची आहे?' त्यामुळे आईचा राग ओसरतो. काळजीने मन बेचैन होते आणि बाळावर झडप घालून आई त्याला कुशीत घेते, अशी कल्पना या गाण्याने व्यक्त केली आहे.

एकाच वेळी तीनचार प्रकारचा नाच खेळून दाखविणारा आणखी एक झिम्म्याचा प्रकार आहे. यावेळी सुरुवातीला एक अगर दोन जोड्या एकमेकींना साध्या टाळ्या देत पुढील ओळी म्हणतात :

**झिम्मा खेळू कडाकडी**
**अबीर बुक्का नाडापुडी**

आणि त्यानंतर 'गळा' बदलून जलदीने टाळ्या देत व पुढे मागे धावत या ओळी सांगतात :

**झिम् पोरी झिम्**
**कपाळीचं भिंग**
**भिंग गेलं फुटून**
**पोरी गेल्या उठून**

त्यानंतर समोरासमोर उभ्या राहून एकमेकींना टाळी देत व डोळे बारीक मोठे करीत अभिमानाने वेगळा 'गळा' काढून बजावतात की :

**पोरीत पोरी मीच गोरी**
**चकमक साडी बिजवरा**

आणि ते झाले म्हणजे मग पुन्हा निराळाच 'साद' काढून पण टाळ्या बंद करून गोल गोल फिरत म्हणतात :

**साई सूऽऽऽ टचोऽऽ**
**अंबा पिकतो रस गळतो**
**कोकणचा राजा बाई**
**झिम्मा खेळतो**

आणि मग हे गाणे संपते.

या गाण्यामध्ये सुरुवातीला अबीरबुक्का आणि उदबत्ती घेऊन टाळ्यांच्या गजरात देवाची पूजा केली आहे. नंतर कपाळावर येणाऱ्या बिंदी नावाच्या दागिन्यामधील काच अगर कुंकवाच्या जागी लावली जाणारी टिकलीवजा काच फुटली म्हणून पोरी पळून गेल्याचा उल्लेख आला आहे. खेळताना आपल्या हातून अपराध घडल्याचा आळ येऊन बोलणी खायला नकोत, यासाठी ही तरतूद केली असली पाहिजे. नंतरच्या दोन ओळींत शिणगाराची कल्पना व्यक्त केलेली असून हातातील दागिन्याला शोभेल अशी साडी नेसल्याचीही माहिती आलेली आहे. म्हणजे खेळताना मनात निर्माण होणाऱ्या बहुतेक सर्व भावनांचा आविष्कार इथे झालेला आहे असे दिसून येते.

हेच गाणे झिम्म्याच्या खेळाच्या वेळी किती जुन्या काळापासून वापरात होते, याचा महानुभाव वाङ्मयात पुढील पुरावा आढळतो :

झिमा खेळु कडाकडि
अभे लंभु का तारा कुडि ।।
झिम् पोरि झिम्
कपालांचे भिंग
भिंग गळे कुट्टु
पोरि हाला उठु ।।
पोरि ते पोरि
मिंचि गोरि
हळधिया उडा
रेशमीचा गुंडा
चकमक संडि
विजे वरा ।।
सइ सुटिये
अंबा पिकतु
रसु गळितु
कुंकमिचा राया माहा
झिम्मा खेळतु ।।

या गाण्याचा सर्व आशय मागच्या गाण्यासारखाच अर्थात आहे.

तुपातलं कारलं आजिरलं ग सई गोजिरलं ग
कोण्या सुगरीणिनं रांधलन् ग सई रांधलन् ग
गीताबाई सुगरीणिनं रांधलंय ग सई रांधलंय ग
गीताबाईचा पति रुसला ग सई रुसला ग
शेजाऱ्याच्या घरी जाऊन बसला ग सई बसला ग
खुंटीवरचा शेला वाऱ्यानं गेला ग सई गेला ग
आपल्याच पतीला समजाव ग सई समजाव ग
तुपातलं कारलं वाढ ग सई वाढ ग

चौघींच्या झिम्म्याच्या वेळी म्हणावयाचे हे गाणे आहे. ह्या वेळी एकदा डाव्या हातच्या व एकदा उजव्या हातच्या जोडीदारणीला टाळी देत फेर धरतात.

एकीने गाणे सांगावयाचे आणि इतरजणींनी ते म्हणावयाचे असे हे चालते. या गाण्यामध्ये सुगरीणबाईच्या सैंपाकाची माहिती आलेली आहे. वास्तविक कारले कडू असते. पण त्याला नीट चव यावी म्हणून ते चांगले धुऊन घेऊन तुपात तळले आहे. पण गीताबाई नावाच्या बाईच्या नवऱ्याला तरीही ती चव पटली नाही. त्यामुळे तो रुसून शेजारी जातो. पण काही कारणाने तेथूनही तो दुसरीकडे गेल्याची खूण म्हणून त्या ठिकाणी खुंटीवरचा त्याचा तेथे शेला दिसत नाही! अशा वेळी तो वाऱ्याने उडून गेला असेल, असे समजून तिने त्याची समजूत घालीत त्याला नीट वाढावे, अशी गोष्ट हे गाणे सांगते. या गीतातील गीताबाई ही प्रातिनिधिक स्त्री आहे. त्यामुळे या नावाऐवजी कोणतेही नाव तिथे घातले तरी चालते.

अशाच प्रकारचा चौघींचा झिम्मा खेळताना पुढील एक लोकप्रिय गाणे म्हणण्यात येते :

**सई सई गोविंदा येतो**
**मजवरि गुलाल फेकीतो**
**तुझ्या बाई गुल्लाल्लाचा भार**
**आमच्या वेण्या झाल्या लाल**
**आमच्या वेण्या मोकळ्या**
**सोनीयाच्या साखळ्या**
**घडव घडव रे सोनारा**
**माणिक मोती बिजवरा**
**बिजवराला बाई खिडक्या**
**आम्ही बाई लेकी लाडक्या**
**लाड सांगू बापाला**
**मोती मागू कापाला**

राधाकृष्णांच्या गोकुळातील गोष्ट सुरुवातीला सांगून वडिलांच्याकडून लाडक्या पोरींच्या होणाऱ्या कौतुकाचे हे गाणे आहे. मोकळ्या वेण्यांच्यावर गुलाल फेकणाऱ्या गोविंदाला गौळणी सांगतात की, 'माणिकमोती आमच्या बिलवराला घडविण्यास आम्ही सोनाराला सांगितले आहे. आम्ही आमच्या

वडिलांच्या लाडक्या आहोत. बापाकडे आम्ही कापाला मोती लावायला मागण्यास निघालो आहोत. तरी वाटेत येऊन खोळंबा करू नकोस.'

**लाडक लेकी, लाडक लेकी**
**साकळ्या लेवून जाय ग**
**आता लेवू माय कशी**
**शंकर गेला दूर ग**
**शंकर पुशी की म्हादेव पुशी की**
**लवलकीचा हार ग**
**चमेलीच्या झाडाखाली**
**फुलाचा भडीमार ग...**

दोघीजणी गौरीपूजनाच्या वेळी चुटक्या वाजवीत नाचून झिम्मा घालतात त्यावेळी म्हणावयाचे हे गाणे आहे. माहेरी आलेल्या गौराईला 'लाडक लेकी' म्हणून हाक देत 'साखळ्या' घालून जा असे आई सांगते आहे. परंतु ती म्हणते, "शंकर तर केव्हाच पुढे निघून गेला आहे. आता केव्हा साखळ्या लेत वसू? आणि खरं म्हणजे चमेलीच्या झाडाखाली फुलांचा सडा पडतो तशा नाजुक लवलकीचा हार पाहिजे असे मला वाटते." यानंतर आठवतील ते सगळे दागिने असे सांगून होईपर्यंत हे गाणे मग संपत नाही! सासुरवाशिणींच्या मनातील माहेरपणाची गोष्ट इथे या प्रकारे सांगितलेली आहे.

**आकडी घालू झकडी पैंजन फकडी**
**सबा म्हनी राया**
**आकडी घालू आमी साजनी बाया**

दोन्ही हातांची टाळी मोठ्या झणकाऱ्याने देत एकदा डावीकडे आणि एकदा उजवीकडे वळत झिम्मा खेळताना म्हणावयाचे हे लहानसे गीत आहे. या गाण्यातील शब्दांवरून हा खेळाचा प्रकार व्यक्त झालेला दिसतो. परंतु या शब्दांचा नेमका अर्थ मात्र लक्षात येत नाही. तथापि एवढे म्हणता येईल की, पैंजण घातलेल्या बायका मोठ्या कौशल्याने नाच करीत असून त्याबाबत त्यांची आपापल्या पतींबद्दल एकमेकींत भाषा चालली आहे!

नदीच्या कडयिला ग बाई मी वाळू शेवाळिली
ग बाई मी वाळू शेवाळीली
त्या बाई वाळूयिचा ग बाई मी चिखल बनविला
ग बाई मी चिखल बनवीला
त्या बाई चिखलाच्या ग बाई मी विटा बनविल्या
ग बाई मी वीटा बनवील्या
त्या बाई विटायिची ग बाई मी चूल बनविली
ग बाई मी चूल बनवीली
त्या बाई चुलीवरी ग बाई मी पाणी तापविलं
ग बाई मी पाणी तापवीलं
चांदीच्या घंगाळात ग बाई मी पाणी विसणिलं
ग बाई मी पाणी विसणीलं
काचेच्या न्हाणीमधि ग बाई मी बाळक न्हाणीयिलं
ग बाई मी बाळक न्हाणीयीलं
जरीच्या रुमालानं ग बाई मी बाळक पुशीयिलं
ग बाई मी बाळक पुशीयीलं
रंगीत पाळण्यात ग बाई मी बाळक नीजविलं
ग बाई मी बाळक नीजवीलं
आकाटयाशेकाटयांनी ग बाई मी पाळणा लांबविला
ग बाई मी पाळणा लांबवीला

चौघींच्याप्रमाणे सहाजणींचा झिम्मा धरताना हे गाणे म्हणतात. या गाण्यामध्ये आपल्या तान्ह्या बाळाच्या आंघोळीसाठी आई काय काय करते त्याची माहिती आलेली आहे. नदीच्या काठची वाळू बारीक मातीमध्ये मिसळून चूल करायची खटपट करण्यापासून तो बाळ झोपेपर्यंतची सगळी हकिगत इथे आलेली आहे. जुन्या काळची श्रीमंती आणि बायका अपत्यप्रेमापोटी करतात ते कष्ट यांचा सुंदर संगम इथे पहावयास मिळतो.

रुण्रुण् पाखरा जा माझ्या माहेरा
कमानी दरवाजा त्यावरी बैस जा

**घरच्या आईला सांगावा सांग जा**
**दादाला सांग जा ने मला माहेरा**

चौघींच्या अगर सहाजणींच्या, कोणत्याही प्रकारच्या, झिम्म्याच्या वेळी म्हणावयाचे हे गाणे आहे. सासुरवाशिणीला माहेरी जावयाची ओढ या गाण्यामध्ये प्रकट झालेली आहे. रघुनाथ पंडितांच्या नलदमयंती आख्यानामध्ये हंसाच्याकरवी अगर कालिदासाच्या मेघदूतामध्ये मेघाच्याकरवी प्रेयसीला धाडलेल्या निरोपाप्रमाणे लेकीने पाखराच्याकरवी आईला धाडलेला हा निरोप आहे. माहेरच्या घराचे वर्णन कमानी दरवाजाने करून धाडलेला हा निरोप विलोभनीय आहे. बायकांना विशेष आवडणाऱ्या व सदोदित त्यांच्या ओठावर घोळणाऱ्या आवडत्या गाण्यांच्यापैकी हे एक गाणे आहे. हेच गाणे पुढील प्रकारेही कुठे कुठे म्हटले जाते :

**रुणझुण पाखरा जा माझ्या माहेरा**
**कमानी दरवाजा त्यावरी बैस जा**
**दादाला पूस जा वैनीला पूस जा**
**हिरवी लवंग भाजकी लवंग**
**तुमच्या मुलीला काय पाहिजे ?**
**आमच्या मुलीला साकळ्या पाहिजेत**
**तुझ्या साकळ्यावरनं माझ्या साकळ्यावरनं**
**उठी उठी पाखरा जाई घराला**
**घराच्या वळचणी चिमी घाली वेणी . . .**

या गाण्यामध्ये मागच्याच गाण्यातील वर्णन आलेले आहे. परंतु ते सविस्तर आले आहे. माहेरच्या घराची खूण ओळखली तरी वळचणीला वेणी घालीत बसलेल्या चिमीला पहा आणि घरच्या लोकांना प्रश्न विचार की, 'तुमच्या मुलीला काय पाहिजे ?' आणि मग 'साकळ्या पाहिजेत' असे उत्तर आले की, तेच घर समजून निरोप दे असे या लेकीचे म्हणणे आहे. माहेरचे घर ओळखून घ्यावयाचा हा प्रकार मोठा हृद्य आहे.

**या हो या रुक्मिणी आमुच्या या आळी**
**हिऱ्या मोराची बाई तुमची काचोळी**

हिऱ्या मोरावरनं गावा गेला हरी
गावा गेला हरी बाई वसली पंढरी
पंढरपूरचा बाई दामूजी सोनार
त्यानं घडविला बाई जोडव्यांचा जोड
एका जोडव्याला साडेतीनशे मोती
म्हाई रुक्मिणीचा बाई पांडुरंग पती

पंढरपूरच्या विठ्ठल रखुमाईची गोष्ट सांगणारे हे गाणे झिम्मा खेळताना बायका मोठ्या आवडीने म्हणतात. हिऱ्यामोत्यांनी गुंफलेली चोळी घालणाऱ्या रखुमाईशी भांडण झाले म्हणून रागावलेला विठ्ठल गावाला जातो. म्हणून तर पंढरपूर गाव वसले जाते. अशा ह्या पंढरपूरचा दामूजी सोनार मोठा कसबी आहे. त्याने जी जोडवी घडविली त्याला साडेतीनशे मोती लावले होते ! अशा ह्या रखुमाईचा पांडुरंग पती आहे. त्यामुळे तिला कशाची वाण आहे? दागिन्यांची हौस बायकांना फार. त्याकारणाने असला हौशी नवरा आपणालाही असता तर उत्तम, ही कल्पना मनाला डिवचल्याने हे गाणे मोठ्या ईर्षेनेदेखील म्हटले जाते !

आली आखाड एकादशी वारी चालली पंढरीशी
तोबा झडतो देवापाशी कार्तिकीची महिमा मोठी
रथ निघं वाळवंटी साधुसंत गाठीभेटी
तुळशीबुक्का आवड मोठी गळी घातली मोत्या कंठी
हंडे घंगाळ चांदी पाट वर बसे पंढरीनाथ
पितांबराची खवी कास पूजा व्हती बहु जोस
भात केसरी सोन्या ताटी पक्वान्नाची झाली दाटी
भरून चांदीचे गडवेपेले हाती घेती इंजनवारे
बडवे देवा वारा घालती स्वस्थ बसा रखुमापति
आडकित्ता तबक सोनीयाचे पान चुनाळ मोलायाचे
अडकित्यासी गुंफले मोती इडा घ्यावा रुक्मापती
जैसा शोबे पंढरीवाला म्हाई रखुमाई दुई बाजूला
वीज खोलीचा झाला भार तिथं लक्ष्मी निरंतार

**दारी उभे चोपदार कलगी तुऱ्याचा झाला भार**
**उठा म्हणती पहाट झाली चला म्हनती काकडचाला**
**झाडुनझुडून सडा झाला हरीनामाचा गजर झाला**
**चंद्रभागाची आंगूळ मग देवाचं दर्शन**
**मग घाला प्रदक्षिना पुढं येती मधुगिरी**
**म्होरं जळतो नगारखाना जनी आली मधुबना**
**काय सांगू पंढरीची हवा संतमंडळीचा उभा थवा**
**गरूडपार इटेवरी उभा राऊळी भरली कैशी सबा**

कार्तिक महिन्यातील पंढरपूरच्या वारीच्या वेळचे वर्णन करणारे हे गीत भाविक स्त्रिया पालखीबरोबर, दिंडीबरोबर पंढरीला जाताना मधूनच रस्त्यात घातल्या जाणाऱ्या झिम्म्याच्या वेळी म्हणत असतात. झिम्मा घालताना त्यांचे सर्वांग काही विशेष पद्धतीने वळत असते. आता तोल जातो की काय असे वाटावे एवढचा ह्या बायका डावीकडे आणि उजवीकडे टाळी देताना खाली वळत वाकत असतात! अशा वेळी या गाण्यातील भावनेने त्यांचे अंतरंग भारून गेलेले असते. त्या नादातच त्या बेभान होऊन नाचतातही! पंढरीचे हे वर्णित वैभव त्यांच्या मनाला भुरळ पाडते. अशा वेळी सहीन्सही त्यांना प्रत्येक शब्दाचा अर्थ उमगतो आणि तो लक्षात घेऊनच त्यांचा आवाज अस्मान ठेंगणे करणारे वैभव गाऊन दाखवतो!

**आंबरी दुधाची डेरी**
**मांडव सोन्याचा घातीला**
**राजे जमले बघायला**
**असा आनंद दशरथाला ।।**
**गादीव बसवा रामाला**
**राम तिथूनी निगाले**
**गेले कौसल्या म्हाली**
**लागले मातेच्या चरणी**
**माते हुकूम द्यावा मला**
**गादीवरी बसायला ।।**

राम तिथूनी निगाले
गेले सुमीत्री म्हाली
डोकं ठेवील चरणी
माते हुकूम द्यावा मला
गादीवरी बसायला ।।
राम तिथूनी निगाले
गेले कैकयी म्हाली
लागले मातेच्या चरणी
कैकयीला करुंद आला
राम ढकलूनी दिला ।।
राम तिथूनी निगाले
गेले सीतेच्या म्हालाला
असा आनंद सीतेला
नेसली देवी पितांबर
घातली मधुपका चोळी
नाकी नथ सुंदयीरी
परकाश पडं गालावरी
रामा चढे शोभा भारी ।।

रामाच्या राज्याभिषेकाच्या वेळी राजवाडचात झालेल्या प्रकाराचे वर्णन या गाण्यामध्ये आलेले आहे. देव म्हणून राम सर्वांचा आवडता. त्याचे दर्शन मानवी मनाला विशेष प्रिय. त्याकारणाने हे सर्व वर्णन करताना बायका भावनावश होऊनच झिम्मा घालीत फेर धरतात. कधीकधी आठजणींचा, दहाजणींचादेखील झिम्मा न चुकता एका ठेक्यात अशा वेळी चालतो. जणू उभे रामराज्यच या क्षणी त्यांच्या डोळचांपुढे येते! रामाबद्दलच्या आवडीने, भक्तीने, त्यांची भावना उफाळून वर येते! सर्वांना कौतुक वाटत असताना आणि आनंद झाला असताना राम गादीवर येणार म्हणून कैकयीला आलेल्या रागाने तिच्याविषयी स्त्रियांना विलक्षण संताप येतो. पण सीतेच्या या शेवटच्या भेटीने तो राग ओसरतो. त्यामुळे खुषीने या गाण्याची लय वाढवीत हा झिम्मा संपवतात.

**फांद्यावरी मव्हर आला खनोखनी गुंजा**
**उघड राई दरवाजा पती आला तुजा**
**इतक्यांदी इतक्यांदी कुठं गेलं हुतं**
**गेलं हुतं नांद्रुकी बनामंदी लइंदी लागलं**
**पिवळी कापडं कशायानी झाली**
**गवराय सवत तुमावरी आली**
**आनुनी आनूनी कुठंजी ठेवीली**
**ठेविली ठेविली खारकीच्या बनी**
**बोलवा बोलवा नगरीचा सुतारु**
**तोडावा तोडावा खारकीचा बनू**
**पाडावा पाडावा सवतीवरी ऊनू**

स्त्रियांच्या मनात येणाऱ्या सवतीमत्सराची माहिती या गाण्याने सांगितलेली आहे. गौरीसारखीदेखील सवत घरात यायला नको म्हणून एका सामान्य बाईने केलेला कांगावा इथे वर्णन केलेला आहे. खूप दिवस गावी गेलेला नवरा परत यायला हे कारण घडले हे समजताच, रागाच्या भरात ही बाई वाटेल ते करायची तयारी दाखविते आहे! नगरातील सुतार बोलावून आणून खारकीचे वन तोडून टाकावयाचे आणि सवतीला उन्हात रखडू द्यावयाचे ही सामान्य स्त्रीच्या मनातील सुडाची भावना या प्रकारे या गाण्याने व्यक्त केलेली आहे.

झिम्म्याची अशी आणखी कितीक गाणी असतील. त्याची गणती होणार नाही. तथापि मला जी काही सापडली ती वानवळा म्हणून इथे दिली आहेत. झिम्मा रंगत गेला आणि ही गाणी संपायची वेळ आली म्हणजे जलद गतीने टाळ्या पडतात. गाण्याची लयही वाढते आणि अखेरीस तोंडाने पिंगा घालीत फुगडीप्रमाणेच बायका बराच वेळ झिम्माही घुमवतात.

ह्या 'पिंग्या'चीदेखील स्वतंत्र गाणी आहेत आणि तोही एक स्वतंत्र खेळ होऊ शकतो. म्हणून एखाद्या मुलीला पिंगा घालता आला नाही म्हणजे ती एक कमीपणाची गोष्ट समजून तिला हिणविले जाते. अशा वेळी—

**पिंगा बाई पिंगा चवळीच्या शेंगा**
**चवळीच्या शेंगेला दाणाच नाही**
**मामाच्या लेकीला नाकच नाही**

हे गाणे म्हणून इतर पुष्कळजणी तोंडाने चांगला पक्‌वा घालतात. चवळीच्या शेंगेप्रमाणे पक्‌वा लांबसडक आणि नाजूक झाला पाहिजे, घालता आला पाहिजे, अशी ह्या मागची कल्पना आहे. पण तसे न झाल्याने एखादी चवळीची शेंग दाणा नसताना रोडकी दिसावी, तशी ही मुलगी बिननाकाची असल्याने तिला पक्‌वा येत नाही असे म्हणावयाचे! त्यामुळे ती मुलगी मग आपोआप खटपट करून पिंगा, पक्‌वा, घालू लागते; आणि एवढे करूनही एखादीला नाहीच जमले, तर मग मात्र—

**ये ग पोरी घाल ग पक्‌वा**
**का ग लाजतीस ?**
**डब्बल कुडची चहाचा कप**
**बिस्किट मागतीस ?**

अशा प्रकारे तिची चेष्टा करून तिला सगळ्याजणींमध्ये ओढून आणून पिंगा घालायला शिकवतात. तो पिंगा तिला नीट जमावा म्हणून थोडे गाणे व थोडा पिंगा असा प्रकार सुरू होतो.

**दंडातल्या येळा काय ग केल्या**
**दिल्या बाई दिल्लीच्या जोग्याला ग जोग्याला**
**फुलाची गवर उभी बारवा**
**म्हवना निगाली पाण्याला ग पाण्याला...**

दोन्ही हातांत भरपूर बांगड्या घालायच्या. स्वतः उभे रहावयाचे. आपल्याच एकेका हातावर आलटून पालटून दुसऱ्या हाताच्या पंजाने ठसकेदार धक्का द्यावयाचा. नंतर पुढे येऊन स्वाभाविकच बाकदार झालेल्या एका हाताच्या कोपरावर दुसऱ्या हाताने टाळी वाजवायची आणि हे करताना सतत पण मोठ्या आकर्षक ठेक्यामध्ये नाचावयाचे, असा हा खेळ खेळताना हे गाणे म्हणतात. पुढे मग सगळे दागिने संपेपर्यंत असे एकेक कडवे म्हणून झाल्यावर दोन्ही हात जोडून ते एकदा कपाळावर व एकदा तोंडावर आपटीत पक्‌वा घालतात. नंतर असे

बराच वेळ चालते. दोघीचौघीजणी जेव्हा हा खेळ खेळतात तेव्हा मोठी मजा येते व एक प्रेक्षणीय नृत्य पाहिल्याचे समाधानही लाभते.

**तुजा पिंगा ग माजा पिंगा ग**
**जातो म्हमई आनतो समई पोरी पिंगा**
**तुज्या पिंग्याची माज्या पिंग्याची**
**लागली दिष्ट ग उतरा मीठ ग पोरी पिंगा...**

हे गाणे जलद गतीने गाताना बायका **भुरूला** घालतात. म्हणजे डोईवरच्या पदराचे उजव्या बाजूचे टोक चांगले हातभर असे ओढून चिमटीत धरावयाचे आणि डावा हात कमरेवर ठेवून हा उजवा हात पदरासह डोक्याभोवती फिरवीत तोंडाने पक्वा घालावयाचा आणि स्वत:भोवती उभ्या उभ्याच आपले अंग गोल गोल फिरवायचे! हा खेळही विलक्षण कसरतीचा असून मोठा प्रेक्षणीय होतो. घाम फुटेपर्यंत यावेळी पक्वा घुमविण्यात येत असतो.

**माझा पिंगा की जातो वेशी की जातो वेशी**
**आणतो म्हशी की माझा पिंगा की माझा पिंगा**
**माझा पिंगा की जातो म्हमई की जातो म्हमई**
**आणतो समई की माझा पिंगा की माझा पिंगा**
**माझा पिंगा की जातो मळ्या की जातो मळ्या**
**आणतो शेळ्या की माझा पिंगा की माझा पिंगा**
**माझा पिंगा की जातो पुण्या की जातो पुण्या**
**आणतो वेण्या की माझा पिंगा की माझा पिंगा**
**माझा पिंगा की जातो वाड्या की जातो वाड्या**
**आणतो साड्या की माझा पिंगा की माझा पिंगा**
**माझा पिंगा की जातो तुळशी की जातो तुळशी**
**आणतो कळशी की माझा पिंगा की माझा पिंगा**

हे गाणे गाताना बायका स्वत:च्या हातावर टाळ्या देत स्वत:भोवती फिरून गोल गोल फिरत नाचतात; आणि प्रत्येक कडवे संपले की, टाळ्या बंद करून पक्वा घालीत कमरेवर हात ठेवून व मागेपुढे होऊन सुंदर नाचतात. ह्या गाण्यामध्ये तोंडातून बाहेर पडणारा पिंगा किती लांब जाऊ शकतो याच्या मर्यादा

दाखविल्या आहेत. त्याचबरोबर स्त्रीजीवनातील साधीसुधी हौसही भागविली गेल्याची सूचक नोंद केली गेलेली आहे.

तोंडाने नुसता पक्वा घालीत दोघीजणी समोर उभ्या रहातात आणि **रवी** खेळतात. अशा वेळी एकजण ताकाच्या डेऱ्यातील रवी होते. म्हणजे जागच्या जागी उभी राहून डोक्यावर दोन्ही हात एकमेकांत अडकवून धरीत एकदा डावीकडे आणि एकदा उजवीकडे सावकाश मान वळवीत असते. दुसरी बाई दोन्ही हात आळीपाळीने मागे पुढे करीत रवी घुसळते. दोघीही अशा वेळी न दमता पिंगा घालतात. त्यामुळे खरोखरच ‘घुसळण’ चालू असल्याचा भास होतो.

**किस् बाई किस्**
**दोडका किस्**
**दोडक्याची फोड लागती गोड**
**आणीक तोंड बाई आणीक तोंड**

हे गाणे गाताना दोघीजणी समोरासमोर उभ्या राहून एकमेकींच्याकडे हात पुढे करीत आपल्या पायावरच मागेपुढे होत नाचतात. दोडक्याच्या भाजीची चव किती गोड असते, याची माहिती या निमित्ताने वायकांनी सांगितलेली आहे. त्यामुळे शेतावरील हा प्रसंगही भाजीच्या चवीइतकाच गोड झाला आहे.

**सालम सलकी तुझी माझी पालखी**
**पालखीत बसू खोबरं किसू**
**चल ग राधे बनात ग**
**चाफ्याचं फूल माझ्या कानात ग**

आपल्याच हाताच्या टाळ्या वाजवीत एकदा डावीकडे आणि एकदा उजवीकडे मोठ्या वेगाने वळून गुडघ्यावर टाळी वाजवीत खेळते वेळी हे गाणे म्हणतात. ह्या गाण्यामध्ये अगदी घरगुती अशा भावना व्यक्त केलेल्या आहेत. जुन्या काळी मोठ्यांच्या वायका कुठे जावयाचे म्हणजे मेण्यात वसून जात असत त्याचाच इथे उल्लेख आला असावा! आपल्या पालखीत बसून खोबरे किसावयाचे म्हणजे घरात वसून हे विशिष्ट काम करावयाचे असाही यावरून एक अर्थ निघतो. चाफ्याचे फूल शुभ मानून ते बनात जाऊन आणावयाचे आणि ऐटीने कानावर ठेवीत त्याचा वास घ्यावयाचा ह्या जुन्या चालीचीही माहिती इथे आलेली आहे.

धडावर काय ?
डोकं.
डोक्यावर काय ?
केस.
केसावर काय ?
पदर.
पदरावर काय ?
चुंबळ.
चुंबळीवर काय ?
पाटी.
पाटीत काय ?
तान्हं बाळ.
बाळाच्या हाती काय ?
वाटी.
वाटीत काय ?
पैसा.
पैशाच्या लवंगा किती ?
वीस.
वीस बाई वीस, दोडका कीस
दोडक्याचं पाणी, घाल माझी वेणी
वेणीला गोंडा, सईचा झेंडा
सईची सरी, हरपली घरी, फू. . .फू. . .फू. . .

शेतकरी कुटुंबातील जीवनदर्शन घडविणारी लहानशी गोष्ट या गाण्यात आलेली आहे. कुणी कुणी हेच गाणे 'इथं मुंगी चावली' अशी नखाबोटापासून सुरुवात करून धडापर्यंत सर्वांग दर्शवीत म्हणतात. म्हणजे इथे अगदी साध्या सोप्या गोष्टींनादेखील स्त्रियांनी काव्याचा विषय करून टाकले आहे! या गाण्यातील पैशाला मिळणाऱ्या वीस लवंगा ही जुन्या काळची स्वस्ताई दर्शविणारी गोष्ट आणि डोक्यावर पाटी घेऊन त्यात बाळ निजवून शेतावर जायचा प्रसंग,

या दोन्ही बाबी सामान्य मनाच्या आवडीच्या आहेत. उभी फुगडी नाचून खेळावी तसा हा एक खेळ असतो. तो खेळताना हे गाणे म्हणावयाचे, पण चारचौघींच्या समुदायाने ह्या खेळास रंग भरतो. त्यामुळे एकमेकींस अशी प्रश्नोत्तरे करून मग खेळतात. दोडका किसायचा, ते पाणी वेणीला लावायचे, त्यात वेणीचा गोंडा भिजावयाचा, त्याकारणाने सईचा झेंडा खाली व्हावयाचा, सईची सरी त्या धांदलीत हरवायची आणि मग त्या गोष्टीचा बोभाटा 'फू...फू...फू...' करीत व्हावयाचा इत्यादी या कल्पना घरगुती तर आहेतच पण रोजच्या जीवनातल्याही आहेत. त्यामुळे एखादीला घडली गोष्ट रंगवून सांगावी त्याप्रमाणे बायका मोठ्या तन्मयतेने हे गाणे म्हणतात. शेवटचे 'फू...फू' तर विलक्षण प्रेक्षणीय होते.

**काथवट कणा, तेल्याचा घाणा**
**तेली गेला तिळाला, तेलात पडलं पाखरू**
**सईबाई तेच माझं लेकरू**

दोन्ही हातांनी आपल्या दोन्ही पायांचे आंगठे धरायचे आणि उजव्या कुशीवरून डाव्या कुशीवर असे एकसारखे वळत अंगणभर फिरायचे असा जो खेळ खेळतात, त्यासाठी हे गाणे रचलेले आहे. तेलाच्या घाण्याप्रमाणे बाई हा खेळ खेळताना, वळताना अगर फिरताना दिसते! म्हणून या 'काथवट कण्या'च्या खेळास ही उपमा दिली आहे. पुढील भाग तेल्याचा संबंध आला म्हणून आला आहे इतकेच. कुणी कुणी हेच गाणे असेही म्हणतात:

**काथवट कणा, चौघीजणी सुना**
**पाणी का ग द्याना, घाण का ग प्याना**

इथे सासूबद्दलचा तिरस्कार पराकोटीला गेलेला आहे! या पलीकडे या गाण्यास विशेष अर्थ नाही.

**सून—ये वैदा, ये वैदा, वाड्याला माझ्या चल**
**आतीचं चारी गोट, धन्याची बैलं आठ**
**भाग्याच्या शिंगा नऊ, नऊ वलनी बस चल**
**चल रं वाड्याला वैदा, वाड्याला माझ्या चल**
**वैद्य—मी तर आताशी, निजून उठलो**
**पुढं हो तू तंवर मी आलो**

**सून—अवो आत्ती　　　अवो आत्ती**
**वैद काई　　　येत न्हाई**
**दुकनं काई　　　सरत न्हाई**
**तुमी काई　　　मरत न्हाई**
**खोली रिकामी　　　होत न्हाई**
**तुमचं काय　　　दुकतं वो**

**सासू—खोकला येतूया ग?...ताप येतूया ग?...**

सासू आणि सून यांच्यामधील प्रेमसंबंध व्यक्त करणारे हे गाणे या दोन्ही भूमिका घेऊन बायका म्हणतात! एखादी सून तिखट असली म्हणजे वैद्याकडे जाऊन त्याला घरी चल म्हणून विनविते. गाण्यात दिले आहे तसे घरचे वैभव लालूच म्हणून त्याच्यापुढे ती सांगते. पण तो काही केल्या लवकर येत नाही. त्यामुळे ती माघारी येऊन फुसफुसते सासूचे दुखणे लवकर संपत नाही आणि मरून ती मोकळी होत नाही म्हणून चिडचिड करते. अशा वेळी 'काय होतंय?' म्हणून ती सासूला रागानेच विचारते आणि सासू दर वेळी वेगळे कारण देऊन कंटाळा येईपर्यंत उत्तर देत रहाते. शेवटी वैद्य येतो आणि आता तो सासूला तपासणार एवढ्यात सासू उठून त्याच्या उरावर बसते! अशा वेळी एवढा जोराचा हशा पिकतो की खेळणाऱ्या बायकांचेही अवसान गळून जाऊन त्या हसण्याच्या भरातच हा खेळ संपतो.

**मी तर होईन चांदणी**
**अतीच उंच गगनी**
**तिथे तू कैसा येशिल रे**
**तुझी माझी भेट कैशी रे**
**तू तर होशिल चांदणी**
**मी तर होईन पाखरू**
**चंद्राला घिरट्या घालिन ग**
**आणि मग तुजला भेटिन ग...**
**मी तर होईन आंबा**
**देईन साखरचुंबा**

तिथे तू कैसा येशिल रे
तुझी माझी भेट कैशी रे
मी तर होईन रावा
आंबा न् आंबा पाडिन ग
फांदी न् फांदी झोडिन ग
आणि मग तुजला भेटिन ग...
मी तर होईन मासोळी
राहिन समुद्रातळी
तिथे तू कैसा येशिल रे
तुझी माझी भेट कैशी रे
मी तर होईन भोया
आशा जाळं टाकिन ग
त्यामधि तुजला पकडिन ग
तळमळ तळमळ करशिल ग
आणि मग तुजला भेटिन ग...

राधाकृष्णांच्या रासक्रीडेची, प्रेमाची, भाषा करणारे हे गाणे टिपऱ्या खेळताना म्हणतात. कुणी कुणी गोफ गुंफतानादेखील हे गाणे म्हणतात. ह्या गाण्यामध्ये एकमेकांवरील प्रेमाची कसोटी पहाण्याची ही जी पद्धती सांगितली आहे ती मोठी अद्‌भुतरम्य आहे. एरवी एवढे कोडे टाकावयाचे आणि त्या परीक्षेत पास होण्यासाठी असे उत्तर देण्याचे सामान्य मनाला जमते ना !

लोकगीतांच्या सहवासात नटलेले असे पुष्कळ आणखी जुने खेळ आपल्याकडे असतील. पण माझ्या माहितीमधील असेच काही मी इथे दिले आहेत. माझ्या ओळखीप्रमाणे मी त्यांची इथे मांडणी केली आहे. कदाचित इतरांच्या ओळखीला त्यांचे वेगळे स्वरूप दिसले असणे शक्य आहे. कारण प्रत्येक प्रदेशाची चालरीत वेगळी आढळते. खेळांचेही तसेच होणे अशक्य नाही.

मराठीच्या परिसरात काही खेळ गाणे न गाताही बायका खेळत असतात. त्यांची संख्या पुष्कळ आहे. तथापि उदाहरण म्हणून एखादा खेळ या ठिकाणी ओळखीचा करून घेणे अप्रस्तुत होणार नाही.

सैपाकघरातील लाटणी घेऊन पुष्कळदा बायका व मुली लाटण्यांचा खेळ खेळत असतात. दोघींनी अगर चौघींनी दोन्ही हातांत लाटणे धरून समोरासमोर उभे रहावयाचे आणि मग पायांवर नाचत झिम्म्याप्रमाणे लाटण्यांवर लाटणे आपटीत खेळावयाचे, असा हा प्रकार आहे. मात्र हाच खेळ मंगळागौरीच्या वेळी गीत गातही खेळतात. पण असे उदाहरण अपवादात्मक म्हणूनच पहावयाचे. गीत न म्हणता खेळावयाचे असे खेळ किती तरी सापडतील.परंतु या प्रकरणामध्ये गाण्यांनी नटलेल्या खेळांचा व त्यांच्या गाण्यांचाच फक्त विचार केलेला आहे.

वैकुंठावरूनी घेतली धावु चंद्रभागातीरी पंढरी जाऊ
कुंडलिकाचा पाहुनि भाऊ मायबापाची करीतो सेवू
भिरकावीली वीट उभा ऱ्हा रे देवा
सावळा उभा पाहिला दिठी पुढं समाधि मागं इट्टल रखमाई
बंधु ज्ञानोबा भैन मुक्ताबाई पुढं समाधि मागं इट्टल रखमाई
आळंदी गाव इंद्रावनी तीरी वैष्णवांची ही बाळकं चारी
अवतार पांडुरंग नाव ज्ञानेश्वर
करी घडामोड जग उद्धराया
निवृत्ति सोपान भैन मुक्ताबाई
पुढं समाधि ही मागं इट्टल रखमाई
एकनाथ हे मुंगी पैठण बत्तीवाले घालूनी बामान
चांगदेव आले येवगी होऊन जासुदा हाती दिलं पत्र लिहून
मुक्ताबाईनं ते पाहिलं वाचून विचार मनाशी केला तिनं
अजून न्हाई गेली चांग्या तुझी भरांती
पुढं समाधि मागं इट्टल रखमाई
चौघं भावंड करीती विचार तोंड धुवायाला बसले भिंतीवर
निर्जीव भिंत चालली सत्वर चांगदेव पाहता पडे धरणीवर
निवृत्ति सोपान भैन मुक्ताबाई
पुढं समाधि मागं इट्टल रखमाई

वारीला निघालेल्या बायका पंढरपूरच्या अगर आळंदीच्या वाटेवर दिंडी-नाच करताना हे गाणे म्हणतात. हातात पताका नाही तर टाळ घ्यावयाचे

आणि मागेपुढे होत ठेक्यावर नाचावयाचे असा हा प्रकार आहे. मृदंगाच्या साथीबरहुकूम टाळांचा ताल आणि सर्वांगाची हालचाल होत असल्याने हा **दिंडी-नाच** मोठा प्रेक्षणीय होतो.

कोकणातील बायका देशावरील बायकांप्रमाणेच काही खेळ खेळतात. परंतु त्यांचे काही खेळ व लोकगीते देशावरल्यापेक्षाही निराळी असतात. नमुना म्हणून इथे त्यांपैकी एकदोन गाण्यांचा विचार करता येईल.

**भाद्रपद सुद्देवो चातुरथीला**
**गण आणीला गोऽ पूंजनाला**
**गनोबा आले गोऽ आनंद झाले**
**गनोबा आले गोऽ सर्वे पूंजती**
**नरनारी या सर्वजन् बोला**
**गनोबा आले गोऽ पूंजनाला**

भाद्रपदातील गौरीपूजनाच्या वेळी चुटक्यांचा झिम्मा घालीत हे गाणे बायका म्हणतात. या गाण्यामध्ये गणपतीच्या आगमनाप्रीत्यर्थ झालेला आनंद व्यक्त केलेला आहे.

**आठशे खिडकी नऊशे दार**
**कोण्या दरवाजानं गेली गो नार**
**जोडवी घालून झाली तयार गो**
**कोण्या दरवाजानं गेली गो नार**
**मंगलसुत घालून झाली तयार गो**
**कोण्या दरवाजानं गेली गो नार**
**येला घालून झाली तयार गो**
**कोण्या दरवाजानं गेली गो नार...**

शेतामध्ये भाताची अगर नाचणीची लावणी करीत असताना हे गाणे बायका म्हणतात. त्यांच्या पसंतीला उतरतील ते सर्व दागिने संपेपर्यंत हे गाणे याच पद्धतीने लांबत जाते. या गाण्याच्या सुरुवातीला आलेल्या आठशे खिडक्यांची व नऊशे दारांची कल्पना मोठी अद्‌भुत आहे. त्याचप्रमाणे सगळ्या दागिन्यांची केली गेलेली गुंफणही चित्तवेधक आहे.

स्त्रियांच्याप्रमाणेच पुरुषमंडळीदेखील सणासुदीच्या वेळी लोकनृत्ये करतात व गाणी गातात. त्यांच्या नृत्यगीतांचे वेळी ढोल, झांजा, ढोलके, मृदंग अशा प्रकारची वाद्ये अवश्य वापरली जातात. तसेच कोकणी मंडळी आपल्या पायांत घुंगुरांचा चाळ बांधून नाचतेली दिसून येतात.

कोळी, धनगर, कोकणी व आदिवासी इत्यादी मंडळी फावल्या वेळी नेहमीच गाणी गात लोकनृत्ये करताना आढळून येतात.

कोकणी मंडळींच्या नागपंचमीच्या लोकनृत्याचे एक गाणे मला नुकतेच मिळाले आहे ते असे :

**यावे नाचत गौरी बाळा**
**हाती घेऊनी पुष्पांच्या माळा**
**सर्वे ठायी मी वंदितो तुला**
**यावे नाचत गौरी बाळा**
**चौदा कलेचा तू माता पिता**
**सर्वे ठायी हाये तुझी सत्ता**
**किती विनवू तुला वेळूवेळा**
**यावे नाचत गौरी बाळा**
**साही शास्त्रे अठरा पुराण**
**तुझ्यापासून झाले निर्माण**
**चार वेदा हाती घेत मेळा**
**यावे नाचत गौरी बाळा**
**मुळारंभी सत्व धरी पाया**
**संगे घेत सरस्वती माया**
**भक्त देव येती मंडपाला**
**यावे नाचत गौरी बाळा**

हे गाणे गात कोकणी मंडळी चार किंवा सहा जणांचा एकेक गट करीत व एकमेकांचे हात कमरेभोवती ठेवीत एकदा डावीकडे व एकदा उजवीकडे अशी नाचत नाचत फेर धरून गोल गोल फिरू लागली म्हणजे बघणारांची तहानभूक हरपून जाते. या लोकांच्या पायांतील घुंगुरांचा झणत्कार अशा वेळी इतका सुंदर

व मनोहारी होत रहातो की गणपतीच काय पण हे लोकनृत्य बघायला जमले माणसेदेखील थुईथुई नाचत जाऊन स्वखुषीने या नृत्यात सामील व्हावयाच मोहाला बळी पडतील !

देशावरील शेतकरी मंडळी शेतातील पिके निघू लागली म्हणजे सामुदायि रीत्या त्यांची कापणी करीत असतात. अशा वेळी शेतावरून वाहणाऱ्या वाऱ्याच झुळकीच्या स्वरात गाताना आणि हातातील खुरप्याच्या किंवा कोयत्याच कापणीच्या तालात नाचताना डाव्या हातात उभ्या पिकाची मूठ धरून त कापीत मोठ्या गमतीने **भलरी** म्हणतात.

ही भलरी घालताना त्यांचे शरीर भराभर हलत असते व मन मोठ खुषीने डुलत रहाते.

शेतात होणारा हा नाच प्रेक्षणीय असतो. कधी उभे रहात तर कधी खाल वाकत, कधी शरीराला ओणवे करीत तर कधी जलद गतीने पुढे होत चालणा हा नाच भलरी गीतांच्या तालसुरात मोठा दणक्याने चालू असतो.

अशा 'भलरी'च्या वेळी जी अनेक गीते गायिली जातात त्यांपैकी वानव म्हणून एक इथे देत आहे ते असे :

**भलरी हो भलरी**
**भलरी गडी दादा**
**शाबास तुझी दादा**
**भलरी गडी दादा**
**जोडीदारा हो भलरी**
**भलरी गडी दादा**
( चाल बदलून )
**व्हय रं गड्या दादा**
**माझ्या सजना हो**
**हरी रामा, भलरी गडी दादा**
**शाबास तुझी दादा**
**दादा सजना हो**
**हरी रामा, भलरी गडी दादा**

(चाल बदलून)
रामा हो रामा, रामा रामा
रामाच्या बागामंदी
चावऱ्या मोटा दोनी
हाकीती हौशा धनी
जाईला जातं पानी
झुळझुळु मंजुळवानी
आंब्याच्या सावली चिंचवरी
रामाचं ध्यान गेलं सीतावरी
(चाल बदलून)
गाडीच्या गाडीवाना
दोन बैलं हौसंची
गळ्या घुंगुरमाळा गोंडं रेशमाची
ह्येच्या बागेत बंगला
हिरव्या हो रंगाचा
वर पिंजरा टांगला
राघू मैनांचा
नार घेती झुल्यावर
वारा मौजेचा

दर्याच्या किनाऱ्यावर रहाणारी कोळी मंडळी मासे धरायला जाताना टोळी-टोळीने व खेळीमेळीने जेव्हा जातात तेव्हा त्यांचे होणारे लोकनृत्य मोठे सुंदर असते. म्हणजे अशा वेळी आपल्या होडीत बसून व हातात वल्ही घेऊन ही मंडळी सपासप पाणी कापीत समुद्रात शिरतात व त्या नादात गीत गात रहातात. यावेळी होणारे नृत्य हे समुद्राच्या लाटांवर वल्ह्यांच्या व होडीच्या तालावर चालू रहाते. अशा वेळी म्हटले जाणारे एक गीत असे—

व्हलय रे नाखवा व्हलय रे ।। ध्रु० ।।
दर्यात मचवा झुलतांय लाडके
सावला दीर तुझा येतांय गो ।। १ ।।

**दंडात येला आनतांय लाडके**
**सावला दीर तुझा येतांय गो ।। २ ।।**
**पायात साकल्या आनतांय लाडके**
**सावला दीर तुझा येतांय गो ।। ३ ।।...**

हे गाणे या परीने सर्व दागिने या गीतात गुंफून संपेपर्यंत चालू रहाते व अखेरीस थट्टामस्करीत संपून जाते.

बिरुबादेवाची पूजा बांधताना खेड्यातील धनगर मंडळी ढोलनृत्य करीत असतात. याच नृत्याला काही भागांतून 'गजानृत्य' असेही म्हटले जाते.

या नृत्याच्या वेळी हातात झांज अगर रुमाल घेऊन ढोलाच्या तालसुरात धनगर मंडळी मोठा देखणा फेर धरतात. लेझीमच्या खेळाच्या वेळचे बहुतेक सारे हात या खेळाच्या वेळी काहीशा निराळ्या दिमाखात पहावयास सापडतात.

ढोलनृत्याच्या वेळी जी लोकगीते म्हटली जातात ती बहुतेक सर्व बिरुबादेवाच्या रोमांचकारी कथेने व्यापलेली असतात. या कथागीतांतील कल्पना अद्‌भुतरम्य असून ऐकता क्षणीच मनाला भुरळ पाडणाऱ्या असतात, अशा गीतांच्यापैकी साताऱ्याकडील चितळी गावी मिळालेले एक गीत असे आहे :

**एऽऽ सुंबरान मांडीलं — गा सुंबरान मांडीलं**
**बिरुबा गा देवाचं — एऽऽ सुंबरान मांडीलं**
**धरतरी मातेचं — मेघराया पित्याचं**
**चांदसूर्व्या बंदूचं — किसना कोयना भैनींचं**
**सुंबरान मांडीलं — बिरुबा गा देवाचं**
**सुरावंत्या बाळाचं — अवतारीक म्हाराजाचं**
**सुंबरान मांडीलं — काशीलिंग बिराप्पाचं**
**भयासूर वनात — हिवराच्या बनात**
**चार गावच्या मदाला — तीन गावच्या शिवला**
**सुंबरान मांडीलं — बिरुबा गा देवाचं...**

हे गाणे बिरुबादेवाच्या प्रीतिविवाहाची कहाणी सांगत या रीतीने जे सुरू होते ते विवाहाची सांगता होऊनच संपते! तोपर्यंत रात्र सरायला येते आणि

धनगर मंडळी न कंटाळता मोठ्या दिमाखाने ढोलनृत्य करीत एकसारखी उभीच असलेली दिसून येतात ! !

अशा प्रकारची पुरुषांची नृत्यगीते निरनिराळ्या भागांची व जमातींची अशी अनेक आहेत. इथे केवळ त्यांचा अल्पसा नमुना दिलेला आहे.

स्त्री आणि पुरुष यांनी एकत्र येऊन लोकनृत्य करीत गीत म्हणायची चाल उत्तर हिंदुस्थानात कुठे कुठे आढळते तशी आपल्याकडे नसली तरी काही ठिकाणी तशा नृत्यगीतांचा नमुना इथेही आढळून येतो.

'वाघ्यामुरळीं'चे लोकनृत्य हा एक त्यांपैकीच चटकदार असा वैशिष्ट्यपूर्ण नमुना होय. जेजुरीच्या अगर पालीच्या खंडोबादेवाची पूजा बांधणारी मंडळी म्हणून वाघ्यामुरळींचा लौकिक आहे. बेलभंडार उधळीत देवापुढे नाचगाणे करून देवाला खूष ठेवणे हे त्यांचे काम असते.

ह्या वाघ्यामुरळींच्या हातात दिमडी, चौंडकं व घंटी असते आणि सुरत्यांच्या हातात तुणतुणे व घाट असतात. त्या सर्वांचा वाद्यमेळ एकदा का सुरू झाला म्हणजे वाघ्यामुरळी बेभान होऊन नाचत रहातात आणि तोंडाने खंडोबाचा जयजयकार करीत निरनिराळी गीते गातात. त्यांपैकी वानवळा म्हणून इथे एकाचा उल्लेख करीत आहे:

**मल्हारवारी मोतियांनी द्यावी भरून**
**नाहीतर देवा मी जातो दुरून**
**नाहीतर देवा मी येतो फिरून ।।**
**गड जेजुरीचे आम्ही रहिवासी**
**देवाचा झेंडा वळखला दुरून**
**मल्हारवारी मोतियांनी द्यावी भरून ।।**
**बानू म्हाळसा रमाबाई शिंपीन**
**देवाचा चालली हात धरून**
**मल्हारवारी मोतियांनी द्यावी भरून ।।**
**सूरदासाचा निश्चय त्यांचा**
**देवाच्या चरणावर जावे मरून**
**मल्हारवारी मोतियांनी द्यावी भरून ।।**

मनाला विलक्षण विश्रांती देणारी आणि हुशारी आणणारी ही लोकगीतांची व खेळांची दुनिया मोठी हृदयस्पर्शी आहे. नृत्य, गीत आणि कहाणी हा लोकांच्या जीवनाला पावन करणारा एक त्रिवेणी संगम आहे. यामध्ये रसाविष्कार आहे, भावनाविष्कार आहे आणि जुनेपणातही काही नित्य नवे दाखविण्याची ताकद आहे.

लोकगीतांचे विषय आणि त्यावर आधारलेले हे विविध खेळ मराठीचे वैशिष्टय दर्शविणारे आहेत. सहजसुलभ रीतीने रोजच्या जीवनाचा आविष्कार करण्याची हिंमत त्यांच्यामध्ये आलेली आहे. या गीतांची भाषा नादमधुर आहे आणि खेळ सर्वांना सहज येतील असे चित्ताकर्षक आहेत. या गाण्यांमधून व खेळांमधूनही कुठे कुठे पुनरुक्ती झालेली आढळत असली, तरी त्यामुळे त्यांची शोभा कमी न होता उलट वाढलेलीच आहे. नृत्याला ही पुनरावृत्ती विशेष उपयोगी पडत असल्याने मुद्दामच तिची योजना झाली असावी. या गीतांमधून वारंवार आलेली गतिदर्शक क्रियापदेही या लोकनृत्याला पोषक असल्याने त्यांची गोडी अवीट झाली आहे. या लोकगीतांना लोकनृत्यांचे सुवासिक मिश्रण लाभल्याने ती सर्वांच्या विशेष आवडीची झाली असून लोकप्रियही झालेली आहेत. त्यामुळे सर्वसामान्य लोकांना तो एक सार्वजनिक ठेवा वाटतो. त्यांच्या दृष्टीने ते एक विशेष प्रकारचे असे मौलिक धन आहे. ते सर्वांचे आहे ते आमचे आहे, असे प्रत्येकाला अभिमानाने वाटते. लोकगीतांचे हेच सर्वांत प्रमुख वैशिष्टय होय.





# भोंडला (हातगा)

भाद्रपद संपून आश्विन उजाडला की, महाराष्ट्रातल्या बहुतेक प्रत्येक घरातील मुलींची मोठी धांदल उडून जाते. घरोघरी मुली 'भोंडला' अगर 'हातगा' घालीत असतात. त्यासाठी प्रत्येकीची जणू ईर्षेने तयारी चालू असते. अंगणात लाकडी पाट ठेवायचा, पाटावर रांगोळीने हत्ती काढायचा आणि त्या हत्तीची पूजा बांधायची, हा या हातगा घालण्याच्या मागे हेतू असतो. रब्बीच्या हंगामातील पिके तरारून वर येत असताना त्यांना अधिकाधिक टवटवी यावी म्हणून अभ्यंगस्नान घालणाऱ्या हस्त नक्षत्राचीच ही पूजा. पावसाळ्यातील हस्त नक्षत्राचा पाऊस मोठा मानाचा. रखरखीत उन्हाने तापलेल्या धरणीला 'वर्षा'ने शांत केल्यावर सर्वत्र आबादीआबाद करून सोडण्याचा त्याचा मान. शेतवाडीला आणि माणसांना भरपूर पाणी साठवून घेण्याची संधी तो देतो. त्यामुळे सर्वत्र आनंदीआनंद. म्हणूनच त्याची ही पूजा घरोघरींच्या मुलीबाळी हसतनाचत आनंदाने बांधतात.

अशा वेळी आपल्या सोंडेमध्ये हार धरलेले दोन हत्ती एकमेकांकडे तोंड करून उभे असल्याचे चित्र भिंतीवर टांगण्यात येते. तसेच या दिवसांत मिळणाऱ्या कोरांटीच्या, कारियळाच्या आणि झेंडूच्या फुलांची माळ नित्य नेमाने दररोज

त्या हत्तींच्या गळयांत घालण्याची चाल आहे. खेरीज सुरुवातीसच या मोसमात मिळणाऱ्या वांगे, दोडका, घोसाळे, भेंडी, पडवळ, सीताफळ, कारले, काकडी, मिरची, दुध्या भोपळा, साधा भोपळा, मुळा, गाजर, तोंडले, घेवडा, मक्याचे कणीस वगैरे सर्व फळामुळांचा हारही या चित्राच्या गळयात घालण्यात येतो.

सामान्यत: संध्याकाळी पाचच्या सुमारास हा हातगा घालावा म्हणून आळीपाळीने घरोघरी मुली दररोज एकत्र जमतात. त्यावेळी रांगोळीने काढलेला पाटावरचा हत्ती मध्ये ठेवून आणि लहानगी मुले मध्ये बसवून या मुली सभोवती फेर धरीत निरनिराळी गाणी म्हणतात. शेवटी कोणाला सहसा ओळखता येणार नाही अशी खिरापत पुढे आणून, आणि ती चिरडीच्या अगर परकराच्या सोग्यात लपवून, ओळखायला सांगतात. खिरापत ओळखली गेली नाही की, फारच मजा येते. अखेरीस ही कोणी तरी खिरापत ओळखली म्हणजे ती सर्वांना वाटून हा खेळ संपवितात.

हा हातगा सोळा दिवस घातला जातो. शेवटच्या दिवशी तर सोळा गाणी, सोळा खिरापती आणि सर्व प्रकारचा भरपूर खेळ असा मोठा गमतीजमतीचा व आनंदाचा हा उत्सव मुली आनंदाने पार पाडतात. या कामी घरच्या वडीलधाऱ्या बायकांचीही त्यांना भरपूर मदत होते. आपण स्वत: लहानपणी अनुभवलेला आनंद त्या या मुलींच्या निमित्ताने पुन्हा उपभोगतात. अशा वेळी तो आनंद पुरेपूर लाभावा म्हणून मुलींना गाणी सांगतानाही त्या अगदी एकजीव झालेल्या दिसून येतात. आपल्यापेक्षाही आपली मुलगी यावेळी गाणारी व्हावी ही ईर्षा त्यांच्या ठायी मोठ्या प्रकर्षाने आढळून येते.

भोंडल्याची व हातग्याची जी गाणी आज कितीक वर्षे सर्वत्र ऐकू येत आहेत ती मोठी सुरेख आहेत. त्यांचे अंतरंग घरगुती आहे. मांडणी रेखीव आहे. भाषा आकर्षक आहे. आणि 'गळा' तर फारच छान आहे. या गाण्यांची सुरुवात बहुधा पुढील गाण्याने करतात :

**ऐलमा पैलमा गणेश देवा**
**माझा खेळ मांडून दे करीन तुझी सेवा**
**माझा खेळ मांडिला वेशीच्या दारी**
**पारवं घुमतं बुरुजावरी**

पारवणी बाळाचे गुंजावणी डोळे
गुंजावणी डोळ्याच्या गुंफिल्या टिक्का
आमच्या गावच्या भुलोजी नायका
येशील काय देशील काय
कांडा तीळ बाई तांदूळ कांडा
आमच्या आया तुमच्या आया
खातिल काय दुधोंडे
दुधोंड्याची लागली टाळी
आयुष्य दे रे बा माळी
माळी गेला शेता भाता
पाऊस पडला येता जाता
पडपड पावसा थेंबोथेंबी
थेंबोथेंबी आळव्या लोंबी
आळव्या लोंबती अंकणा
अंकणा तुझी सात कणसं
भोंडल्या तुझी सोळा वर्षं

हस्ताचा पाऊस म्हणजे मुसळधार पाऊस. फार मोठा. या बाबतीत जुनी माणसे एक कहाणी सांगतात की, आभाळातील मोठे ढग समुद्रावर येऊन पोट फुटेपर्यंत पाणी पिऊन जातात आणि मग हत्तीच्या सोंडेची झारी करून ते आभाळातून पुन्हा खाली धरणीवर सोडतात! . . . हा पाऊस हत्तीच्या सोंडेतून पडतो म्हणूनच त्याला हस्ताचा पाऊस म्हणावयाचे. अशा या पावसाचे स्वागत करताना मुली म्हणत आहेत की, वेशीच्या दारावर मांडलेला माझा खेळ हे गणपतीबाप्पा तू चांगला मांडून दे. नुकत्याच विसर्जित केलेल्या गणपतीची आठवण करून मुली आपल्या उभ्या आयुष्याचा खेळ त्याला मांडून द्यायला सांगत आहेत! ही गाण्यातील हृद्य भूमिका उठावदार व्हावी म्हणूनच की काय रोजच्या जीवनातील प्रसंगांचा इथे उल्लेख आलेला आहे. बुरजावर घुमणारा पारवा, गावचा भुलोजी नाईक, तांदूळ कांडणे, आईचे खाणे, माळी, शेत, पाऊस, कणसे इत्यादी सर्व गोष्टी जमतील तशा इथे आलेल्या

आहेत. मनात आले ते आनंदाच्या प्रसंगी जसेच्या तसे बोलून मोकळे व्हावे तसे इथे झाले आहे.

यानंतर स्वाभाविकपणेच पुढे येणारे गाणे असे आहे :

**वाजे चौघडा रुण्झुण**
**आला ग हादगा पावणा**
**दारी तुळसा दऊणा**
**जाईजुई शेवंती दुपारी**
**फुले ग नाना परी**
**हार गुंफिते कुसरी**
**वहाते मी हादग्या परी**
**हादगा देव मी पूजिते**
**लवंगा सुपाऱ्या वेलदोडे**
**करून ठेविले विडे**
**आणखीन दुधातले दुधपेढे**
**वहाते मी हादग्यापुढे**
**हादगा देव मी पूजिते**
**सखयांना बोलाविते**
**हादगा देव मी पूजिते**

सुरुवातीला होणारी हातग्याची पूजा या गाण्यात वर्णिलेली आहे. (हातगा हा शब्द इथे हादगा असा उल्लेखिलेला आहे. हे दोन्ही शब्द सर्वत्र प्रचारात आहेत.) चौघडा वाजतो आणि हादग्याच्या येण्याची चाहूल देऊन आपले चित्त वेधून घेतो आहे, अशी या गाण्याची ही सुरुवात फारच सूचक अशी आहे. त्याचप्रमाणे या गाण्यात वर्णिलेल्या पूजेच्या व नैवेद्याच्या साहित्याबरोबरच दारातील तुळशीचे व दवण्याचे ओघाने सुचविले गेलेले मंगल वातावरणही मन प्रसन्न करणारे आहे.

मुली हातगा खेळायला लागल्या म्हणजे मग, कणगीचे तोंड बाजूला होताच अखंडपणे जोंधळे बाहेर पडावेत, त्याप्रमाणे एकामागून एक गाणी भराभर म्हणू लागतात. त्या गाण्यांना ठरलेला क्रम नसतो. सुचेल तसे किंवा आठवेल तसे या प्रकारचे गाणे ओठावर खेळायला लागते.

येवढं येवढंसं पाखरू माझं
लाल लाल ग त्याची चोच
गुंजावाणी ग त्याचे डोळे
सप्त पाताळी बाळ खेळे की पाखरू माझं
कोण्या बाजारासी गेलं
कोण्या नारीनं खुणाविलं की पाखरू माझं
दह्यादुधांनी भरल्या वाट्या
वर साखर रायपुरी
माझा जेवणार नानापरी की पाखरू माझं
दुधातुपांनी भरल्या वाट्या
वर साखर रायपिठी
माझा जेवणार जगजेठी की पाखरू माझं
लोण्या ताकांनी भरल्या वाट्या
वर साखर चवीयीला
आला गोविंद जेवायला की पाखरू माझं
हस्तीदंती ग आणा फणी
जावळ विंचरूनी घाला वेणी की पाखरू माझं
सोनियाचा ग पाळयीणा
मोतीयाची ग लावली दोरी
पुढं हालविते राधा नारी की पाखरू माझं

आपल्या लहानग्या बाळाचे कौतुक या गाण्यामध्ये आईने मनसोक्त केले आहे आणि ते गाणे आपल्या मुलीला म्हणायला शिकविले आहे. हेतू एवढाच की, मुलीला वात्सल्याची कल्पना यावी आणि त्या जिव्हाळ्यातील आनंद कळावा. शिवाय आपल्या लहान भावंडांना उद्देशून असे गौरवोद्‌गार इतरांच्यापुढे अभिमानाने काढावयाची तिला सवय लागावी. भावंडांमधील आपुलकी वाढावी. इथे वर्णन केलेली दह्यादुधाची, लोण्याची, तुपाची वर्णने त्या वेळच्या आबादीआबादीची साक्ष देतात. तसेच आपल्या मुलाला भगवान श्रीकृष्ण मानून हे गोरस भरपूर देण्याची आईच्या मनातील ईर्षाही दिसून

येते! सुरुवातीच्या तीनचार ओळींमधील बाळाच्या सौंदर्याचे वर्णनही मोठे सुंदर आहे.

**पानपुडा की शंकरचुडा की शंकरचूडा**
**मामा माझा की लेकुरवाळा की लेकुरवाळा**
**त्याच्या घरी की दुभतं काही की दुभतं काही**
**मामा पाहुणा आला बाई की आला बाई**
**त्याला जेवायला काय काय करू की काय काय करू**
**त्याला जेवायला साखरउंडे की साखरउंडे**
**मामा सांगे की मामी भांडे की मामी भांडे**
**त्यानं आणली की तेलंग साडी की तेलंग साडी**
**नेसून गेले मी बुरुजावरी की बुरुजावरी**
**तिथं हरपली इरुद्या जोडवी की इरुद्या जोडवी**
**सासूबाईंना कळू गेलं की कळू गेलं**
**चार चाबूक चमकाविले की चमकाविले**
**ते बाई चाबूक दूरच्या दूर की दूरच्या दूर**
**माझं माहेर पंढरपूर की पंढरपूर**
**माझं आजोळ रत्नांगिरी की रत्नांगिरी**
**रत्नांगिरीच्या बांगड्या साध्या की बांगड्या साध्या**
**येता जाताना खुळखुळ वाजे की खुळखुळ वाजे**

माहेरच्या आणि सासरच्या माणसांची तुलना करण्याचा इथे प्रयत्न झालेला आहे. आपला लेकुरवाळा मामा आपले दुभते घर सोडून आपल्याकडे येणार, तेव्हा त्याला उत्तम जेवण दिले पाहिजे, ही आईची शिकवण या गाण्यात प्रकट झाली आहे. आपली भावना आईने जणू मुलीच्याकरवी इथे बोलून दाखविली आहे. लाडक्या भाचीला आणलेली तेलंग साडी (तेलंगणातील–आंध्र प्रांतातील) किती मोलाची असते, हे उभ्या गावाला दाखवावे म्हणून ती गावातल्या बुरुजावर जाऊन दिमाखाने उभी रहाते ही कल्पना हृदयंगम तशीच त्या वेळच्या जुन्या काळातील त्या गावच्या किल्ल्याचे वास्तव्यही दर्शविणारी आहे. लग्नाच्या वेळची पायातील इरुदी जोडवी हरवली म्हणून सासूबाईंनी चाबकाचा मार

दिला ! त्यामुळे माहेरची आणि आजोळची आठवण होऊन शेवटी आजोळी ातलेल्या साध्या बांगड्यांवर मनाचे समाधान स्थिर झाले, असा इथे प्रकट ालेला भोळ्याभाबड्या मनातील भावनाविष्कारही मोठा गमतीचा आहे.

**हातूका मतुका, चरणी चतूका**
**चरणीच्या सोंडेवरी**
**बाळ खुळखुळ गोंडेवरी**
**एकेक गोंडा विसाविसाचा**
**नागर साड्या नेसायचा**
**नेसा ग नेसा मावल्यांनो**
**सात घरच्या पाव्हण्यांनो**
**पाव्हण्या गेल्या खोली**
**सितानं टाकली डोली**
**चिटक्या मिटक्या करंडफूल**
**ते बाई फूल मी तोडीलं**
**हातग्या देवा वाहीलं**
**हातग्या तुझा तुरारा**
**मोतीयाचा भुरारा**
**भैनी तुमचा चांद वो**
**मोतियाचा भांग वो**
**चांदासरशी निळ्ळी घोडी**
**येता जाता कमळं तोडी**

या गाण्यामध्ये अनेक कल्पना एकत्र आलेल्या आहेत. हत्तीच्या पुढे वाहिलेल्या स्त्राला लावलेला एकेक गोंडा विसाविसाचा असा मौल्यवान आहे ! म्हणजे ा एवढा महागडा गोंडा (त्या वेळच्या स्वस्ताईच्या मानाने) वापरणारी स्त्री ारी नागर साडी नेसणारी आहे. अशा चांगल्या सात घरच्या पाहुण्या जणू वस फेडावा म्हणून हातग्या देवाकडे आल्या आहेत ! त्या वेळच्या रिवाजाप्रमाणे ण्यामध्ये बसून येणाऱ्या बायकांचा इथे उल्लेख आला आहे. तसेच पूर्वी वसापलीकडे सामान्य स्त्रियांना अंक मोजता येत नसत, हेही यावरून दिसून येते !

पूजेसाठी जमविलेली फुले, बसायला मिळालेली निळी घोडी, वहिणीच्या भांगातील मोत्यांची बिंदी वगैरे गोष्टींचा इथे आलेला उल्लेख जुने ऐश्वर्य दर्शवीत आहे. ही गाणी नेमकी केव्हा तयार झाली याचा मागोवा घेता येत नसला, तरी त्यामधील वर्णनावरून त्या वेळचा काळ बराच जुना असला पाहिजे हे उघड आहे.

एक लिंबू झेलू बाई दोन लिंबू झेलू
तीन लिंबू झेलू बाई चार लिंबू झेलू
चार लिंबू झेलू बाई पाच लिंबू झेलू
पाचा लिंबांचा पानोळा
माळ घाली हनुमंता
हनुमंताची निळ्ळी घोडी
येता जाता कमळं तोडी
कमळाच्या पाठीमागं लपली राणी
अग अग राणी इथं कुठं पाणी
पाणी नव्हे यमुना जमुना
यमुना जमुनाची बारीक वाळू
तिथं खेळे चिलार बाळू
चिलार बाळाला भूक लागली
सोन्याच्या शिंपीनं दूध पाजलं
पाटावरच्या घडीवर निजवलं
नीजरे नीजरे चिलार बाळा
मी तर जाते सोनारवाड्या
सोनारदादा सोनारदादा
गौरीचे मोती झाले का नाही
गौरीच्या घरी तांब्याच्या चुली
भोजन झाले आवळीखाली
उष्टया पत्रावळी चिंचेखाली
शेणगोळा आंब्याखाली
पान सुपारी उद्या दुपारी

या गाण्याचा उत्तरार्ध याशिवाय कुणी कुणी असाही म्हणतात :

**गौराईच्या माहेरी तांब्याच्या चुली**
**मांडव घातला मखमखपुरी**
**लगीन लागलं सूर्यातळी**
**उष्ट्या पत्रावळी चिंचेखाली**
**टाळ्या पोळ्या पुराणाच्या पोळ्या**
**भुलाई जाते सासरी**
**जाईल तशी जाऊ द्या**
**खीर पोळी खाऊ द्या**
**आमचा भोंडला वर्षाला येऊ द्या**

या गाण्यामध्ये एवढ्या गोष्टी एका ठिकाणी गोळा झाल्या आहेत की, नेमके काय म्हणायचे आहे हे लक्षात येत नाही. परंतु हे गाणे विशेष लोकप्रिय आहे. या गाण्याची चाल आणि ठेका मोठा आकर्षक असल्यानेही त्याची मोहिनी मुलींच्या मनावर पडते. इथे एक लहानशी कथा सांगण्याचा प्रयत्न झालेला दिसतो. लिंबांशी खेळ खेळणारी बाई त्या लिंबांच्या पानांची माळ हनुमंताच्या गळ्यात घालते. त्या हनुमंताची निळी घोडी असते व तो येता जाता कमळे तोंडीत असतो. (हा हनुमंता कोण याचा मात्र एवढ्यावरून मागमूस लागत नाही. कदाचित ते एखादे विशेषनामही असणे शक्य आहे.) त्या कमळाच्या पाठीमागे कोणी तरी स्त्री लपलेली असते. यमुनेच्या काठावर पाणी आणायला ती जाते. तिथे चिलार (श्रीयाळ) बाळ खेळत असते. त्याला घेऊन ती सोन्याच्या शिंपीने दूध पाजते, पाटावर निजवते आणि स्वत: सोनाराकडे जाऊन गौरीच्या दागिन्यांची चौकशी करते. होता होता ती गौरीच्या घरी जाऊन तेथील वर्णन करते आणि मग स्त्रीस्वभावाला अनुसरून जेवण्याखाण्याचा उल्लेख करीत भोंडल्याला दर वर्षाला यायचे निमंत्रण देते, असा ह्या कथेचा गोषवारा या गाण्यावरून काढता येईल. कदाचित भोंडला खेळण्यासाठी जमलेल्या मुलींनी भातुकली खेळून जेवण उरकले असण्याचीही शक्यता वरील वर्णनावरून दिसून येते! त्यामुळे एकूण सर्व वर्णनच स्त्रियांच्या रोजच्या जीवनातील अगदी घरगुती असे इथे चितारले गेल्याने त्याची गोडी स्त्रीमनाला भुरळ पाडीत असावी!

अक्कण माती चिक्कण माती
अश्शी माती सुरेख बाई ओटा तो मळावा
अस्सा ओटा सुरेख बाई जातं ते रोवावं
अस्सं जातं सुरेख बाई सोजी ती काढावी
अश्शी सोजी सुरेख बाई करंज्या कराव्या
अश्शा करंज्या सुरेख बाई दुरडी भराव्या
अश्शी दुरडी सुरेख बाई शेल्यानं झाकावी
अस्सा शेला सुरेख बाई पालखी ठेवावा
अश्शी पालखी सुरेख बाई माहेरी धाडावी
अस्सं माहेर सुरेख बाई खेळाया धाडीतं
अस्सं सासर द्वाड बाई कोंडूनी मारीतं

इथे स्त्रीजीवनातील सुग्रीणपणाचा उल्लेख आलेला आहे. माहेरी जायचे म्हणजे किती शेलका खाऊ सर्वांसाठी करून न्यावयाचा याचे मोठे सुरेख वर्णन इथे केलेले आहे. सासरची माणसे खेळायला धाडीत नाहीत आणि फक्त कामातच जखडून ठेवतात, म्हणून ती द्वाड आणि माहेरची माणसे काम न सांगता खेळायला धाडतात म्हणून ती चांगली, अशी जुन्या काळच्या लहान वयात लग्न झालेल्या मुलीने व्यक्त केलेली या गाण्यातील भावना प्रौढ वयातील सासुरवाशिणीच्या डोळ्यांतही पाणी उभे करते! वय वाढले तरी माहेरची माया सुटत नाही, उलट ती चंद्राच्या वाढत्या कलेप्रमाणे वाढतच जाते, हे दर्शविण्याचा या गाण्यामागचा हेतू काळजाला चटका लावणारा आहे.

हेच गाणे कुठे कुठे पुढीलप्रमाणेही सांगतात :

एवढंसं घरकुल बाई सारवूनी काढावं
उखळ त्यावरी रोवावं बाई जातं जी मांडावं
अस्सं उखळ गोड बाई खपल्या कांडाव्या
अश्शा खपल्या गोड बाई गहू ते ओलवावे
अस्से गहू गोड बाई जाती ते टाकावे
अस्सं जातं गोड बाई सोजी ती काढावी
अश्शी सोजी गोड बाई गव्हले ते वळावे

अस्से गव्हले गोड बाई दुरडी भरावे
अश्शी दुरडी गोड बाई माहेरी धाडावी
अस्सं माहेर गोड बाई खेळाया धाडीतं
अस्सा खेळ गोड बाई आजोळी नेईतो
अस्सं आजूळ गोड बाई खायाला मिळतं
अस्सं सासर द्वाड बाई कोंडूनी मारीतं

या गाण्याचा तोंडवळा मागच्या गाण्यापेक्षा काहीसा निराळा दिसत असला तरी मथितार्थ तोच आहे. स्थलभिन्नत्वाप्रमाणे पदार्थांची भिन्नताच तेवढी काय ती इथे अधिक दिसून येते आहे.

हरीच्या नैवेद्याला केली
जिलबी बिघडली
त्यातली एवढीशी उरली मळी
त्याची केली बुंदी कळी
तुपात तळली साखरेत घोळली
जिलबी बिघडली
त्यातला एवढासा उरला पाक
त्याचा केला साखरभात
तुपात तळली साखरेत घोळली
जिलबी बिघडली
त्यातलं एवढसं उरलं पीठ
त्याचं केलं थालीपीठ
तुपात तळली साखरेत घोळली
जिलबी बिघडली

देवाला नैवेद्य दाखवावा म्हणून जिलबी केली खरी पण ती ऐन वेळी बिघडल्या-कारणाने ते कोणाच्या लक्षात येऊ नये म्हणून इतर पदार्थांसाठी ते साहित्य कारणी लावून, झाकली मूठ सव्वालाखाची ठेवण्यात होणारा आटापिटा येथे वर्णन केलेला आहे. स्त्रीजीवनात अधूनमधून अचानक निर्माण होणाऱ्या प्रसंगाचे हे वर्णन मोठे गमतीचे आहे. कारण ऐन वेळी प्रसंगावधान राखून

बिघडलेल्यातूनच एखादी वस्तू कारणी कशी लावावी, ही गोष्ट इथे मोठ्या सूचक रीतीने सांगितलेली दिसून येते.

**खाइल्या पट्टीत वईल्या पट्टीत**
**पेरला राळा बाई पेरला राळा**
**कोण्या देशीचा काऊ आला बाई काऊ आला**
**एक लोंबट खोडुन नेलं बाई खोडुन नेलं**
**सईच्या अंगणी झोकुन दिलं बाई झोकुन दीलं**
**चोळुन मोळूनी राळं केलं बाई राळं केलं**
**सईनं उचलूनी घरात नेलं बाई घरात नेलं**
**कांडुन कुटूनी तांदुळ केलं बाई तांदुळ केलं**
**म्होरच्या बाजारी विकाय नेलं बाई विकाय नेलं**
**त्या बाई तांदळाचा खुरदा आला बाई खुरदा आला**
**त्या बाई खुरद्याची बांगडी लेली बाई बांगडी लेली**
**सासूबाईनं ठोसला दिला बाई ठोसला दिला**
**तो बाई ठोसला दूरच्या दूर बाई दूरच्या दूर**
**माझं माहेर पंढरपूर बाई पंढरपूर**
**माझं आजूळ रत्नांगिरी बाई रत्नांगिरी**
**माझ्या हातात कोइमतुरी चुडा बाई कोइमतुरी चूडा**
**मला बसायला निळ्ळा घोडा बाई निळ्ळा घोडा**
**कोण्या देशीचे गहू आणले बाई गहू आणले**
**त्याच्या चपात्या केल्या नऊ बाई केल्या नऊ**
**त्या बाई चपातिच्या तारा तुटं बाई तारा तूटं**
**माझ्या झिम्म्याचा धिंगाणा ऊठं बाई धिंगाणा ऊठं**

एखाद्या शेतावर घर बांधून रहाणाऱ्या शेतकऱ्याच्या घरच्या एका प्रसंगाचे हे वर्णन आहे. ही एक चिमुकली कथा आहे. कुठला तरी कावळा अचानक येऊन राळ्याचे लोंबट तोडून नेतो आणि ते अंगणात सापडल्यानंतर सई त्याचे चोळून-मोळून आणि कांडूनकुटून राळे करून बाजारात विकते. त्या विक्रीकारणाने आलेल्या पैशाच्या ती बांगड्या घालते म्हणून सासू रागावते. अशा वेळी बसायला

मिळणारा निळा घोडा तिच्या लक्षात येतो आणि मग वन्सी गव्हासारख्या चांगल्या अशा दूर देशातील गव्हाच्या चपात्या माहेरी खाऊन भरपूर खेळायला मिळते ही आठवण होऊन तिला रुखरूख वाटते ! या गाण्यातील ही कथा लक्षात घेता एक गोष्ट उघड होते की, माहेरी होणारे कौतुक व स्वतःची कर्तबगारी बाई या निमित्ताने समाजापुढे ठेवीत आहे! अशा गाण्यांमधून वरचेवर आढळून येणारे माहेर पंढरपूर आणि आजोळ रत्नागिरी म्हणजे पंढरीचा विठोबा आणि कोल्हापूरचा (रत्नागिरी) ज्योतिबा हे देव असावेत असे म्हणायला हरकत नाही. देवाच्या दारी माहेराप्रमाणे मोकळचा मनाने खेळता येते असे इथे सुचविले असावे ! या गाण्यात शेवटी झिम्म्याचा उल्लेख आलेला आहे. हातगा घालताना फेराचा झिम्मादेखील मुली कुठे कुठे खेळतात व त्यावेळी हे गाणे म्हटले जाते.

**कोथिंबिरी बाई ग आता कधी येशिल ग**
**आता येईन चैत्रमासी**
**चैत्रा चैत्रा लौकर ये**
**हस्त घालिन हस्तारा**
**देव बसविन देव्हारा**
**देव्हाऱ्याच्या चौकटी**
**उठताबसता लाथाबुक्की**
**घे काठी लाग पाठी**
**घेत नाही काठी लागत नाही पाठी**
**घरादाराची लक्ष्मी मोठी**

हातगा संपत यावा आणि घट बसावेत अशा वेळची कल्पना या गाण्यात आलेली आहे. पावसाळ्यात भरपूर बहर आलेल्या कोथिंबिरीशी बोलता बोलता चैत्रमासाला बोलावणे केले आहे. हस्त नक्षत्रात हातगा घालायचा आणि नवरात्रात देव बसवायचे. पण देव्हाऱ्याजवळ फार काळ घालवला की सासू उठता बसता रागे भरील ही भीती वाटते. तिचे कोणी कान भरील ही धास्ती वाटते. पण तसे होत नाही. घरादाराची लक्ष्मी म्हणून सुनेचा मान राखला जातो, अशी या गाण्यात व्यक्त झालेली कल्पना मोठी सूचक आहे.

पूर्वीच्या काळी लेकीवाळींना व सुनांना अशा रीतीने उपदेश करण्याची प्रथा फार होती.

**बाईच्या परसात भेंडीचं झाड**
**भेंडीचं झाड बाई खारवलं**
**मामाचं घर बाई थोरवलं**
**मामाच्या घरी येऊन जा**
**तूप रोटी खाऊन जा**
**घाल ग मामे तुपाची धार**
**तुपाची धार गेली वाऱ्यावनं**
**भैनी आल्या पालखीतनं**
**बाप आले घोड्यावनं**
**आई आली चुड्यावनं**
**भाऊजी आले कुत्र्यावनं**
**का वो भाऊजी रुसला**
**काळा विंचू डसला**
**काळा विंचू पापी**
**रांजणाच्या काठी**
**रांजण गेला गडगडी**
**पाऊस आला धडाधडी**

आजोळच्या जिव्हाळ्याची गोष्ट या गाण्यात सांगितलेली आहे. मामाच्या घरी भेंडीचे पीक भरपूर आले आहे आणि अशा वेळी तिथे लक्ष्मी आनंदाने नांदत असताना आपण आजोळी जावे, तिथे तूपरोटी खावी आणि मजा मारावी असे एखादीला मनापासून वाटते. पण मामीने थोडी ढिलाई केल्या-कारणाने सारे बिनसते. टाकोटाक ही वातमी मग आईला समजते. आपापल्या मानाने सगळी गोळा होतात. पण भाऊजी मात्र काळ्या कुत्र्यावरून आल्याने हशाच हशा होतो. त्यांच्या या येण्याला काही तरी कारणमीमांसा जोडून शेवटी विनोद निर्माण झाला असून, पाऊस मुसळधार पडण्यात गाणे थांबते. विनोद करणे शक्य होईल अशी नाती जमा करून अशा प्रकारची भाषा

करण्याची प्रथा अद्यापही खेड्यामध्ये आहे. घटकाभर खेळीमेळीने वेळ काढावा हा त्यामागचा हेतू इथे सफल झालेला दिसतो.

**काळी चंद्रकळा नेसू मी कशी**
**गळ्यात हार बाई वाकू कशी**
**पायात पैंजण चालू कशी**
**बाहेर मामाजी बोलू कशी**
**दमडीचं तेल मी आणू कशी**
**दमडीचं तेल बाई आणलं**
**सासूबाईचं न्हाणं झालं**
**वन्सबाईंची वेणी झाली**
**मामांजींची दाढी झाली**
**उरलेलं तेल झाकून ठेवलं**
**लांडोरीचा पाय लागला**
**येशीपातूर ओघळ गेला**
**त्यातनं हत्ती वाहून गेला**

या गाण्यामध्ये अगदी पराकोटीची अतिशयोक्ती वर्णन केलेली दिसून येते. सासरच्या घरचे उणेपुरे बोलून दाखवताना जीभ किती वळवळ करते, त्याचा हा मासलेवाईक नमुना आहे. घरच्या माणसांचा थोडा धाक असला की, कोणती गोष्ट किती पराकोटीला जाते हे इथे चांगले दाखविलेले आहे. अर्थात हा केवळ विनोद आहे हे विसरून चालणार नाही.

**एवढासा तांदूळ नखांनी खुडीला**
**भारा जी बांधिला येशीभाईर टाकीला**
**गाय आली हुंगून गेली**
**म्हैस आली खाऊन गेली**
**म्हैशीला झाला रेडा**
**गाईला झाला पाडा**
**तोच रेडापाडा बापाजींचा वाडा**
**बापाजींनी घेतली जांभळी घोडी**

**जांभळ्या घोडीची नेटकी चाल**
**जिथं पाऊल पडलं तिथं कोलापुरी शाल**
**कोलापुरी शाल बाई उंदरून दिशी**
**ठसा पडल बाई चोळीचोळी देशी**
**ठस्सा मस्सा अंबर घस्सा**
**अंबरात पडली काडी**
**तीच काडी उप्पर माडी**
**उप्पर माडीवर कमळाचं तळं**
**त्या बाई तळ्यात परटीन धूती**
**विठूच्या टोपीला निळा रंग देती**
**विठूची टोपी बाई रंगाची**
**रखमाईची चोळी भिंगाची**

शेतकरी घराण्यातील वडिलांच्या घरच्या दौलतीचे वर्णन इथे आलेले आहे. एवढा एवढासा तांदूळ नखाने खुडून घेऊन उरलेले निकामी गवत वेशीच्या वाहेर टाकले आणि ते गाईने हुंगले व म्हशीने खाल्ले. त्यामुळे गाईला पाडा झाला व म्हशीला रेडा झाला ! वडिलांच्या घरी दावणीला त्या दोघांना जागा मिळाली. पण वडिलांनी निळी घोडी घेऊन तिच्या नेटक्या चालीचा उपयोग करून घेतला. अशा वेळी घडले असे की, जिथे पाऊल पडावे तिथे कोल्हापुरी शाल मिळू लागली एवढी त्यांची कर्तबगारी वाढली, कोल्हापुरी शाल मोठी देखणी. चार देशांत उठून दिसणारी . . . वडिलांच्या कर्तबगारीची ही हकिगत आल्यानंतर या गाण्यात कुठल्या तरी वरच्या माडीवरील तळ्याचे वर्णन येऊन शेवटी विठ्ठल व रुक्मिणीच्या कपड्यांच्या गोष्टी आलेल्या आहेत. त्यावरून असे दिसते की, माणसाच्या चांगुलपणाला देवादिकांचा आधार मिळावा ही कल्पना त्यामागे असावी. तसेच, अशा गाण्यांमधून वरचेवर येणारी निळी घोडी म्हणजे त्या वेळच्या ऐश्वर्याचा दिमाख दर्शविणारी गोष्ट असली पाहिजे.

**नणंदा भावजया दोघीजणी**
**घरात नव्हतं तिसरं कोणी**

शिक्यावरचं लोणी खाल्लं कोणी
मी नाही खाल्लं वहिनीनं खाल्लं
आता माझा दादा येईल ग
दादाच्या मांडीवर बशीन ग
वैनीच्या चाडचा सांगीन ग
दादा तुझी बायको चोरटी
असू दे माझी चोरटी
घे काठी लाग पाठी
घरादाराची लक्ष्मी मोठी

या गाण्यामध्ये नणंदा भावजयांच्या नात्यामधील एक महत्त्वाचा प्रसंग चित्रित झालेला आहे. घरात दोघीजणीच असायच्या आणि झाल्या गेल्याचा आळ फक्त वहिनीवरच यावयाचा ही रोजच्या व्यवहारातील एक साधी गोष्ट आहे. पण भावनेच्या दृष्टीने ती फार महत्त्वाची आहे. खोडी होईल ती फक्त भावजईच्या हातूनच आणि नणंद तेवढी करूनसवरून नामानिराळी अशी ही कल्पना सर्वत्र रूढ झालेली तिचाच हा आविष्कार. पण त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट म्हणजे नवऱ्याने तिची बाजू घेतली असून वहिणीच्या चहाडचांना धुडकावून लावले आहे.

नणंदा भावजया दोघीजणी
खेळत बसल्या अंगणी
भावजईवरी डाव आला
रुसून बसली गाईच्या गोठ्यात
सासुरवाशी सून रुसून बसली कैशी ?
यादवराया राणी रुसून बसली कैशी ?
नणंद गेली समजावयासी
उठा उठा वैनी चला घरासी
सोन्याची सुपली देते तुम्हासी
सोन्याची सुपली नक्को मला
मी नाही यायची तुमच्या घराला

**सासुरवाशी सून रुसून बसली कैशी ?**
**यादवराया राणी रुसून बसली कैशी ?**

हे गाणे असे बरेच लांबलचक आहे. शब्दरचना सर्वत्र पुढे हीच आहे. फक्त नणंदेच्या ऐवजी घरची इतर माणसे तिचा रुसवा काढायला जातात व सोन्याच्या सुपलीऐवजी इतर पदार्थांचे आमिष दाखवितात, एवढाच काय तो फरक. दीर चेंडूदांडू घेऊन येतो, जाऊ ताकाचा डेरा देऊ करते, सासरा पैशाची पेटी देतो म्हणतो, सासू अर्धा संसार देईन म्हणते पण तिची मर्जी मुळीच फिरत नाही ! अखेर शेवटी नवरा आल्यावर मात्र साराच रंग निराळा दिसून येतो.

**नवरा गेला समजावयासी**
**उठ उठ राणी चल घरासी**
**लाल लाल चाबूक देतो तूशी**
**उठली ग बाई गजबजून**
**पदर घेतला सावरून**
**सासुरवाशी सून घरासी आली कैशी ?**
**यादवराया राणी घरासी आली कैशी ?**

आणि मग हे गाणे असे संपते. इथे हट्टी सुनेचे स्वभावचित्र रेखाटलेले आहे. पण त्याचबरोबर नवऱ्याचा धाकही ती मानून असते, याचा मोठ्या मार्मिकतेने उल्लेख आलेला आहे.

**सोन्याची सुपली बाई मोत्यांनी गुंफली**
**तिथं आमच्या वन्सं खेळत होत्या**
**वन्सं वन्सं, मला आलं मूळ**
**गुणाचे गौरी मला काय पुसतीस पूस जा आपल्या दिराला**
**सोन्याचा चेंडू बाई मोत्यांचा दांडू**
**तिथं आमचे भाऊजी खेळत होते**
**भाऊजी भाऊजी, मला आलं मूळ**
**गुणाचे गौरी मला काय पुसतीस पूस जा आपल्या जावेला**
**सोन्याची रवी बाई रुप्याचा डेरा**
**तिथं आमच्या जाऊबाई ताक करीत होत्या**

**जाऊबाई जाऊबाई, मला आलं मूळ**
**गुणाचे गौरी मला काय पुसतीस पूस जा आपल्या सासऱ्याला**
**सोन्याची सहाण बाई रुप्याचं खोड**
**तिथं आमचे मामाजी पूजा करीत होते**
**मामाजी मामाजी, मला आलं मूळ**
**गुणाचे गौरी बरीच दिसतीस पूस जा आपल्या सासूला**
**सोन्याचा करंड बाई रुप्याचा आरसा**
**तिथं आमच्या सासूबाई कुंकू लावीत होत्या**
**सासूबाई सासूबाई मला आलं मूळ**
**गुणाचे गौरी बरीच दिसतीस पूस जा आपल्या नवऱ्याला**
**रुप्याचा पलंग बाई रेशमाची गादी**
**तिथं आमचे पती निजले होते**
**पती पती, मला आलं मूळ**
**आणा फणी, घाला वेणी, जाऊ द्या राणी माहेरा**

या गाण्यामध्ये जुन्या काळच्या ऐश्वर्याची आणि आज्ञाधारकपणाची माहिती सर्वत्र गोविलेली आहे. माहेरचा मुराळी न्यायला म्हणून आला की, घरच्या प्रत्येकाची कशी मनधरणी करावी लागत असे, ह्याचा हा एक म्हाण्याजोगा नमुना आहे. प्रत्येकाकडे जावे आणि ज्याने त्याने स्वतःवर जबाबदारी न घेता दुसऱ्यावर ढकलून रिकामे व्हावे असा हा प्रकार आहे! अखेरीस नवऱ्याने समंजसपणा दाखवावा आणि बायकोला माहेरी धाडून तिचे मन सांभाळावे, ही उदार मनाची खूणगाठही येथे मोठ्या खुबीने चित्रित झालेली आहे.

**सासरच्या वाटे कुचकुच काटे**
**कोण पाहुणा आला ग बाई...हूं...हूं...**
**सासरा पाहुणा आला ग बाई...हूं...हूं...**
**सासऱ्यानं काय आणलं ग बाई...हूं...हूं...**
**सासऱ्यानं पाटल्या आणल्या ग बाई...हूं...हूं...**
**पाटल्या मी लेत न्हाई, संगं मी येत न्हाई**

चारी दरवाजे लावा ग बाई...हूं...हूं...
झिपरं कुत्रं सोडा ग बाई...हूं...हूं...

असे हे गाणे घरची सगळी नाती जवळजवळ सगळे दागिने घेऊन येस्तोवर व त्यांना प्रत्येकाला नकार देईपर्यंत चालते. पण शेवटी नवरा आल्यानंतर मात्र एकदम वातावरण वदलते !

सासरच्या वाटे कुचकुच काटे
कोण पाहुणा आला ग बाई...हूं...हूं...
पति पाहुणा आला ग बाई...हूं...हूं...
पतीनं काय आणलं ग बाई...हूं...हूं...
पतीनं चाबुक आणला ग बाई...हूं...हूं...
चाबुक मी लेते, संगं मी येते
चारी दरवाजे उघडा ग बाई...हूं...हूं...
झिपरं कुत्रं आवरा ग बाई...हूं...हूं...

आणि मग हे गाणे संपते. ह्या गाण्याचा सगळा तोंडवळा जवळजवळ मागे आलेल्या गाण्याप्रमाणेच आहे. पण ती परिस्थिती सासरच्या घरातील होती आणि ही माहेरची आहे एवढाच काय तो फरक. बाकी मानपान येथून तेथून सर्वत्र सारखेच! हे गाणे एकीने म्हणावयाचे व बाकीच्यांनी फक्त 'हूं...हूं' करावयाचे असते. त्यामुळे कहाणी ऐकताना लागणारी चित्ताची एकाग्रता व गाणे पुढे सरकायला लागणारे उत्तेजन हे दोन्हीही मिळत असल्याने, ऐकताना मोठी मौज येते. अशाच प्रकारचे आणखी एक गाणे थोड्या-फार शब्दांच्या फरकाने ऐकायला मिळते. हे गाणे हातगा घालताना म्हणतात. त्याचे अंतरंग असे :

अरडी बाई परडी ग
परडी एवढं काय ग
परडी एवढं फूल ग
दारी मूळ कोण ग
दारी मूळ नणंद ग
नणंदेनं काय आणलंन् ग

नणंदेनं पाटल्या आणल्या ग
पाटल्या मी घेत नाही संगं मी येत नाही
चारी दरवाजे लावा ग बाई
झिपरं कुत्रं सोडा ग सई...

येथेही मागच्या गाण्याप्रमाणेच सर्व प्रकार घडत जातो व शेवटी नवऱ्याचे म्हणणे ऐकावे लागते. अशा या सर्व गाण्यांमधून 'असे पति देवचि ललनांना' या भावनेने परमोच्च बिंदू गाठलेला दिसतो व नवऱ्याखेरीज भागणार नाही या कल्पनेने वायकोही आपला सगळा तोरा सोडून देते ही वस्तुस्थिती येथे या रीतीने प्रकट झालेली दिसते.

आला चेंडू गेला चेंडू, राया चेंडू झुगारिला
आपण चाले हत्ती घोडे, राम चाले पायी
राम ग वेचीतो कळ्या
सीता ग गुंफिते माळा
आल्या ग लगीन वेळा
आकाशी घातीला मंडप
जरतारी घातीलं बोहलं
जरम्‌जरती बसले पती
पतीन् पती तिरूबाई राळा
तिरूबाई राळा मुंजाबाळा
मुंजाबाळाची मुंजक दोरी
तीच दोरी सावध मारी
सावधा सावधा सर्वतकाळ
सर्वतकाळाचा दोर
आणा दोर बांधा चोर
बांधा चोर बाई झाडाशी
झाड झपकं, फूल टपकं
ते बाई फूल मी तोडीलं
बहिणा माथा खोवीलं

बहिणा तुझी वेणी ग
सोनीयाची फणी ग
बहिणा तुझा खोपा ग
उंदीर घेतो झोपा ग

येत असतील त्या सगळ्या गोष्टी एखाद्याला भराभरा सांगून मोकळे व्हावे तसा प्रकार या गाण्यामध्ये आढळून येतो. सुरुवातीला आलेली राम आणि सीता, नंतरची लगीन वेळ, बोहलं, तिरूवाई राळा, मुंजावाळ, सर्वतकाळ, चोर, झाड व फूल इत्यादी या गोष्टी अशा रीतीने येथे एकत्र झालेल्या आहेत की, कशाचाच कशाला पत्ता लागत नाही! तथापि सुरुवातीचे रामाचे नाव आणि शेवटचा विनोद यामुळे मुलींना हे गाणे म्हणताना खूप मजा वाटते.

आमच्या परसात भेंडीचं झाड
लवलव डहाळ्या हालतील ग
अंबरमामा बाई येतील ग
फुलफुल साड्या आणतील ग
फुलफुल साड्या बाई नेसू
लांब लांब पदर काढू
लांब लांब पदर जरतारी
आमचे मामा व्यापारी
तोंडात चिकणी सुपारी
सुपारी गेली फुटून
मामा आले उठून

या लहानशा गाण्यामध्ये श्रीमंत मामाचे व लाडक्या भाचीचे वर्णन थोडक्यात पण खुबीदार रीतीने केले गेलेले आहे. साडीची हौस मामा पुरवीत असे ही गोष्ट सांगायला हा चिमुकला संसार येथे उभा केला आहे! हातगा घालताना म्हणावयाची अशी पुष्कळ लहान लहान गाणी आहेत.

माझी वेणी मोकळी
सोनीयाची साखळी

**साखळी देऊ देवाला**
**देवा, दे मला अंगारा**
**अंगारा देऊ आईला**
**आई, दे मला साडी**
**साडीच्या पदरी रुपया**
**भाऊ माझा शिपाया**

ज्याला हवे ते मिळवून देऊन आपणाला हवे ते पदरात पाडून कसे घ्यावे, याची कल्पना इथे थोडक्यात दिलेली दिसते. तसेच जुन्या काळी भाऊ शिपाई असणे म्हणजे मोठी मानाची गोष्ट असे, याही गोष्टीचा उल्लेख मागे आलाच आहे.

**अहिल्या पहिल्या गनीस देवा**
**माजा खेळ मांडिला वेशीच्या दारी**
**पारवा घुमतो बुरजावरी**
**पारवाळ पक्काचे गुंज गुंज डोळे**
**आमचा मारुती शिकार खेळे**
**खेळत खेळत गेला मळचाला**
**फुलाची माळ आनली हत्तीला**

या गाण्यामध्ये अगदी सुरुवातीच्या 'ऐलमा पैलमा' पलीकडे विशेष काही नाही. फक्त शिकार खेळणाऱ्या मारुतीचा उल्लेख इथे जादा आला असून त्याने मळचाला जाऊन हत्तीसाठी फुलांची माळ आणल्याची माहिती वेगळी दिली गेली आहे.

**डेरा ग डेरा मांडीला अवधानी**
**त्या बाई डेऱ्यात कायसंसं घुमतं**
**घुसळण घुसळी राधीका गवळण**
**तिकडून आले कृष्णाजी दातार**
**कृष्णाजी कृष्णाजी, दान द्या**
**निळ्या घोडीवर बसून जा**
**निळी घोडी वाकली, सखुबाई सुंदर हासली**
**सखुबाई तुमच्या अंगणी, सुंदर चाफा लावूनी**

**ऐसा चाफा फुलला, चला बाई कळ्या तोडायला**
**आम्ही बाई कळ्या तोडील्या, आम्ही बाई हार गुंफिले**
**हारा हारा चाफेळी, रात्र झाली गोकुळी**

इथे गोकुळच्या राधाकृष्णांचे वर्णन आलेले आहे. सखुबाई हे नाव कुणाचे तरी नाव घालायचे म्हणून इथे आले आहे या पलीकडे त्याला वेगळा अर्थ दिसत नाही. सर्वत्र राधाकृष्णांच्या लीलेची माहिती गोवलेली आहे व शेवटी अंगणातील चाफ्याच्या फुलांचा हार गुंफताना रात्र झाली असा उल्लेख आला आहे. निळी घोडी खाली वाकते व त्यामुळे ताक करीत उभी असलेली राधा कृष्ण खाली उतरून खेळायला आल्याकारणाने हसते, हा उल्लेखही इथे मोठ्या खुबीने केलेला आहे.

**गंगु रंगु तंगु गऽ मिळूनी हादगा गाऊऽ**
**केळी नारळी बकुळ पोफळी वरती लिंबू लावू**
**अननस पपनस कणीस आंबा वरती डाळिंब लावू**
**खिरापती या किती तऱ्हेच्या करंज्या मोदक लाडू**

या लहानग्या गाण्यामध्ये जमलेल्या मैत्रिणींच्या व खिरापतीच्या नावांची फक्त नोंद झालेली आहे. ही नोंद हातगा घालताना आवश्यक असल्याने मोठी गमतीची वाटते. मुलगी हातगा गाऊन झाल्यावर जेव्हा परकराच्या सोग्यात खिरापत लपवून जमलेल्या सगळ्याजणींना ती ओळखायला सांगते, तेव्हा ती खिरापत लवकर ओळखली नाही म्हणजे मोठी बहार उडून जाते. अशा वेळी अक्कल जणू पणाला लागते या ईर्षेने हातगा जिच्या घरी घालावयाचा ती मुलगी आपली खिरापत मुली हरतील कशा हे मुद्दाम पहाते! त्यामुळे रोज न ओळखणारी खिरापत कोणती करावी याची काळजी त्या मुलीप्रमाणेच तिच्या आईला व आजीलाही फार घ्यावी लागते!

**आड बाई आडवनी**
**आडाचं पाणी खारवनी**
**आडात होता गणोबा**
**गणोबा आमचा सत्याचा**
**पाऊस पडला मोत्यांचा**

**आड बाई आडवनी**
**आडाचं पाणी खारवनी**
**आडात पडला शिंपला**
**आमचा भोंडला संपला**

भोंडला अगर हातगा घालायचा संपला म्हणजे शेवटी हे गाणे म्हणायचा प्रघात आहे. या गाण्यात आडाचे पाणी खारे असले तरी आत नुकताच टाकलेला गणपती सत्याचा वाली असल्याने भरपूर पाऊस होतो व प्यायला गोड पाणी मिळते, ही कल्पना प्रकट झालेली आहे. ह्या गाण्याच्या उत्तरार्धात विशेष काहीच सांगितलेले नाही. तथापि फक्त आता भोंडला संपला हे मात्र जरूर सूचित केले गेले आहे.

हातग्याची मला सापडली ती गाणी मी इथे दिली आहेत. तथापि ती आणखीही किती तरी असण्याची शक्यता असून ती मिळवावीत तशी आपली लांबतच जातात. संपत म्हणून नाहीतच! सगळ्याच लोकगीतांचे तसे आहे. त्यामुळेच या गीतांचे नावीन्य व गोडवा! आणि दर वर्षाचे न संपणारे माहात्म्यही!

**हस्त हा दुनीयाचा राजा**
**तयासी नमस्कार माझा**
(चाल बदलून)
**नमस्कारासरशी आला वारा**
**आधी पडल्या मेघधारा**
**मागून पडल्या मुसळ धारा**
(चाल बदलून)
**धारा या दुधाच्या दिसती**
**त्यांनी ग पिके ही पोसती**
(चाल बदलून)
**हस्ताची मग पाळी आली**
**म्हणौनी त्याने गंमत केली**
**त्याच्या योगे झाला चिखल**
**त्या बाई चिखलात लावल्या केळी**

**एकेक केळ मोठालं**
**हदग्यापुढे वाहिलं**
(चाल बदलून)
**हादगा मी गांधारी पूजीते**
**सखयांना बोलवीते, हादगा देव मी पूजीते**

या गीतात हस्त नक्षत्राचे वैशिष्टच वर्णन केलेले आहे. या नक्षत्रात होणारा पाऊस हा वर्षभराचे पाणी साठविणारा होत असल्यामुळे त्यास दुनियेचा राजा म्हटले आहे.

हस्ताचा पाऊस पडतो कसा आणि दुधासारखा दिसतो कसा व त्यामुळे पिके पोसली जाऊन सर्वत्र आनंदीआनंद होतो कसा याचे वर्णन इथे आले आहे.

अखेरशेवटी ह्या पावसाने झालेल्या चिखलात लावलेल्या केळीचे फळ हातग्याला वाहून त्याची पूजा बांधल्याचाही उल्लेख या गाण्यात आलेला आहे. शिवाय हातगा देव पूजणारी स्त्री स्वत:ला गांधारी म्हणून संबोधित असल्याची अपूर्वाईही इथे सांगितली गेली आहे.

आपल्याकडे महाराष्ट्रात (पश्चिम महाराष्ट्रात) हातगा घालतात त्याच वेळी खानदेशात व वऱ्हाडात भुलाभाईचा खेळ खेळतात. हा खेळ भाद्रपद पौर्णिमेपासून तो आश्विनी पौर्णिमेपर्यंत महिनाभर चालतो. शंकराला भोलानाथ, भुलोबा, म्हणतात. म्हणून पार्वती म्हणजे भुलाबाई होय.

घरातील कोनाड्याला मखर लावून अगर चांगली आरास करून त्यात भुलोबा व भुलाबाई यांची दोन मातीची चित्रे मांडतात. त्यांची पूजा संध्याकाळी मुलीबाळी एकत्र जमून गाणी गात करताना दिसून येतात. हातग्याप्रमाणेच या खेळासही रोज खिरापत असते व ती ओळखूनही घ्यावी लागते. शेवटच्या दिवशी म्हणजे कोजागिरीस हळदीकुंकू आणि फराळाचे करून भुलाबाईचे विसर्जन होते.

भोंडल्याप्रमाणेच भुलाबाईचीही अनेक गाणी आहेत. त्यांपैकी काही इथे नमुन्यादाखल म्हणून देत आहे.

**पहिली ग भुलाबाई देवा देवा साजे**
**घातीला मंडोबा खेळीखेळी खंडोबा**

**खंडोबाच्या नादी बाई वर्षा वर्षा आवपणी**
**आवपणीचं पाणी तसं गंगेचं पाणी**
**गंगेच्या पाण्यानं वेळीला भात**
**जेवीला कंथ हनुमंता बाळा**
**हनुमंत बाळाचे लांब लांब झोके**
**शिकारीचे डोळे हातपाय गोरे**
**भाऊ भाऊ टेकती माथा फुलं झळकती**
**झळकतीचं एकच पान**
**दुरून भुलाबाई नमस्कार**

भुलाबाईच्या गाण्याला प्रारंभ होतो तो पार्वतीच्या नमनाच्या गाण्याने. खंडोबा आणि हनुमंत (महारुद्र) हे शंकराचे अवतार समजले जातात. म्हणून त्यांचा या गाण्यात उल्लेख आलेला आहे. ह्या दोघांना इथे भाऊ भाऊ म्हणून संबोधिले आहे व त्यांची भेट झाल्याचे म्हटले आहे.

हे दिवस पावसाळ्याचे असतात म्हणून या गाण्याचा प्रारंभ दर वर्षी येणारी भुलाबाई लक्षात घेऊन केलेला असतो.

**एवढीशी गंगा झुळझुळ वाहे**
**तांब्या पितळी नाय ग**
**हिरवी टोपी घाल ग**
**हिरवी टोपी हारपली**
**सर्पा आड लपली**
**सरपदादा हेकोडा**
**जाई आंबा पिकला**
**जाई नव्हे जुई नव्हे**
**चिंचेखालची राणूबाई**
**चिंचा तोडीत जाय ग**
**पाच पानं खाय ग**
**खाता खाता रंगली**
**तळ्यात घागर बुडाली**

गंगेचे पाणी (नदीचे पाणी) अगदी झुळझुळते आहे आणि ते भरून घ्यायला जवळ तांब्या अगर पितळीही नाही. अशा वेळी इथे नदीला हिरवे वस्त्र परिधान करण्यास विनंती केली आहे! किंवा जी बाई पाणी भरायला जाईल तिने आपल्या बाळाला तसे म्हटले असावे असाही एक अर्थ येथे निघतो. ही हिरवी टोपी सर्पाआड लपली आहे! (इथे याचा नेमका अर्थ लागत नाही) आणि तो हेकोडा मानून जाईजुई व आंब्यांची शंका निर्माण झाली आहे. परंतु तो सारा भ्रम ठरतो व चिंचेखालची ती राणूबाई निघते! ती चिंचा तोंडीत जाते व पान खाते. पान खाता खाता तिचा विडा रंगतो व त्या नादात तिची घागर तळ्यात बुडून जाते, अशी ही एक लहानशी कथा आहे. लहान मुलाला घास भरवताना चिऊकाऊची गोष्ट सांगावी तसा हा प्रकार वाटतो.

**एके दिवशी काऊ आला बाई काऊ आला**
**एकच कणीस तोडून नेलं बाई तोडून नेलं**
**सईच्या अंगणात टाकून दिलं बाई टाकून दिलं**
**कांडून कुटून राळं केलं बाई राळं केलं**
**घागर घेऊन पाण्याला गेली बाई पाण्याला गेली**
**तिथं निळा विंचू चावला ग बाई चावला ग**
**आला ग माहेरचा वैद्य**
**डोक्यात टोपी ग जरतारी**
**अंगात सदरा बुट्टेदारी**
**नेसाया रेशमी धोतर**
**हातात काठी ग चंदनाची**
**कसा ग दिसतो राजावाणी**

या गाण्याची भोंडल्याच्या गाण्यासारखीच सुरुवात असून नंतर ती सई पाण्याला जाते व तिथे तिला विंचू चावल्याकारणाने तिच्या माहेरचा वैद्य येऊन तिला बरे करतो अशी गोष्ट पुढे आली आहे. माहेरच्या वैद्याचे हे वर्णन मात्र माहेरचा रुबाब दर्शविणारे आहे, हे चटकन ध्यानात आल्याविना रहात नाही.

**या या भुलाबाई आमुच्या आळी आमुच्या आळी**
**तुमच्या अंगात निळी चोळी निळी चोळी**

निळ्या चोळीवर काढला मोर काढला मोर
निळ्या मोरावर सांडला गुलाल सांडला गुलाल
भुलोजी दल्लाल घरी नाही घरी नाही
या या भुलाबाई आमुच्या आळी आमुच्या आळी
तुमच्या अंगात लाल लाल चोळी लाल लाल चोळी
लाल लाल चोळीवर बसला मोर बसला मोर
बसल्या मोरावर सांडलं अत्तर सांडलं अत्तर
भुलोजी मास्तर घरी नाही घरी नाही
या या भुलाबाई आमुच्या आळी आमुच्या आळी
तुमच्या अंगात पारवी चोळी पारवी चोळी
पारव्या चोळीवर काढला मोर काढला मोर
बसल्या मोरावर सांडलं पाणी सांडलं पाणी
भुलोजी वाणी घरी नाही घरी नाही

या गाण्यात खेळायला जमलेल्या मुली भुलाबाईला मैत्रीण समजून आपल्याबरोबर खेळायला बोलावीत आहेत. आणि दर वेळी तिच्या चोळीचे त्या वर्णन करीत असतानाच त्यांना भुलोजी घरी नाही तर मी कशी येणार असे भुलाबाई उत्तरादाखल सांगते आहे.

येथुन दाणा पेरीत जाऊ माळियाच्या दारी
हळूच भुलाबाई पाय टाका साखळ्या तुमच्या भारी
येथुन दाणा पेरीत जाऊ माळियाच्या दारी
हळूच भुलाबाई पाय टाका तोरड्या तुमच्या भारी
येथुन दाणा पेरीत जाऊ माळियाच्या दारी
हळूच भुलाबाई पाय टाका तोडे तुमचे भारी

ह्या गाण्यात माळ्याच्या घरी दाणे पेरीत जाऊया म्हणून भुलाबाईला गळ घातली जाते आहे. परंतु भुलाबाईच्या पायांतील दागिने भारी जड असल्याने तिला हळूच पाऊल टाकण्याचा इशारा दिला जातो आहे! माळ्याच्या घरी जाऊन फुले आणण्याचा तिचा मानस असावा असे यावरून दिसते!

भोंडला (हातगा) व भुलावाई यांची ही गाणी काही लहान तर काही मोठी अशी असून सगळी अगदी खाजगी स्वरूपाचे जीवन चित्रण करणारी आहेत. त्यामुळे त्यांची गोडी विशेष आहे. शिवाय त्यांची स्वररचनाही सुरेख असल्याने त्यांचे विशेष आकर्षण जाणवते.

परंतु अलीकडे महाराष्ट्राचे राऊळ एके काळी दणाणून सोडणारी ही घरोघरीची गीतपूजा वरीचशी मावळत चालली आहे ! कुठे कुठे तुरळकपणेच तिचे दर्शन घडते ! ! शहरात तिची वर्दळ कमी होत चाललेली दिसली तरी अद्यापही खेडोपाडी ती तग धरून आहे. मुलीबाळींचा हा आवडता छंद त्यांना भरपूर खेळायला व मनमुराद गायला मोकळीक देणारा असा आहे. परंतु अलीकडच्या सुधारलेल्या जगात त्याची किंमत घरच्या वडीलधाऱ्या बायकांच्या जवळ उरलेली नाही ! त्यामुळे ही अनास्थेची परिस्थिती निर्माण झाली आहे. नाही तर जुन्या काळच्या घरच्या वडीलधाऱ्या बाईला घरात भोंडला यायचा म्हणजे कोण भूषण वाटे ! मुलींच्यापेक्षा मूल होऊन तिचा हात ही पूजा सजवायला सिद्ध व्हायचा. कारण ह्या पूजेत ती स्वतःचे बाळपण आठवून सौभाग्याची वाढती मागणी देवाकडे करायची !





# नागपंचमी

**श्रावण** महिन्यात दर वर्षी येणारी नागपंचमी म्हणजे सर्वसामान्य स्त्रीजीवनातील एक मोठा विसावा आहे. खेडोपाडीच्या वहुतेक सर्व माहेरवाशिणी यावेळी माहेरी आलेल्या असतात. वर्षभर या ना त्या कारणाने कामाच्या रगाड्यात गुंतलेल्या मनाभोवतालची बंधने यावेळी ढिली होतात. वयाचेदेखील माणसाला भान रहात नाही! 'वर्षा' ऋतूमधील पावसाळ्याचा मनमुराद आस्वाद घेत घरचे काम बाजूला सारून, झाडून सगळ्या बायका खेडोपाडी यावेळी मोकळ्या मनाने खेळत असतात. हसत खेळत एकमेकींच्यामध्ये मिसळताना त्यांना विलक्षण समाधान मिळते. लहान मोठ्या, तरुण वयस्कर अशा सगळ्याजणी वयाचा मागमूसही न लागू देता हा सण मोठ्या थाटाने पार पाडतात. भरपूर खेळायचे आणि खूप गावयाचे हे या सणाचे वैशिष्ट्य आहे. त्यामुळे श्रावण निघाला की, लगेच बायका गुणगुणायला लागतात :

**आखाडमासी एकादशी नागारपंचीम कोण्या दिशी, साजणीबाई ग**
**या बाई पंचमीची लाही बोलावा आलाया ग बाई, साजणीबाई ग**
**बोलाव्याचं घेते गोंडं गणपतीची वाकडी सोंड, साजणीबाई ग**
**गणपतीच्या हाती लाडू महालक्ष्मीला वाढू, साजणीबाई ग**

या बाई लक्ष्मीची पात्रं घरात आली बघा पित्रं, साजणीबाई ग
पित्राची मी निसते डाळ आली घटाची वो माळ, साजणीबाई ग
घटाची वो घाटीगटी शिलंगणाची केली दाटी, साजणीबाई ग
शिलंगणाचं घेते सोनं दिवाळीनं केलं येणं, साजणीबाई ग
दिवाळीची पुजते पंती संक्रांत आली नेन्ती, साजणीबाई ग
संक्रांतीचं पुजते सुगडं माही पुनव आली उघड, साजणीबाई ग
पुनवेची घेते ओंबी शिमगा खेळे झोंबाझोंबी, साजणीबाई ग
शिमग्याची जळती व्हळी रंगपंचमी आली खेळी, साजणीबाई ग
रंगपंचमीचा रंग पाडवा आला टोलेजंग, साजणीबाई ग
पाडव्याची उभारते गुडी आकितीनं मारली उडी, साजणीबाई ग
आकितीचा तळते वडा आंब्याचा ग शेणसडा, साजणीबाई ग
आंबा खाऊन झाले गार पावसाची चळकदार, साजणीबाई ग

म्हणजे बाराही महिन्यांतून येणारे सगळे सण त्यांच्या वैशिष्टयांसह एकत्र जमा करून, नागपंचमी केव्हा आहे याचा तपास लावीत बायका खेळायला सुरुवात करतात. रोज रात्री कामधाम आटोपले की, ही पंचमी यायच्या अगोदर आठवडाभर तरी मुळीबाळी अंगणात खेळ खेळत गाणी गायला सुरुवात करतात. आणि मग एखाद्या दिवशी कुणी तरी हळूच सांगते की,

पंचमी आली बुधवारी पुस नक्षीत्रावरी
देवई नातू झाला वसुदेव आनंदला
चोपुनी केली भुई चवरंग त्या ठाई
वर बसवू रखमाबाई पंचमी ग ये ग बाई
केळीचे रवले खांब
कुरळे केस विचरीती
वेनी गुंफीत्यात नारी
वेनीयीचा साज झाला
पिवळ्या नागायाची मुद
हारपाळ खेडी पुतळी
काखत खेडी कोयाळी

**कोथिंबिरी येल बाळी**
**पंचमी बुधवारी आली**

आणि मग तेवढ्या आधारावर हसत खेळत सणाची तयारी सुरू होते. या गाण्यात आलेल्या पुष्य नक्षत्रासंबंधीचा हा उल्लेख लक्षात घ्यावयाचा म्हणजे हे गाणे रचले असेल त्यावेळी ते नक्षत्र होते आणि तो वार होता असे समजावयाचे. एरवी दर वर्षी तो वार आणि ते नक्षत्र असेलच असे नाही. वसुदेवाला नातू झाला, त्यासाठी घरात चोपून भुई केली, तिथं चौरंग ठेवला, त्याभोवती केळीचे खांब रोवले, त्या चौरंगावर बसून रखमाईने केस विंचरले, वेणी गुंफिली, तिच्यात सोन्याचे दागिने घातले आणि मग फराळाचे जिन्नस पुढे आले व शेवटी पंचीम केव्हा आली आहे ते सांगितले असा ह्या गाण्याचा आशय आहे. या गीतात आलेली व्यक्तींची नावे देवादिकांची असली, तरी त्याच देवमाणसांच्या उल्लेखा-साठी ती आली नसून सामान्य मनाला देवाचे नाव घेतले की, बरे वाटते म्हणूनही आली आहेत.

नागपंचमीचा सण म्हणजे नागाची पूजा करावयाचा दिवस. या दिवशी गारुडी किंवा वैदू नाग घेऊन घरोघरी जातात. पायांत पैंजण बांधून पुंगी वाजवतात. त्या नादावर त्यांच्याजवळच्या टोपलीतील नाग फणा काढून फुस्कार सोडीत डुलतो. मग बायका हळदकुंकू वाहून नागाची पूजा करतात. नमस्कार घालतात. नैवेद्य म्हणून दुधाची वाटी पुढे ठेवतात. ओवाळणीला जुने कपडे किंवा पैसाअडका ऐपतीप्रमाणे देतात.

खेड्यामध्ये बहुतेक प्रत्येक घरात भिंतीवर मातीने अगर शेणाने आदल्या दिवशी सारवतात. नागपंचमीच्या दिवशी मग त्या जागेवर हळदीने नाग काढतात. त्या चित्राभोवती पांढऱ्या चुन्याच्या व चुलीजवळच्या काजळाच्या अगर काळ्या रंगाच्या ठिपक्या देऊन शोभा आणतात. शिवाय मातीचा नागोबा करून त्याला पाटावर बसवायचे, दुधातुपाचा नैवेद्य दाखवायचा, लाह्या वहायच्या, पोवते घालावयाचे, फुले वहायची वगैरेही असतेच. आणखी एक वैशिष्ट्य असे की, या दिवशी बायका सडासारवण, दळणकांडण अगर पोळ्या लाटणे, कानवला लाटणे हे सर्व टाळतात! कारण विचारले तर 'तशी चाल आहे' असे उत्तर येते. तथापि नागाचा फणा दुखावला जाऊ नये अशी अंधश्रद्धा या चालीमागे असावी असे दिसते.

या दिवशी नागाची पूजा करावयाची म्हणजे जणू वाडवडिलांचा आशीर्वादच एका परीने घ्यावयाचा. अशी एक जुन्या काळची समजूत आहे की, नागाच्या रूपाने आपले वाडवडील आपल्या घराभोवती पहारा करून आपल्या धनदौलतीचे रक्षण करतात! या संदर्भात पुराणात अशी कथा आहे की--'ब्रह्मा नावाचा एक फार मोठा देवमाणूस होऊन गेला. त्याला कुठे तरी एक जुनी पोथी चाळताना असे आढळून आले की, शमी नावाच्या झाडाखाली फार मोठी धनसंपत्ती पुरली आहे! त्यामुळे त्याने ही बातमी लगेच तिथल्या ठाकुराला दिली. त्याचा परिणाम असा झाला की, ठाकुराने लगोलग तिथे पहारा बसवला. ते धन आपल्या ताब्यात घेतले. आणि रातोरात आपल्या किल्ल्यात त्याची रवानगी करून तेथे ते पुरून ठेवले! इकडे तोवर काय झाले की, त्या जागेवर त्या संपत्तीची पूजा करावी म्हणून ब्रह्मा आला तो ठाकुराने त्याला तिथे जिवंत पुरले! त्यानंतर अशी गोष्ट घडली की, ब्रह्मा तिथे नागाच्या रूपाने पहारा करीत रात्रंदिवस फिरू लागला! कुणालादेखील त्याने तिथे फिरकू दिले नाही.'

या नागांबावत पुराणात आणखी एक कथा आहे ती अशी की--'दूधसागरात शेष नावाच्या नागावर झोपूनच भगवान विष्णू विश्रांती घेत! या नागाला हजारो तोंडे असून आपल्या माथ्यावर तो अख्खी पृथ्वी धारण करतो! आणि वासुकी नावाच्या नागाला तर मंदार पर्वताच्या भोवती करकचून बांधले होते. अमृतमंथनाचे वेळी त्याचा रवीला लावलेल्या दोरीप्रमाणे उपयोग झाला! देव आणि दानव यांनी सागर घुसळून चौदा रत्ने बाहेर काढली ती याच नागाच्या जिवावर!'

नागाच्या माथ्यावर एक मोहोर असते व त्यामुळे नागाला रात्रीच्या वेळी प्रकाश दिसतो असाही एक समज आहे. स्वखुषीने नागाला प्रसन्न करणाराला नाग ही मोहोर बक्षीस देतो, अशीही एक श्रद्धा असून आभाळात इंद्रधनुष्य आले असता फारच चकाकणारी ही मोहोर एरवी बळजबरीने काढली म्हणजे नाग मरून जातो असेही म्हणतात!

याखेरीज पुराणातील दुसऱ्या एका कथेत आणखी एक गोष्ट अशी आली आहे की--'माणसाच्या रूपाने हे नाग स्वर्गात रहात असत. नागकन्या म्हणजे

फारच सुंदर मुली. त्यामुळे दशरथ राजानेदेखील सुमित्रा नावाच्या नागकन्येशीच लग्न केले होते!'

जुन्या कथावाङ्मयात आलेली नागाची ही हकिगत लक्षात घेऊनच नागपंचमीला त्याची पूजा करीत असतात. तुपाचा दिवा लावून ही पूजा केली म्हणजे पुण्य पदरात पडते अशी एक भोळीभाबडी समजूत आहे. त्यामुळेच भरपूर खेळावयाचे आणि गाणी म्हणावयाची अशी प्रथा आहे.

खेडोपाडी शहराच्या मानाने ही चाल मोठ्या प्रमाणावर अद्यापही आहे. शहरातील जीवनच पुष्कळ बदलत गेल्याने असे प्रसंग तुरळक आढळतात. खेड्यातील मुली लाह्यांचा झोळणा भरून घेऊन आणि पानाफुलांनी सजलेले तांबे (न्हवणे) घेऊन वारुळाकडे नागाच्या पूजेसाठी गाणी गात जातात. आणि मग रात्रीच्या वेळी घरी खेळतात. कुठे कुठे दुपारच्या वेळी झोपाळा अगर जीग खेळताना पुरुष मंडळीही दिसून येतात. स्त्रियांचे खेळ सर्व प्रकारचे असतात. फुगड्या, झिम्मा, कोंबडा, काथवटकणा, चुईफुई, घसरफुगडी, भुरुला, दंडाची फुगडी, पिंगा, कळशीचा नाच, सुपाचा नाच वगैरे वगैरे.

पंचमीच्या दिवशी फेर धरून गाणे म्हणण्याची पद्धत विशेष आहे. एकदोघींनी गाणे सांगावयाचे आणि इतर सर्वजणींनी ते त्यावरहुकूम म्हणावयाचे, असे चालते. कधी ही गाणी लहान असतात, कधी खूप मोठीही असतात. पण बहुधा ही सगळी गाणी या ना त्या प्रकारची लहान मोठी कथा सांगताना दिसून येतात, हे विशेष होय.

**दोनतीन बैलांच्या लागल्या ढुशी बाई लागल्या ढूशी**
**त्यात माझी करंगळि गमावलि कशी बाई गमावलि कशी**
**धाकल्या दिराला गवसलि कशी बाई गवसलि कशी**
**धाकल्या दिराचं काय मत झालं बाई काय मत झालं**
**सासू सुगरीणिला सांगत गेलं बाई सांगत गेलं**
**सासू सुगरीणिचं काय मत झालं बाई काय मत झालं**
**दोन तीन चाबूक उडविले बाई उडवीले**
**दोनतीन चाबूक तारातूर बाई तारातूर**
**माझं माहेर पंढरपूर बाई पंढरपूर**

माझं आजूळ रत्नांगिरी बाई रत्नांगिरी
रत्नांगिरीच्या टाक्यावरि बाई टाक्यावरी
शेला झुलतो ढाप्यावरि बाई ढाप्यावरी
नाग डुलतो चाफ्यावरि बाई चाफ्यावरी

या गाण्यामध्ये घरातील बैलांची झुंज लागली आहे आणि ती सोडवीत असताना हातातील करंगळीमध्ये घालायची अंगठी अगर पायातील करंगळीत घालावयाचा चांदीचा दागिना हरवतो, धाकटया दिराला ती करंगळी सापडते, त्यामुळे तो सासूबाईला सांगत जातो, सासू रागावून चावकाने फोडून काढते, त्यामुळे माहेर व आजोळ आठवते. अशी कथा आलेली आहे, शिवाय रत्नागिरीला असणारे पाण्याचे टाके, ढाप्यावरचा शेला आणि चाफ्यावरचा नाग हे सर्व आठवून मनाची जी द्विधा अवस्था होते तीही सांगितलेली आहे. सासुरवाशिणीच्या मनातील ही भावना हृदयस्पर्शी झालेली आहे.

चांदीची घागर बाई मोत्यांची चुंबळ
चुंबळ तरंगती बाई घागर बुडवीती
सासऱ्याची पायरी ग कवा मला सुटल
बाप माझा विठ्ठल ग कवा मला भेटल
सासूची पायरी ग कवा मला सुटल
आई माजी रुक्मिणी ग कवा मला भेटल
नणंदेची पायरी ग कवा मला सुटल
भैन माझी मुक्ताई ग कवा मला भेटल
दिराची पायरी ग कवा मला सुटल
भाऊ माजा ज्ञानदेव कवा मला भेटल

या गाण्यामध्ये चांदीची घागर आणि मोत्यांची चुंवळ घेऊन पाणी आणायला गेलेल्या सासुरवाशिणीच्या मनोभावनेचा आविष्कार आलेला आहे. चांदीची घागर आणि मोत्यांची चुंवळ लाभणाऱ्या घरातील सुनेला तिच्यावर काही तरी आळ आणावा म्हणून कुणी तरी तिची घागर बुडवीत आहे. अशा वेळी बुडती घागर आणि तरंगती चुंवळ बघून तिला भडभडून येते. सासुरवासाचा वीट येतो. आणि मग पंढरपूरचा विठ्ठल, रखुमाई, मुक्ताई व ज्ञानदेव ही माहेरच्या

गणगोतातील माणसे आठवायला लागतात. त्यामुळे घरच्या सासूसासऱ्यांच्या, नणंदांच्या व दिरांच्या जाचातून मोकळे होऊन आपण केव्हा एकदा बहीण-भावांत आणि आईवडिलांत जाऊन मन शांत करतो असे तिला होऊन जाते. ही लहानशी कथा सांगणाऱ्या गाण्यातील देवादिकांशी व थोर संतांशी जोडलेली नाती हे गाणे रचणाऱ्या स्त्रीच्या व त्या वेळच्या समाजाच्या मानसिक विकासाची साक्ष देते. अशाच प्रकारचे आणखी एक गाणे असे आहे:

**घराचा घरधंदा मी करते**
**पाण्याला एकली जाते...घराचा घरधंदा...**
**जिवू बाई करींदिरा कामानी**
**जाते माहेराला... घराचा घरधंदा...**
**कधी मी सोडिला का घराचा उंबरठा**
**कधी हा भेटला का बाप माझा गोमटा...घराचा घरधंदा...**
**कधी मी सोडिली का घराची पायरी**
**कधी ही भेटली का आई माझी सोयरी...घराचा घरधंदा...**
**कधी मी सोडिला का दारीचा पिंपळ**
**कधी हा भेटला का भाऊ माझा विठ्ठल...घराचा घरधंदा...**
**कधी मी सोडिली का नदीची साकळी**
**कधी ही भेटली का भैन माझी धाकली... घराचा घरधंदा...**

इथे सासरी काम करून करून जीव वैतागून गेलेल्या स्त्रीची तक्रार सांगितली गेलेली आहे. एकटीनेच पाण्याला जावे व घरचा सगळा उद्योग पहावा आणि त्यामुळे विलक्षण कंटाळून माहेरची आठवण यावी असा हा कथाभाग आहे. घराचा उंबरठा, घराची पायरी, दारीचा पिंपळ, नदीची साकळी या गोष्टींशी वडील, आई, भाऊ व बहीण यांचा मेळ बसवून आपल्या मर्यादांचे सासुरवाशिणीने केलेले हे वर्णन विलक्षण आकर्षक आहे. जुन्या काळच्या स्त्रीच्या आयुष्यामध्ये उद्भवणाऱ्या 'चूल आणि मूल' या कार्यक्षेत्रातील हा एक मासलेवाईक नमुना ठरेल!

**वहिल्या रानाला पाण्याचं जंजाळ**
**घागर पवतं बाई चुंबळ तरंगतं**

नदीतल्या मगरमाशा दे माजी घागर
सासू माजी वंगाळ शिव्या मला देईल
नदीतल्या मगरमाशा दे माजी घागर
सासरा माजा वंगाळ मला भाजुनी खाईल
नदीतल्या मगरमाशा दे माजी घागर
नणंद माजी वंगाळ रागं मला भरील
नदीतल्या मगरमाशा दे माजी घागर
दीर माजा वंगाळ चहाड्या करील
नदीतल्या मगरमाशा दे माजी घागर
पती माजा वंगाळ मला फोडुनी काडील
अग अग नदीबाई घोळ तुज्या पान्याचा
सारूनी ग अल्याड दे माजी घागर
अग अग नदीबाई माजे ग माऊली
दे माजी चुंबळ सांजचे सावली

या गाण्यामध्ये सासुरवाशिणीच्या जीवनात आलेला एक वेगळाच प्रसंग चित्रित झालेला आहे. दूरच्या रानातील भरपूर वेग असलेल्या नदीच्या पाण्यामध्ये चुकून निसटलेली व दूर गेलेली घागर आणि चुंबळ धारेला लागली म्हणून सासुरवाशीण घावरली आहे. नदीतल्या मगरीला ती विनवीत आहे. घरची माणसे खाष्ट आहेत तेव्हा कसेही करून आपली घागर व चुंबळ तिने काढून आणून द्यावी ही तिची इच्छा. अखेरीस तिने मगरीवर विसंबून न रहाता नदीलाच खुद्द आवाहन केले आहे की, आपला पाण्याचा घोळ अलीकडे करून घागर व चुंबळ मला दे! किती सुंदर आहे ही कल्पना! नदीने पाण्याचा वेग आपल्याकडे सरकवून आपले काम करून द्यावे हा मनोभाव हृदयस्पर्शी आहे. नदीला आई समजून आणि रात्रीच्या वेळी घागरीच्या पायी भलतेच काही घडले तर विसाव्याचे ठिकाण मानून तिला विनंती करायची ही स्त्रीच्या मनातील कोंडमाऱ्यास फुटणारी वाचा कुणाच्याही काळजाचा ठाव घेणारी आहे.

दिवस कुठं जी मावळला
चंद्र कशानं कोम्याला बाई

दिवस कुठं जी मावळला
दादा आल्याती निय्याला
रजा द्यावी वो जायाला
रजा न्हाई मी दियाची
बदमी खरकी लावायची
बदमी खरकी नेल्यात्या तोडूनी
भैनाला निय्याची म्हायारी
चल चल भैना तू झरझरी
शाळू दिवस कानेली
कशी दादा मी चालू जी
पायात साकळ्या जाड जी
दे जा टाकून हिन्नाच्या
घालिन घडवीन चांदीच्या

माहेराहून भाऊ न्यायला आला आहे, आणि अशा वेळी दिवस केव्हा मावळून गेला व चंद्राची प्रभाही कशी कोमेजून गेली हे न कळल्याने गडबडून गेलेली सर्वसामान्य घरातील सासुरवाशीण इथे रंगविली गेली आहे. माहेरी जायला उतावीळ होऊन भाऊ न्यायला आल्याचे ती सासूला सांगते आहे. परंतु सासू परवानगी नाकारते. त्यासाठी कारण म्हणून तिने खरकी लावायची गोष्ट पुढे केली आहे. इथे खरकी म्हणजे खारीक. ती सुनेला बदाम व खारीक खायला देऊन ठेवून घ्यायची भाषा बोलत आहे! परंतु भाऊ ते कारण बाजूला करीत लोकांच्या बहिणी भावांच्या बरोबर माहेरी गेल्याचे सांगतो! शेवटी कशीबशी परवानगी काढून बहिणीला घेऊन जाताना तो तिला भराभर चालायला सांगतो. पण दिवस मावळलेला बघून आणि शाळू दिवस म्हणजे हिवाळ्यातील लहान दिवस असल्याने जलद चालावे लागते व पायात हिन्नाच्या साखळ्या असल्याने पाय जड होत असल्याचे ती म्हणते! तेव्हा भाऊ कारण ओळखतो. हिन्नाच्या साखळ्या काढून टाक मी तुला चांदीच्या नव्या देईन असे सांगतो. अशी ही छोटी कथा या गाण्यात सांगितलेली आहे. भावाने बहिणीला करावयाच्या 'माहेराची' इथे शेवटी आलेली सूचकता माहेरवाशिणीला विलोभनीय वाटावी अशीच आहे.

करडया करडया का का कू का का कू
कुणाच्या बैलाला घाला जू घाला जू
घाल आमच्या मदना मदना
मदन आमुचा गुणाचा गुणाचा
बैलापाठी फुलाचा फुलाचा
फुलबा फुलबा ढेलजंत जा ढेलजंत जा
पाण्याच्या वाटेनं खेळत जा खेळत जा
पाण्याच्या वाटेनं ढोल ग ढोल ग
किडकं आंबं घावलं ग घावलं ग
किडकं आंबं गोमाशा गोमाशा
गोमाशा काजाळ लिवू ग लिवू ग
हिरव्या पाण्याला जाऊ ग जाऊ ग
हिरवं पाणी गाईचं ग गाईचं ग
आमच्या नागोबाला फूल जाईचं ग जाईचं

करडया नावाचे पाखरू ओरडत जात असताना त्यास उद्देशून या गाण्याला सुरुवात झाली आहे. आपल्या मदन नावाच्या बैलाला जू घालून फिरतीवर निघायची इथे कुणी तरी तयारी केली आहे. आणि या बैलाच्या पाठीशी असलेल्या दुसऱ्या एखाद्या मालकाला, पाखराला अगर बैलाला (फुलबाला) ढेलजेत जाऊन नदीकडे खेळायला जायला सुचविले आहे. गाणे सांगणाराला यांपैकी नेमके कुणाला हे सुचवावयाचे आहे हे एवढ्यावरून सांगता येत नसले, तरी हे तिन्ही पर्याय लक्षात घ्यायला हरकत नाही. ढेलज म्हणजे वाड्याच्या तोंडाशी असलेल्या लगतच्या दोहो बाजूंच्या जागा. तिथे जाऊन पाण्याच्या रस्त्याकडे जावयाचे. या वाटेवर झाडाला असलेल्या गुहेसारख्या पोकळ्या आहेत. त्यांनाच ढोल म्हटले असून तिथे किडके आंबे मिळाल्याचा उल्लेख आला आहे. त्यावर बसणाऱ्या गोमाश्यांचे काजळ लेवून हिरव्यागार झाडीतील पाण्याकडे जावयाचा इशारा दिला आहे. आणि ते पाणी खास गाईसाठी असल्याचे सुचवून तिथे त्याची पवित्रता प्रकट केली आहे. अखेरीस एवढ्या मंगल ठिकाणी आलेले जाईचे फूल आपल्या नागोबाला वहायची रीतदेखील इथे आवर्जून सांगितली गेली आहे.

जेवढे चांगले तेवढे देवाला राखून ठेवावयाचे हा या संस्कारातील मानवी धर्म आहे. त्याचाच हा एक आविष्कार.

**नाच ग घुमा**
**कशी मी नाचू**
**या गावचा त्या गावचा**
**सोनार न्हाई आला**
**माझ्या बाळाला वाळा न्हाई दिला**
**कशी मी नाचू?**
**अंगान वाकडं भवतनं लाकडं**
**नाच म्हणीता कशी मी नाचू?**
**या गावचा त्या गावचा**
**शिंपी न्हाई आला**
**माझ्या बाळाला कुडता न्हाई दिला**
**कशी मी नाचू? . . .**

एकीने हातात सूप घेऊन ते उडवीत मध्ये नाचावयाचे आणि तिच्या हातातील सुपावर होणाऱ्या अंगठ्यांच्या खिणखिणाटाप्रमाणेच भोवती टाळचा वाजवीत 'नाच ग घुमा' म्हणणाऱ्या बायकांनी उत्तर देत नाचावयाचे, अशा रीतीने खेळावयाचे हे गाणे पंचमीला म्हणतात. या ठिकाणी मुलाची हौस भागल्याखेरीज आपणाला नाच गाणे सुचणार नाही असे आई सुचवीत असून त्यासाठी शेतकऱ्याच्या जीवनात येणाऱ्या बारा बैत्यांचा उल्लेख तिने केला आहे. प्रत्येकाकडून या गाण्यात इथे दिल्याप्रमाणे कोणत्या वस्तू आणावयाच्या आहेत ते सांगून ही बारा बैती संपल्यावर मग हे गाणे संपते. अंगण वाकडे आहे आणि सभोवती लाकडे असल्याकारणाने नाचायला पुरेशी जागा नाही ही इथे आलेली सबब काही तरी सांगावयाचे म्हणून सुरुवातीस पुढे आली असली तरी त्यामागचे खरे कारण मुलाची हौस भागवावी हेच आहे.

**श्रावण हंकारी हंकारी**
**कांडुन कुटून करा पंचमी**
**गणपतीची सोंड वाकडी**

अग या गणपतीचे लाडू
बाई या लक्ष्मीपुढे वाडू
अग या लक्ष्मीच्या गाठचा
बाई या पित्रांनी केल्या दाटचा
अग या पित्राचे ताट
दसरा आला गजघाट
अग या दसऱ्याच्या माळा
दिवाळी आली काळू काळा
अग या दिवाळीचा दिवा
सटीनं घेतला ग धावा
अग या सटीचा रोडगा
संक्रांतीनं घातला डगा
अग या संक्रांतीचं सुगड
या ग शिमग्याला बिगी धाड
शिमग्याचा गुलाल
पाडवा दलाल
अग या पाडव्याची गुढी
आखितीनं मारली उडी
आखितीचा आंबरस
सर्व सणा निचींत बस

मागे आलेल्या एका गाण्याप्रमाणेच इथे सर्व सणांची हकिगत आलेली आहे. परंतु श्रावणाने हुंकार दिल्यानंतर सर्व सणांनी आपले वैशिष्टय कसे राखले आहे याचे केलेले हे वर्णन थोडे निराळे व विलोभनीय असे आहे. विशेषत: शेवटी आखितीचा आंबरस सर्व सणांना निश्चित बसायला सांगतो व पुढचे वर्ष उत्तम जाईल असे भाकीत ध्वनित करतो, ही या गीतातील कल्पना मोठी गोड आहे.

पंचमीच्या सणायाला
नणंद आणली म्हायाराला
काही नाही घालायाला ऐका वो, साजणीबाई

गोट आणि पाटयिल्या
लेण्यामंदी आगयिळचा
त्याबी दिल्या घालायाला ऐका वो, साजणीबाई
अग्गरबाळचा बग्गरबाळचा
लेण्यामंदी आगयिळचा
त्याबी दिल्या घालायाला ऐका वो, साजणीबाई
गळ्यातली चिंचपेटी
कंबरचा कंबरपट्टा
सर्व दिलं घालायाला ऐका वो, साजणीबाई
सर आणि पुतयिळचा
दिसायला आगयिळचा
त्याबी दिल्या घालायाला ऐका वो, साजणीबाई
काळी ती वो चंद्रकळा
वर मोतीयांची चोळी
ती बी दिली नेसायाला ऐका वो, साजणीबाई

पंचमीच्या सणाच्या वेळी एखादी नणंद जर माहेरी आलीच तर त्यावेळी भावजयीला तिची वडदास्त कशी ठेवावी लागते, याची मोठी विनोदी हकिगत या गाण्यात सांगितलेली आहे. इथे भावजयीला स्वत:चे सर्व दागिने तर नणंदेला द्यावेच लागतात, पण साडीचोळीदेखील द्यावी लागते असे म्हटले आहे! अशा गाण्यांच्यामुळे खरोखरच नणंदभावजयांत चिडाचीड होण्याचा संभव अधिक. परंतु तसे कोणी मनावर घेत नसल्याने व केवळ हा विनोद आहे असे मानल्यामुळे हे गाणे फारच रंगते. या गाण्यातील जुन्या दागिन्यांची आलेली माहिती लक्षात घेता हे गाणे बरेच जुने असावे याची साक्ष पटते.

गाई चरती जमुना तीरी
तिला राखन कृष्णहरी. . .ग गोकूळच्या नारी
गाई भरूनि गाईचं शिंग
जसं म्हादेवाचं लिंग. . .ग गोकूळच्या नारी

गाई भरूनि गाईची मांडी
जशी पालखीची दांडी. . .ग गोकूळच्या नारी
गाई भरूनि गाईचं पोट
जशी कापसाची मोट. . .ग गोकूळच्या नारी
गाई भरूनि गाईचं कान
जसं नागवेलीचं पान. . .ग गोकूळच्या नारी
गाई भरूनि गाईची पाट
जशी म्हादेवाची वाट. . .ग गोकूळच्या नारी
गाई भरूनि गाईचं नाक
जसं कोलापुरी माप. . .ग गोकूळच्या नारी
गाई भरूनि गाईचा गळा
जसा म्हादेवाचा मळा. . .ग गोकूळच्या नारी
गाई भरूनि गाईची कास
धार काडीतो हारीचा दास. . .ग गोकूळच्या नारी
गाई भरूनि गाईचे डोळे
जसे लोणीयाचे गोळे. . .ग गोकूळच्या नारी
गाई भरूनि गाईचं तूप
जसं म्हादेवाचं रूप. . .ग गोकूळच्या नारी
गाई भरूनि गाईचं दावं
हात जोडीत सर्वा जावं. . .ग गोकूळच्या नारी

यमुनेच्या काठावर गुरे चारणाऱ्या गोकूळच्या कृष्णाच्या गाईचे हे वर्णन आहे. गाईच्या प्रत्येक अवयवाचे सौंदर्य तुलनात्मक रीतीने इथे दाखविण्याचा प्रयत्न झालेला आहे. गाईचे शिंग महादेवाच्या लिंगासारखे दिसते, तिची मांडी पालखीच्या दांड्यासारखी वळकट दिसते, तिचे पोट कापूस भरलेल्या मोटेसारखे दिसते, तिचा कान नागवेलीच्या पानासारखा दिसतो, तिची पाठ महादेवाच्या वाटेसारखी दिसते, तिचे नाक कोल्हापूरच्या मापाप्रमाणे दिसते, तिचा गळा महादेवाच्या मळ्यासारखा दिसतो, तिचे डोळे लोण्याच्या गोळ्याप्रमाणे दिसतात, तिचे तूप महादेवाचे रूप दाखविते इत्यादी प्रकारचे हे गाईचे वर्णन

मोठे चित्तवेधक तर आहेच पण कल्पकतेचा विलास दाखविणारेही आहे. अखेरीस गाईच्या दाव्याची माहिती देताना गाईला बघून सर्वांनी तिला आदराने नमस्कार करावा अशी सूचना दिली गेली आहे. गाय ही हिंदूंची एक पवित्र देवता मानली असल्याने त्या भावनेचा हा एक मंगल उच्चार आहे. त्या भावनेमागच्या पवित्रतेचीच जणू ही ग्वाही आहे !

चल ग सये वारुळाला नागोबाला पूजायाला
हळदकुंकू वहायाला ताज्या लाह्या वेचायाला
चल ग सये वारुळाला चल ग सये वारुळाला
या ग या गडयीनी या ग या मैतरिणी
तेल्या तांबूळयाच्या बाई वाण्या बामणाच्या बाई
जमूनिया साऱ्याजणी जाऊ बाई न्हवणा
जिथं पाय ठेवू बाई तिथं उठल् दौणा
चल ग सये वारुळाला चल ग सये वारुळाला
नदीच्या पल्याड ग सोनाराचं हाई घर
तिथं बाई उतरला दामाजी ग सोनार
त्यानं बाई घडविला साखळयांचा जोड
लेग लेग लेग लेकी लेग लेग लेग लेकी
कशी लेवू सांग दादा कशी लेवू सांग दादा
घरी माझ्या भावजया करतील हेवा दावा
घरी माझ्या नंदा जावा करतील हेवा दावा
चल ग सये वारुळाला चल ग सये वारुळाला
नदीच्या पल्याड ग दामाजी सोनार
त्यानं बाई घडविला बांगडिचा जोड
लेग लेग लेग लेकी कशी लेवू सांग दादा
घरी माझ्या भावजया करतील हेवा दावा
चल ग सये वारुळाला चल ग सये वारुळाला. . .

हातात पानाफुलांनी सजविलेला तांब्या (म्हणजेच न्हवण) घेऊन नदीरील वारुळाकडे निघालेल्या मुलींनी म्हणावयाचे हे गाणे आहे. जातपात न

मानता सर्व मुलीबाळींना सारख्या लेखून खेळायला एकत्र बोलविण्याची जुनी रीत इथे प्रकट झाली आहे. न्हवणाला निघालेल्या मुलींचा पाय जिथे पडेल तिथे दवणा नावाची सुवासिक वनस्पती उगवेल, ही या गाण्यातील कल्पना फारच बहारदार आहे. नदीच्या पलीकडे घर करून असलेल्या दामाजी सोनाराने घडविलेला दागिना घरच्या नणंदाजावांच्या अगर भावजयांच्या हेव्यादाव्याला भिऊन घालण्याचा नकार द्यावयाचा यासाठी लागणारा संयमही इथे हृदयंगम रीतीने व्यक्त झालेला आहे.

तसे हे गाणे खूप मोठे आहे. सगळे दागिने गोवीपर्यंत ते लांबते. आणि मग अखेरीस शेवट होतो तो असा:

**नदीच्या पल्याड ग दामाजी सोनार**
**त्यानं बाई घडविला कोल्हापुरी साज**
**गिरजाबाई माझी ल्याली वारुळाला गेली**
**वारुळीच्या नागायानं धरयिला पदयीर**
**सोड नागा पदयीर आमची कुळी नागर**
**चल ग सये वारुळाला चल ग सये वारुळाला . . .**

कोल्हापुरी साजाचा स्वीकार म्हणजे मंगळसूत्राचा स्वीकार. त्याच्यावर दुसऱ्या कुणाचा हक्क नाही. खास मालकीचा तो जिन्नस. आणि तो घालून वारुळाकडे गेले म्हणजे मग वारुळीच्या नागाने थट्टा करावयाची! पण घराण्याच्या धाकाने तो मोह आवरून त्याला माघारी वळवावयाचे हे या गाण्यातील अखेरचे वर्णनदेखील मोठे लक्षात घेण्याजोगे आहे.

**काळा बैल बांधला बागंला वनव्या डोंगरी लागला**
**चला जाऊ वन पाहू वनात आगीन जळती**
**चला जाऊ आगीन बघू आगीन पाण्यानं विझती**
**चला जाऊ पानी बघू पान्यात मासुळे खेळती**
**चला जाऊ मासुळे बघू मासुळे फासात आडकती**
**चला जाऊ फास बघू फास पारधी घालीती**
**चला जाऊ पारधी बघू पारधी लांडगे धरीती**

चला जाऊ लांडगे बघू लांडगे वासरं फाडीती
चला जाऊ वासरं बघू वासरं गाईला पितातो
चला जाऊ गाय बघू गाय दुधाण्या मागं दडती
चला जाऊ दुधाणं बघू दुधाणं कुंभार घडवीतो
चला जाऊ कुंभार बघू कुंभार चाकाआड दडीतो
चला जाऊ चाक बघू चाक सुतार तासीतो
चला जाऊ सुतार बघू सुतार किकाऱ्याआड दडीतो
चला जाऊ किकरं बघू किकरं लव्हार घडवीतो
चला जाऊ लव्हार बघू लव्हार भात्याआड दडीतो
चला जाऊ भाता बघू भाता चांभार शिवतो
चला जाऊ चांभार बघू चांभार मोटंमागं दडीतो
चला जाऊ मोट बघू मोट हिरीला चालली
चला जाऊ विहीर बघू हिरीचं पानी पाटाला
चला जाऊ पाट बघू पाटाचं पानी फुलबागंला
चला जाऊ पानं बघू गाईला वासरं पितातो
चला जाऊ वड बघू वडाला पानं फुटती
चला जाऊ दुरून बघू दुरून वडाला टांगोला
चला जाऊ गुरव बघू गुरव दुरून (द्रोण) शिवीतो
चला जाऊ देव बघू देव गुरवाआड दडीतो
चला जाऊ फुलबाग बघू फुलं देवाला वहाती

काळा बैल बागेमध्ये बांधावयाचा प्रसंग आला त्यावेळी कुठे कुठे काय घडले, ते कोणत्या कारणाने कसे कसे घडत गेले याची सुंदर हकिगत या गाण्यामध्ये आलेली आहे. त्याचप्रमाणे हे सगळे घडलेले बघायला हरघडी जाणाऱ्या माणसांच्या ओळखीची मर्यादाही किती बेताची आहे याचीही यावरून कल्पना येते. झाली गोष्ट मनावर पक्की ठसावी म्हणून एकाच एका भावनाविष्काराचा या गाण्यात दोनदा झालेला उपयोगही त्या गोष्टीची महती वर्णन करणारा आहे. पुनरुक्तीचा हा दोष वाटत असला तरी त्यामुळे निर्माण होणारी लय आणि सांगण्याची धाटणी गाण्याची गोडी वाढविणारीच आहे.

| | |
|---|---|
| आला पंचमीचा सण | आला पंचमीचा सण |
| लोकाच्या लेकी बा म्हायारी | माजी बाळाई सासरी |
| आरं तू सोपान बाळा | जा रं बाळी आनायाला |
| कर तानीयाचं लाडू | कर भुकईचं लाडू |
| कर बुत्ती नी भाकरी | जातो बाळाई आनायी |
| गेला घोड्याच्या पागंला | शेलका वारू सोडीयला |
| आला वाड्या घेऊयीनी | आला वाड्या घेऊयीनी |
| घातलं मखमाली जिन | वडलं रेशमी पटारू |
| घोड्याव बा स्वार झाला | गेला वाड्याच्या भाईरी |
| लागला राजस मारगी | लागला राजस मारगी |
| लागला वनाच्या वाटंला | पाची वनं वलांडिली |
| साव्या सातव्या वनायाला | दिसलं बाळीचं सासर |
| गेला वाड्या जवयीळी | गेला वाड्यायाच्या आत |
| अंगणी भाला रवीयीला | त्येला वारू बांधियीला |
| बाळीनं पावना देकीयला | शेला वलनी झळकीला |
| झारी बुडवी रांजनात | दिली बंधूच्या तळातात |
| घेतलं चवरंगी सूप | पेटविली वैलचूल |
| गेली उतरंडीयीला | काढल्या साळी काढल्या डाळी |
| बाळीनं सैंपाक बा केला | बंधु भोजन वाढीयीलं |
| बंधु घरी गोष्ट करी | बाळी घेऊन जायायाची |
| दिली बाळी लावूयीनी | चालला बाळी घेऊयीनी |
| वारुवरी स्वार झाला | आला वाड्याच्या भाईरी |
| लागला राजस मारगी | पाच वनं वलांडिली |
| साव्या सातव्या वनायाला | वाडा लागं दिसायाला |
| आला आपुल्या वाड्याला | आला वाड्यायाच्या आत |
| घेतली बाळी उतरुनी | गेली आईच्या जवळी |
| आई मी ग काय नेसू | नेस जा माजं पातयीळ |
| नगं तुजं पातयीळ | दे ग वैनीची कासाई |

नेसली वैनीची कासाई गेली पाटलाच्या आळी
म्होरं म्होरं काडीयील्या पाटलाच्या पोरीबाळी
आली आपुल्या वाड्याला लागली पंचीम खेळायाला
नागा घेतल्या बा लाह्या नागा घेतलं दूध तूप
नागा घेतलं हळदकुंकू नागा घेतलं पवयीतं
गेली वाड्याच्या भाईरी संगं सान्या पोरीबाळी
सगळ्या गडनी मिळूयीनी चालल्या संगं मिळूयीनी
म्होरं पाटील कुलकर्ण्यांच्या मागं तेल्या तांबूळच्याच्या
गेल्या नागाजवयीळी नागा लाह्या वाहीयील्या
नागा वाहिलं दूध तूप नागा वाहिलं हळदकुंकू
हाता हात लावीयला एक फेरजी धरीला
दोन फेर धरीयीलं तीन फेर धरीयीलं
चवथ्या पाचव्या फेरायाला याक हळदीचं बोटू
याक कुंकवाचं बोटू लागलं वैनीच्या कासाई
बाळीनं बा देखीयीलं हातचा हात सोडीयीला
ततनं धावत पळत आली वाड्या निगूयीनी
गेली वाड्यायाच्या आत गेली गाईच्या जवळी
हळदकुंकवाचं बोटू लागलं वैनीच्या कासाई
तेवढं वैनीनं देखीयीलं गेली गाईच्या गोठ्यायाला
तिथं निजरंसुर्म झाली घेतली खाट नी वाकाळ
आला सुबाना बा बंधू तुमी सर्वो हाईसा बा
माजी अस्तुरी कुठं हाई गेली असल पान्यायाला
सर्व घर धुंडीयलं सगळी वाट धुंडीयीली
गेला गाईच्या गोठ्यायाला देखीली बा अस्तुयीरी
याक हळदीचं बोटू याक कुंकवाचं बोटू
माज्या कासाई लागलं माजी कासाई नासली
तिला नेऊनी वधावी दुरनी रगात धरावं
त्यात कासाई बुडवावी सूर्या किरनी वाळवावी

घडी चापूनी घालावी मला आनून दावावी
गेला आईच्या जवळी अग तू अंबिका ग माता
कर बाळीची तयारी सासऱ्याला धाडायाची
गेली मदूरा पेटेला घेतलं चोळी पातायीळ
गेली कासाराच्या आळी काकनं बाळीला लावीली
आली वाड्या घेऊयीनी भरली बुत्ती दुरुयीडी
झाली बाळीची तय्यारी चुलीव ठेवीयलं पानी
पैला तांब्या धरनीला आई सुकून बा झाला
लेकी कशायाचा झाला आपल्या घरी जायायाचा
बाळी पाताळ नेसयीती पैली निरी धरनीला
आई सुकून बा झाला लेकी कशायाचा झाला
अशी का ग म्हनतीस संगं सोपाना बाळ हाई
बंधू नव्हं त्यो वयीरी त्येच्या कंबरला सुरी
घात वाटं करीयील अग तू अंबिका ग माता
बाळ जेवाया बसली पैला घास धरनीला
केली बुत्ती नी भाकरी घेतली बुत्ती नी भाकरी
बाळी घोड्याव बसवीली गेला वाड्याच्या भाईरी
लागला राजस मारगी पाच वनं वलांडिली
साव्या सातव्या वनायाला नवी वाट फुटयीली
आरं तू सोपान दादा न्हवं ही सासऱ्याची वाट
माज्या सासऱ्याच्या वाटं केळी नारळी बनं दाट
हितं काऱ्या बोऱ्यापाळं काटंकुटं वाटयीला
साव्या सातव्या वनायाला बाळी खाली उतरीली
काडली कंबरीची सुरी ठेवली बाळीयीच्या शिरी
दुरनी रगात धरीयीलं त्यात कासाई बुडवीली
सूर्या किरनी वाळवीली चापून घडी घातीयीली
शेल्या पदरी बांधीयीली आला आपुल्या वाड्यायाला
गेला गाईच्या गोठ्यायाला काळी कासाई दावीली

**आली उठून घरायाला फिरली नार घरादारा**
**बाळी झाली जाईझाड गेली सासूच्या सपयीनी**
**पाची उतरंडी ढासळल्या अपसुकून मोटा झाला**
**घात झाला वाटंवरी आली बाळाई सपनी**
**जमूयीनी सर्वजन आली पाचव्या वनायाला**
**डावी करंगळी कापीयीली पतीनं अमृत शिंपीयीलं**
**बाळ झाली साजीवंत आली धरनीच्या वरी**
**नेली आपुल्या वाड्यायाला लागली राज करायाला**

एका अद्‌भुतरम्य, रोमांचकारी आणि हृदयंगम अशा लोककथेला पद्याचा साज चढविणारी ही एक जुनी किमया आहे. एकेक शब्द आणि एकेक ओळ शेलकी काढून ह्या गाण्याचे अंतरंग सजविले आहे. अधूनमधून पुनरावृत्ती होऊनही कथानकाला एकसारखे धावते ठेवीत ऐकणाराचे भान हरपण्याची ह्या गाण्याची शक्ती मोठी आहे. ठेवण देखणी आहे. मांडणी सुरेख आहे. कुठेही न खटकता झाली गोष्ट सुरळीतपणे घडत गेली तशी सांगितली आहे, ऐकावे तसे सारे समजत जावे, मनात ठसावे आणखी लगोलग ओठांवर खेळावे, हे या गाण्याचे प्रमुख वैशिष्टच आहे. झाल्या गोष्टीवर कुणाचा विश्वास बसो अगर न बसो, पण ती आटपाट नगरातील चित्त थरारून सोडणारी एक कहाणी आहे, एवढा बरीक निर्वाळा कुणालाही देणे भाग पडेल, असे हे लांबलचक पण कंटाळवाणे न होणारे गाणे आहे. स्त्रीजीवनातील एका जगावेगळ्या विलक्षण प्रसंगाची ती एक करुणरम्य कहाणी आहे.

**आली वर्साची पंचीम आली वर्साची पंचीम**
**उठली सकाळच्या पारी गेली गाईच्या गोठ्यायाला**
**घेतलं मूठभर शेन घातलं सडासारवान**
**झालं सडासारवान सर्व धुनं गोळा केलं**
**बांधली धुण्यायाची मोट बांधली हासडून गाठ**
**घेतली नखा बोटावरी घेतली डुई शिरावरी**
**गेली वाड्याच्या भाईरी गेली वेशीच्या भाईरी**
**लागली राजस मारगी लागली राजस मारगी**

एक वन वलांडिलं
दोन वनं वलांडिली
तीन वनं वलांडिली
चार वनं वलांडिली
पाचव्या साव्या वनायाला
लागली यमुना दिसायाला
आली यमुनेजवळी
गेली यमुनेच्या आत
काळा खडा बघितला
टाकली धुन्यायाची मोट
सर्व धुनं धुतीयलं
सर्व धुनं वाळीवलं
काढली मधुपका चोळी
फेडला पिवळा पितांबर
काढला नवलाखी हार
ठेवला मूळ डोंबावरी
गेली यमुनेच्या आत
राधानं आंगूळ बा केली
आली यमुनेच्या वरी
सर्व अंग पुशीयीलं
घातली मधुपका चोळी
नेसली पिवळा पितांबर
घेतली धुण्यायाची मोट
आली नदीच्या भाईरी
लागली राजस मारगी
चारी वनं वलांडिली
पाचव्या साव्या वनायाला
लागलं गाव दिसायाला
आली आपुल्या वाड्यायाला
आली वाड्यायाच्या आत
टाकली धुन्यायाची मोट
घेतलं चवरंगी सूप
गेली पाची उतरंडी
काडल्या साळी काढल्या डाळी
पेटविली वैलचूल
ठेवली डेचकी लोटकं वर
लावल्या चंदनाच्या फाळी
जाळ तिनं फुंकीयीला
राधानं सैंपाक बा केला
गेली आपुल्या खोलीला
हाती आईना घेतीला
लागली मुखजी पहाया
सर्व अलंकार हाई
नवलाखी हार न्हाई
टाकला हातचा आईना
लागली धावाया पळाया
तितनं धावत पळत
आली वाड्याच्या भाईरी
लागली राजस मारगी
सर्व वनं वलांडिली
लागली यमुना दिसाया
गेली यमुनेच्या आत
गेली मूळ डोंबावरी
नवलाखी हार न्हाई
झाली कावरी बावयीरी
आली यमुनेच्या वरी

तितं गवळ्याचा गोईंदा त्येला बाई इच्यारती
आरं तू गोईंदा माज्या हार माझा देकोला का
हाराला हारकी काय ग काय तू मला देशील ग
दीन साकरेचं पोतं हार माजा द्यावा देवा
साकरेचं पोतं काय पाहिलं का न्हाई मी
आमी मथुरेचं वानी आमाला साकरेचं काय? . . .

एका साध्याभोळ्या बाईची कहाणी सांगणारी ही एक पद्यात्मक कथा आहे. यापुढे या कथेने खाण्याचे सगळे पदार्थ संपविण्यापर्यंत हीच भाषा केली आहे आणि मग नंतर—

आली धावत पळत आली अपुल्या वाड्यायाला
घेतली दंडा पुरचुंडी गेली वाण्यायाच्या आळी
अवो अवो वानीदादा माजा दादा हुशीला का
अवो अवो वानीदादा मला गुलाल देशीला का
तितनं धावत पळत गेली तांबूळ्याच्या आळी
अवो तांबूळी वो दादा पान मला देशीला का. . .

अशा रीतीने सर्वांच्याकडे जाऊन पाहिजे आहे ते विड्याचे सामान गोळा झाल्यावर या कथानकाला अशी गती मिळाली आहे:

तितनं धावत पळत गेली लालनी बागेत
तितं गवळ्याचा गोईंदा बाई निजरंसुर्म झाला
आरं आरं गोईंदा जागं व्हावं झडकरी
साकरेचं पोतं बाई फेकीते मी अंगावरी
जागं व्हा जागं व्हा मुकुंदा वो मुरारी. . .
सुपारीचं पोतं बाई फेकिते मी अंगावरी
जागं व्हा जागं व्हा मुकुंदा वो मुरारी. . .
घातला उशीखाली हात घेतला नवलाखी हार
तितनं धावत पळत आली आपुल्या वाड्यायाला
किष्ण बाई जागा झाला गडबडून उठयीला
वारं तरी सुटूनी का आंबा तरी पडूनी का

**मग मी जागा झालो असतो    जाग मला आली असती**
**इडा तरी खाल्ला असता    मग मी हार दिला असता**
**रंग तरी खेळलो असतो    मग मी हार दिला असता**

त्यानंतर जमा केलेल्या सामानाची सगळी पोती अंगावर फेकूनही जाग न आलेल्या कृष्णाला नवलाखी हार गमावल्यामुळे झालेला पश्चात्ताप सांगत असतानाच हे गाणे संपले आहे.

शेतकऱ्याच्या घरातील कामधंदा वर्णन करीत आरंभ झालेले हे गाणे कामाच्या जागेपर्यंत जायचे यायचे म्हणजे सात वने ओलांडावी लागतात याचे पुन:पुन्हा वर्णन करीत शेवटी राधाकृष्णाच्या गोकूळची आठवण देते. नवलाखी हार म्हणजे नऊ लाख किंमतीचा मौल्यवान हार. पण एवढ्यानेच त्याचे महत्त्व संपत नाही. हा त्या काळच्या स्त्रियांचा मंगळसूत्रासारखा पवित्र हारही दिसतो. हा हार हरवला तर नवरा आपल्या बायकोची ओळख विसरतो असे काही लोककथांतून म्हटले आहे! म्हणून या एका दागिन्याभोवती सर्व कथानक फिरू देणारे हे काव्य सामान्य मनाला भुरळ पाडणारे आहे. घर सारवणे, सडा घालणे, धुणे धुणे, मधुपका चोळी व पिवळा पीतांबर नेसणे, पाची उतरंडी उतरून डाळभात करणे, त्यासाठी चंदनाच्या फाळी लावून वैलचूल पेटविणे इत्यादी घरगुती जीवनातील या चित्रित प्रसंगांबरोबरच कृष्णाने नवलाखी हार लपवून ठेवला तो मिळावा म्हणून सगळ्या व्यापाऱ्यांची विनवणी करणे, कृष्णाच्या अंगावर तो सगळा माल पोत्यांनी फेकला तरी त्याला जाग न येणे, नवलाखी हार खुबीने उशाखाली हात घालून परत घेऊन जाणे आणि कृष्णाला जाग आल्यावर त्यामुळे पस्तावा होणे हे इथे आलेले अद्‌भुतरम्य प्रसंग मनाला चटका लावणारे आहेत. त्यामुळे हे गाणे ऐकणाराची तहानभूक हरपीत घोळून घोळून सांगितले जाते.

हीच कथा सांगणारे आणखीही एक गाणे आहे. त्याचा साजशिणगार असा:

**सूर्व्याची कन्या राधिका    बत्तीस लक्षणी देवता**
**उठली कोंब्या फटफटी    पेटविल्या चंदनवाती**
**केला केर नी बा वारा    गेली बा गायीयीच्या गोठ्या**
**आणलं गुळीभर शेण    केलं सडा सारवण**

घातली कणा रांगूयीळी घेतली तांब्या घागयीर
घेतली मोत्या चुंबयीळ घेतली गजयीनी चोळी
घेतला पिवळा पितांबर राधिका नेसून निघायीली
गेली यमुनेच्या तिरी उतरली तांब्या घागयीर
ठेवली मोत्या चुंबयीळ ठेवली गजयीनी चोळी
ठेवला पिवळा पितांबर घातला गळ्याखाली हात
काढला नवलाखी हार ठेवला कलम रुक्षावरी
राधानं आंगूळ बा केली कपाळी कुंकू लावीयलं
सूर्व्या नमस्कार केला नेसली पिवळा पीतांबर
घातली गजयीनी चोळी घेतली मोत्या चुंबयीळ
घेतली तांब्या घागयीर लागली राजस मारगी
आली घराजवयीळी वतली घागर घंगायीळी
लावली माळ्यायाला शिडी काढले चंदन सलपे
पेटविल्या तांब्या चुली काढलं साळी तांदूयीळ
घंगाळी आदणी वरीयीलं मुगाचं वरण करीयलं
केली वांग्यायाची शाक राधिका सैंपाक बा केला
वाढला सासूसासऱ्याला वाढला दीर जावयाला
वाढला आपुल्या भर्ताराला वाढलं नणंदबाईला
केलं आपुलं बा ताट राधिका जेवाय बसयीली
राधेला अपसकून झाला पैला घास धरनीला
दुसरा घास गळी आला घातला गळ्याखाली हात
नाही नवलाखी हार राधा मनी चरकली
गेली यमुनेच्या तिरी बोलली कलम रुक्षायाला
माजा नवलाखी हार कुठं गेला सांग दादा
कलमावरचा गरुयीड तो बा बोलू लागयीला
तुजा नवलाखी हार नेला गवळ्या गोईंदानं
तिथून राधा बा निघाली गेली गवळ्याच्या वाड्या
आरं तू गवळ्या गोईंदा द्यावा नवलाखी हार

नवलाखो हार दिल्यावर काय ग राधे देशील
दीन पाच सुपाऱ्या दीन पाच नारयोळ
आमी मथुरेचे वानी आमा नारळसुपारीचं काय?...

हे गाणे इथवर असे आल्यानंतर त्याचा उत्तरार्ध मागच्या गाण्यासारखाच आहे. पूर्वार्ध मात्र तीच कथा सांगत असला तरी अंतरंगाने तो पुष्कळसा वेगळा आहे. या गाण्यातील प्रत्येक शब्द आणि प्रत्येक ओळ फार सोपी असल्याने त्याचे पुन्हा वर्णन करण्याचे कारण नाही. तथापि एवढे मात्र म्हणता येईल की, या गाण्याची सुरुवात 'सूर्याची कन्या राधिका' अशी झाल्याने पूर्वीच्या गाण्यापेक्षा कुतूहल मात्र इथे वाढत्या श्रेणीचे रहाते. तसेच जुन्या काळच्या श्रीमंतीचीही चाहूल इथे लागल्याखेरीज रहात नाही. कलमरुक्ष म्हणजे कदंब वृक्ष होय.

सोन्यायाचा विटीदांडू किष्णानं डाव मांडीयीला
तिकून आली गवळ्याची राई तिनं उचलूनी नेईला
तिथून किसना निगाला गेला आईच्या जवळी
आई माजी तू हूशील चेंडूफळी आनशील
गवळ्याच्या राईनं ग नेली माजी चेंडूफळी
तिथून आई जी निगाली आली गवळवाड्यायाला
अग अग राई, गवळ्याचे बाई दे किष्णाची चेंडूफळी
तुमी कशाला आल्या आत्याबाई ज्येची त्येला धाडून द्यावा
तिथून किष्ण निगायीला गेला बापाच्या जवळी
बाप माजा तू हूशील चेंडूफळी आनशील
गवळ्याच्या त्या राईनं नेली माजी चेंडूफळी
तिथून बापजी निगाला आला गवळवाड्याला
अग अग राई, गवळ्याचे बाई दे किष्णाची चेंडूफळी
तुमी कशाला आला मामूजी ज्येची त्येला धाडून द्यावा...
तिथून किसना निगाला आला गवळ्याच्या वाड्या
अग अग राई, गवळ्याचे बाई दे माजी ग चेंडूफळी
यावं वाड्यायाच्या आत मग मी दीन चेंडूफळी

| | |
|---|---|
| यावं माज्या पलंगावरी | मग मी देते चेंडूफळी |
| आलो ग तुज्या पलंगावरी | दे ग माजी चेंडूफळी |
| माज्या हातचा इडा खावा | मग मी देते चेंडूफळी |
| खाल्ला ग तुज्या हातचा इडा | दे माजी ग चेंडूफळी |
| राईनं दिली चेंडूफळी | खुशी आला वनमाळी |

कृष्णाने मांडलेला चेंडूफळीचा डाव गवळचाच्या राईने मोडला म्हणून निर्माण झालेला पेचप्रसंग इथे वर्णन केलेला आहे. जुन्या काळी राजाच्या मुलांनी सामान्य स्त्रीच्या घरी जायचे नाही असा रिवाज होता. त्याकारणाने कृष्णाने आपल्या आईवडिलांना इथे राईच्या घरी धाडले आहे. कोणी अशा गाण्यामध्ये भावाबहिणींनाही पाठविल्याची हकिगत जोडतात. पण कोणीही गेले तरी राई चेंडूफळी देत नाही. उलट 'ज्याची त्याला पाठवून द्या' असे धिटाईने सांगते. त्यामुळे शेवटी कृष्णाला स्वत:लाच तिच्याकडे जाणे भाग पडते व तिच्या रंगेल वृत्तीचे आव्हान स्वीकारून आपली चेंडूफळी घ्यावी लागते, असा हा कथाभाग आहे. राधाकृष्णाचे वेड सामान्य मनाला विशेष. तशात ही थोडी रंगेल जीवन दर्शविणारी कथा. त्यामुळे आणखीनच तिची भूल पडते. कुणी कुणी हेच गाणे अशीही सुरुवात करून म्हणतात:

| | |
|---|---|
| खुळखुळ येळूंबाची जाळी | किष्णानं मांडली चेंडूफळी |
| तितनं चेंडू झुगारीला | गेला राईच्या वाडचायाला. . . |

परंतु पुढचे सर्व असेच. राधाकृष्णाच्या रोमांचकारी गाण्याचे वेड सर्वांनाच फार. त्यामुळे अशी कितीक गाणी नागपंचमीच्या फेरावर घुमत असतात.

**एक हुतं जी नगारु । वसुदेव राज करी । त्येची रुकमीन अस्तुरी । सरवन बाळ त्येंचा । मायबाप बोलती झाली । आरं तू सरवना बाळा । आमाला काशीला जायाचं । सरवन तिथूनी निगाला । गेला अस्तूरी जवळी । त्येची जवान अस्तूरी । आगं आगं अस्तूरी । आमाला काशीला जायाचं । न्हाई संगत सोबत । तुमची कवळी उम्मत । नका जाऊ वो काशीला । काशीला म्हईन्याची वाट । जाऊ सनगाराच्या वाडचा । आना दोन जी कांबळं । बांदा दोनीची ती मोट । यावो तिरीत लुटूनी । येत्याल काशीला भेटूनी । आगं आगं अस्तूरी । माज्या मायबापाला । द्वाड गत चितीली ।**

तिथून सरवन निगाला । गेला सुताराच्या वाड्या । आरं तू सुतारदादा । माजा मैतर हूशील । कावड बनवूनी देशील । त्येचा मैतर बा झाला । कावड वो बनवीली । सरवन तिथूनी निगाला । गेला बुरुडाच्या आळी । आरं तू बुरूडदादा । करंड बनवून देशील । माजा मैतर हूशील । त्येचा मैतर बा झाला । करंड बनवूनी वो दिला । सरवन घरापाशी आला । सरवनानं आंगूळ बा केली । घातली कापडं चोपडं । सरवन भोजना बसला । कावड आठीली येठीली । उचलून खांद्याव घेतीली । राम राम जी बोलला । गेला वाड्याच्या भाईरी । गेला येशीच्या जवळी । गेला येशीच्या भाईरी । लागला वनाच्या मारगी । एक वन वलांडिलं । दोन वनं वलांडिली । तीन वनं वलांडिली । चवथ्या पाचव्या वनायाला । माता तान्याली जानकी । आरं तू सरवना बाळा । मला तान जी लागली । मायबापाची कावड । ठेवली बेलाच्या फांदीला । गेला पान्याच्या शोदाला । गवत्या पुचूड्या बांदित । दगडी कमानी रचीत । सरवन खुनाजी मांडीत । गेला तळ्याच्या जवळी । हाती पाणी घिया गेला । हाती पानी जी येईना । पाया पानी घिया गेला । पाया पानी जी येईना । सोडला कंबरचा काचा । लावला झारीच्या गळ्याला ।

झारी बुडबुडा बोलली । दशरथाच्या कानी गेली । करकर बान जी जोडीला । येऊनी हुरदी भिडला । सरवन धरनीला पडला । दशरथ तिथूनी आला । आरं तू कुनायाचा कोन । रुकमीन माजी माता । विठू माजा पिता । आरं माज्या हातायांनी । बाळा अपघात झाला । भाचा मारूनी टाकीला । झारी भरूनी घेतीली । गेला बेलाच्या जवळी । का रं बाळा बोलनास । कुनी बोटाला लावीलं । त्येचं बोट मी तोडीन । कुनी डोळ्याला लावीलं । त्येचा डोळा मी फोडीन । सरवन बाळ न्हवं मी । मी ग दशरथ राजा । तुजा बाळ माज्या हाती । बान हुरदी भिडला । माता कुरुंद ग आला । बोलली दशरथ राजाला । तुला चौघजन पुत्र । पानी न्हाई मिळायाचं ।...

श्रावण बाळाच्या आयुष्यातील महत्त्वाचा प्रसंग सांगणारी ही एक पद्यात्मक कथा आहे. एखाद्या लोककथेप्रमाणे हिची सुरुवात झाली आहे. 'एक होतं नगर' या थाटात ही कथा सुरू झाली आहे आणि त्याच पद्धतीने अखेरपर्यंत ती पुढेही गेली आहे. घडले तसे लहान लहान वाक्यांच्या सहाय्याने सर्व काही येथे सांगितलेले

आहे. श्रावण बाळाच्या जीवनातील व दशरथ राजाच्याही आयुष्यातील एक रोमांचकारी कथाभाग सामान्य मनाने येथे सांगितला आहे. गद्याचाच सर्व साज. पण आवरण पद्याचे. तरी पण साधे वाचले तरी तीच गोडी. गायिले तरीही तीच गोडी. संभाषणांचा ओघही धावता आहे. त्यामुळे सारे काही आता या घडीला समोर घडावे तसे वाटते. भाषा मात्र अगदी गावरान आहे. त्याच कारणाने एक वेगळी अशी तिची गोडी. ही गोष्ट इथे जशी थांबली आहे तशीच मुळात थांबली असण्याची शक्यता वाटत नाही. कदाचित दशरथाच्या पुढील आयुष्याची माहितीही पुढे आली असणे शक्य आहे. पण त्याचा विचार इथे नाही. आहे हे गाणे असे आहे. जेवढे मिळाले तेवढे इथे ठेविले आहे. कारण ते सांगणारी बाई विचारले असता म्हणाली की, 'एवढीच ही गोष्ट. मूळ मुद्दा आला!'. . .

**गावा आल्याती गव्हार — त्यंचा खेळ गुढघ्या मांडचावरी**
**जईता पहायाला गेली — बहुर डोळ्यांनी दापिली**
**बहुर म्होरं जईता मागं — जईता आली घरायासी**
**घेतली मोत्याची चुंबळ — घेतली खुटीची घागर**
**बहुराची एक खेप — जईताच्या दोन खेपा**
**आगं आगं माजी आई — पानी आंगुळीला ठेव**
**ठेवील तुजी जईतारानी — ती तर देशावरली दासी**
**बहुर तिथूनी निगाला — गेला शिपीयाच्या आळी**
**घेतला रुपयाचा बांड — घेतली आनीयाची चोळी**
**जईताला हाकलुनी दिली — लागली राजस मारगी**
**याक वन वलांडिलं — दोन वनं वलांडिली**
**तीन वनं वलांडिली — चवथ्या पाचव्या वनायाला**
**आलं जईताचं म्हायारु — जईता पाणवठ्या बैसली**
**बहुर तिथूनी निगाला — गेला शिपीयाच्या आळी**
**घेतला रुपयाचा बांड — घेतली आनीयाची चोळी**
**जईताला हाकलुनी दिली — लागली राजस मारगी**
**याक वन वलांडिलं — दोन वनं वलांडिली**
**तीन वनं वलांडिली — चवथ्या पाचव्या वनायाला**

आलं जईताचं म्हायारु जईता पाणवठ्या बैसली
भावजा आल्या पान्यायाला अग तू कुनायाची कोन
मी ग देशावरली दासी करीन तुमचं काम धाम
करीन तुमचं दळायान करीन तुमचं कांडायान
भावजा म्होरं जईता मागं जईता आली घरायासी
दिलं पायलीभर गहू लागली दळान दळाया
विठू माजा व्हाई पिता रखमीन माजी व्हाई माता
साता तळायाची माडी तितं नांदं जईता लाडी
बंदु माजा इंदूर सरती माजी त्येला ववी
साता तळाची माडी तितं नांदं जईता लाडी
इंदूर तिथूनी निगाला आला जईताच्या सासरी
अवो अवो आत्याबाई माजी जईता दिसत न्हाई
तुमची जईता बाळातीन व्हाई आत घरायात
तिथून इंदूर निघाला गेला सासऱ्याजवळी
तुमी सर्वे दिसता वो जईता माजी दिसत न्हाई
तुमची जईता बाळातीन व्हाई आत घरायात
इंदुर तिथूनी निगाला गेला नवऱ्याजवळी
अवो अवो दाजीबा जईता माजी दिसत न्हाई
आज जईताची पाचवी पाचवी करीत वाटंला
न्हेतो तिला म्हायारा माता मालनीला भेटाया
जईता कनकीची केली दोन वनं वलांडली
मखमली शालू दिला लागला राजस मारगी
इंदूर तिथूनी निगाला जईता वारूवरी आली
एक वन वलांडिलं गोपा तांदळाचा केला
तिसऱ्या चवथ्या वनायाला आगास मागास पायदळ
शालू वारीयानं गेला जईतावरी नदार गेली
जईता कनकीची केली घेतली सोन्याची कुराड
गेला चंदन बेटायाला दोन चंदन तोडीली

**जईताला जाळून टाकीयीली चवथ्या पाचव्या वनायाला**
**इंद्रूर घरायासी आला आगं आगं माजे आई**
**जईता आपली आपल्या घरी का म्हन लावलं सोयऱ्याघरी**

जईता नावाच्या सासुरवाशिणीची ही एक अद्भुत तशीच करुणरम्य अशी कहाणी आहे. जईता म्हणजे सासुरवाशिणीचे एक प्रातिनिधिक स्वरूप. सासुरवास कसा घडतो आणि तो लपवून ठेवण्यासाठी माहेरच्या माणसांची कशी दिशाभूल केली जाते याची ही एक चित्ताकर्षक हकिगत आहे. कणकीचा माणूस करावयाचा आणि डोळचांत धूळ फेकावयाची ही जुन्या काळच्या गाण्यातील व कथेतील एक अद्भुत चीज आहे. तिचाच इथे वापर झालेला आहे. जईताचे हे गीत नाना प्रकारांनी बायका म्हणतात. आपापल्या परीने हे कथानक त्या सजवितात. मूळचे एकच कथानक. पण सांगण्याचा प्रकार निराळा. पंचमीच्या गाण्यांमधील अनेक कल्पना एकत्र गोवूनही हे गाणे सजते. परंतु खरी कथा सांगणारे आटोपशीर असे जे गाणे मला मिळाले आहे ते मी इथे दिले आहे.

दासी कुणबिणीचा वेष घेऊन आलेल्या नणंदेला न ओळखणाऱ्या भावजयी, ओव्या गाताना 'गळा' ओळखून कावरीबावरी झालेली आई, बहिणीला सासरहून आणायला गेलेला भाऊ आणि सासरच्यांनी त्याची केलेली फसवणूक, त्यानंतर बहिणीची होणारी खरी भेट; आणि केवळ गावात आलेला खेळ बघायला बायको गेली म्हणून तिला टाकून देण्यापर्यंत मजल गेलेला रागीट नवरा ह्या या कथानकातील कल्पना मनाला वेड लावणाऱ्या आहेत. 'असे कसे होईल?' हा प्रश्न करणाऱ्या त्या आहेत. आणि या गोष्टीची पराकाष्ठा तर कणकीच्या जईताने व तांदळाच्या गोपाने भारी अद्भुततेने करून टाकली आहे! 'पुढे काय? पुढे काय?' असा मनाला चटका लावीत धावणारे हे गाणे स्त्रियांच्या आवडीचे आहे. फेर धरला की जईताचे गाणे हवेच. जणू तिच्या निमित्ताने उभ्या दुनियेतल्या सासुरवासाला वाचा फोडावी हाच त्या मागचा हेतू!

**सासूसुनांची कुरबुर झाली सासू झनकाऱ्यानं गेली**
**आली गारूडचाच्या आळी आरं तू गारूडचा रं दादा**
**माझा मैतर हूशील का सर्प धरूनी देशील का**
**गारूडी मैतारू झाला सर्प धरूनी दीला**

सासू आली घरायासी
बाहेरून आली राई सून
अवो अवो आत्याबाई
तुज्या ग म्हायारीचा मेवा
अवो अवो आत्याबाई
दारी लिंबूण्याचं झाडू
चवथ्या पाचव्या घासायाला
चूल बाजूस काडीली
गेली गोईंदाच्या सपनी
चूल बाजूस काडीयीली
गोईंदा तिथून निगाला
ढवळा वारू शिणगारीला
लागला वनाच्या मारगी
याक वन वलांडिलं
तीन वनं वलांडिली
आलं राईचं सासर
अवो अवो आत्याबाई
तुमी सर्वी दिसत हाई
गेली असल धुण्यायाला
तिथून गोईंदा निगाला
घेतलं रूपीयाचं खोरं
राईला मांडीव घेतीयीली
राईला साजिवंत केली

शिजून शिंक्याला लावीयला
अवो अवो आत्याबाई
ह्या भगूल्यात हाई काई
ताटी घेऊनी ग खावा
पैला घास कडू हाई
पडलं असल पिकलं पानू
राई धरनी पडयीली
राईला गाडून टाकीयीली
आरं आरं तू गोईंदा दादा
मला गाडून टाकीयीली
गेला वारूच्या पागंला
वारूवरी स्वार झाला
लागला राजस मारगी
दोन वनं वलांडिली
चवथ्या पाचव्या वनायाला
गोईंदा आला घरायाशी
माजी राई कुठं हाई
माजी राई दिसत न्हाई
गेली असल पानीयाला
घेतली सोन्याची कुदयीळ
राईला काढून घेतीयीली
डावी करंगळी कापीयीली
म्हायारी गोईंदानं नेली

सासूसुनेच्या भांडणाचा अतिरेक किती होतो, याची काळजाचा ठाव घेणारी कथा ह्या गाण्याने दिली आहे. थोडीशी कुरबूर झाली रे झाली की, सासू कसा डाव रचते आणि सुनेचा काटा काढते, याची हकिगत हे गाणे सांगते. गारुड्याशी मैत्री करून साप मिळवायची आणि तो शिजवून माहेरची मिठाई म्हणून सुनेपुढे ठेवायची, ही सासूची सूडबुद्धी इथे आली आहे. सासूचे मन फिरले

की ती काय करील त्याचा नेम नसतो म्हणतात, तेच या गाण्याने जणू सिद्ध केले आहे! परंतु सासूचा हा डाव सून आपल्या भावाच्या स्वप्नात जाऊन सांगते आणि शुभशकुन व्हावा म्हणून भाऊ ढवळ्या घोड्यावर बसून जातो. सासरची माणसे त्याला वहिणीबद्दल थापा मारतात. पण झाली गोष्ट त्याला माहीत असते. तो सोन्याची कुदळ घेतो. रुप्याचे खोरे घेतो. राईला उकरून काढतो. माहेरी घेऊन जातो. हे सारेच कसे चमत्कार घडविणारे! तसेच भावाबहिणीच्या प्रेमाला कस लावणारे असे आहे. त्याकारणाने अशा भावनेने तावून सुलाखून निघालेल्या बायका हे गाणे आवर्जून म्हणत असतात. ह्यानिमित्ताने त्यांचा अनुभव जणू त्या बोलून दाखवतात. दृष्टान्ताने येणारा दाखला त्यांच्या मनावर ठसतो.

कनकन कनानीलं
वारुळ दनानीलं
चांगुनेच्या घरी
हृषी देव आलं
आलं तर येऊं द्या
परस दारानं येऊं द्या
आलं परस दारानं
पाट बसाया टाकीला
झारी भरून पानी दिलं
घेतलं चवरंगी सूप
गेली पाचव्या उतरंडी
काढल्या साळी नी बा डाळी
पेटविल्या कातीव चुली
लावल्या चंदनाच्या फाळी
पाणी घंगाळ सारीलं
उठा देवा भोजनाला
आमा भोजन कशायाचं
येळल्या साळी नी बा डाळी
साळी डाळीयाचं
आमच्या न्हाई आवडीचं
सत्वाची ग चांगुणा
गेली देवाच्या खोली
घेतला बंदा रुपाया
निगाली वो बाजायीरा
ऊर बाई उडयीतो
मोत्याचं ग इंजान
गेली खाटक्याच्या आळी
खाटक्या मैतर हूशीयोल
मगरमासा तू देशील
होय म्हनूनी बोलला
घेतला मगरमासा
आली आपुल्या वाड्याला
गेली देवायाच्या खोली
घेतली सोनीयाची सुरी
शीरकमळ उतरीलं
देवापुढं ठेवीयीलं
कांडून कुटून शिजविलं
दिली हिंग फोडयीनी

ऊठा देवा जेवायाला आमा जेवण कशायाचं
केलं मगरमाशायाचं आमच्या न्हाईं आवडिचं
तुमा भोजन काय बा करू आमा भोजन बाळायाचं
आमा आवड चिलियाची पोटीयीच्या पुत्राची
गेली देवाच्या खोली घेतली गुळायाची वाटी
गेली तडक गलीयीला हाक दिली बाळायाला
कडी तोडीयाच्या बाळा कंबरी करदूडचाच्या बाळा
दंडी वाकीयाच्या बाळा अंगडचा टोपडचाच्या बाळा
गळी पेटीयाच्या बाळा कानी डुलायाच्या बाळा
ये रे माज्या लाडक्या बाळ धावत पळत
हाती दिली गूळवाटी कडी घेतला उचलूनी
आली आपुल्या घराला गेली देवाच्या खोलीला
घेतली सोनीयाची सुरी शीर बाळाचं उतरीलं
शीर ठेवलं शिक्यावरी धड कांडून कुटीयीलं
दिली हिंग फोडणी भोजन तयार झालं
उठा देवा भोजनाला आमा भोजन कशायाचं
केलं धडायाचं बा आमा नको धडायाचं
तुमा भोजन कशायाचं चिलीयाच्या शिरायाचं
शीर कांडून कुटूयीन केलं भोजन तयार
दोन पाट टाकीयीलं दोन ताटं मांडीयीली
दोन तांबे भरीयीले दोन पेले ठेवीयीले
अग तू सत्त्वाची चांगुना दोन पाट कुनायाला
एक ताट देवायाला एक शिराळ राजाला
ताट आनी एक कर तांब्या आनी एक भर
ताट तांब्या कुनायाला एक चिलार बाळायाला
बाळ आता कुटीयीलं अग तू सत्त्वाची चांगुना
जा ग देवाच्या खोलीयीत घे ग हाती गूळवाटी
दे ग हाक बाळायाला काप माजो करंगळी

| | |
|---|---|
| बाळ साजिवंत झालं | बाळ जेवाया निगालं |
| बाळ धावत पळत | येऊन बसलं पाटावर |
| बाळा भोजन बा केलं | देवा भोजन बा केलं |
| सत्त्वाची ग चांगुणीना | न्हाई हरली सत्त्वायाला |
| देव उठूनी बा गेलं | लागली राज करायाला |

देवाची भूक भागविण्यासाठी स्वतःच्या पोटच्या बाळाला मारून त्याचा पाक रांधणाऱ्या चांगुणेची ही गोष्ट आहे. ही जगावेगळी सत्त्वाची परीक्षा देणाऱ्या स्त्रीची हकिगत काळजाची चिरफाड करणारी आहे. हे गाणे सांगणाऱ्या बाईच्या आणि तिच्या बरहुकूम ते म्हणणाऱ्या बायकांच्या डोळ्यांत गाणे चालू असेपर्यंत पाणी उभे रहाते. गळा दाटून येतो. काळीज मुसमुसायला लागते. आवाज फुटत नाही. शब्द नीट निघत नाही अशी तऱ्हा होते! तरी पण स्त्रीच्या जवळच्या सत्त्वाचे गुणगान करण्याची ईर्षा हे गाणे म्हणायला लावते. आणि मग बायका ते म्हणतातही. स्वतःच्या पोटचे बाळ आपल्या हाताने मारण्याची भयंकर गोष्ट त्यांच्या मनाला सहन होत नाही. भारी झोंबते. पण देवाची भूक शमविण्यासाठी हा त्याग करणे भाग असल्याने कर्तव्याची पारख होते. याही दिव्यातून ती पार पडते आणि अखेरीस देवाला तिचा विजय मान्य करावा लागतो. तिचे बाळ तिला मिळते. माणसाला मारायचे आणि करंगळीच्या रक्ताचे शिंपण करून पुन्हा जिवंत करावयाचे, हा या गाण्यातील भाग इतर काही गाण्यांतही आलेला आहे. त्यावरून ही अद्‌भुत किमया मनाला भुरळ पाडीत असली पाहिजे हे उघड आहे. एरवी तीच पुनःपुन्हा येती ना!

तळ्याच्या काठी मोर पानी पीतो
पिऊनी पिऊनी रानोमाळ जातो
पंचमीच्या दिवशी वारुळाला येतो
वारुळीचा नाग धरी माजा पदर
सोड सोड नागा माजा पदयीर
सांग सांग तूज्या जोडव्याचं मोल
काय सांगू दादा चुटक्याचं लेनं
त्येचं मोल केलं देवा विठ्ठलानं...

तळ्याच्या काठावर असलेला मोर पाणी पीत असताना बघून एकीचे मन हारपते. त्याकारणाने त्याच्या मागोमाग रानोमाळ भटकत असताना पंचमीच्या दिवशी वारुळावर येणे घडते. तिथे नाग त्या बाईचा पदर धरतो आणि विचारतो की, 'तुझ्या जोडव्याची किंमत काय?' तशी ती सांगते, 'माज्या विठ्ठलदेवानं त्याची किंमत केलीय. मी काय सांगू? मनात आलं नि पायातही बसलं.' नंतर मग अशा प्रकारे सर्व दागिने संपेपर्यंत अशी भाषा होते. या गाण्यात तसे काही विशेष नाही. दागिन्यांच्या व पशुपक्ष्यांच्या आवडीनिवडीचा उल्लेख फक्त इथे आलेला आहे.

काय सांगू माज्या इट्ठलाचं ध्यान इटेवरी उभा सुकुमार चरन
पिवळा पितांबर नेसले कसून वैजयंती माळा घाली गळ्यातून
जळू जळू दिष्ट ह्याला कशी झाली कोन्या चंडाळांनी काय खोड केली
नाशवंती देवी टाका उतरूनी करा लिंबलोण सावळ्यावरूनी
इट्ठल ग बाप आई रखुमाई चंद्रभागातीरी पुंडलीक बाई
आपुली ग भैन गुरु चांदनी वाट ती ग पाही उभ्या अंगनी
अग माया भैनी मधु चाखवीसी सुखाची ती वाट मला दाखवीसी
मिरवत निगालं इमानी गेलं बंदु माजं दोन इमानी कोन
चक्रभुज नार धुरपतीसारकी आपुली ती भैन भेटावी वाटती
भैनीला भाऊ शिकवी ग काई जन्माला येऊनी हरीनाम गाई
मजला म्हायारी न्यावं बो विठ्ठला म्हायारी जाऊनी बसावं बंगली
पुसे कवतुक माजा पांडुरंग कवतिक माजे धन्यचि देवा
जाईन जाईन झिमगाला वारा चांदीचं घंगाळ रुप्याचे तांबे
आता माजे बंधु पुंडलिक न्हाले चांदीचं ग ताट कोण्याला भात
पिठी साखरनी भरीयीली मूठ खाजाव करंज्या अनारसी मऊ
बुंदीचे ग लाडू परकार बहू मुळ्या वाळकाची भाजी झाली थोडी
कवळ्या काकडीची कोशींबीर केली खोबऱ्या चटण्या कुटील्या भारी
तोंडी लावायाला चटणी सुंदरी अशा परकारानं भरीलं ग ताट
चांदीची वजरी हाय तीनकोनी हात घाशीत्यात मावंच्या भैनी
राधाबाई म्हने निवली माजी डोई असं हात मऊ धन्यचि बाई

राधाबाई म्हने निवला माजा माथा कासाई सुनेनी हंडा केला रीता
न्हाऊनी धुवूनी सौभागी झाली सौभागी होऊनी म्हायारी आली
आरशी घेऊनी मुखजी पहाती बुक्क्याचा चांदवा कपाळी लेती
केली साडी चोळी गव्हायाची वटी वल्या नारळाचा परसाद वाटी
रथात बसली धुवायाचे पायी पुंडलीक बंधु परतुनी पाही
नगरीच्या नारी उभ्या वाटेवरी कवा आली राधाई आपुल्या घरी
काय सांगू बाई म्हायारीचं सूक आता इसरते परपंचाचं दूक

पंढरीच्या विठोबाला व रखुमाईला मायबाप समजून व पंढरीला माहेर मानून तिकडे जाण्याचा प्रघात फार जुना आहे. माहेरचे सगळे सुख या ठिकाणी मिळते ही भावना. त्यामुळेच पंढरीच्या वारीला गेलेल्या 'राधाबाई'ने माहेरच्या सुखाची केलेली ही पारख इथे आली आहे. विठ्ठलाचे वर्णन, त्याला लागलेली दृष्ट, लिंबलोणाची तयारी, पुंडलिकाचे नाते, हरिनामाचे वैशिष्टच, पांडुरंगाची कौतुकाची विचारपूस, चांदीची भांडी, नाना प्रकारचे जेवण, न्हाणे, धुणे, बुक्क्याचा टिळा, नगरच्या नारींची विचारपूस आणि त्यांना दिलेले उत्तर या सर्वांनी मिळून हे गाणे गुंफिले असल्याने त्यास चांगलाच घरगुतीपणा आला आहे. माहेरी गेलेल्या सामान्य स्त्रीच्या कोडकौतुकाला देवाच्या दारीही काही उणे पडले नाही! सगळे घडले ते गोड मानून घेतले. त्याची हरप्रकारे माहेराशी तुलना केली. कौतुक झाले. देवाच्या दारी पूजा बांधली, ती मान्य झाली हाच आनंद. मनाला येईल ते सगळे करायला मिळाले हेच माहेरचे सुख इथे असे रंगविले गेले आहे.

पहिली माजी वोवी पहिल्यापनात
विठ्ठल बनात विठाबाई
दुसरी माजी वोवी नाई दुजा भाऊ
जनीमंदी पाहू पांडुरंगा
तिसरी माजी वोवी तिरगुनी आरती
साकशा पिठती विठ्ठलाची
चवथी माजी वोवी चऊ येळुयेळा
तुळशीच्या माळा हरीच्या गळा

पाचवी माजी वोवी पाची पंचवीस
हुरद्यात ठसं विठ्ठलाच्या
साव्वी माजी वोवी मी ग ती गाईली
दिव्या मी वाहिली विठ्ठलाला
सातवी माजी वोवी सातवं रिफाट
रंगल्यात व्हट विठ्ठलाचं
आठवी माजी वोवी आठी तुळशीपत्र
वाळत्यात धोतरं विठ्ठलाची
नववी माजी वोवी नवीन गाईली
फुलं मी वाहिली विठ्ठलाला
धाव्वी माजी वोवी घेऊनी आत्रीत
चांदुबा खिडकीत आंगुळीशी
अकरावी माजी वोवी बांधा पीठकूट
धरा नीट वाट पंढरीची

इतर गाण्यांच्याप्रमाणे अशा ओव्या गाऊनही पंचमीला बायका फेर धरतात. विठ्ठलाची भक्ती आणि त्याचे वर्णन या गाण्यात आले आहे. भक्त आणि देव यांच्यामधील परस्पर प्रेमाची कल्पना इथे आली आहे. वारकरी स्त्रियांच्या अत्यंत आवडीचा हा विषय आहे; आणि तो त्यांनी मोठ्या भाविकतेने हाताळलाही आहे. अकरा ओव्यांच्या चिमुकल्या जगात मोकळे झालेले हे अंतःकरण ऐकणाराला पंढरीचा महिमा दाखविल्याखेरीज रहात नाही!

पंचमीच्या सणाच्या वेळची फेराची अशी आणखी कितीक गाणी आहेत कुणाला माहीत! जो जो ती सापडतात तो तो त्यांना ना आदी ना अंत असे वाटते. गावोगावचा वानवळा निराळा. प्रत्येक वेशीचे म्हणून काही वेगळेच. सांगावे तेवढे थोडे. ऐकावे तेवढे कमीच. असा हा प्रकार. तरी पण त्याची कल्पना यायला एवढे पुरे आहे.

या सणाच्या वेळी कोणत्याही खेड्याचा कानाकोपरा टाळ्यांच्या तालावर आणि या गाण्यांच्या सादावर रात्रभर निनादून गेलेला दिसतो. गोड गळ्यावर होणाऱ्या भावनाविष्काराच्या ललकाऱ्यांनी दाही दिशा दुमदुमून जातात.

पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेली ही गाणी बायकांच्या ओठावर मनमुराद खेळायला लागली म्हणजे ऐकणाराचे भान हरपते. ठेवणीतल्या ह्या भावना आठवणीच्या बळावर पुन्हा ताज्यातवान्या होताना पाहिल्या म्हणजे 'खरे काव्य हे इथे आहे' असा मोह मनाला होतो. तासन्‌तास ऐकत रहावेसे वाटते. कंटाळा म्हणून कसा तो येतच नाही.

या फेराच्या गाण्यांच्या जोडीलाच पंचमीला मुलीबाळी आणि बायकामंडळी निरनिराळे भरपूर खेळ खेळत असतात. या खेळांचे प्रकार जेवढे वेगळे तेवढीच त्यांची गाणीही भरपूर. अख्खी रात्र ही खेळगाणी चालूच असतात. पण म्हणून कोणी दमलेले दिसत नाही. 'खेळ व गाणी' या प्रकरणात स्वतंत्रपणे व विस्ताराने सुरुवातीलाच या पुस्तकात यासंबंधी विचार केलेला असल्याने इथे पुन्हा त्याची चर्चा मुद्दामच केलेली नाही. तरी पण एखादा नमुना म्हणून झिम्म्याच्या खेळाचे एक गाणे इथे देत आहे.

या गाण्यात सासरी असलेल्या मुलीला माहेरी न्यायला म्हणून भाऊ मुराळी होऊन आलेला आहे. परंतु त्या मुलीची सासू मात्र कारल्याचे आळे लावून व त्या वेलाला येणारी कारली घेऊन त्यांची भाजी करून खाईपर्यंत तिला जायला परवानगी देत नसल्याचे सांगितले आहे. त्यामुळे हे गाणे मोठे छानदार रंगते.

**कारल्याचं आळं लाव ग जू**
**मंग जा तू तुपल्या माहेरा**
**कारल्याचं आळं लावलं व फुईजी**
**बंधु आले न्यायजी**
**मी जाते मपल्या माहेरा**
**कारल्याला पानं येऊदे ग जू**
**मंग जा तू तुपल्या माहेरा**
**कारल्याला पानं आली व फुईजी**
**बंधु आले न्यायजी**
**मी जाते मपल्या माहेरा**
**कारल्याला कारली येऊ दे ग जू**
**मंग जा तू तुपल्या माहेरा**

कारल्याला कारली आली व फुईजी
बंधु आले न्यायजी
मी जाते मपल्या माहेरा
कारल्याची कारली काढ ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा
कारल्याची कारली काढली व फुईजी
बंधु आले न्यायजी
मी जाते मपल्या माहेरा
कारल्याची भाजी कर ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा
कारल्याची भाजी केली व फुईजी
बंधु आले न्यायजी
मी जाते मपल्या माहेरा
कारल्याची भाजी खा ग जू
मंग जा तू तुपल्या माहेरा
कारल्याची भाजी खाल्ली व फुईजी
बंधु आले न्यायजी
मी जाते मपल्या माहेरा

साध्याभोळ्या खेडवळ स्त्रियांच्या मनात येणाऱ्या अनंत भावभावनांचा झालेला हा आविष्कार पंचमीच्या या अनेक गाण्यांतून पहायला मिळतो. त्यामुळे घरोघरी पंचमी चांगलीच गाजते.

परंतु हे पंचमीचे वैभव पहावयाचे व अनुभवावयाचे म्हणजे खेडेगावची पाणंद तुडवीत किंवा आता नव्याने झालेल्या रस्त्याने वाहन घेऊन खेडेगावी गेल्याखेरीज रसिक मनाचे भागत नाही. कारण शहरात या गोष्टीला आता महत्त्व उरलेले नाही.

नागपंचमीच्या या सणाचे आणखी एक वैशिष्टय जाता जाता इथे सांगावयाचे म्हणजे या सणाला एक वेगळा इतिहास आहे. पूर्वीच्या काळी द्राविडी लोक दक्षिणेकडे रहात असत. त्यामुळे वसाहतीसाठी उत्तरेकडून

येणाऱ्या आर्यांशी त्यांचे लग्नसंबंध जुळून येत. विशेषत: आर्य पुरुषांनी इकडील द्रविड स्त्रियांशी विवाह केले. त्याकारणाने आजच्या दक्षिण भारतामध्ये आर्य व द्रविड यांच्या मिश्रणाचे लोक आढळून येतात. त्यांच्या मनावर द्राविडी संस्कृतीचाच पगडा अधिक आहे. नागाची पूजा करणे हे या द्राविडी संस्कृतीचेच द्योतक होय. तसेच ही पूजा मुख्यत: स्त्रियाच करतात हेही इथे अवश्य लक्षात घेणे जरूर आहे.





# गौरी पूजन

**भा**द्रपद महिना म्हणजे सणांची गर्दी. पाऊसकाळामुळे सगळीकडे लोकांना कामधाम कमी. पेरण्या आटोपलेल्या. रानातील काम आळसावलेले. सगळीकडे हिरवा समुद्र पसरल्याकारणाने मन प्रसन्न. थोडीफार जिवाला मोकळीक. हौस पुरवायला वेळ रिकामा. त्यामुळे सणासुदीची चैन उपभोगण्यास वाव भरपूर. अशा वेळी गौरीगणपतीसारख्या देवदेवतांची पूजा सामान्य मनाला विशेष प्रिय. सगळीकडे आबादीआबाद झाल्याकारणाने चित्तवृत्तीदेखील हारखलेल्या. त्यामुळे जवळची सारी कला पणाला लावून देवाची पूजा आणि आरास करण्यात लोकांना विशेष आनंद वाटतो.

गणपतीची पूजा इतर अनेक कारणांसाठी होत असली, तरी ती एक विद्येची देवता आहे या दृष्टीने तिच्या पूजेचे महत्त्व फार. त्यामुळे भाद्रपदाच्या शुक्ल-पक्षातील चतुर्थीला येणारा हा गणपती मुलाबाळांचा विशेष आवडता. 'गणपती बाप्पा मोरया' म्हणताना मुले व मोठी माणसेही आनंदाने उड्या मारतात. आणि या गणपतीची पूजा दूर्वा आणि नैवेद्याला मोदक ठेवून केली म्हणजे आरती म्हणते वेळी तर सर्वांची धांदल विचारूच नये! अगदी ठेक्यात आणि तालासुरात ही आरती म्हणताना खरोखरच 'सुखकर्ता

दुःखहर्ता वार्ता विघ्नाची...' या कल्पनेचा आविष्कार मनात घोळल्याविना रहात नाही!

अशा वेळी या गणपतीची आई जी गौरीमाता, पार्वती, तिची पूजाही झालीच पाहिजे. म्हणून गणपती आल्यापासून तिसऱ्या दिवशी गौरीही येते. शहरामधील बहुजन समाजामध्ये व खेडोपाडी सर्रास ही पूजा जरूर केली जाते. गणपती हा शंकर-पार्वतीचा मुलगा. त्यामुळे तो घरी आल्यानंतर त्याची आई गौरी हीदेखील माहेरी येणे स्वाभाविक आहे. या गौरीमातेच्या पूजेमागचा हेतू हा की, भरपूर धनधान्य आणि स्वास्थ्य याचे वरदान तिच्याकडून मिळावे आणि भरपूर आयुष्यही तिच्याजवळ मागता यावे म्हणून भाविक मन तिची पूजा करते.

या गौरीपूजेच्या बावतीत पुराणामध्ये अशी एक गोष्ट सापडते की, पूर्वीच्या काळी दैत्यांनी देवांना अतिशय त्रास दिला. त्यामुळे देवांच्या स्त्रियांना आपले सौभाग्य कसे सुरक्षित राहील याबद्दल धास्ती वाटली. काळजी वाटली. त्या-कारणाने सगळ्याजणींनी एकत्र जमून या संकटामधून आपली मुक्तता करण्या-साठी महालक्ष्मीस विनविण्याचे ठरविले. यानंतर महालक्ष्मीची त्यांनी पूजा बांधल्यावर ती त्यांना प्रसन्न झाली. तिने दैत्यांचा संहार केला. आपल्या भक्त-मंडळींना अडचणींतून मुक्त केले. सुखाची त्यांच्यावर खैरात केली. त्यामुळे या उपकाराची आठवण म्हणून दर वर्षी गौरीपूजेचा हा उत्सव बायका साजरा करतात. आपणास अखंड सौभाग्य लाभावे ही त्यामागची प्रमुख भावना असते.

परंतु खेडोपाडीच्या सामान्य बायका या सणामागचे कारण विचारताना ही गोष्ट न सांगता एवढेच म्हणतात की, 'या कारणाने पार्वतीला माहेरी यायला मिळते. पार्वती म्हणजे आपलीच पोर. माहेरवाशीण. वर्षातून एकदा येणारी. तिचे कौतुक करायचे. तिला माहेर करायचे. तिला सुखात ठेवायची.' त्यामुळे त्या दृष्टीनेच सर्वत्र हा सण पार पडताना दिसतो.

**सूर्या समूक माजं घर ग बाई मी लोटीते घरदार**
**पायी साकळ्या तंगभार ग बोटी जोडवी झिनकार**
**कमरी दाबाला चारी कुलपं ग गळी पुतबोळ्याची माळ**
**वर चिताक नक्षीदार ग डाळी डोरलं पाच फेर**

**नथ नाकात डौलदार ग    काप कानात गजबार**
**डोकी केवडा मारी ल्ह्यार ग    चोळी अंगात हिरवीगार**
**नेशी पिवळा पितांबर ग    हाती सोन्याचं बिलवर**
**मी ग निगाले न्हवयीना ग    लेक बाबांची तालीवार**

अशा प्रकारचे जुन्या काळचे असे सगळे दागिने एकत्र गुंफून तयार झालेले गीत गात घरोघरीच्या पोरीबाळी न्हवणाला म्हणजे गौरी आणायला म्हणून जातात. हातांत पानाफुलांनी सजवलेला तांब्या घेऊन नदीवर नाही तर आडावर अगर विहिरीवर जावयाचे. त्यावेळी जाताना केलेला साजशिणगार असा बोलून दाखवायचा. घोळचामेळचाने जमून ठेक्यात पावले टाकीत जाताना एकमेकींचा दिमाख एकमुखाने असा म्हणायचा. मग घरात खरोखरच तसे वैभव नांदत नसले तरी फिकीर नाही! मनाचे ऐश्वर्य कायम. कल्पनेची भरारी दांडगी.

पाणवठ्यावर जाऊन ही गौर आणावयाची म्हणजे तांब्यातील पाण्यात पाच खडे घेऊन यावयाचे. बरोबर नेलेले तेरडयाचे पान व फूल त्यास वहावयाचे. कोकणामध्ये गंगेवर तेरडा नेऊन ठेवतात. त्यावेळी नारळ व कोरे सूप नेऊन तो तेरडा व सात खडे माघारी आणतात. तेरडयावर मुखवटा बसवतात. त्यावरच सर्व साजशिणगार चढवतात. देशावर फक्त पाच खडे आणतात. ते घेऊन घरी आलेल्या मुलीच्या पायावर गरम पाणी ओतून, तिला हळदकुंकू लावून आणि ओवाळून घरात घेतात. अशा वेळी घरची कर्ती बाई न्हवण घेऊन घरात येणाऱ्या मुलीला विचारते, 'गौराय कशाच्या पायांनी आल्या?' आणि ती मुलगी उत्तर देते की, 'गौराय सोन्यारुप्याच्या पायांनी आल्या.' नंतर हाच प्रश्न पुन:पुन्हा विचारला जातो व दर वेळी 'हिऱ्यामाणकांच्या, मोतीपवळ्यांच्या, जडित्राच्या लेण्याच्या, धनसंपत्तीच्या, आरोग्य आबादीच्या' पायांनी गौराय आल्याची स्वतंत्रपणे माहिती दिली जाते. तसेच ही मुलगी घरात येताना हळद कुंकवाच्या बोटांच्या ठशांनी पायघडी घालण्यात येते. त्यामुळे हा प्रसंग फारच बहारीचा ठरतो. घरात अशी गौराय आल्यानंतर मग ते पाच खडे एखाद्या गाडग्यात नाही तर पितळेच्या भांड्यात ठेवून गौरी बसवतात. त्या संख्येने दोन असतात. त्यांची मांडणीही मोठी अभिनव असते. म्हणजे गाडग्यावर गाडगे

उतरंडीसारखे रचावयाचे आणि वरच्या तोंडाला हळदीकुंकवाने माणसाचा चेहरा काढलेल्या लहान टिंगाणीचा मुखवटा ठेवायचा. त्यावर खण घालावयाचा. कुणी कुणी भांड्यावर भांडे अगर डब्यावर डबे ठेवून त्यावर मातीचा अगर वाटीवर काजळीने काढलेला मुखवटा ठेवून उंची लुगडी नेसवतात. क्वचित प्रसंगी पितळेचे मुखवटेही दिसून येतात. मात्र या सगळ्या गोष्टींसाठी वापरण्यात येणाऱ्या गाडग्यात अगर भांड्यात सवाष्णीची ओटी असते. तांदूळ अगर गहू, पानसुपारी, लेकुरवाळे हळकुंड, खोबऱ्याची वाटी वगैरे वगैरे सर्व या गौरीला लागते. त्याचप्रमाणे मुखवटा असेल त्या बेताने नाकात व कानांत डाग घालतात. एरवी सर्रास गौरींना गळ्यातील सर्व ठळक दागिने घालण्याची प्रथा आहे. उंची लुगडे आणि दागदागिने यामुळे ही गौर नक्षत्रासारखी दिसते. तिच्यापुढे घरातील सुंदर वस्तूंची मांडणी करून दोन्ही बाजूंना दोन समया तेवत ठेवायच्या आणि समोर मांडलेल्या खणा-नारळांवर हळदकुंकू वहावयाचे. यावेळी ही सगळी शोभा बघून डोळ्यांचे पारणे फिटल्यासारखे वाटते.

गौरीगणपतीचा उत्सव यावेळी मोठ्या आनंदाने साजरा केला जातो. गौरीच्या भोवती नाचताना

**भाद्रपद सुद्येवो चातुरतीला । गण आणीले गो पूंजनाला ।**
**गनोबा आले आनंद झाले । गनोबा आले सर्व पूंजती ।**
**नरनारी या सर्वजन बोला । चला गो जाऊ चौपाटी बंदराला ।**

हे गीत कोकणातील मंडळी विशेष भक्तिभावाने म्हणत असतात.

हा गौरीचा सण तीन दिवसांचा असतो. पहिल्या दिवशी गौर येते. तिची मांडामांड झाली की, तिला शेपूच्या भाजीचा आणि भाकरीचा नैवेद्य होतो. दुसऱ्या दिवशी पुरणपोळीचे जेवण. रात्री जागरण. लहानमोठ्या सगळ्या बायका आणि मुलीबाळी रात्रभर भरपूर गात आणि नाचत गौर जागवतात. गौरीचे जागरण म्हणजे भारी आनंद. त्यामुळेच सुरुवातीला एखादी मोठी बाई लहान मुलीला सांगते की,

**बाळे मी जाते बाजारी — ऐक माजी गोष्ट ग**
**नेसले काळी चंद्रकळा — तिला रेशमी काठ ग**
**अंगात चोळी भिंगाची — दंडात बाजूबंद ग**

गळ्यात मणी डोरलं जाळीची काळी पोत ग
कानात बाळ्या बुगड्या नाजुक मोत्यांचे काप ग
हातात गोट पाटल्या कंगण्या भरल्या दाट ग
कमरेचा मासपट्टा चार कुलपी दाब ग
पायांत पैंजण घुंगराचं दाट हाईती घस ग
बोटात जोडवी मासूळच्या बिरुद्याचं ठसं ग
भांग भरला मोतीयानं कपाळ भरलं कुंकवानं
नेत्र भरले काजळानं नाक भरलं नथीनं
मुख भरलं तांबुळानं भरला कान फुलानं
गळा भरला गळसुरीनं दंड भरले बाजूबंदानं
हात भरले बांगड्यानं कंबर भरली दाबानं
पाय भरले पैंजणानं बोटं भरली जोडव्यानं
वटी भरली तांदळानं केलं म्हायार मावळच्यानं

अशानं अशी माझी गोष्ट आहे. कपडेलत्ते आणि दागदागिने यांची जणू ददात नाही. मला सगळे काही आहे.

परंतु हे ऐकले म्हणजे मग मुलीबाळी यांपैकी एखादा दागिना आपल्यासाठी कर म्हणून तिच्या पाठीमागे लागतात. मग तीही खुषीने सावधगिरी बाळगून आधीच तयार केलेला दागिना तिला देऊ करते ! सणासुदीच्या कारणानं लेकीबाळींना दागिना करावा ही मराठी स्त्रीची फार मोठी हौस असते.

गौर यायची म्हणजे असा थाट असला पाहिजे. एवढी मोठी पाहुणी यायची, तेव्हा आपलाही दिमाख तेवढाच हवा, ही त्या मागची भावना. जुन्या काळच्या बहुतेक सर्व दागिन्यांची माहिती इथे आली आहे. त्या वेळच्या बाईला नटायची किती हौस होती हे यावरून दिसते ! आज काळ फार बदलला आहे. सगळेच निराळे झाले आहे. परंतु शहरे सोडली तर खेडी अजून या सुखाला पारखी झालेली नाहीत असे दिसून येते. निदान एवढ्या सगळ्या दागिन्यांच्या वडील-धाऱ्या माणसांजवळचा पुरावा गोळा करून ते घडवायची हिंमत दाखवायला तरी कुणी भीत नाही ! हौसेला मोल नाही असाच त्यांचा समज आहे. अगदीच गरिबी असेल तर घरातील किडूकमिडूक विकून एखादा दागिना घडविला जातो आणि

बाकीचा सारा भाग फळाफुलांनी सजतो! बाभळीच्या शेंगांच्या मासोळ्या आणि जोडवी, बाभळीच्या फुलांचा नाकात मोगरा, भुईमुगाच्या शेंगांची नथ आणि डूल, मण्यांचा साधा लफ्फा, भिंगाची काकणे इत्यादी गोळा करून मुली दागिन्यांची हौस भागवताना खेड्यामध्ये अद्यापही दिसतात. गौरीसारख्या पाव्हणीपुढे दारिद्र्य नको हाच त्या सगळ्या पाठीमागचा हेतू असतो.

रात्रीच्या वेळी गौर जागवताना जसा गाण्यांना बहर येतो तसाच तो तिला आणते वेळीदेखील येतो.

**अंगणी तापलं दूध दूधा पिवळी शाई**
**ये ग गवरी बाई एवढं जिवूनि जाई**
**आता काय करू बाई माता ग ऽऽ दारी शंकर उभा ग ऽऽ**
**शंकर साळा राजा भोळा नगरी मोडुन जाय ग**
**नगराला लागलं निशाण ग ऽऽ कापूराची वात ग ऽऽ**
**दिवा जळी दिवाटी कापूर जळी आरती**
**गवरायसारकी पावणी खेळू साऱ्या राती**

अंगणात दूध तापते आहे, त्यावर पिवळी साय आली आहे आणि अशा वेळी 'हे गौरी, तू जेवायला येऊन जा' असा पुकार बायका करीत आहेत. गौर यायची म्हणजे जणू थोरामोठ्या घरी दिलेली मुलगीच यायची. खमंग दुधाचे जेवण म्हणूनच तिला रांधायचे. पण ती बिचारी पडली सासुरवाशीण. आईने हाक दिली तरी शंकराची भीती आहेच की! दारात तो उभा असताना यायचे कसे? परंतु आईला दम निघत नाही. ती उलट जबाब देते की, 'तो साधा भोळा शंकर आहे. भ्यायचे कारण नाही.' तरी पण ती सांगतेच, 'त्याने गाव सोडून दिले आहे.' पण छे! आईला ते पटत नाही. नगराला निशाण लागले असून शांतता दर्शविणारी कापुराची वात आरतीत आली आहे असे ती सुचविते. अखेरीस पणतीत जळणाऱ्या दिव्याच्या उजेडात गौरीला माहेरी येणे भाग पडते. ह्या गाण्यातील असा हा आशय मोठा सुरेख आहे. मनाला गुदगुल्या करणारा आहे.

**ताड गौरी ताडाला लागली**
**शंकूरबाची वाट गिरजा पाहू बा लागली**

सोड सोड शंकर आमुचा पालव
आमाला जाऊ दे म्हायारी
काय काय लेनं लेवूनी येतील्या
येतील तशा बा येऊ द्या
आनीन साकळ्याचं ज्वाड
माजं म्हायार दुबळं
आनीन पुतळ्याची माळ
माझं म्हायार दुबळं...

माहेराला जावे म्हणून गौरी शंकराला विचारण्यासाठी थांबली आहे. झाडावर उंच चढली आहे. पण शंकर तिचा धरलेला पदर सोडीत नाही. पण हिला तर माहेरी जायची घाई झाली आहे. म्हणून माहेराहून काय आणशील असे विचारले असता ती सगळे दागिने आठवेपर्यंत तो तो दागिना मी आईकडून आणीन असे सांगते आहे! हेच गाणे कुणी कुणी असेही म्हणतात:

ताडावरची माड गवराय येंगू जी लागली
म्हायाराची वाट गवराय पाहू जी लागली
तिकून आला शंकर त्येनं पदर जी धरीला
सोडा सोडा पदर मला जाऊ द्या म्हायारी
म्हायारी जाऊन काय ग खाशील
तूप, शेवाया, दूध शेवाया खाईन
दीड दिवस राहीन आणिक मग मी येईन
सोडा सोडा पदर मला जाऊ द्या म्हायारी
न्हाई सोडित पदर काय ग म्हनशील
वैताग घेऊन जाई जी होईन
जाई होऊन मी मळ्याला जाईन
मग मी माळी होऊनी येईन
पाणी घालून मग तुजला भेटीन
झाड होऊन कळ्या जी आनीन

**फुलं तोडून हार मी गुंफीन**
**देवाला घालून मग मी तुला ग भेटीन**

मागच्या गाण्यापेक्षा ह्या गाण्यातील भावनाविष्कार अधिक स्पष्ट व थोडा निराळाही झाला आहे. माहेरच्या माणसांना कमी लेखून प्रश्न करणाऱ्या नवऱ्याला खाण्यापिण्याची गोष्ट सांगून गौरीने जाई व्हायची इच्छा इथे प्रकट केली आहे! परंतु तरीही शंकर तिची सोबत सोडीत नाही. ती जे रूप घेईल तिथे त्याने आपलेही नाते जोडले आहे. याचा अर्थ असा की तो तिला खुषीने परवानगी देत नाही! मानवाच्या संसारातील हे कटु सत्य इथे या रीतीने देवावर आपल्या भावना शिंपित व्यक्त झालेले आहे.

गौर एक वेळ याही परिस्थितीत माहेरी आली म्हणजे मग तिची मांडणी करताना बायका गुणगुणतात,

**रानामागली तुळस पानाफुलांनी सजली**
**पैंजणाच्या भारूभार गवर कशी ग लवली**

तुळशीची मंजिरी पवित्र भावनेने न्हवणामध्ये खोविली असता पानाफुलांनी सजलेला तेरडा आणि आतील पाच खडे घेण्याला व पैंजणाच्या भाराने भारावलेले पाय हलके करायला वाई वाकते ही गोष्ट इथे सांगितली गेली आहे आणि

**गवर आली गजबारानं पाय भरले पैंजणानं**
**तुज्या गुलालाचा भार माजं पैंजन झालं लाल**
**गवर आली गजबारानं पाय भरलं जोडव्यानं**
**तुज्या गुलालाचा भार माजं पैंजन जोडवं लाल...**

मग अशा रीतीने गौर मोठ्या थाटामाटाने आली असून तिच्या स्वागतासाठी गुलालाचा अभिषेक करताना सगळे दागिने माखले गेले, असेही या रीतीने इथे सांगितले गेले आहे. हेतू एवढाच की, गौरीच्या निमित्ताने पुन्हा एकवार आपल्या दागिन्यांचे वैभव सर्वांच्या कानांवर गाणे गात गात का होईना घालावे!

**अपाळचा वड बाई जपाळचा वड**
**जपाळचा वडाला कोतमिरी पानं**
**दुरून दिसती हिरवी रानं**
**हिरव्या रानाला पिवळं ठसं**

**गौराय म्हनी म्हायार दिसं**
**म्हायार न्हवं बाई सोनार वाडा**
**गौराय म्हनती नथ माजी घडा**
**नथीजोगा सोनार बाई कोनचा**
**गौराय म्हनी माज्या म्हायारीचा**
**वाक्या घडविल गुजरीच्या...**

गौरीचा सगळा साजशिणगार झाला म्हणजे मग तिला आणखी खूप दागिने हवेत असे वाटून हे गाणे गुणगुणले जाते. इथे वडाच्या झाडाबरोबरच माहेरच्या वाटेवरील हिरव्यागार रानातून उठून दिसणारी सोनाराची पिवळी घरं मोठ्या खुबीने वर्णिलेली आहेत. साध्याभोळ्या स्त्रीच्या मनातील कल्पनाचातुर्याचा हा एक उत्कृष्ट नमुना ठरेल. निसर्गाशी तादात्म्य पावून तिने व्यक्त केलेला हा भाव हृदयंगम तसाच स्त्रीसुलभ भावनेला साजेल असाही आहे.

रात्रीच्या वेळी गौर जागवायची म्हणजे भरपूर गावयाचे आणि खेळावयाचे, म्हणून आळीतील सगळ्या मुलीबाळी व लहानथोर बायका एके ठिकाणी जमतात. अशा वेळी एखादी बाई परात पालथी घालून तिच्यावर वस्त्रगाळ राख पसरते. दोन्ही हातांत लाटणे व डाव घेऊन त्या राखेवर आळीपाळीने फिरविते त्यावेळी खर्र्र्र्र....खर्र्र्र....असा मोठा देखणा आवाज घुमायला लागतो; आणि मग त्या पार्श्वभूमीवर गौरीचे कान उघडताना बायका गायला लागतात :

**आली आली गवराय येतच हुती**
**आंब्याच्या बनी गुतली हुती**
**आंब्याचं आंबं तोडीत हुती**
**सईच्या वट्या भरीत हुती**
**सईला वाटेला लावीत हुती**
**आंब्याच्या बनी वरुटा पाटा**
**आली आली गवराय हळदकुंकू वाटा**

गौरी माहेरी येताना वाटेत काय काय घडले ते इथे सांगितले आहे. वरवंटा व पाटा असलेल्या विहिरीवर आंब्याचे झाड होते आणि तिथे ती तोडलेले आंबे बायकांना वाटण्यात गुंतली होती. म्हणून उशीर झाला. परंतु आता ती

आली आहे तेव्हा हळदकुंकू वाटून तिचे स्वागत करावे, असे या गाण्यात सूचित केलेले आहे.

**सातो शंकर वनामंदी**
**एकला गनव्या वनामंदी**
**गणूच्या आईला सांगून धाडा**
**गणूनं तोडं गमीवलं**
**गमीवलं तर गमवू द्या**
**गनूला घराला घेऊन या**

म्हणजे सात वनांनी दाटलेल्या जंगलात शंकर गुंतले असता एकटा गणपती एके ठिकाणी वनात सापडला आहे! अशा वेळी पायांतील अगर हातांतील तोडे हरवल्याने तो रडतो आहे, अशी तक्रार गौरीच्या कानावर आली, म्हणून तिला यायला वेळ झाला. मनाची रुखरूख कमी करावी म्हणून तिने तोडे गेले तर जाऊ देत पण पोर हाताशी लागू दे, अशी प्रकट केलेली ही भावना स्त्रीजीवनातील वात्सल्यपूर्ण कल्पनाविष्कार दर्शविते आहे. आईच्या अंत:करणाचीही अवस्था इथे इतक्या सहजतेने आली आहे की, तिला आणखी सजविण्याची आवश्यकताच भासू नये.

**गवरी ग बाई जागरान तुजं**
**जागता जागता पडल्या झापाडी**
**एवड्या निजची पिरत केवडी**
**सोन्याच्या चौकटी गौरी बाळातनी**
**नारळीच्या गोन्या लोटील्या अंगनी**
**बदामाच्या गोन्या लोटील्या अंगनी**
**सुपारीच्या गोन्या लोटील्या अंगनी...**

गौरीचे 'जागरण' चालू असतानादेखील फार उशीर झाल्याने झोप येते आहे. पण गौरीबाई बाळंतीण असल्याने, अंगणात गोण्या गोण्या भरून आलेल्या सगळ्या फळांच्या याद्या संपेपर्यंत चालणाऱ्या या गाण्याने जागायची आवश्यकता पटविली आहे. सामान्य जीवनातील प्रसंग देवादिकांनाही जोडून देत मनाचे समाधान करून घेण्याची मानवी प्रवृत्ती इथे अशी सूचित झालेली आहे!

बैठकीतील अशी गाणी रेंगाळली म्हणजे मग बायका खूप खेळ खेळतात. परंतु खेळांची गाणी एका स्वतंत्र विभागात विचारात घेतल्याने प्रस्तुत ठिकाणी त्यांची पुनरावृत्ती मुद्दामच केलेली नाही. इतर खेळांच्या जोडीलाच नागपंचमीप्रमाणे यावेळीही बायका फेर धरून खास गौरीची अशी निरनिराळी गाणी म्हणतात. एकदोघींनी एकेक ओळ सांगायची आणि मग हाताला हात धरून खाली वाकून, वर उभे रहात इतरांनी ती म्हणायची असे चालते.

**गवर पुशी शंकराशी स्वामी विनंती तुमापाशी**
**मला पाठवा माहेराशी भेटुन येईन आईबापांशी**
**माय बाप भेटवावे आमी तर अस्तुरीची जात**
**सासऱ्याची धनसंपदा तरी त्या माहेराची प्रीत**
**शंकर म्हणे प्राणवल्लभे तुजविणे आम्हा नाही गमे**
**तू अस्तूरी रंभा शोभे तुजविणे आम्हा नच गमे**
**काय शोभे मजला हो मज तरी आहे तुमचे ध्यान**
**त्यांनी तारीले जीवन मग मी भेटून येईन**
**साजूक तांदळाचा भात वरण मुगाचं पवित्र**
**तुपात तळल्या खिरी घाऱ्या खिरी बोटव्या गव्हल्याच्या**
**साजुक शेवाया वेळीती लोणचे लिंबाचे आणीती**
**भोजन सावकाश झाले उष्ण उदक आचविले**
**कापरासहित विडे दिले डोल्लाऱ्यावर आसन केले**
**आणा पैठणी ही साडी आणला कळस नाकी शेला**
**गणेश गौरीला मूळ आले सुखी जा ग गौरीबाई**
**आंबा सुखी जा ग माय आंबा परतुनी पाहे**

शंकर पार्वतीची एकमेकांमधील भाषा आणि माहेरच्या प्रीतीने भारावून गेलेल्या पार्वतीचे माहेरी झालेले स्वागत यांनी नटलेले हे गाणे आहे. या गाण्याची भाषा बरीचशी शहरी वळणाची आहे. सुशिक्षित मनातून आलेली आहे. त्यामुळे इतर गाण्यांच्यापेक्षा हे गाणे एकदम वेगळे वाटले तरी त्याचे अंतरंग तसे निराळे नाही. तीच मूळची भावना. पण सांगण्यासाठी निवडलेले शब्द वेगळे एवढेच काय ते. गौराईला सुग्रास भोजन देऊन, ऊन पाण्याने तिचे हात धुऊन, तिला चौरंगावर

बसवून, स्वादिष्ट विडे देऊन, पैठणी नेसवून आणि झालरीचा शेला आणून तिची पाठवणी केली, ही या गीताच्या उत्तरार्धातील कल्पना माहेरवाशिणींच्या मनाला भुरळ पाडणारी तशीच घरगुती चालरीत दर्शविणारीही आहे.

भली भली ग पारबती
शब्दाला उतार (उत्तर) देती
ऐकावं महादेवा समद्याचा उतार घ्यावा
कुनाला ग सोडीत हुती
कुनाला ग बांधीत हुती
कुनाला हाती धरूनी रंगम्हाली जात हूती
गाईला मी बांदित हुते
वासराला मी सोडित हुते
दुधाची चरवी घेऊनी रंगम्हाली जात हूते
भली भली ग पारबती
शब्दाला उतार देती...
कुनाला ग हार्डपित हुती
कुनाला ग दडपीत हुती
कुनाच्या मुखाकडं बघूनी वारा घालीत हूती
दाराला मी हार्डपित हुते
इस्त्याला मी दडपीत हुते
दिव्याच्या मुखाकडं बघूनी वारा घालित हूते
भली भली ग पारबती
शब्दाला उतार देती...
कुनाला ग वारीत हुती
कुनाला ग बुडवीत हुती
कुनाच्या गळ्यावरी हात ठेवून चालत हूती
पान्याला मी वारीत हुते
घागरीला मी बुडवीत हुते
घागरीच्या गळ्यावरी हात ठेवून चालत हूते

भली भली ग पारबती
शब्दाला उतार देती...
कुनाला ग दिला हात
कुनाला ग दिला पाय
कुनाच्या गादीवरी राज्य तू करीत हूती
कासाराला दिलावता हात
सोनाराला दिलावता पाय
देवाच्या गादीवरी राज्य मी करीत हूते

सासुरवाशिणीच्या प्रत्येक कृतीकडे आणि कामाकडे साशंकतेनेच उठता वसता बघून तिला प्रश्न करणाऱ्याला तिने ठसक्यात उत्तर देऊन आपला आब कसा राखला, याचा हा एक उत्तम नमुना आहे. सासूसुनांच्या वादाला इथे मोठा सुंदर रंग भरलेला आहे. एकीपेक्षा एक सवाई होऊन उत्तर देते आहे. कुणीही हार जात नाही. पार्वती नावाची एक सासुरवाशिणीची प्रातिनिधिक स्त्री प्रत्येक शब्दाला कसे मोजके आणि गप्प बसविणारे पण माघार घ्यायला भाग पाडणारे उत्तर या गाण्यामध्ये देत असून, सुनेच्या चोखपणाची बाजू राखताना दिसते आहे. सुनेची खंबीर बाजू मांडणारे हे गाणे त्यामुळेच बायकांच्या विशेष मर्जीतले आहे.

चला सयांनू कौलाला
काय कौलाची बडाई
शेजारीन चंद्राबाई
चंद्राबाई तुमचे पति कुठं वो गेले
गेले असतील नांद्रुकी बनी
नांद्रुकी बनीच्या कालूवा नाईका
तुमची रानी पाटावू मागती
पाटावू पडला हिरवा रंग
तिथं मांडिला दोघांनी छंद
छंद न्हवं त्यो सोंगाड्या
सोंगाड्यानं खाल्ल्या केळी
केळीखालून गेला मोर

**मोरानं घागरी घुमीवल्या**
**आमीबाई गौराई जागीवल्या**

या गीतात एखाद्या बाईला चांगले लुगडे हवे असले म्हणजे त्याची वाच्यता करण्याची काय रीत असते व त्याचे फळ काय मिळते याची गमतीदार गोष्ट सांगितलेली आहे. त्याचबरोबर शेजारणीच्या नवऱ्याच्या प्रवासाची हकिगत सांगतानाच आपण त्या नादात गौराई कशा जागविल्या तेही सांगितले आहे. रानावनातील संचार, मोरांचे नृत्य व घरी फुंकल्या जाणाऱ्या कळशाघागरी यांची इथे मोठी सुंदर गुंफण दिसून येते.

**माझ्या मुक्ताचं चांगूलपन जसं केवडयाचं पान**
**बाळया बुगडयांनी भरलं कान कापाला सोडवान**
**काप घेतील विकयीत नाकी सूरव्याची नथ**
**नथीबाईला आरयिली ग काळया पोतीला डोरयिली**
**डोरल्याखाली ग सरी लोळं पडला सरीला बाई पीळ**
**बाजूबंद मी लेली घेळा (वाक्या) बाजूबंदाचं आऊयीट**
**सई लेती या चारी गोट ग माजी अंगठयांनी भरली बोटं**
**पायी पैंजण वाजयीती ग बोटी जोडवी झिनकारीती**

मुक्ता नावाच्या चांगुलपणा मिळवून वागणाऱ्या बाईच्या अंगावरील दागिन्यांची नोंद या गाण्याच्या निमित्ताने झाली आहे. बायकांना अगोदरच दागिन्यांची विशेष आवड, तशात डाग घालून सजलेल्या गौराईपुढे स्वाभाविकच अनेक परीचे दागिने गोवलेले असल्याने हे गाणे त्या आवडीने म्हणत असतात. जुन्या काळचे दागिने कसे असत हे या गाण्यावरून दिसून येते.

**माजी गवर आली ग**
**भांग भरून गेली ग**
**भांग न्हवं भंडारा**
**खिडकीत पडला अंगारा**
**खिडकीच्या बा कपाटा**
**न्हवं बाई माजा परवंटा**

परवंट माजा हाटावू
शेला माजा पाटावू
बाई ग माजी हसरी
तिची शेतं डोंगरी
डोंगर जळं धडाधडा
हरीण रडतंय खळखळा
हरणीबाई दूध ग
बाळपणीची बूध ग
बाळपणाचं नक्षत्र
नशीब घडवी पवित्र
चांदा तुज्या टिपुऱ्या
चांदणी उभ्या राहू
शिंपीदादा शिवी चोळी
अंबरनाडा मी गुंफीन
अंबरनाडा पडं सांदडी
रथाच्या दांडीव घोड्याची मांडी
घोड्याच्या मांडीव फिरे मोगरा
एक कळी तोडता वास गेला नगरा
नगराच्या राजानं नगराई केली
आमच्या महादेवाला पारूबाई दिली
पारूबाई देऊनी यशवंत झाला
दिवट्या लावूनी घरासी आला

या गाण्यामध्ये शंकर पार्वतीच्या जीवनातील अनेक प्रसंग एकत्र आले आहेत. वास्तविक त्या सर्वांचा सलग असा संबंध या एकत्रीकरणात लागत नाही. तरी पण काय काय घडत गेले याची कल्पना मात्र येते. जुन्या काळी बायका भांगात गुलाल किंवा कुंकू भरीत. नऊवारी लुगडे चापूनचोपून नीट बसावे म्हणून कमरेभोवती कमरपट्ट्यासारखी गाठ घालून पदर आवळून वर घेत त्याला 'परवंटाने' नेसणे म्हणत. त्याच परवंटाचा इथे उल्लेख आला आहे. हे परवंटी लुगडे हातमागावर

विणलेले व रेशमी असे, हे 'हाटावू' व 'पाटावू' या शब्दांनी सांगितले आहे. ही गौरी हसतमुखी आहे व तिची शेते डोंगरावर आहेत. पण डोंगराला वणव्याने घेरल्याने आग लागली आहे. त्यामुळे हरिण रडते आहे. कोवळ्या मनाला दु:ख झाले आहे. कदाचित त्या डोंगरावरील या हरिणीची पिले मरतील या भीतीने तिला घेरले असावे. हरिणीचे दूध म्हणजे बालपणी मिळालेले वळण. त्यावेळी जे नक्षत्र असेल ते भवितव्याची रेघ ओढून पवित्र झाले! टिपुऱ्या चांदण्यात उभे राहून मौज पहावयाची. शिंपी चोळी शिवतो आणि लुगड्यावर बांधायचा नाडा आपण गुंफीत आहोत तो आता सांदीला (अडगळीत) पडला आहे. परगावी जायला रथ आला आहे. त्याच्या दांडीला घोड्याची मांडी घासते आहे. त्या मांडीवर मोगरा फिरवला म्हणजे त्याच्या वासाने उभे गाव प्रसन्न होते. त्या गावच्या राजाने युक्ती करून महादेवाला पार्वती दिली. ती मिळाल्याने तो भाग्यवान ठरला आणि दिवटीच्या प्रकाशात तिला घरी घेऊन गेला. अशा अनेक गोष्टींचा, प्रसंगांचा, उल्लेख या गाण्यात आल्याने बायकांना ते आपल्याच जीवनाची गोष्ट सांगणारे आहे असे वाटते. त्याच कारणाने त्यांना हे गीत गाण्याचा मोहही होतो.

**सोन्याची ग किरीमिरी शंभुदेवाच्या शिकरावरी**
**चौरंगी ग शालजोडी शंभुदेवानं पांघरीली**
**हाती घेऊनी ग काठी डोई घालूनी ग टोपी**
**काखी लावूनी झोळी गेला गिरजेच्या ग माडीखाली**
**'अल्लक' ग बोलयीला गिरजा दान जी करू आली**
**शंभू वचन बोलयीला गिरजा मागं परतली**
**गेली शेकाजी रायापाशी त्यानं धाडिल्या नऊ दासी**
**त्येचा विचार कर बिगी तू कुनाचा बा कोन**
**मी बा शिखरीचा शंभू मला न्हाई नात्याचं कोन**
**मला न्हाई भैन भाऊ तुमची कन्या मला द्यावी**
**शेकाजी ग राजा बोले तुला न्हाई नातंगोतं**
**तुला न्हाई भैन भाऊ तुला गिरजा कशी देऊ**
**गिरजा बोले बापापाशी कपाळीची माजी रेग**

गिरजाबाईला देऊ केली शंभु त्या ग देवायाला
चंदनाचे ग खांब सई घातीले ग भूमीवरी
माणिकांच्या वेली सई छपरी ग सोडीयील्या
गिरिजाबाईच्या लगनाचा आला गगनी मंडप
गिरजा नारीच्या ग हाती माळ पवळ्यांची आली
सई लाजत मुरकत शंभुदेवाच्या गळ्या घाली
रखमाई ग करवली चंद्रभागेच्या झरी आली
तांब्या पाण्याचा विसरली पाणी दिसतं दुधावाणी
चंद्रभागेचं पाणी प्याली गिरजा घराशी ग आली

गिरजेच्या लग्नाची सगळी हकिगत या गाण्यामध्ये दिलेली आहे. शिखरावरचा शंभुदेव सूर्य उगवताच शाल पांघरून बैराग्याचे रूप घेऊन निघाला. तो आला गिरजेच्या घरी. तिने त्याला दान दिले. दोघांचे एकमेकांवर मन बसले. वचन मिळाले. गिरजेने शेकाजी राजाला, आपल्या बापाला, झाली गोष्ट सांगितली. त्याने नऊ दासी पाठवून नीट विचार कर म्हणून तिला सांगितले आणि शंभुदेवाची चौकशी केली. त्याला कोणीच नात्यागोत्याचे नाही म्हणून तो विचारात पडला. पण तरीही गिरजेने होकार दिला. लग्नाची तयारी झाली. चंदनाच्या खांबाला माणकांची वेल लावून मंडप उभारला. गिरजेने शंभूच्या गळ्यात पोवळ्यांची माळ घातली. लग्न लागले. आणि मग रखमाई करवली झाल्याने पंढरपूरच्या चंद्रभागेचे ती विसरून आलेले पाणी तिथे जाऊन गिरजा प्याली व आपल्या घरी आली, अशी माहिती इथे आली आहे. म्हणजे सामान्य लोकांच्या लग्नाच्या रीतीप्रमाणे देवादिकांचीही लग्ने लागत, ही कल्पना गिरजेच्या निमित्ताने या ठिकाणी मांडली गेली आहे. आपली सुखदु:खे देवादिकांनाही चुकू नयेत ही मानवी मनात डोकावणारी भावना या निमित्ताने व या प्रकारे प्रकट झालेली आहे. त्यामुळे आपलेच आयुष्य जणू आपण अनुभवीत आहोत, या विश्वासाने बायका हे गाणे मोठ्या आवडीने म्हणतात.

तात्या कुनब्याचं शात — शात पिकलं अमरावती
महादेव गेलं बाई चोरी — पाच कनसं मोडीयिली
कुनब्या दादानं देखीयिलं — कुनबी धावत पळयीत

गोसावी जटंशी धरीयीला आसडून धरनी पाडीयिला
धरून माळचाला बांदिला ग तात्या कुनब्याची आली रानी
भरली पाटी शेता आली भरताराला शिव्या दीती
गोसाव्या का चोरी केली गोसावी माळचाचा सोडीयिला
गोसावी धावत पळयीत आला आपुल्या मठायाशी
पारबतीशी बोलता झाला तात्या कुनब्याचं ग शात
पिकलं हुतं ग अमरावती मी गेलोवतो ग चोरी
पाच भेंडांनी मारीयिला धरून माळचाला बांधीयिला
पारबती ग ऐकती झाली पारबती ग बोलती झाली
भोळचा माज्या महादेवा कुनब्याचा का मार खावा

महादेव आणि पार्वती यांच्या जीवनात घडलेल्या मोठ्या मजेदार प्रसंगाचे हे वर्णन आहे. एखाद्याचे शेत उत्तम पिकले म्हणून तिथे चोरी केली आहे व आणखी काय काय घडते आहे ते ऐकून पार्वती त्याला 'अशाचा आपण मार खावा का?' म्हणून प्रश्न विचारीत टोमणा मारते आहे ही या गाण्यातील हकिगत गमतीची आहे. त्याचप्रमाणे कुणब्याच्या बायकोने माळचाला टांगलेल्या महादेवाची सुटका करून 'हा कसा चोरी करील' असे विचारले, ही कल्पनाही मनोवेधक आहे. स्त्री जीवनातील दयाळू स्वभावाचा एक दाखला म्हणून हे गीत दाखविता येईल.

गौराईच्या अंगावरचा साजशृंगार पाहिला म्हणजे तिची व आपली तुलना करीत कधीमधी बायका फेर धरताना जे गाणे एकमेकींना सांगतात ते असे आहे:

दक्षाची कन्या पारबती
आमी ग सातजनी भैनी
मजला टाकलं येगळूनी
जशी काय वनात सुटली गाय
संचीती की माजी माय
जीव गडा मी लेले काय . . .
अग या लोकाच्या नारी
घाली गळचात सोन्याच्या सरी
मजला बांदायला दोरी

**संचीती की माजी माय**
**जीव गडा मी लेले काय...**

हे गीत इथे सर्व दागिन्यांची नोंद होईपर्यंत व आपले अपुरेपण उघडकीला येईपर्यंत याच रीतीने चालते व अखेरीस,

**अग या लोकाच्या नारी**
**कपाळी लेवुनी लाल चिरी**
**मजला एकलीलाच टिकला**
**संचिती की माजी माय**
**जीव गडा मी लेले काय**

या रीतीने समारोप पावते. त्यामुळे फार मोठा हशा पिकतो आणि हळूहळू बायका मग आपापली समजूत घालीत रहातात. ही एक आपली अद्‌भुत गोष्ट बोलायची रीत म्हणून बोलणी करतात. आणि नसेल त्याच्या मागे न लागता असलेल्यातच सुख मानायचा निश्चय करून रहातात. दुसऱ्याची श्रीमंती बघून आपण वैतागून जाता कामा नये हाच या गीताचा संदेशही मानतात.

शंकर व पार्वतीच्या जीवनातील मोठी सुंदर हकिगत सांगणारे खानदेशच्या पाचोरा भागातील एक लोकप्रिय गाणे ऐकण्याजोगे असते. हे गाणे अहिराणी भाषेत असले तरीही त्याचा ढंग आपल्या नेहमीच्या परिचयातील असल्याने त्याची गोडी किती अवीट असते त्याची कल्पना ते ऐकल्याखेरीज येत नाही. या गाण्याची चाल मोठी सुंदर असून त्याची रचना अशी आहे:

**सोन्याची सुतई न् पानी काढे कोन्ता**
**शंकर हरी व माय, केसर दंदनी**
**पानी काढे शंकर हरी न् तठे मनी गौराई**
**न्हायनी व माय, केसर दंदनी**
**तठे मनी गौराई न्हायनी न् पिवया पितांबर**
**नेसनी व माय, केसर दंदनी**
**पिवया पितांबर नेसनी न् कपाळी**
**कुंकवाची चिरी व माय, केसर दंदनी**

कपाळी कुंकवाची चिरी न् भांग गुलालाचा
भरी व माय, केसर दंदनी
भांग गुलालाचा भरी न् डोळी काजळ
झिरीमिरी व माय, केसर दंदनी
डोळी काजळ झिरीमिरी न् हाती चंदनाची
छडी व माय, केसर दंदनी
हाती चंदनाची छडी न गौराईचं माहेर
फुलझडी व माय, केसर दंदनी
गौराईचं माहेर फुलझडी न् तठला सुतार नांदे
भारी व माय, केसर दंदनी
तठला सुतार नांदे भारी न् त्यांना घर रंगीत
पायना व माय, केसर दंदनी
त्यांना घर रंगीत पायना न् त्याले रेशीमन्या
दोऱ्या व माय, केसर दंदनी
त्याले रेशीमन्या दोऱ्या न् त्यामा मसूरनी
गादी व माय, केसर दंदनी
त्यामा मसुरनी गादी न् त्यानामा निजना
शंकर हरी व माय, केसर दंदनी
त्यानामा निजना शंकर हरी न् झोका देये गौराई
नारी व माय, केसर दंदनी

कोकणातील वायका गौर जेवून पुन्हा सासरी निघाली म्हणजे तिला पोचविताना नदीवर जाते वेळी शंकर पार्वतीची गोष्ट मोठ्या गमतीने एकमेकींना सांगतात :

अल्याड शंकर धोतरं धुतोय
पल्याड गौराय नाय गो
न्हाऊन धुवून उभीच केली
एवडा शिनगार काय गो
माय बोले लाडिक लेकी
बुगड्या लेवुन जाय गो

**आता गे माय कवा लेवू**
**शंकर वाट पाय गो. . .**

या गाण्यात सर्व प्रकारचे दागिने गोवून होईपर्यंत ते लांबते. पण मुख्य म्हणजे माहेरी अशा थाटामाटात दंग झालेली गौराई शंकराकडे परत जाताना किती भांबावून गेली आहे व तिकडे शंकराची एकटयाची काय अवस्था झाली आहे याची ही हकिगत स्त्रिया जणू आपलीच गोष्ट सांगावी अशा जिव्हाळयाने बोलून दाखवितात. त्यामुळे हे गीत मोठे भावपूर्ण सुरावटीत गायिले जाते.

त्याचबरोबर सासरी गेलेल्या गौराईने जर कधीमधी,

**झुन झुन पाखरा**
**जा माझ्या माहेरा**
**बयाला सांग जा**
**माझ्या या म्हायारीचा**
**कमानी दरवाजा**
**तुज्या या लेकीनं**
**पुतुळ्या मोडील्या**

असा निरोप माहेरी धाडलाच तर,

**मोडू दे गौराई**
**शंकर जावाई**
**घडवील सवाई**

या प्रकारचे झोकात उत्तर देऊन बायका जेव्हा गौराईला चिडवू पहातात तेव्हा तर मोठी वहार उडते. खेळीमेळीच्या जीवनाला सुंदर पंख फुटतात आणि गौराईच्या निमित्ताने आपल्याही जीवनातील गमतीजमतींना त्या उधाण आणू पहातात. त्याकारणाने गौराईबरोबरच जणू आपलेही कोडकौतिक बोलून मोकळ्या होतात आणि म्हणून अशी गाणी म्हणताना त्यांच्या गळयाला जसे काय तारुण्य लाभते. भावनेला उभारी चढते. जीवनाला आगळे सौंदर्य येते.

गौरीच्या जागरणाचे वेळी अशी कितीक गाणी फेर धरून बायका म्हणत असतात. त्या सगळयांना मला इथे नोंदता आले नाही. त्यांना ना आदी ना अंत. मिळाली तेवढी मी इथे दिली आहेत. आणखी पुष्कळ असतील. कुणी सांगावे ?

पण एवढ्यावरून त्यांची कल्पना येईल. रात्र केव्हा मागे सरली याचे भान न रहाणाऱ्या बायका अशा वेळी मनमुराद गातात आणि खेळतातही. कितीकदा नागपंचमीच्या वेळच्या फेराच्या गाण्यांचाही इथे समावेश होतो !

खेडेगावातील मायबहिणींच्या एकमेकींच्या सहवासातील हे गौरीचे जागरण बरेच सुखावते. त्यांची भावगंगा अशा वेळी अगदी ईर्षेने दुथडी तुडुंब भरून वहाते ! त्यांच्या भावनेचा पसारा मोठा. त्यांचे खेळायचे अंगणही भव्य ! आनंदातिरेकाने त्या गात राहिल्या म्हणजे त्यांच्या 'फेरा'ला दृष्ट लागेल की काय असे पहाणाराला वाटते. केवढे सौंदर्य त्यात साठले आहे हे पारखताना दृष्टी मंदावत तर नाही ना, असा भास होतो ! शरीराचा प्रत्येक भाग अशा वेळी आवाहन स्वीकारतो आणि आपली तालबद्धता मनाच्या लयीबरोबर आणि स्वरविलासाच्या संगतीत विलीन करून गाणाऱ्यांना हुशारी आणतो . . . त्यामुळेच मग शेवटी घरोघरी परतताना खेडुत बायका एकमेकींत कुजबुजतात, 'सोन्यासारखी सोबत ही आपली. साऱ्या दुनियेची माया तिच्या पोटात ! दुजाभाव म्हणून कसला त्यो न्हाईच ! . . .' आणि जाता जाता एकमेकींना हसत खेळत बजावतातही,

**हमरस्ता पायपुस्ता**
**देवाला निगालेय मी आता पाच वाजता !**





# लग्नातील गाणी

**लग्न** म्हणजे मानवाच्या जीवनातील एक श्रेष्ठ आणि मंगल असा संस्कार आहे.

दोन जिवांचे हे मधुर मीलन असते. जन्मभर एकमेकांशी एकनिष्ठ रहावयाची ही एक पवित्र शपथ आहे. दोन घराण्यांचे नाते जोडणारा हा एक सर्वश्रेष्ठ दुवा आहे. त्यामुळे त्याचे महत्त्व विशेष. म्हणून त्या दृष्टीने हा सोहळादेखील विशेष आवडीने आणि हौसेने पार पाडला जातो. आपापल्या ऐपतीप्रमाणे ही हौस भागविली जाते.

शहरांपेक्षा खेड्यांमध्ये लग्नाचा पसारा मोठा. तीन-चार दिवस वाजतगाजत सगळ्या चालीरीतींनी हा प्रसंग नटलेला असतो. सगळे भाऊबंद, इष्टमित्र आणि नातलग जमा होऊन वधूवरांना आशीर्वाद देत असतात. त्यामुळे घरचे वैभव दाखविणारी हौस पराकोटीला जाते ! रीण काढून सण करावा तसे यावेळी होते. कर्ज काढावे लागले तरी हरकत नाही, पण हौसेला मोल नसते ही कल्पना खरी करून दाखविण्याची ईर्षा मनात बाळगूनच जणू लग्नाचा सौदा ठरविला जातो !

अशा या लग्नाच्या मंगल वेळी बायका मोठ्या हौसेने आणि आनंदाने गाणी गात असतात. घोळक्याने एकत्र जमून या वेळी काम उचलले जाते आणि त्याच थाटात गाणीही म्हटली जातात.

मांडवाच्या दारी हळदीबाईचं वाळवान
नवऱ्या बाळाचं केळवान
मांडवाच्या दारी हळदीबाईचा गेला घोडा
नवरा बघूनि दिला हुंडा
मांडवाच्या दारी घोडा नाचतो थयाथया
नवरा उठना पाणी न्हाया
मांडवाच्या दारी हलग्या शिंगांची एक घाई
नवरा कळशी पाणी न्हाई
मांडवाच्या दारी करवलीचा ग लई ठसा
माडी मागीती जानवसा
उप्पर जानवसा कोन मागीती गवळण
नवऱ्या बाळाची मावळण
उप्पर जानवसा कोन मागीती हावयीशी
नवऱ्या बाळाची मावयीशी
नवरा झाला म्हनू झाला आपुल्या नशीबानं
पाया पडतो बाशींगानं
मांडवाची मेड बाई जोतं सोडूनी एक हात
नवऱ्या बाळाचं लई गोत
मांडव घातीयीला सई निच्चळ जाईयीचा
छंद न्हवऱ्याच्या आईयीचा
मांडव घातीयीला सारा निच्चळ चाफ्यायाचा
छंद नवऱ्याच्या बापायाचा
थोराचा नवयीरा कसा जायाचा माडीतून
सया बघत्यात्या झाडीतून
थोराचा नवयीरा अब्दागिरीनं झाकीयीला
पाय तोडव्याचा देकीयीला
वाजंत्री वाजत्याती पानमळ्याच्या टिपरीखाली
नवरा सोन्याच्या छत्रीखाली

**थोराच्या नवऱ्याची बोली हुतीया पारावरी**
**नवरा हुंड्याचा माज्या घरी**
**थोराचा नवयीरा बोली करीतो त्येचा भाऊ**
**नवरा हाई ग बाजीराऊ**

लग्नाच्या अगोदर होणाऱ्या हळदी समारंभासाठी जाते पुजून पाच सवाष्णी हळद दळत असतात. त्यावेळी या ओव्या गाण्याची खेड्यामध्ये चाल आहे. लग्नाला उभ्या रहाणाऱ्या नवऱ्याच्या घरची हौस या प्रकारे अगोदरच व्यक्त करण्यात आल्यामुळे दुसऱ्या बाजूची मंडळी खबरदारी घेऊन वागत असतात! या ओव्यांनी जुन्या काळची लग्नाच्या वेळची चालरीतही सांगितलेली असल्यामुळे या ओव्या वाचताक्षणी अगर ऐकताक्षणी सगळे नजरेसमोर घडत असल्याचा भास होतो! त्यामुळे या बाबीतील हौस कशी आगळी असते याची कल्पना आपोआप येऊ लागून माणूस आपल्या स्वतःच्या घरच्या लग्नकार्याशी तुलना करण्यात गुंग होऊन जातो.

या ओव्यांप्रमाणेच या संदर्भातील आणखी काही ओव्या अशा आहेत:

**ओल्या हळदीचं वाळवान सई घातलं अंगनी**
**केलं केळवन गोतानी**
**घाणा ग भरीयीला सव्वा खंडी भाताचा**
**नवरा उदंड गोताचा**
**सारवील्या भिंती वर काढील्या गवळणी**
**हाईत हावसच्या मावळणी**
**पाच दुरड्या रुखवत साव्वी दुरडी पानांची**
**चुलती रुसली मानाची**
**लग्नाच्या ग वेळी शिंगी कापती थराथरा**
**आला नवरा धीर धरा**
**मांडवाच्या दारी चिखल का ग झाला**
**नवऱ्याचा बाप न्हाला**
**पाच पेडी वेणी बाई मामांनी ग उकलली**
**कन्यादानाला उभी केली**

| | |
|---|---|
| **नवरी पाहू आले** | **सोपा चढूनी माडी गेले** |
| | **नवरी पाहूनी दंग झाले** |
| **नवरा पाहू आले** | **काय बघता वाडा घोडा** |
| | **नवरा हाय जाडाजूडा** |
| **लाडकी बाई लेक** | **लाड सांगीती बापायाला** |
| | **मोती मागीती कापायाला** |

प्रसंग तोच असला तरी पूर्वीपेक्षा या ओव्यांमधून व्यक्त झालेली भावना बरीचशी वेगळी आहे. तथापि हा सगळा आविष्कार हौसेमौजेचाच आहे. नाही म्हणायला शेवटी नवऱ्याचे दाखविलेले व्यंग आणि मुलीची दागिन्यांची अपेक्षा या बाबी मात्र निराळ्या आहेत. आपले तेवढे चांगले आणि दुसऱ्याचे तेवढे दोषपूर्ण आहे, असे दाखविणाऱ्या काही स्त्रियांच्या स्वभावाची इथे थोडी चुणूक दिसून येते.

कोकणामध्ये हळद लावताना अशा ओव्यांप्रमाणेच काही सुंदर गाणी म्हणण्याचाही प्रघात आहे. त्यांपैकी एक गाणे असे मिळते :

**ताला भरला राते कंबलानी**
**एक एक कंबाल भोलुबाईच्या पुंजं**
**भोलुबाईनं येवावं वाजंत्री तुऱ्यांनी**
**एक एक पिटाला पुरवठा देवावा . . .**

या गाण्यात भोलुबाई या देवीचे नाव जिथे आले आहे तिथे वाघोबा, लक्ष्मी, चंद्र, सूर्य व इतर कुलदैवतं या सर्वांची नावे गोविली जाईपर्यंत याच रीतीने हे गाणे लांबते. इथे तांबड्या कमळांनी भरलेल्या तळ्याचा उल्लेख आला असून त्या कमळांनी होणाऱ्या पूजेसाठी देवादिकांनी वाजतगाजत यावे असे म्हटले आहे.

**आवातनं गेलं पाटलाच्या देवा**
**पाटलाच्या देवानं येवावं**
**नवऱ्याला हळद लावावी . . .**

अशा प्रकारच्या या गाण्यात सर्व देवांना व अखेरीस घरच्या गणगोतांना हळदीसाठी निमंत्रण केलेले आहे. हे गाणे सर्व देवाधिदेव व गणगोत यांची नोंद होईपर्यंत लांबते.

हळदाई पेरिली
हळदाई उगवू जी लागली
हळदाई आली एक पाना
हळदाई आली दोन पाना
हळदाई खणू जी लागले
सोन्याच्या कुदळा
रुप्यायाची खुरपी
हळदाई वाढू जी लागली
वरमाईच्या हाती
आदी हळद लावा मारुती देवाला
मग हळद लावा
नवरदेवाला

या गीतात हळदीची मुळापासूनची गोष्ट सांगून लग्नाचे वेळी तिचा प्रथम व नंतर कसा उपयोग करावा ते सांगितले आहे.

देवळाचे दारी कोगबीवर कोगबा
दाटली वो दाटली वो
ती कोगबा तोडुनी भरील्या परड्या
सयांच्या साड्या रंगीवल्या वो रंगीवल्या वो
ती साडी नेसली चंद्राची भारजा न्
तुळशी पुंजायला गेली वो गेली वो
तुळशी पुंजताना चांदसूर्व्या पुसतो
साडीचं मोल काय बोला वो बोला वो
दोन लाख साडी न लाखाची चोळी
चुड्याला गणीत न्हाई वो न्हाई वो
देवळाच्या दारी कोगबीवर कोगबा
दाटली वो दाटली वो
तोडील्या कोगबा भरील्या परड्या
सयांच्या साड्या रंगीवल्या वो रंगीवल्या वो

ह्या गाण्यामध्ये नवरीला हळदीसाठी लुगडे वा महावस्त्र कसले आणावे याची फारच सुंदर कल्पना दिलेली आहे. कोकणातील कोकमाच्या, आमसुलाच्या रसात रंगविलेली साडी नेसून एखादी स्त्री तुळशीच्या पूजेला गेली असता तिला बघून आकाशीचे चंद्र व सूर्यदेखील विचारतात की, 'बाई, तुझ्या साडीची किंमत काय?' म्हणजे त्यांनादेखील जगावेगळे असे काही भव्यदिव्य दिसल्याचा भास होतो! म्हणून ती बाई पण मोठ्या दिमाखाने सांगते की, 'माझ्या साडीची किंमत दोन लाख! चोळीची एक लाख!! आणि हातातील चुड्याचे तर आकड्यांनी मोजमाप होणारेच नाही!!!' म्हणजे सौंदर्यशाली सौभाग्य अलंकारांची किती आकर्षक आणि मनाला भुरळ पाडणारी अशी ही मागणी आहे नाही का?

**घाणा ग भरीयला खंडीभर भाताचा**
**मंडप गोताचा दणका थोर**
**घाणा ग भरीयला खंडीभर जिऱ्याचा**
**मंडप हिऱ्याचा लखलखाट**
**घाणा ग भरीयला खंडीभर गव्हाचा**
**मंडप देवाचा शोभीवंत**
**घाणा ग भरीयला पाच कुडवातो**
**सवाष्णी पाच येती मानापानाच्या**
**घाणा ग भरीयला सुपाच्या तेजानी**
**सूर्याच्या किरणी उल्हासला**

हळदीप्रमाणेच लग्नानिमित्त गव्हाचे व इतर दळण जेव्हा जाते पुजून पाच सवाष्णी दळत असतात, तेव्हा त्या सोहळ्याला 'घाणा' भरणे म्हणतात. अशा वेळी या ओव्या म्हणतात. इथे आपल्या घरचे वैभव दाखविण्याचा प्रयत्न केला गेला असून हे कल्पनावैभवही वैशिष्ट्यपूर्ण रीतीने व्यक्त झालेले आहे. या ओव्या सामान्यत: मध्यमवर्गीय बायकांच्या तोंडी ऐकावयास मिळतात. खेडोपाडी ऐकू येणाऱ्या ओव्या मात्र यापेक्षा निराळ्या आहेत:

**मैनाला मागणं ग दुही दारांनी झाली दाटी**
**कंबरेला शेला बाई मामा तिचा पानं वाटी**

मैनाला मागणं ग  तिचा बाप नाही घरी
मामानं बोली केली  वीस पुतळ्यावरी सरी
मैनाला मागणं ग  आमी कोनाची देनार
सईला किती सांगू  मामा किल्ल्याचा येनार
मैनाला मागणं ग  आमी कोनाची कोन द्यावी
माज्या ग बाळाईच्या  तिच्या चुलत्याची पुस घ्यावी
मैनाला मागणं ग  आलं दडत लपत
सावळी बाळराज  मैना खेळती चांदण्यात
बंधु मी करते याही  दीर दाजीबा संगं चला
मांडव नारळीचा  पायघड्याची बोली करा
बंधु मी करते याही  जावानंदांच्या मेळाव्यात
सोन्याची मोहनमाळ  सून राधाच्या गळ्यात
नवरीचा बाप  मांडव घालीतो मोडीतो
नवऱ्याचा बाप  येता चौघडा झोडीतो
जात्या तू ईसवरा  तुला सुपारी बांधिली
 नवरी हळद लागली
जात्या तू ईसवरा  तुला तीळतांदळाचा घाणा
 नवरा मोतीयांचा दाणा
जात्या तू ईसवरा  तुला बक्षी गव्हाचा घास
 नवरा मोतीयांचा घोस

या ओव्यांमधून अनेक सामाजिक चालीरीतींचा व नात्यागोत्यांतील दृढ स्नेहाचा आविष्कार झालेला आहे. एखाद्या मुलीला मागणे आलेच तर तिच्या आजोळच्या माणसांवर तिच्या घरच्या लोकांची केवढी भक्ती असे, आणि ते मागणे आल्याच्या निमित्ताने घरात पै-पाहुणे किती जमा होत असत, याची मोठी सुंदर माहिती इथे आलेली आहे. तसेच भावाची मुलगी आपल्या मुलाला करून घेणारी बहीण आपले मागणे किती सूचकतेने व्यक्त करीत असे, याचेही छानदार वर्णन इथे आलेले आहे. शेवटी जात्याला ईश्वर मानून व्यक्त झालेली भावना तर अतिशय

परिणामकारक झाली असून कल्पकतेचा एक सुंदर नमुना म्हणून वाखाणण्या-सारखी आहे.

झुन् झुन् वाजंत्री वाजती म्होरं कळवातनी नाचती
नवरा आला शिवंपाशी शिवपुंजान देईन
शिवपुंजान देईन नवरी जितून नेईन
झुन् झुन् वाजंत्री वाजती म्होरं कळवातनी नाचती
नवरा आला देवळापाशी देवा इडा जी ठेवीन
देवा इडा जी ठेवीन नवरी जितून नेईन
झुन् झुन् वाजंत्री वाजती म्होरं कळवातनी नाचती
नवरा आला मांडवापाशी मांडव खंडूनी देईन
मांडव खंडूनी देईन नवरी जितून नेईन
झुन् झुन् वाजंत्री वाजती म्होरं कळवातनी नाचती
नवरा आला भावल्यापाशी करवली खण जी देईल
करवली खण जी देईल नवरी जितून नेईल
दारी हुती बोर बोराई तिजवर हुता जोर जावाई
त्यांनी नेली आमची बाई घावनं काडा त्येच्यापाई
ज्याची हुती त्येनी नेली येडी माया वाया गेली
झाली मंदी पाच बोरं मायबाप झाली थोर
झाली मंदी पाच चिंचा मायबापा पडली चिंता
झाली मंदी पाच आवळे मायबाप झाले खुळे
झाली मंदी पाच कन्या वराडाच्या घाली वेन्या
झाली मंदी पाच नाडं वराड्यांनी जुंपलं गाडं
अग तू नेवाळीन बाई नेवाळी ग कुठं गेला
गेला येळूईच्या बना येळू तोडलं तातू जसं
झाली विनल्या झाप जसं झालीचं वो मोल काय
सवाई वो सोनं टाका सांगा नवऱ्याच्या बापा

लग्नाच्या वेळी 'झालझेंडा' म्हणून एक मोठा गमतीचा सोहळा असतो. त्यावेळी हे गाणे बायका म्हणत असतात.

लग्न झाल्यानंतर 'जेवण' झाले म्हणजे मंडपातून नवरानवरी आपल्या घरी जातात. त्यानंतर नवरीकडील बायका नवरीला द्यावयाची भांडी आणि विहिणीला करावयाचा मानपान मोठ्या थाटाने वाजतगाजत उरकून घेतात. याला 'झालझेंडा' असे म्हणतात. म्हणजे रुखवत उघडण्यापूर्वीचा हा एक सोहळा असतो. तांब्याचे पाच कळस मांडावयाचे आणि मध्ये चौरंग ठेवायचा. या चौरंगावर नवऱ्याकडील पाच सवाष्णी ओळीने बसावयाच्या व नवरीकडील बायकांनी त्यांचे पाय धुऊन त्यांना हळदकुंकू व पानसुपारी देऊन त्यांची ओटी भरायची. त्याच वेळी त्यांच्या भांगात गुलालही भरण्यात येतो. त्यानंतर नवऱ्याच्या आईला नवे लुगडे नेसवून व तिची खणानारळाने ओटी भरून तिला या चौरंगावर बसवतात. तिच्याही भांगात गुलाल भरावयाचा आणि तिचेही पाय धुऊन तिला हळदकुंकू व पानसुपारी द्यावयाची. हे सर्व उरकल्यानंतर तिच्या डोक्यावर नव्या खणाची चुंबळ करून ठेवतात आणि मग त्या चुंबळीवर नवी परात ठेवतात. या परातीत बोरे, चिंचा, फणी, आवळे इ. पदार्थ ठेवतात. मग पाच सवाष्णी मिळून ही परात हातात धरतात व ती विहिणीच्या डोक्यावर घुसळीत गमतीने हसून म्हणतात, 'खडबड कुठा, विहिनीबाई उठा.' यावेळी मोठा हशा पिकतो. शेवटी नवरीचा दीर येऊन ही झाल (परात) घेऊन जातो. त्याने यावेळी मागे न पहाता जावयाचे असा नियम असतो. त्यामुळे त्याला कांदे मारण्यात आले तरी तो ते सोसून तसाच पुढे निघून जातो व समाधानाचा सुस्कारा सोडतो. कारण त्याने जाताना मागे बघितले तर नवरी पळून जाईल, अशी धास्ती कोणी तरी त्याच्या मनात भरवलेली असते !

पूर्वीच्या काळी मुलगी लहान असताना लग्न होत असे. त्यामुळे हे सर्व विधी मोठ्या हौसेने पार पाडीत. या विधीनंतर नवरी व तिचा मामा यांनी नवऱ्याकडील ठराविक लोकांच्या मांडीवर बसायची चाल असे ! या गाण्यामध्ये या सर्व चालीरीतींचा मोठा सुंदर उल्लेख आलेला आहे.

**अक्षतीला जाताना हाती रुप्याची वाटी**
**पुढे चाले नारळाचा गाडा**
**विहीणबाई राग मनातील सोडा**

व्याही मिळाला मनधरणीचा खरा
विहीणबाई राग मनातील सोडा
आज सेवंतीची वेळ नवरा बसे घोड्यावरी
पुढे चाले दारू नळा निळ्ळा घोडा
विहीणबाई राग मनातील सोडा
मिरवती वरमाय गोरी गोरी
नाजुक पिवळ्या पायांनी
पायघड्यावरून तुम्ही चला
विहीणबाई राग मनातील सोडा
गव्हातांदळानं भरल्या कोठ्या
खोबऱ्या नारळानं भरल्या पाट्या
खणानारळांनी ओट्या तुम्ही भरा
विहीणबाई राग मनातील सोडा
पाटाला लागला पाट पुढे रुप्याचे ताट
विहीणीला आधी साखरभात वाढा
विहीणबाई राग मनातील सोडा
जेवण झाल्यावर हात चोळते साखरेनं
दात कोरते लवंगानं
घंगाळी रुपये तुमी घाला
विहीणबाई राग मनातील सोडा
अत्तरदाणी गुलाबदाणी
पुढे नाचती कळवातणी
झोपाळ्यावर बसून वेणी तुम्ही घाला
विहीणबाई राग मनातील सोडा
आज साड्याची झाली वेळ
नवरी झाली वसंगळ
व्याही गृहस्थ तुमी जोडा
विहीणबाई राग मनातील सोडा

लग्नसमारंभामध्ये विहीणबाई रुसल्याच तर त्यांची मनधरणी करण्यासाठी हे गाणे म्हणतात. या गाण्यामध्ये विहिणीचा किती मानमरातब ठेवणे भाग पडते, याचा मजेदार नमुना सांगितलेला असून जुनी चालरीतही गोवलेली आहे.

**‘ऐका मंडळी ऐका. नवरीच्या बापानं घेतला पैका. घेतला असल तर जगाला दिसल.**

**डोंगराशेजारी डोंगर. डोंगराचा तुटला कडा. बारा बैलांचा जुंपला गाडा. गाड्याला लागली उटी. पावण्यांनी केली दाटी. पावण्याला दिला फेटा. कोळ्याचा मान मोठा. कोळ्याची पुजली कावड. पुढं आली सोन्याची लगड. वर्धावा गेला शेवाया खायाला. काळं लागलं गालाला. दिष्ट होईल लालाला.**

**येशीजवळ झाला गडबडाट. वाजंत्र्याचा उडाला थाट. पुढं आलं महारणीचं ताट. महारणीला दिली साडी. वर ओवाळणीला दिली घडी. लगीन वेळ राहिली थोडी. लगीन लागलं. नवरा हसला. नवरीचा मामा कन्यादानाला बसला. कन्यादानाची तूपलोटी. येऊ द्या कानपिळीची आंगठी. तिकडून येईल कुरवड्याची पाटी.**

**झाली झाल. झालीची आली हंडा परात. मिरवायची राहिली वरात. वरात मिरवली. असा कोणता बाजीराव सोयरा तवा त्यानं घेतला पाचशेचा शेला ?**

**सुवर्णाचा दिवा. माणकांची वात. नवरीच्या बापानं ओवाळलं नवऱ्याचं ग्वात.’**

लग्नानंतर मंडपामध्ये पाहुणे मंडळींची पंगत बसते, त्यावेळी नवरीचा बाप ‘पात ओवाळणी’चे हे उखाणेवजा गाणे म्हणतो. यावेळी नवरीचा बाप हातात ताट घेऊन त्यात दिवा व कुंकवाचा करंडा ठेवतो. पंक्तीमध्ये येऊन त्याने नवऱ्याच्या बापाला ओवाळून टिळा लावावयाचा हा विधी असतो. हौसेखातर हा सोहळा करतात. त्यामुळे त्याची गोडी सर्वांना विशेष. जणू काय जेवणाच्या पंक्तीचा हा मंगल मुहूर्तच म्हणावा !

या गाण्यामध्ये या सोहळ्याची सर्व चालरीत आलेली असल्याने जुन्या चालीरीतींची कल्पना अधिक येते.

मिरवती वरमाय पायघड्यावरूनी जाई
मिरवत मिरवत पिवळ्या पायी दारापशी येई
घोडे सांडणी स्वार नौबत वाजे घनघोर
पालख्या अब्दागिरींनी उडविला भार
तरीपण गणगोताशी ग बोलली
न्हाई मनीची हौस पुरली
नक्षत्रमाळा आणिल्या ताज्या
हवईनळा लावल्या फुलबाजा
ताशा वाजंत्र्याचा आणिला बाजा
चौघडा सनईची लुटली मजा
तरीपण गणगोताशी बोलली
न्हाई मनीची हौस ग पुरली
त्या बाई विहिणीचा केवढा थाट
रांगोळीपुढे ठेवला फिरकी पाट
हंड्या लाविल्या तीनशे साठ
उदबत्त्यांचा सुटला घमघमाट
म्हणून म्हणते कशी करणी केली
न्हाई मनीची हौस पुरली
विहीण बसली न्हायाला
व्याहीदादा गेला पाणी आणाया
वासाचे लावीले ग तेल
शिकेकाईची केली धमाल
वजरीने विहीण पाय ते धुई
न्हाई मनीची हौस पुरली
आर्डभिती करीते नखरा
ठराव केले रुपये आकरा
सुनेला बांगडी कबूल केली
तरी न्हाई हौस मनीची पुरली

**वराडणी बाई गुलहौशा**
**रंग भरूनी टाकी कळशा**
**गुलालानी सई घाबरली**
**तरी न्हाई मनीची हौस पुरली**

या गाण्यामध्ये या सोहळ्याची सर्व चालरीत आलेली असल्याने जुन्या सांस्कृतिक जीवनाची कल्पना अधिक येते. तसेच इथे वरातीच्या वेळी प्रकट होणाऱ्या भावनाविष्काराची हकिगत आलेली आहे. त्यामुळे त्यास 'वरातीचे गाणे' याच नावाने ओळखतात. नवऱ्याच्या आईची मर्जी कशी कशी आणि किती सांभाळावी लागते याचे हे एक मोठे सुंदर दिग्दर्शन आहे. शिवाय नाना प्रकारांनी तिला खूष करायचा प्रयत्न केला तरीही ती कशी नाखूष असते, याचेही हे एक मजेदार चित्रण आहे.

याही गाण्यामध्ये विहिणीबाबतच्या मानपानाची जुनी चालरीत व्यक्त झालेली आहे.

| | |
|---|---|
| **कृष्ण देवजी** | **देवजी नवरा झाला** |
| **शिरी बाशींग** | **बाशींग तुरा या लेला** |
| **मोडीव मंदील** | **मंदील भगवान लेला** |
| **कृष्ण ग देवया** | **देवया नवरा झाला** |
| **कृष्ण ग देवाच्या** | **देवाच्या नवरीसाठी** |
| **पैंजान घडवीलं** | **घडवीलं मध्यान राती** |
| **एवढ्या मध्यान** | **मध्यान मध्यान रात्री** |
| **तोडं घडवीलं** | **घडवीलं नानायापरी** |
| **कृष्ण देवजी** | **देवजी नवरा झाला** |

घरातील लग्नकार्य संपले म्हणजे वरातीच्या वेळी वडीलधाऱ्या बायका मोठ्या कौतुकाने नवऱ्याला कृष्णदेव मानून आपण त्याच्यासाठी काय काय केले याची कहाणी एकमेकींत मोठ्या तालासुरात बोलत रहातात. त्यावेळी प्रकट होणारी भावना या गाण्यात या परीने व्यक्त झालेली आहे. इथे सर्व दागिन्यांचा उल्लेख होईपर्यंत व शेलक्या वारूवर स्वार झालेला नवरा नक्षत्रमाळांच्या सावलीत गणगोतासह मिरवणुकीने घरी जाईपर्यंतच्या कल्पना व्यक्त होईतो हे

गाणे लांबते. कौतुकाने व्यक्त होणाऱ्या भावनाविष्काराचा हा एक हृदयंगम नमुनाच होय.

मध्यंतरी मी कोकणात गेले होते त्यावेळी नारळी पोफळीच्या झावळीत बसून एका बाईने मला आपल्या घरच्या लग्नकार्याला आमंत्रण दिले, म्हणाली की,

**सुवरणाच्या ना मंडपात**
**मोत्या पवल्याच्या चऊकात**
**मांडा घालून तू ग बस**
**माजे सांगाती गाना गा ग**
**नाइत शेल्डेच्या जल्मा जासी**
**आरी बोरीचा पाला खाशी...**

या गीताच्या निमित्ताने आपल्या घरच्या लग्नमंडपात सुवर्णाचा थाट आहे आणि मोत्यापोवळ्यांचा चौक मांडला आहे ही डामडौलाची गोष्ट तिने जशी सांगितली तशीच त्या चौकात मांडी घालून मी बसावे व तिच्याबरोबर गीते गावीत हाही इशारा देऊन टाकला! एवढेच नाही तर मी हे ऐकले नाही म्हणजे मला शेळीचा जन्म येईल ही भीतीही तिने घातली! पण मग मी थोडी वावरले आहे हे लक्षात आल्यावर तिने पुन्हा मला एक गीत दिले:

**बाप करतो कन्यादान**
**आई सोडिते मोत्यादारा**
**ह्या ना अंतरपाटावरी**
**लेक जाते मी मोकल्या केशी**
**बाय आंदान काय देशी**
**देईन लेकी गे हंड्या कलशी**
**बंधु आंदान काय देशी**
**पाच गाईच्या पाच पाड्या**
**संगं देईन चौघ्या दासी**
**आंदान देईन गाई म्हशी**

**पाच गाईच्या पाच पाडचा**
**बंधु पाव रं माज्या वाडचा**

या गीतामध्ये मोत्यांच्या माळा असलेल्या अंतरपाटासमोर कन्यादान होत असून न्हालेली मोकळचा केसांची मुलगी आंदण काय देणार असे विचारते आहे. त्यावेळी वडील भांडी देईन म्हणत असून, भाऊ पाच वासरांसह गाई-म्हशी व चौघी दासी देईन म्हणतो आहे. त्यामुळे खूष झालेली बहीण आपल्या घरी त्याला ये म्हणते आहे.

देशावरील मावळ भागात 'तेलवणाचे' म्हणून मला मिळालेले लोकगीत या संदर्भात जरूर पहाण्याजोगे आहे:

**तेलयाची धार नागिनीचं पान**
**ह्या घरच्या कुळसूत्री तुमावर भार कशायाचा**
**तुला तेलवान व्हाती मग लग्नाला जाती**
**ह्या घरच्या चुली तुमावर भार कशायाचा**
**तुमच्यावर साळीडाळी त्या शिजती**
**तुमा तेलवान व्हाती मग लग्नाला जाती**
**या घरीयीच्या जात्या तुमावर भार कशायाचा**
**सुपारी भार हळदी दळती**
**तेलवान तुम्हा व्हाती मग लग्नाला जाती**
**या घरीयीच्या उंबऱ्या तुमावर भार कशायाचा**
**तुमावर भार माणसाचा लोक येती जाती**
**तुमा तेलवान व्हाती मग लग्नाला जाती**
**या घरीयीच्या उखळचा तुमावर भार कशायाचा**
**तुमावर भार कांडणाचा डाळी तांदूळ सडीतो**
**तुमा तेलवान व्हाती मग लग्नाला जाती**
**या घरीयीच्या मुहूर्तमेढी तुमावर भार कशायाचा**
**तुमावर भार टाकायाचा टाळचा भार कशायाचा**
**टाळचा भार दिव्यायाचा दिव्या भार कशायाचा**
**दिव्या भार तेलायाचा तेली भार कशायाचा**

तेली भार वातीयीचा वातीभार कशायाचा
वातीभार ज्योतीयीचा ज्योती परकाशा पाडीती
तुमा तेलवान व्हाती मग लग्नाला जाती
या घरीयीच्या नवरी तुमावर भार कशायाचा
तुमावर भार हळदीचा लल्लाटीच्या कुंकवाचा
तुमा तेलवान व्हाती मग लग्नाला जाती
या घरीयीच्या नवरा तुमावर भार कशायाचा
तुमा भार टोपीयीचा, टोपीभार मुंडावळ्याचा
तुमा तेलवान व्हाती मग लग्नाला जाती

या गीतात लग्नमंडपामध्ये कोणी कसला भार उचलला आहे आणि हे लगीन शोभिवंत करण्यास कशी कशी मदत केली आहे, याचे मोठे सुरेख वर्णन आलेले आहे. हौसमौज असलेल्या घरातील हे कवतिक बघणारांच्या डोळ्यांचे पारणे फेडल्याशिवाय रहात नाही. . .आणि म्हणूनच असली गीते या प्रसंगी पोत्याने बाहेर निघतात!

दारी सोनेरी चाफा तिथे मखमली रोपा
दारी सोनेरी चाफा
आईची माया मोठी लेक कन्यादान केली
दारी सोनेरी चाफा तिथे मखमली रोपा
दारी सोनेरी चाफा
बाबांची माया मोठी लेक कन्यादान केली
दारी सोनेरी चाफा तिथे मखमली रोपा
दारी सोनेरी चाफा
भावाची माया मोठी बहीण कन्यादान केली
दारी सोनेरी चाफा तिथे मखमली रोपा
दारी सोनेरी चाफा
मामाची माया मोठी भाची कन्यादान केली
दारी सोनेरी चाफा तिथे मखमली रोपा
दारी सोनेरी चाफा

वारल्यांच्या या गीतामध्ये कन्यादानाचा प्रसंग आलेला असून कोणकोण कन्यादान करीत आहे हे सांगताना मखमली रोपांच्या संगतीत दारी सोनेरी चाफा असल्याची शुभसूचक खूणही आवर्जून सांगितली आहे.

लग्नसमारंभाच्या वेळी म्हणावयाची गाणी याच प्रकारची, अशी किंवा यांहून वेगळी अशी आणखी कितीक असतील. परंतु मला मिळाली ती ही अशी आहेत. जुन्या काळातील वाडवडिलार्जित अशा चालीरीतींना या गाण्यांनी अमर करून ठेवले आहे, असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही.

या गाण्यांप्रमाणेच 'रुखवता'च्या वेळी बायका मोठ्या ईर्षेने व हौसेने उखाणे घालतात. त्यांची गोडी यापेक्षा आणखी अभिनव असते. परंतु या उखाण्यांचा उल्लेख उखाण्यांच्या स्वतंत्र प्रकरणामध्ये आलेला असल्याने इथे पुन्हा त्यांची पुनरुक्ती मुद्दामच केलेली नाही.

लग्नसमारंभाच्या वेळी म्हटली जाणारी ही लोकगीते म्हणजे जुन्या चालीरीतींचा एक नमुनेदार इतिहासच होय.





# मंगळागौर

**श्रावण-भादव्यात** अनेक सण येतात. कहाण्यांचे श्रवण व पठण होते. व्रत-वैकल्यांची सांगता केली जाते. गाणी म्हटली जातात. खेळ खेळले जातात. सासर माहेरचा प्रवास होतो. कोडकौतुक निघते. सणासुदींची बोलणी होतात.

मंगळागौर हा याच भावनेच्या पार्श्वभूमीवर पार पाडला जाणारा वसा आहे. वसा म्हणजे व्रत. स्वतः लावून घेतलेला नेम. मनातील देवतेची उपासना. मंगळागौर म्हणजे पार्वती. लग्न झाल्यानंतर तिच्याप्रमाणे अखंड सौभाग्यवती व्हावे म्हणून तिचा वसा घेण्याची चाल महाराष्ट्रातील हिंदु समाजात आहे. हा वसा प्रामुख्याने ब्राह्मण समाजातील स्त्रिया व काही क्षत्रिय स्त्रिया घेत असतात. वसा घ्यायचा म्हणजे मंगळागौरीची पूजा करायची.

लग्न झाल्यानंतर पाच वर्षे ही पूजा केली जाते. दर वर्षी येणाऱ्या श्रावण मासातील प्रत्येक मंगळवारी ही पूजा होते. त्यापैकी शेवटचा मंगळवार अधिक महत्त्वाचा मानतात. पहिल्या व शेवटच्या पाचव्या वर्षी सर्व मंगळवारी पूजा केली म्हणजे जन्माचे सार्थक झाले असे म्हणतात. मनाला त्यामुळे विलक्षण समाधान मिळते.

ह्या पूजेसाठी लग्न झालेल्या पहिल्या पाच वर्षांतील सौभाग्यवतींना बोलाविण्यात येते. या मुलींना वषेरी—वसोळी—म्हणतात.

आपापल्या घरी ह्या मुली पूजेच्या दिवशी डोक्यावरून स्नान करतात. त्यांना वडीलधाऱ्या स्त्रियांकडून कौतुकाने न्हाऊमाखू घालण्यात येते.

मंगळागौरीच्या पूजेसाठी सोळा प्रकारची पत्री, नाना प्रकारची फुले, त्या फुलांचेच केलेले देवीचे हात, काजळ, वेणी, चोळीचा खण इत्यादींची जुळवाजुळव करण्यात येते. याखेरीज काळी पोत, बांगडया आणि पंचामृतही पूजेसाठी हवे असते. या पंचामृतात दही, दूध, तूप, मध आणि साखर यांचा समावेश होतो व या सर्वांनी चौरंगावर मांडलेल्या देवीला स्नान घालण्यात येते.

ही पूजेची देवी नदीवरून अगर विहिरीवरून आणलेल्या पाच खडयांची असते. तिच्यासाठी या पूजेच्या वेळी खास अलंकार करण्यात येतात. हे अलंकार पिठाचे असतात व ते वाहताना वषेरी स्त्री देवीला विनविते की, 'देवी देवी, तुला घे पिठाचे. मला दे सुवर्णाचे, हिऱ्यामाणकांचे.'

या पूजेनंतर देवीला पुरणपोळी, गव्हल्याची खीर, वरणभात, साजूक तूप, तऱ्हेतऱ्हेच्या कोशिंबिरी या प्रकारचा महानैवेद्य दाखविला जातो. नंतर सर्व वषेऱ्या मुली आपल्या नात्यागोत्यातील मंडळींसह हे सुग्रास भोजन सुखासमाधानाने घेतात. यावेळी त्यांच्या अल्लडपणाला व हसण्याखिदळण्याला भारी ऊत येतो. वडील मंडळींकडून कौतुक होते. नवे वस्त्रालंकार मिळतात.

पूजेच्या संध्याकाळी या वषेऱ्या मुलींना फराळाचे पोहे व करंज्यांसारखे पदार्थ खाण्यासाठी देतात. ह्या पूजेचा सर्व दिवस कोणाच्या तरी एकीच्या घरी आळीपाळीने साजरा होतो. रात्री मंगळागौरीची सामुदायिक आरती झाल्यानंतर मंगळागौर रात्रभर खेळून जागविली जाते. या दिवशी खेळले जाणारे खेळ नागपंचमीसारखेच असतात. परंतु या खेळांची गाणी मराठमोळ्या स्त्रियांच्या गाण्यांपेक्षा वेगळी असतात.

**घ्या घ्या कुऱ्हाडी चला जाऊ वऱ्हाडी**
**चंदनी लाकडं तोडायला बाई तोडायला**
**गणपतीचं देऊळ बांधायला बाई बांधायला**
**गणपतीच्या देवळात गजानन बसे गजानन बसे**
**आली आली पार्वती टाकील फासे टाकील फासे**

हे गाणे 'लाडूझिम्मा' खेळताना म्हणतात. या गीतातील सर्व कल्पना एकीतून एक अशा ओळीने निघत पुढे सरकल्या आहेत. त्यामुळे कुऱ्हाडी घ्यायच्या, वऱ्हाडात जाऊन चंदनी लाकडं तोडायची, गणपतीचे देऊळ बांधायचे, त्या देवळात गणपती रहायचा व तेथे येऊन पार्वतीने फासे टाकायचे या गोष्टी ओघाने येणाऱ्या कथेसारख्या वाटतात.

**गोफ विणू बाई गोफ विणू**
**अर्ध्या रात्री गोफ विणू**
**गरे खा गरे पोटाला बरे**
**न खाईल त्याची म्हातारी मरे**
**मेली तर मेली, कटकट गेली**
**संसाराला मोकळीक झाली**
**गोफ विणू का गोफीण विणू**
**गोफ विणू बाई गोफ विणू**

'गोफ' खेळताना म्हणावयाचे हे गाणे आहे. वेगवेगळ्या रंगांचे दोरे उंच एकत्र बांधलेले असतात ते सुटे घेऊन त्यांचा गोफ विणीत चारसहा जणी, खेळतात. अशा वेळी एक छानदार पंचरंगी दोरी तयार होते.

या गीतातील मध्यरात्रीचा उल्लेख हा खेळ बराच वेळ चालत असल्याचा निदर्शक आहे. तसेच इथे आलेले फणसाचे गरे हे कोकणाची आठवण करून देणारे आहेत व न खाल्ले तर काय होते याची दिलेली हकिगत ही खेडेगावच्या अडाणी मंडळींची विचारसरणी दर्शविणारी आहे.

**खुर्ची का मिर्ची**
**जाशील कैशी**
**सासू मारीते**
**बरं करीते**
**दीर रागावतो**
**बरं करीतो**
**मामंजी मारीती**
**बरं करीती**

**नणंद बोचकारते**
**बरं करीते**
**जाऊ बोलावते**
**बरं करीते**
**खुर्ची का मिर्ची**
**जाशील कैशी**

लाडूझिम्म्यासारख्या हाताने टाळचा वाजवीत फेर घालायचा, मधल्या गोलात एकीने धावत पळत सर्वांची नजर चुकवून कोंडी फोडून बाहेर यायचे आणि मग वरील प्रश्नोत्तरे करीत हा खेळ खेळायचा. हा खेळ मोठा प्रेक्षणीय असतो.

जुन्या काळी लहानपणी लग्न झालेली मुलगी कशा प्रकारे सासरी वागणूक मिळे याचे जे वर्णन करी त्याचा खुलासा या गीताने केलेला आहे.

**लाटा बाई लाटा कणकेचा बोटा**
**मामांनी दिला मला चांदीचा लोटा**

पंचमीच्या सणाच्या वेळी लाटणी खेळताना म्हटले जाणारे हे गीत मंगळा-गौरीला पण लाटणी खेळताना म्हटले जाते. या गीताचा पुढील भाग असा आहे :

**लाटा बाई लाटा चंदनी पेटा**
**मामांनी दिला मला सोन्याचा लोटा**
**आई मी लहान केतकीचं पान**
**मामांना सांग मला कंबरपट्टा आण**
**एक सूं सूं दोन सूं सूं**
**आपण दोघी मैत्रिणी नव्या साड्या नेसू**

आजोळच्या माणसांचे जिव्हाळ्याचे नाते व मामाकडे आपण लहान म्हणून भाचीने केलेली मागणी इथे प्रकट झालेली आहे. त्यावरून जुन्या काळची वैभवशाली रीतभात लक्षात आल्याविना रहात नाही.

**अग अग सूनबाई**
**काय म्हणता सासूबाई**
**माझ्या पाटल्या केल्या काय**
**भावाच्या मुंजीत आईला दिल्या**

**अग अग सूनबाई**
**काय म्हणता सासूबाई**
**माझी नथ केलीस काय**
**भावाच्या लग्नात वहिनीला दिली...**

या पद्धतीने सर्व दागिन्यांची नोंद होईपर्यंत हे गाणे चालते. हा संवाद दोन बायकांत चालतो आणि अक्षरशः हातवारे करण्यासह भांडणाचे स्वरूप त्यास लाभते! त्यामुळे खूपच हशा पिकतो.

**किकीचं पान बाई की की**
**सांगड मासा सूं सूं**
**आल्या ग बाई गुजरणी**
**कापूस घ्या ग पिंजरणी**
**कापूस आमचा सोन्याचा**
**पाऊस पडला मोत्यांचा**

उजव्या हाताने डाव्या हातावर टाळी देऊन नंतर डाव्या हाताने मस्तक धरीत खाली वाकून हे गाणे गात खेळ खेळतात. या खेळाचे नाव 'किकीचे पान' असेच आहे. या गीतातील गुजरणीचे येणे, कापूस पिंजणे, तो कापूस सोन्यासारखा मानणे व शेवटी मोत्यांचा पाऊस पडणे या सर्व गोष्टी व सुरुवातीचे किकीचे पान आणि सांगड मासा या सर्वांचा एकदम मेळ बसत नाही! तरी पण हे नृत्यगीत मोठे छानदार रंगते.

**काचकिरडा पाय मुरडा**
**पायावरून काय गेलं**
**पाय लंगडा**

असे म्हणत दोन्ही पायांचे अंगठे एकमेकांत गुंफून डावी उजवीकडे नाचत बायका मोठ्या गमतीचा हा खेळ खेळतात. ह्या खेळाचे नाव आहे 'काचकिरडा'. ह्यामुळे शरीराला फारच चांगला व्यायाम होतो.

**आगोटा पागोटा घालीन म्हणते पगोटा**
**मथुरेच्या बागेत जाईन म्हणते**
**लाल लाल साडी नेशीन म्हणते**

पायांच्या पंजावर नाचत व दोन्ही हात आळीपाळीने डावी उजवीकडे एकदम नेत उड्या मारून खेळताना हे गाणे म्हणतात. ह्या खेळाचे नाव आहे 'आगोटा पागोटा'.

**साळुंकी साळुंकी तुझी माझी पालखी**
**पगडा फूं बाई, पगडा फूं**
**गेले होते विहिरी विसरले दोरी**
**पगडा फूं बाई, पगडा फूं**
**गेले होते शेता विसरला कोयता**
**पगडा फूं बाई, पगडा फूं**
**गेले होते आडा विसरला घडा**
**पगडा फूं बाई, पगडा फूं**

कमरेवर दोन्ही हात ठेवून सर्वांगाभोवती वळून व वाकून तोंडाने पिंगा घालीत हे गाणे म्हणण्याचा प्रघात आहे. या गीताचा सर्व गाभाच मुळी खेड्यातील जीवनाचे दिग्दर्शन करणारा आहे हे विशेष होय.

**भोर भेंडी कशी नाचे**
**आरसे खिडक्या नक्षीदार**
**कोण्या एके वाटी आली नार**
**तिचा तुटला चंद्रहार**
किंवा
**सो ऽ ऽ मी गो ऽ ऽ मी**
**सोमी गोमीचा वाडा**
**बाई माझ्या सखुला धाडा**

असली लहानगी गीते आणखी किती तरी वेळ म्हणत वेगवेगळे खेळ मंगळा-गौरीला खेळतात. विहिणींचे भांडण, गाठोडे, भुरुला, फुगडी, झिम्मा यांचीही त्यात भर पडते. याशिवाय मंगळागौरीपुढे फेराची गाणीदेखील म्हणतात.

**आज मथुरेचा बाजार, झाला उशीर**
**गौळणीचं न्हाणं धुणं, उद्या बाजाराला जाणं**
**अडविलं त्या गोविंदानं, सोडा हरी पदर**

**का बा धरलिस माझी वेणी**
**घरी आहे घरचा धनी**
**करील माझी धूळदाणी, सोडा हरी पदर**
**का बा धरलिस माझी वेळ**
**घरी आहे तान्हं बाळ**
**रडुन रडुन करी गोंधळ, सोडा हरी पदर**
**का बा धरलिस माझी वाट**
**घरी आहे सासू खाष्ट**
**करील कामाचा बोभाट, सोडा हरी पदर**

मथुरेच्या गौळणी व कृष्णदेव यांच्यामधील सुखसंवादाची गोष्ट या फेराच्या गीताने इथे केली आहे. घरच्या अडचणी पुढे करताना गौळणींची उडालेली ही धांदल मोठी गमतीची आहे.

मंगळागौरीपुढे खेळले जाणारे खेळ, त्यांची वेगवेगळी गाणी व उखाणे आणि फेरांची गीते यापेक्षा आणखी पुष्कळ आहेत. परंतु मला जेवढी मिळविता आली तेवढयांचा मी इथे उल्लेख केलेला आहे. या खेळगाण्यांत नागपंचमी व गौरी-पूजनाचे वेळची खेळगाणी यांचाही समावेश होतो.

मंगळागौरीचा असा हा पूजेचा वसा पाच वर्षे घेतला जातो आणि शेवटच्या पाचव्या वर्षी त्या वशाचे वाण मुलीच्या आईवडिलांना दिले जाते.

हे वाण देताना नव्या चोळीने बांधलेला तपेलीतील सोन्याचा नाग आईला देतात. वडिलांना सर्व पोषाख होतो. त्यामध्ये छत्री व जोडा यांचाही समावेश असतो ! याच वेळी आई आपल्या मुलीला सोन्याचा हार देत असते.

हा वसा पुण्याहवाचन व होमहवन करून पूर्ण केला जातो.

■ ■ ■



# डोहाळे

आपल्या घरामध्ये नवे बाळ जन्माला येणे ही मोठी भाग्याची गोष्ट आहे असे सर्वत्र मानण्यात येते. बाळाचा जन्म म्हणजे दोन्ही घराण्यांचा आनंद. बाळ म्हणजे जणू कुलदीपक. त्याचे स्वागत करावयाचे ही अभिमानाची गोष्ट. त्यामुळे घरामधील लेकीवाळी अगर सुना गरोदर आहेत अशी कुणकुण जरी कानावर आली, तरी घरच्या वडीलधाऱ्या स्त्रियांच्या चेहऱ्यावर आनंद झळकतो. विशेषत: एखाद्या सुनेला किंवा लेकीला पहिल्यांदाच जेव्हा दिवस जातात, तेव्हा तर या आनंदाला पारावारच रहात नाही. या पोरीचे किती कौतुक करू आणि किती नको याला काही हिशेबच रहात नाही. त्यामुळे अशा वेळी या मुलीवर संस्कारांचा एवढा वर्षाव करण्यात येतो की, ती मुलगी भांबावून जाते! मात्र हे सारे सोपस्कार वडिलोपार्जित चालत आलेले असल्याने, मोठ्या काळजीपूर्वक त्यांची अंमलबजावणी व्हावी या दृष्टीने ती मुलगी आनंदाने सर्व करून घेते. त्याकारणाने वडील मंडळींनाही मोठा हुरूप येतो.

साधारणपणे सहा महिने संपले आणि सातवा उजाडला म्हणजे मुलीला चांगला मुहूर्त बघून गर्भारशीला माहेरी आणण्याची चाल आहे. अशा वेळी सासरची मंडळी मुलगी पाठविण्यापूर्वी 'डोहाळजेवणा'चा समारंभ करतात.

गणगोतातील स्त्रिया आणि शेजारच्या आयावाया बोलावून सवाष्णींच्याकडून समारंभाने मुलीची ओटी भरण्यात येते. त्याचबरोबर सर्वांना ऐपतीप्रमाणे थाटामाटाचे जेवणही देण्यात येते. म्हणजे या निमित्ताने गर्भारशीच्या आवडीचे पदार्थ सर्वांच्या सहवासात तिला जेवू घालणे आणि तिला उत्तेजन देणे ही यामागची भूमिका असते.

माहेरीदेखील याच प्रकारे 'डोहाळजेवण' करण्याचा प्रघात आहे. परंतु त्यातही प्रकार असतात. मुलीला वागेत नेऊन, नावेत बसवून, झुल्यावर—झोपाळ्यावर—वसवून, मखरात वसवून आणि फुलांनी सजवून ज्याच्या त्याच्या राजीखुषीप्रमाणे जेवू घालण्यात येते. हेतू एवढाच की, त्या गर्भारशीचे मानसिक आरोग्य सुधारावे आणि तिला उत्साह वाटावा. म्हणजे दोन्हीही घरच्या मंडळींना तेवढेच कौतुक.

परंतु माहेरची भावना फार वेगळी आणि तिथे खेळीमेळीचे प्रमाणही अधिक दिसून येते. एरवी जो सोहळा व्हावयाचा त्यात फरक नसतो. नाही म्हणायला खाण्याचे पदार्थ त्या त्या ठिकाणच्या रीतिरिवाजाप्रमाणे वेगळे वेगळे असणे शक्य असते.

अशा प्रसंगी गर्भारशीला नवे लुगडे नेसवावयाचे, हिरव्या खणानारळासह तिची ओटी भरायची, हिरव्या बांगड्या घालावयाच्या अशी पद्धत आहे. यावेळी शेजारच्या व नात्यागोत्यातील सवाष्णी मिळून तिला ओवाळतात व तिची फळाफुलांनी ओटी भरतात.

जेवणाचा कार्यक्रम संपला आणि ओटीभरणाची वेळ आली, म्हणजे मग ओटी भरताना गर्भारशीला तांदळाच्या अगर गव्हाच्या रांगोळीने सजविलेले आसन बसावयास देतात. या आसनाला 'चौक' म्हणतात. ओटीभरण सुरू झाल्यानंतर हौशी वायका डोहाळ्याची गीतेही म्हणू लागतात.

खेड्यामध्ये गर्भारशीला जे पदार्थ करावयाचे ते करताना सगळ्या बायका मिळून घरी दळण दळतात. त्या प्रसंगी पुढीलप्रमाणे ओव्या गायिलेल्या ऐकावयास मिळतात:

**पैल्यांदा गरभार कांत विचारी आर्डभिती**
**पाची प्रकाराचं ताट रानी म्हईनं झालं किती**

पैल्यांदा गरभार
हौशा माज्या कांता
पैल्यांदा गरभार
माजा ग बाळराज
पैल्यांदा गरभार
माजी ती सूनबाळ
पैल्यांदा गरभार
माजा ग बाळराज
पैल्यांदा गरभार
माजा बाळ आणीयीतो
पैल्यांदा गरभार
चाफा चंदन माज्या दारी
पैल्यांदा गरभार
हौशा ग भरतार
हिरव्या चोळीला ग
माज्या त्या भैनाईला
पाची प्रकाराचं ताट
माज्या त्या भैनाईची

कांत विचारी गोठ्यायात
घाला अंजीर वट्यायात
डोळे लागले जिन्नसाचे
गरे करीतो फणसाचे
डोळे लागले ताकायाचे
हाये लक्षन पुत्रायाचे
डोळे लागले कारल्याचे
मळे धुंडितो मैतराचे
डोळे लागले कशायाचे
आंबे शेंदरी पाडायाचे
तिला सारकी येती घेरी
बसू सावली त्येच्या नारी
तिला अन्नाची येती घान
देतो सुपारी कातरून
बंदा रुपाया सारीयीला
चोळी गर्भार नारीयीला
वर केळाची केळफणी
वटी भरीती सवाशीनी

या ओवीगीतामधून गरोदर स्त्रीच्या या वेळच्या मानसिक अवस्थेची कल्पना देण्याचा प्रयत्न केलेला आहे. आपापल्या परीने घरच्या माणसांनी या वेळी घेतलेली काळजी अशा रीतीने इथे व्यक्त झालेली आहे. नवऱ्याने एकांतात तिची चौकशी करायची, तोंडाला चव यावी म्हणून तिला घरच्या मुलाने तिच्या इच्छेप्रमाणे लोकांचे मळे धुंडाळून कारली आणावयाची, शेंदरी पाडाचे आंबे आणावयाचे, फणसाचे गरे करून द्यावयाचे, वहिणीने बंदा रुपया खर्चून तिला हिरवी चोळी शिवायची, खणानारळांनी व फुलाफळांनी तिची ओटी भरावयाची, ती वरचेवर ताक पिते तेव्हा पुत्राचे लक्षण दिसते अशी गोष्ट सासूने करावयाची, मैत्रिणीने तिला मळमळते म्हणून अंगणातील चाफ्या-चंदनाच्या सावलीत बसावयास सांगावयाचे इत्यादी या सर्व हालचाली मोठ्या सूचकतेने इथे व्यक्त झालेल्या आहेत.

पैल्या मासी रुक्मिनीशी आली शिसारी अन्नाची
बाग केळी नारळीची त्रिपन केळी बकूळीची
केली ताकीत माळचाला दिवस सोनीयाचा आला
किष्ण पूसे रुक्मिनीला दिवस सोनीयाचा आला
दुसऱ्या मासी भिम्मकतनया चढलीसे गर्भ छाया
हर्षयुक्त यादवराया पालटली सर्व काया
प्रभु हर्ष मनी झाला दिवस सोनीयाचा आला
किष्ण पूसे रुक्मिनीला दिवस सोनीयाचा आला
तिसऱ्या मासी भिमकबाळी घालितसे चीरचोळी
पाट समया रांगूयीळी भोजनाला गूळपोळी
भोजनाशी उशीर झाला दिवस सोनीयाचा आला
किष्ण पूसे रुक्मिनीला दिवस सोनीयाचा आला
चवथ्या मासी उभी द्वारी पुशी द्वारकिच्या नारी
विनोद करी नानापरी लाजे रुक्मिनी सुंदरी
गजरा येनीमंदी घाला दिवस सोनीयाचा आला
किष्ण पूसे रुक्मिनीला दिवस सोनीयाचा आला
पाचव्या ग महिन्यात दिला मंडप बागेत
पाचो पक्वान्नांचा थाट पंक्ति बसल्यात आचाट
मधी बसवा रुक्मिनीला दिवस सोनीयाचा आला
किष्ण पूसे रुक्मिनीला दिवस सोनीयाचा आला
सहा महिन्यांची सोहाळी किष्ण पूशीतो डोहाळी
आंबे पाडाचे पिवळे रुक्मिनीचे वय कवळे
वारा विंझनांनी घाला दिवस सोनीयाचा आला
किष्ण पूसे रुक्मिनीला दिवस सोनीयाचा आला
सातव्या महिन्याच्या परी आंबुळी ग वेळा खिरी
अंगी चोळी भरजरी पिवळं पातळ केशरी
वारा विंझनाचा घाला दिवस सोनीयाचा आला
किष्ण पूसे रुक्मिनीला दिवस सोनीयाचा आला

आठव्या महिन्या आठुंगूळ हार गजरे गोकूळ
माळ उंबराची घाला दिवस सोनीयाचा आला
किष्ण पूसे रुक्मिनीला दिवस सोनीयाचा आला
नऊ महिने नऊ दिवस झाली रुक्मिनी प्रसूत
बाळ जल्मले मदन जैसे सूरव्याचे किरन
चांद लाजूयिनी गेला दिवस सोनीयाचा आला
किष्ण पूसे रुक्मिनीला दिवस सोनीयाचा आला

गर्भारशीला चार चौघींच्यामध्ये बसवून तिचे कौतुक करते वेळी हे गाणे म्हणतात. रुक्मिणीच्या निमित्ताने उभ्या दुनियेतील सगळ्या बायकांच्या होणाऱ्या कौतुकाला इथे अशी वाचा फुटली आहे. दिवस गेल्यानंतर ओळीने नऊ महिने रुक्मिणीमध्ये व तिच्या कोडकौतुकामध्ये कसकसा फरक पडत गेला तो इथे मोठ्या खुबीने वर्णन केलेला आहे. सोन्याचा दिवस घरामध्ये उजाडला या भावनेने श्रीकृष्णाने रुक्मिणीची पुरवलेली इच्छा गर्भारशीपुढे ठेवण्यात आली आहे. हेतू एवढाच की, हे सुख सर्वांचे सारखे, राजाच्या राणीसारखे, ही भावना सामान्य मनाला पटावी आणि हुरूप यावा.

रुक्मिणीला दिवस गेले आहेत आणि तिच्या मुखावर गर्भाची छाया पसरली आहे, हे बघून हर्ष झालेल्या यादवरायाने सोन्याचा दिवस आला, असे सांगून माळ्याला ताकीद दिली की, केळी, नारळीची आणि बकुळीची बाग ताजी ठेव. तिला तिसरा महिना लागल्यानंतर समई, रांगोळी, पाटाचा थाट करून गूळपोळीचे भोजन दिले व कोरी चोळी शिवली. चौथ्या महिन्यात ती दरवाजात उभी राहिली असता द्वारकेतील स्त्रिया तिची विनोदाने चेष्टा करतात. केसांमध्ये फुलांची वेणी घालतात आणि रुक्मिणी लाजून चूर होऊन जाते. पाचवा महिना येताच पाची पक्वान्नांचा थाट उडून बागेतील मंडपात उठणाऱ्या पंक्तीमध्ये तिला बसविण्यात येते. कोवळ्या वयाच्या रुक्मिणीला सहावा महिना लागताच कृष्ण तिची इच्छा विचारतो व त्याप्रमाणे तिला पंख्याने वारा घालावयास सांगून तिला पाडाचे पिवळे धमक आंबे खाऊ घालतो. सातव्या महिन्यात भरजरी चोळी आणि केशरी पातळ नेसवून तिला आंबोळी व नाना प्रकारच्या खिरी देण्याची व्यवस्था करण्यात येते. आठव्या

महिन्याला शास्त्राप्रमाणे शुभ म्हणून उंबराची माळ आणि हारगजरे उभे गोकूळ रुक्मिणीला देते. आणि शेवटी नवव्या महिन्यामध्ये पुरे दिवस भरल्यानंतर रुक्मिणी प्रसूत होते. तिला झालेले बाळ मदनासारखे सुंदर, सूर्यकिरणासारखे प्रकाशमान असते. त्याला बघून चंद्रदेखील लाजतो! अशी ही या गाण्यामध्ये झालेली भावना ऐकताना आणि सांगताना बायका तल्लीन होऊन जातात. खुद्द गरोदर स्त्रीदेखील विलक्षण आनंदून जाते. जणू हे सारे सोपस्कार आपल्यावरच या घटकेला होत आहेत आणि आपले बाळही एवढे देखणे होणार आहे ही कल्पना तिच्या मनाला आनंदाने गुदगुल्या करीत विलक्षण मोहिनी घालते.

**हा मास प्रथम भिमकीचा नुमजे कुणाला । वदनेंदु सुकला । चालता गजगति होती श्रम पदकमला । धन्यता होय धरणीला । घामाने तनु डबडबली । तोंडावरि दिसली लाली । गर्भाची छाया पडली । नेसली नवी हिरवी जरतारी । गर्भिणी रुक्मिणी नारी । डोहाळे पुसे श्रीहरी ।।**

**दुसऱ्यात समवया सख्या मिळुनी येती । बहुपरीचा विनोद करिती । विंझण वारे घेऊनि हाती । चवरंगी उपचार सुशोभित करिती । लाविली उटी वाळ्याची । गुंफिली वेणी चाफ्याची । घातली माळ सुमनांची । घनदाट वास सुगंध सुटला भारी । डोहाळे पुसे श्रीहरी ।।**

**तितक्यात बहु डोहाळे होती । सोहाळे द्राक्षाचे मंडप देती । लाविली बाग केळीची वृक्ष पालवले । फलभार तरुवर आले । पुष्पांची बागशाही । शेवंती मोगरा जाई । आंब्याची घनदाट आंबराई । झोपाळे बांधुनी बसवी त्यावरी । डोहाळे पुसे श्रीहरी ।।**

**चवथ्यात कळे गोतास आला विश्वास । लागला पाचवा मास । गुंफिली फुलांची जाळी । मेंदी नखास माखिली । पक्वान्ने नानापरीची केली । कांद्याची भाकरी शिळी । चांदणे रात्र अंधेरी । थंडीत गुलाबी कोवळ्या उन्हाच्या लहरी । डोहाळे पुसे श्रीहरी ।।**

**लागला सहावा मास पसरले तेज । अवतरतो मकरध्वज । नेसुनी हिरवा शालू हिरवाच साज । पाहुनिया खूष हो यदुराज । बसुनि पति शेजारी ओटी भरी । डोहाळे पुसे श्रीहरी ।।**

**लागला सातवा मास । पोट नारळी महालामधि केली आरास । नगरीच्या नारी गाती मंजुळ गाणी । कुणी चेष्टा करिती मिळुनी । वाटिती हळदकुंकू पानसुपारी । डोहाळे पुसे श्रीहरी ।।**

**आठव्यात शास्त्र संस्कार अठांगूळ करिती । गोतास आमंत्रण देती । कुणी आणिती चिरकंचुकी आहेर करिती । देवीचे आशीर्वाद घेती । सुस्वर वाद्य वाजंत्री चौघडा भेरी । डोहाळे पुसे श्रीहरी ।।**

**नऊ मास नऊ दिवस । झाली प्रसूत बहु आनंद द्वारकेस । वाटीती नगरी शर्करा भरूनिया रथ । जन्मासि ये रतिकांत । हर्षले मनी श्रीरंग । भक्तासि करुणा मेघ । गंगेस लागला छंद । आवडीने गाती गुणगान जमुनीथा नारी । डोहाळे पुसे श्रीहरी ।।**

डोहाळजेवणाच्या निमित्ताने जमलेल्या बायका मागच्या गीताप्रमाणेच हेही गीत म्हणतात. गीताचा आशय तोच. पण रीतिरिवाज भिन्न पडतात. पहिले गीत प्रामुख्याने बहुजन समाजातील स्त्रिया गातात आणि हे गीत पुढारलेल्या वर्गातील स्त्रिया गातात. त्यामुळे भाषेच्या वापरातही फरक दिसून येतो. या फरकापलीकडे पूर्वीच्या गाण्यापेक्षा ह्या गाण्यात वेगळी भावना व्यक्त झालेली दिसत नाही. वर्णन मात्र सविस्तर आलेले आहे इतकेच काय ते. त्यामुळे भगवान श्रीकृष्णाच्या वेळचे ऐश्वर्य नजरेत भरायला अधिक अवसर सापडतो. तसेच सामान्य मनालाही ते कल्पनेत का होईना, उपभोगण्याची संधी मिळाल्याचा आनंद होतो! निदान असा आदर्श डोळ्यापुढे रहायला तरी हरकत नाही, या खुळ्या समजुतीने बायका भारून जातात.

**श्री वशिष्ट गुरूची आज्ञा वंदुनी आला**
**तो राजा दशरथ कौसल्येच्या महाला**
**स्थूल देह ओसरीवरती नृपवर चढला**
**देह सूक्ष्म माजघरी संशयात पडला**
**याला कारण कोठडीत पाहे नृप तो**
**महाकारण माडीवरी जाय त्वरित तो**
**ही द्वारी नच राहे उभी म्हणत तो**
**शोधिता परस्पर परसी पाहुनि तिजला**

म्हणे रुसून बसलि का निर्विकल्प छायेला
डोहाळे दशरथ पुसतो कौसल्येला
हे राजकुमारी काय आवडे तुजला
जे योगिजनांना योग साधिता न मिळे
ते कौसल्येने पूर्ण ब्रह्म साठविले
तिजजवळी बसुनी राजा दशरथ बोले
पुरवीन कामना इच्छित वद या वेळे
ती नीजानंद आनंदी रंगली
ती द्वैतपणाची बोली विसरली
तिशी गोष्ट विचारीत राजा मागली
आठवते तुला का वऱ्हाड बुडवूनि गेला
पौलस्त्य तनय तो मत्स्यमुखी दे तुजला
डोहाळे दशरथ पुसतो कौसल्येला
हे राजकुमारी काय आवडे तुजला
बोलतो कुठे रावण भुज आपटोनी
ती उठली शत्रूचे नाम ऐकता श्रवणी
म्हणे चापबाण दे दाहि शिरे उडवोनी
मी क्षणात टाकिन कुंभकर्ण मारूनी
त्या इंद्रजिताला बाणे जर्जर करुनी
धाडीन यमपुरा बंधूसाह्य घेवोनी
मम भक्त बिभीषण लंके स्थापूनी
बंधमुक्त करीन सुर सारे या क्षणी
धाडीन स्वर्गी सन्माने त्या ज्ञणी
हे कार्य करीन मी पाळुनी ताताज्ञेला
डोहाळे दशरथ पुसतो कौसल्येला
हे राजकुमारी काय आवडे तुजला
घे शशांकवदने नवरत्नांची माळा
मी चाप भंगिता घालिल भूमीबाला

घे अननस आंबे द्राक्षे ह्या वेळा
मी प्रिया शोधितां देईल शबरी मजला
घे दास दासी रथ घोडे गे सुंदरी
हनुमंत दास तो माझा महीवरी
नौकेत बैसुनि जलक्रीडा तू गे करी
प्रिय भक्त गुहक मज नेई परतीराला
ही लाल पैठणी पांघर भरजरी शेला
डोहाळे दशरथ पुसतो कौसल्येला
हे राजकुमारी काय आवडे तुजला
झडपिली भुतांनी पंचाक्षरी कुणी आणा
इज नेऊनि दाखवा वैद्य बघुनिया शहाणा
तव उदरी येईल वैकुंठीचा राणा
आशीर्वाद दिले मज श्रेष्ठी नमिता चरणा
हे द्वारपाल गुरुजींना सांगति मम गोष्ट प्रियेची
तू सांग कहाणी करुनि बहु सायास प्रीतीची
मम गोष्ट ऐकुनी दुत तो शीघ्र घेउनी आला
त्या ब्रह्मसुताच्या वंदित नृप पदकमला
डोहाळे दशरथ पुसतो कौसल्येला
हे राजकुमारी काय आवडे तुजला

पुराणामध्ये सापडणाऱ्या दशरथ आणि कौसल्येच्या विवाहाच्या रोमांचकारी कथेच्या पार्श्वभूमीवर आधारलेले हे गाणे आहे. इथे दशरथ कौसल्येला तिची आवडनिवड विचारीत आहे. परंतु ती सर्वसामान्य जिवांमधील नाही. कौसल्येचा पुत्र राम आपल्या मृत्यूला कारणीभूत होईल हे विधिलिखित खोटे ठरावे, म्हणून पराकोटीचा प्रयत्न करणाऱ्या रावणाच्या कारस्थानाला हाणून पाडण्याची हिकमत या ठिकाणी व्यक्त झालेली आहे. कौसल्येच्या उदरात वाढत असलेल्या रामचंद्राच्या पराक्रमाची जणू ही तयारी चालली आहे. आणि ती भाग्यवती ठरावी, वैभवशाली व्हावी म्हणूनच की काय दशरथ कौसल्येच्या खाण्यापिण्याची व वस्त्रालंकारांचीही या ठिकाणी काळजी घेत आहे ! त्यामुळे एकदम ऐकताक्षणीच

समजावयास कठीण वाटणारे हे गाणे रामासारखा पराक्रमी पुत्र आपल्यालादेखील व्हावा या भोळ्या आशेने सामान्य स्त्रिया पाठ करून आवडीने म्हणतात. गर्भारशीच्या कानांवर हे जरूर पडावे म्हणजे तिचे मन प्रसन्न राहील व देवमाणसाला जन्म दिल्याचे पुण्य तिच्या पदरात पडेल, ही त्यांची भोळी समजूत असते. सर्वसामान्यांच्या कौतुकाच्या कल्पनेबरोबरच असामान्य जीवनातील कौतुकाचीही गुंफण या गाण्यात मोठ्या खुबीने केलेली दिसून येते. त्यामुळे अगोदरच प्रभु रामचंद्राविषयी अपार जिव्हाळा मनात बाळगणाऱ्या स्त्रियांना या गाण्याची आणखी गोडी वाटू लागते. जुना इतिहास नव्याने घडविण्याची हिंमत बाळगूनच जणू हे गाणे त्या डोहाळजेवणाचे वेळी म्हणतात !

**बाई मी पहिल्या माशी उभी ग अंगणात**
**मशी पावला रघुनाथ**
**बाई मी दुसऱ्या माशी उभी ग वृंदावनी**
**डाव्या कुशीला चक्रपाणी**
**बाई तिसऱ्या माशी मुखावर दिसती लाली**
**भैना कोणत्या महिन्यात न्हाली**
**बाई चवथ्या माशी वरणाचा येतो वास**
**माझ्या भैनाला गेले दिवस**
**बाई पाचव्या माशी निरीबाई उंच दिसे**
**तिचा भ्रतार एकांती पुसे**
**बाई सहाव्या माशी खाऊशी वाटे बहू**
**चल अंजनी बागेत जाऊ**
**बाई सातव्या माशी इच्छा झाली डाळींबाची**
**मला शिवा चोळी रेशमाची**
**बाई आठव्या माशी मुलीनं ग घेतला छंद**
**मायबापाशी झाला आनंद**
**बाई नवव्या माशी नऊ महिने झाले पूर्ण**
**पोटी जन्मले भगवान**

**बाई दहाव्या माशी आणा दाई बोलावून**
**करा साडी चोळीची बोळवन**

डोहाळ्याचे हे गीत वहुजन समाजाची या संबंधातील एक प्रातिनिधि भावना या दृष्टीने गोंधळी लोक गाताना दिसून येतात. अगदी घरगुती जीवनदर्श घडविणारे हे गाणे क्वचित प्रसंगी कुठे कुठे स्त्रियाही चारचौघीत बसून, आ ल्याला येणाऱ्या गाण्यांची गमतीने मोजदाद करायला लागल्या म्हणजे, गातान दिसून येतात. कुठे कुठे कोकेवालेही हे गाणे म्हणावयास सांगितले म्हणजे आपल कोका (तंतुवाद्य) वाजवून आनंदाने म्हणताना दिसून येतात.

पुष्कळदा असे होते की, डोहाळजेवणाचे वेळी काही वायका न्हाण आले असतान म्हणावयाची गाणीही म्हणत असतात. त्यापैकी एक गाणे सर्वत्र आढळते ते असे :

**बाई पैल्या दिवशी — रुक्मिनीला न्हान आलं**
**गोताला बोलावनं केलं**
**बाई दुसऱ्या दिवशी — रुक्मिनी तोंड धुती**
**चिमन्या पानी पिती**
**बाई तिसऱ्या दिवशी — धाडा सोनाराला चिठ्ठी**
**मागा चांदीची ताटवाटी**
**बाई चवथ्या दिवशी — घाली सासू ऊनऊन पानी**
**हाती आईच्या तेलफनी**
**बाई पाचव्या दिवशी — बागेत गेला माळी**
**रुक्मिनीच्या मखराला केळी**
**बाई सहाव्या दिवशी — धाडा सोनाराला पत्र**
**मागा सोन्याचं फूलपात्र**
**बाई सहाव्या दिवशी — करा कासाराला बोलवनं**
**हाती सोन्याचं कंगवान**
**बाई सातव्या दिवशी — वान्याला धाडा चिठ्ठी**
**नारळ घाला वटी**
**बाई आठव्या दिवशी — खिडकीत उभी राही**
**गोताची वाट पाही**

बाई नवव्या दिवशी पुरनपोळीचं जेवायान
गनागोतांला बोलावनं
बाई दहाव्या दिवशी हळदीकुंकवाचा केला काला
देव इट्टल शांत झाला
बाई अकराव्या दिवशी धई भाताचा काला केला
देव इट्टल शांत झाला
बाई बाराव्या दिवशी वाजे चौघडा दारोदारी
इट्टलरुक्मिनीला केला पोषाक भारी

विठ्ठल-रुक्मिणीच्या निमित्ताने सर्वसामान्य घरात होणारे कौतुक या रीतीने इथे व्यक्त झालेले आहे. न्हाण आले त्यावेळी झालेले कौतुक आताच्या गर्भारशीच्या कौतुकात अधिक भर घालीत आहे, हे दाखविण्याच्या ईर्षेनेच हे गाणे अशा वेळी म्हणत असतात.

डोहाळजेवण हा प्रत्येक पिढीतील स्त्रीचा जीवनात येणारा सदासर्वकाळचा असा एक विलोभनीय सोहळा आहे. त्यामुळे वदलत्या काळाप्रमाणे त्या सोहळ्यानिमित्ताने गायिल्या जाणाऱ्या गाण्यांना नव्या गाण्यांचीही जोड लाभत जाते. अशापैकीच मला सापडलेले डोहाळ्याचे एक गीत असे आहे :

श्रीभवानी मातेने वर हा दिधला म्हणूनिया दिवस हा आला
मज वाटतसे आजपासुनी आपुला भाग्योदय खचितचि आला
तव मुखचंद्र प्रिये अशा या समयाला बहु खिन्न कशाने झाला
तव मनी काय आवडते, तव चित्त कशावरि जडते, जरि असे फार अवघड ते
पुरवीन तरी सांग मला तव चित्ती जे सर्व मनोरथ असती
निज कांतेला डोहाळे अति प्रीती सरदार शहाजी पुसती
म्हणे जिजाई आवड स्वातंत्र्याची मज नको बेडी पारतंत्र्याची
हा विप्रछळ मज पहावेना, पारतंत्र्य मला साहवेना, मृत अन्न गोड लागेना
परदास्याने मिळविलेली संपत्ति मज वाटे केवळ माती
निज कांतेला डोहाळे अति प्रीती सरदार शहाजी पुसती
मज वाटतसे तलवार ढाल घेवोनी निज घोड्यावर बैसोनी
या कामी मरण जरी येई, तरी मला सुखदचि होई, याखेरीज इच्छा नाही

**हे डोहाळे ऐकुनी शहाजी म्हणती** **बाळ हे करिल बहु कीर्ती**
**निज कांतेला डोहाळे अति प्रीती** **सरदार शहाजी पुसती**

महाराष्ट्राला सौभाग्याचे दिवस दाखविणाऱ्या छत्रपती शिवाजीमहाराजांच्या परमपूज्य मातु:श्री जिजाबाई यांचे मनोगत व्यक्त करणारे हे डोहाळे म्हणावयाचे गीत आहे. शिवाजी हा पराक्रमी पुत्र व्हावा म्हणून त्याच्या भाग्यशाली आईने प्रकट केलेली ही इच्छा मराठी मनाला स्फूर्ती देणारी आहे. मराठ्यांच्या इतिहासाची बैठक या गाण्याच्या निमित्ताने समाजापुढे आलेली आहे. मोंगली अमलाचा व सत्तेचा कंटाळा आलेल्या व पारतंत्र्यातून स्वराज्यनिर्मितीकडे धावणाऱ्या जिजाऊच्या मनातील ही भावना हृदयाला जाऊन भिडणारी आहे. पराक्रमी मातेची ही भाषा त्यामुळेच स्त्रियांची आवडीची झाली आहे. माझा मुलगा शिवाजीसारखा पराक्रमी व्हावा असे प्रत्येक स्त्रीला वाटावे, एवढी ईर्षा या गाण्याने निर्माण होते. त्यामुळेच या गाण्याची योजना डोहाळ्यांच्या गीतांत जरूर केली जाते व स्त्रिया आवडीने ते म्हणतातही.

अशा प्रकारची डोहाळ्यांची गीते आणखी पुष्कळ असतील. पण मला जी मिळाली आहेत त्यांचे सौंदर्य असे आहे. गर्भारशीला भरपूर उत्साह देणारी व भावी मुलाचा आदर्श मनासमोर उभा करण्यास समर्थ असलेली ही गीते आहेत. त्यांच्यामध्ये पराक्रम आहे, स्फूर्ती आहे, इतिहास आहे, कौतुक आहे, उत्तेजन आहे, सारे काही आहे. त्यामुळे ज्या त्या घराण्याच्या पद्धतीप्रमाणे सजविलेल्या आसनावर अभिमानाने बसणाऱ्या गर्भारशीला त्यांच्या श्रवणाने निश्चित आनंद होतो. मनातील संकोच नाहीसा करून ती आपल्या भावी मुलाचे चित्र मनासारखे रंगविण्यात गुंगून जाते. आपल्या आवडीच्या पदार्थांचे सेवन करताना अशा वेळी या गीतातील सुंदर आणि मंगल भावनांची पेरणी आपल्या पोटातील बाळाच्या रक्तामध्ये होऊ दे अशी तीव्र इच्छा तिच्या ठायी निर्माण होते ; व त्या आनंदातच ती सर्वांशी खुल्या दिलाने वागून तिच्या एकी होणाऱ्या कौतुकाचे सहर्ष स्वागत करते.

■ ■ ■



# पाळणा (अंगाईगीत)

दर दिवसाकाठचे चोवीस तास व दर वर्षागणिकचे बारा महिने ज्या गोष्टीचा आनंद ओसरत नाही, ती गोष्ट म्हणजे एखाद्या घरात बाळ जन्माला येणे ही होय. स्त्रीजीवनातील हा एक अतिशय आनंदाचा आणि कौतुकाचा प्रसंग आहे. त्यातल्या त्यात मुलीला पहिल्यांदा बाळ होणे ही कल्पना आईच्या मनाला विशेष आनंद देणारी असते. लेकीचे किती कोडकौतुक करावे आणि किती करू नये याच्या सीमारेषा ठरविणे तिच्या आवाक्यावाहेरचे होते. आपल्या मुलीकारणाने घरामध्ये तिच्या वंशाचा दिवा लागला, ही भावनाच तिला पराकोटीचा आनंद मिळवून देते. अशा वेळी जवळचे सारे कौतुक जमा करून घरात आनंदोत्सवाच्या परमोत्कर्षाचा बिंदू ती आपल्या करणीने दाखवू शकते. विशेषतः खेडोपाडी ही भावना अधिक प्रमाणात आविष्कृत केली जात असल्याने मूल जन्मल्या दिवसापासून चौघडा आणि सनई दारात वाजली पाहिजे, दारावर आंब्याच्या डहाळ्या बांधल्या पाहिजेत, कडुलिंबाची आंबोळ बाळंतिणीला पहिले पाच दिवस तरी घडली पाहिजे, पाचव्या दिवशी कुवारणी पुजून सटवाई पुजली गेली पाहिजे, सहाव्या दिवशी सटवाई सोन्याची करून आणून बाळाच्या गळ्यात बांधली पाहिजे आणि पहिले वहिले अंगडे-टोपडे शिवले पाहिजे;

तसेच त्या दिवशी कणकीचे पाच दिवे आणि पाच मुटके करून देवीची तेलवाती पाजळून पूजा केली पाहिजे; दहाव्या दिवशी घर उभे कडवी सारवून व स्वच्छ करून विटाळ संपविला पाहिजे; आणि बाराव्या दिवशी अगर तेराव्या दिवशी मुलगा वा मुलगी असेल त्या बेताने बारसे केले पाहिजे, असे नाना प्रकार घडताना दिसून येतात. शहरामध्ये अलीकडे बाळंतपण दवाखान्यात होत असल्याने हे सारे बंद! शिवाय, सुधारणेच्या काळात जीवनाकडे पहावयाची दृष्टीच बदलत चालली असल्यामुळे तितके त्याचे महत्त्वही कमीच! खेरीज हा घरच्या आर्थिक परिस्थितीचा तसाच हौसेमौजेचाही भाग आहे.

बारशाचा दिवस म्हणजे बाळाच्या जीवनातील अतिशय मानाचा तसाच महत्त्वाचाही प्रसंग. जन्मभर ज्या नावाने जगाला त्याची ओळख पटावयाची त्या नावाचा शिक्कामोर्तब होण्याची ही वेळ, पुन्हा म्हणून त्यात फरक नाही. मात्र मुलगीच असेल तर लग्नाचे वेळी कुठे कुठे तिचे नाव बदलण्यात येते. पण सर्रास तसे नाही. एकदा ठेवले तेच नाव कायम होते. त्यामुळे जन्माच्या वेळेपासून त्याबद्दल चर्चा होते. अशा वेळी दोन्ही घराण्यांतील (सासर व माहेरच्या) मंडळी त्यासाठी आपल्या कल्पनाशक्तीचा विशेष कसोशीने वापर करतात.

जी माणसे हौशी असतात ती बारशाच्या दिवशी आपल्या आनंदाला आलेले उधाण उतू गेलेले पहाण्यातच आनंद मानतात. सवाष्णी बोलावून भल्या पहाटेच चौघडा सनईच्या मंगल सुरावटीत उंबरठ्यावर पाणी ओतावे, त्यांची खणानारळांनी ओटी भरावी, दारावर फुलांचे तोरण बांधावे, सोनार बोलावून बारीक सुईने बाळाचे कान टोचून मंगल घडावे म्हणून त्यावर खोबऱ्याची वाटी मोडावी, सोनाराला सव्वा रुपाया आणि नारळ देऊन त्याचा सन्मान करावा; बाळाला नवे अंगडे-टोपडे आणि कुंची शिवावी, सरी बिंदली आणावी, सासरची माणसे बोलावून त्यांचा मानपान राखावा, शेजारच्या व ओळखीच्या आयाबायांना बोलावून बारशाचा थाट करावा, गव्हाचा चौक मांडून त्यावर बाळबाळंतीण बसू द्यावीत, समया लावाव्यात, निरांजनांनी बाळाला ओवाळावे, शृंगारलेल्या पाळण्यात दोघी सवाष्णींनी पाचदा 'हरपाळ घ्या, गोपाळ द्या,' अशी वेगवेगळी नावे घालून खालीवर करीत बाळाला निजवावे, ठरलेली नावे बाळाच्या आत्याने पाच वेळा (नावरस नावासह) बाळाच्या

कानात कुर्रर्रर्र. . .करीत ठेवताना तिच्या पाठीत इतरांनी गमतीने बुक्क्या मारून तिचे तोंड गोड मिठाईने भरावे; आणि मग बाळाचे नाव ठेवले या भावनेने बाळाला पाळणा म्हणावा, असा प्रकार नाव ठेवण्याचे वेळी चालतो. त्याच वेळी ओळखीची आणि दोन्ही घरची मंडळी बाळंतिणीची ओटी भरतात. हौसेप्रमाणे खण-नारळ, अंगडे-टोपडे व दागदागिन्यांचा आहेर करतात. त्यातूनही पहिला मान सासरचा. दुसरा माहेरचा. बाकीचे सर्व नंतरचे! अखेर शेवटी प्रत्येकाचे आहेराचे मोकळे झालेले ताट पेढ्यांनी वा बर्फीने आणि घुगऱ्यांनी भरून परत द्यावयाचे असते. जमलेल्या बायकांना हळदकुंकू, अत्तर, गुलाब, पानसुपारी दिली म्हणजे मग हा समारंभ संपला असे समजून बायका घरोघरी परततात.

नाव ठेवल्यानंतर यावेळी बाळाला उद्देशून जो पाळणा अगर अंगाई गीत म्हणतात, त्याच्यामागे ही भावना असते की, बाळाच्या कानांवर एव्हापासूनच चांगले शब्द पडावेत, थोर पुरुषांच्या गोष्टी ऐकून बाळ शहाणे व्हायला मदत व्हावी, आपल्या चालीरीतींच्या उल्लेखाने बाळाला नीट वळण लागावे आणि ते चांगले सुसंस्कृत व्हावे. त्यामुळे ह्याच ईर्षेने एकीपेक्षा एकजण येत असलेला पाळणा ठेवणीतला जिन्नस काढावा त्याप्रमाणे गोड गळ्यावर गात असते. ह्या पाळण्यांच्या चाली गोड असतात. बाळाला त्या ऐकता ऐकता झोप यावी आणि ते सुखात रहावे हाच त्या स्वरविलासामागचा हेतूही असतो. बहुधा हे पाळणे एकमेकींच्याकडून ऐकूनच 'ध्यानात' धरलेले असतात. त्याकारणाने ते नेमके किती जुने असावेत हे सांगणे कठीण आहे. तथापि त्यांच्या अंतरंगावरूनच त्यांचा जुनेपणा नजरेत भरतो. खेड्यामध्ये बहुतेक सर्वत्र म्हटला जाणारा लोकप्रिय पाळणा असा आहे :

**पहिल्या मासी पैला मासुळा । गर्भनारीचा रंग पिवळा ।**
**पिंड घडवतो हरी सावळा । जू बाळा जू जू रे जू ।।**
**दुसऱ्या मासी पदर बंद । हिरव्या चोळीवर काढीला चांद ।**
**मायबापाला झाला आनंद । जू बाळा जू जू रे जू ।।**
**तिसऱ्या मासी कंताला ठावं । हळदीकुंकवा लल्लाटी ल्यावं ।**
**वटी भरूनी खोबरं घ्यावं । जू बाळा जू जू रे जू ।।**

चवथ्या मासी कुसवा चढं । अन्नपाणी तिला लागंना गोड ।
पिकल्या पानांचं बांदावं विडं । जू बाळा जू जू रे जू ।।
पाचव्या मासी पाच फेरानं । बाळ देवीला जातं शरन ।
सांडले मोती घ्यावे भरून । जू बाळा जू जू रे जू ।।
सहाव्या मासी सायास करिते । चोळी पातळ इच्छा पुरवीते ।
पोटी पुत्र मी मागून घेते । जू बाळा जू जू रे जू ।।
सातव्या मासी नवस केला । खेळणा पाळणा वाहीन तुला ।
सोन्याची घुंगरं वाहीन तुला । जू बाळा जू जू रे जू ।।
आठव्या मासी आठवी प्रीती । पंचारती घेऊन देवीला जाती ।
बाळाचा नवस फेडूनी येती । जू बाळा जू जू रे जू ।।
नवव्या मासी हुरदं दुखती । दाईला बोलावून आणा म्हणती ।
पोलादी इळा दाईच्या हाती । कडू लिंबाचा काडा पाजीती ।
जू बाळा जू जू रे जू ।।
दहाव्या मासी जायफळ सोळा । बाळाच्या मुखात अफूचा गोळा ।
बाळा लागलाय कलीचा वारा । जू बाळा जू जू रे जू ।।
आकराव्या मासी म्हायारी जाती । अंगडं टोपडं घेऊनी येती ।
पुत्र जन्मानं इच्छा पुरवीती । जू बाळा जू जू रे जू ।।
बाराव्या मासी बारसं करीती । थोरामोठ्यांना आवातनं देती ।
पोथीपुस्तक वाचून पहाती । बाळाचं नाव गोविंद ठेवीती ।
जू बाळा जू जू रे जू ।।

या पाळण्यात बाई गरोदर राहिल्यापासून तो ती बाळंतीण होऊन मुलाचे नाव ठेवीपर्यंत काय काय चालते याचे मोठे सुंदर चित्रण आलेले आहे. वास्तविक यामध्ये डोहाळ्यांचाही उल्लेख आहे. त्यामुळे कुणी कुणी याला डोहाळ्याचे गाणेही समजतात. पण पाळणा म्हणूनच हे गीत अधिक लोकप्रिय आहे. पोटातील बाळाची वाढ उत्तम रीतीने व्हावी, म्हणून गर्भारशीचे कोडकौतुक कसकसे पुरविले जाते, हे सांगताना गरोदरपणाची छटा पहिल्यांदा चेहऱ्यावर दिसताच देव बाळाला घडवितो आहे, तेव्हा तू सुखाने ऐस, असे गर्भारशीला सूचित केले गेले आहे. नंतर हिरव्या चोळीवर चंद्राची नळी काढून आणि

खोबऱ्याने ओटी भरून तिला कुंकू लावावयाचे, उलट्या होत असतील तर पानाचे विडे खावयाची सूचना करायची, तिच्यासाठी नवी साडी चोळी आणायची, देवीला नमस्कार करावयाचा, पोटी पुत्र मागून घ्यावयाचा, देवीला खेळणापाळणा बांधीन म्हणून नवस करायचा, नवस फेडण्यासाठी सोन्याच्या घुंगुरांची तयारी करून पुन्हा देवीला जावयाचे, दाई बोलावून बाळंतपण करावयाचे, नाळ कापायला म्हणून आणलेल्या तिच्या हातातील पोलादी विळ्याला साफसूफ करून ठेवायचे, बाळ झाल्यावर त्याचेसाठी ते रडू नये म्हणून अफू आणायची, कलियुगातील बाळ फार दंगा करते म्हणून तक्रार करावयाची, माहेरचे अंगडे-टोपडे बाळाला आणावयाचे, थोरामोठ्यांना बोलावून त्याची पत्रिका बघावयाची आणि मग त्याचे नाव ठेवावयाचे अशी ह्या पाळण्यात क्रमाक्रमाने आलेली कल्पना त्या वेळेच्या जुन्या काळातील चालीरीतींचे दिग्दर्शन करते. त्याचप्रमाणे अगदी वेचक अशा शब्दांनी या कल्पनेची गुंफण झाल्याकारणाने ती मोठी हृद्यही झाली आहे यात शंका नाही.

**पहिल्या दिवशी जन्मले बाळ । कळस सोनीयाचा देतो ड्हाळ । पडला उजेड तिनी त्रिकाळ । दिपली नेत्रं दोनी प्रेमळ । करी भक्तांचा प्रतीयापाळ । किष्ण जन्मला बंदीया शाळं । जो बाळा जो जो जो ।।**

**दुसऱ्या दिवशी दुसरा रंग । रूप सावळं बाई गोरं हे अंग । जसं झळकतं ग आरशाचं भिंग । येती गवळणी बाळाच्या संगं । नारी पद्मीनी झाल्या त्या दंग । यशवदा फेकिती किष्णावर रंग । जो बाळा जो जो जो ।।**

**तिसऱ्या दिवशी आनंद मोठा । सीता सावित्री बायानू उठा । खारीक खोबरं साखर वाटा । धर्म केलाया धा वीस पेठा । आयेव नारीचा आयोर लुटा । जो बाळा जो जो जो ।।**

**चवथ्या दिवशी बोलली बाळी । अनूसयाची वाजली टाळी । किष्ण जन्मला यमुना तळी । सोन्याची दोरी पाळण्या बांधिली । जो बाळा जो जो जो ।।**

**पाचव्या दिवशी पाचवीचा राडा । रानसटवीनं वेडीला वाडा । येश्वदा मातेचा जीव झाला थोडा । लिंबू नारळ देवाला फोडा । तान्ही वासरं गाईला सोडा । तान्ह्या बाळाची दिष्ट ग काडा । जो बाळा जो जो जो ।।**

**सहाव्या दिवशी कळीचा वारा । बाळ जन्मला फुलांचा गजरा । जशी मोत्यांनी गुंफावी तारा । राधा किष्णाला घालीती वारा । चल येश्वदा अपुल्या घरा । जो बाळा जो जो जो ।।**

**सातव्या दिवशी सातवीचा म्हाल । मधी चांदणं पडलं गोल । चहू बाजूंला तोरण हालं । सोनेरी मंडप घातीला लाल । किष्ण मांडीवर येश्वदा डुलं । जो बाळा जो जो जो ।।**

**आठव्या दिवशी आठवीचा थाट । भुलल्या गौळणी तीनशे साठ । चुकूनी गेलीया पाण्याची वाट । मोहिनी टाकीली धा वीस पेठ । ताकाचे डेरे फोडीलं चट । श्रीकिष्णाची पहाती वाट । जो बाळा जो जो जो ।।**

**नवव्या दिवशी नवतीचा फंद । तान्ह्या बाळानं बाई घेतला छंद । वसुदेवाचे सोडीले बंद । जो बाळा जो जो जो ।।**

**दहाव्या दिवशी दहावीची रात । तेहतीस कोटी देव मिळून येत । मुखी त्यांच्या ग चंदनज्योत । उतरून टाकीती माणीक पोत । जो बाळा जो जो जो ।।**

**अकराव्या दिवशी नारद बोले । देवा तुम्ही किती झोप वो घ्याल । श्रीकिष्णाचे ग पताक लाल । जो बाळा जो जो जो ।।**

**बाराव्या दिवशी जमल्या नारी । पाळणा बांधिला येश्वदे घरी । त्याला बांधिली रेशमी दोरी । जो जो म्हनीत हालवीती नारी । पाळणा गायिला नानाया परी । बाळाचे नाव ठेवीले हरी । जो बाळा जो जो जो ।।**

जुन्या कथापुराणांमधून उचललेल्या आणि कुणी तरी कथाकीर्तनांतून सांगितलेल्या भगवान श्रीकृष्णाच्या गोष्टी ऐकून त्या मनात उरल्या तेवढ्यावर आधारलेला हा पाळणा आहे. बाळ जन्मल्यापासून बारसे होईपर्यंत काय काय घडामोड झाली ती इथे दिली आहे. श्रीकृष्णासारखे बाळ जन्माला यावयाचे आणि त्याच्या बाळलीला वर्णन करावयाच्या म्हणजे मोठी भाग्याची गोष्ट. उभ्या गोकुळाची जणू ही तारीफ ! डोळे दिपून जातील अशा प्रकारचे रूप घेऊन आलेला चिमुकला कृष्ण, त्याचा जन्म झालेली बंदिशाळा, त्याच्या जन्मामुळे गौळणींची उडालेली धांदल, यशोदेला झालेला आनंद, दहावीस पेठा असणाऱ्या गावात वाटलेली साखर, रानसटवीच्यामुळे यशोदेचा झालेला कावरावावरा

जीव आणि ती शंका दूर करावी म्हणून उतरलेले लिंबलोण, यशोदेच्या घरचे वैभव, कृष्णाने आपल्या पराक्रमाने वडिलांची केलेली मुक्तता, त्यामुळे देवादिकांचे धरणीवर झालेले आगमन, नारदाची भाषा, बाराव्या दिवसाचा थाट आणि 'हरी' म्हणून ठेविलेले नाव इत्यादी या पाळण्यातील हकिगत भाविक मनाला वेड लावणारी आहे. हा पाळणा गावयाचा म्हणजे आपला बाळ कृष्णासारखा पराक्रमी होऊ दे म्हणून अंतरीची इच्छा या निमित्ताने प्रकट करावयाची. भगवान श्रीकृष्ण म्हणजे मोठे दैवत. गीता सांगितलेला महापुरुष. त्याचे गुणगान करावे तेवढे थोडेच. त्यामुळे त्याच्या निमित्ताने गायिलेले पाळणेही अनेक सापडतात.

**बाळा श्रीकृष्णा, देवकिच्या नंदना ।**
**बाळा जू जू रे ।।**
**व्हतास कैलासी, अल्लक नीरंजना ।**
**बाळा जू जू रे ।।**
**आलास अवतारी, कौसल्येच्या उदरी ।**
**करीशी पालना, सुखी करावे जना ।**
**बाळा जू जू रे ।।**
**येऊनी रामानी सोडीले बंधना ।**
**येउदी हटेना, ऋषी करी वंदना ।**
**बाळा जू जू रे ।।**
**राम जन्मले, न्हाई कुनी वळकोले ।**
**कुनाला कळेना, वसीष्ट जाने खुना ।**
**बाळा जू जू रे ।।**
**कौसल्येच्या गर्बात, आठ वर्साची मूर्तना ।**
**घालसी धिंगाना, कुठं आहे रावना ।**
**बाळा जू जू रे ।।**
**अवतार निर्गून, उडवो रावनाची मान ।**
**मारीला कुंबकर्न, राज दिले बिभीसैन ।**
**बाळा जू जू रे ।।**

आनंद अवघ्याला, तेतीस कोटी देवाला ।
इंद्र करी गायना, नारद वाजवी वीना ।
बाळा जू जू रे ।।
राम बोध झाला, कीरीत भावना ।
खून दिली पुरं ना, काय करावे कळेना ।
बाळा जू जू रे ।।
दिवस सोमवारी, लावून ज्ञानाची दोरी ।
केले पालना, सुखी ठेविले जना ।
बाळा जू जू रे ।।

या पाळण्यात कृष्णानेच पुढे रामाचा अवतार घेऊन या जगावर पराक्रम गाजविल्याची हकिगत आली आहे. कृष्णासारखाच रामही सर्वांचा आवडता. त्याकारणाने त्याचेही अमाप कौतुक. त्याच्यासंबंधी बोलावे तेवढे थोडेच. जणू बोलण्याने बोलणे लांबत जावे तशी तऱ्हा ! तरी पण अगदी वेचक शब्दांत आणि थोडक्यात रामाच्या कर्तबगारीची कीर्ती इथे सांगितलेली आहे. कौसल्येच्या उदरी रामाने घेतलेला जन्म, वसिष्ठ ऋषींना त्याची पटलेली खूण, रामरावणांची लढाई, कुंभकर्णाला मारून विभीषणाला केलेली मदत, देवादिकांना झालेला आनंद, नारदाचे वीणावादन, रामाची अवर्णनीय कीर्ती, ज्ञानाची दोरी पाळण्याला बांधून त्याने केलेले सर्वांचे पालनपोषण इत्यादी गोष्टी इथे मोठ्या खुबीने एकत्र गोविलेल्या आहेत. विशेषत: अखेरीस ज्ञानाची दोरी लावून रक्षण करण्याची जी कल्पना इथे व्यक्त झालेली आहे ती मोठी सुंदर आहे, काव्यमय आहे.

जो जो रे जो जो श्रीकृष्ण बाळा । पालखी निद्रा करी घननीळा ।
जो जो रे जो जो जो ।।
श्रावणमासी कृष्णाष्टमीसी । देवकीकुशी येशी जन्मासी ।
जो जो रे जो जो जो ।।
कंस भये तो वसुदेव बाळा । नेऊनी गोकुळी ठेवी तयाला ।
जो जो रे जो जो जो ।।
मध मुखी घालुनी मधुसूदनाशी । नंद बघे निजसुत वदनासी ।
जो जो रे जो जो जो ।।

गर्ग मुनींनी जातक केले । दुसऱ्या दिवशी हेलकरी आले ।
जो जो रे जो जो जो ।।
तिसरे दिवशी माय उसंगा । घेउनी पान्हा पाजी श्रीरंगा ।
जो जो रे जो जो जो ।।
चवथे दिवशी साखर पेढे । वाटिले नगरी बहु भरूनी गाडे ।
जो जो रे जो जो जो ।।
पाचवे दिवशी पंचमी पूजा । बाळबाळंतीण रक्षाबळी जा ।
जो जो रे जो जो जो ।।
सहावे दिवशी सटवीचा फेरा । लिहीतसे भाळी गोरस चारा ।
जो जो रे जो जो जो ।।
सातवे दिवशी ये सप्तऋषी । रक्षा बंधने बांधिती खाशी ।
जो जो रे जो जो जो ।।
आठवे दिवशी आठवी वाणे । दिधली नंदाने गो-भू-दाने ।
जो जो रे जो जो जो ।।
नववे दिवशी नौबत वाजे । हेलकऱ्या इनाम दिले नंद राजे ।
जो जो रे जो जो जो ।।
दहावे दिवशी तिमण करा । सुईणीची मोत्याने ओटी भरा ।
जो जो रे जो जो जो ।।
ऋतूवती नारी बळीराणा घेती । त्यायोगे त्यांना होत संतती ।
जो जो रे जो जो जो ।।
बारावे दिवशी बारसे झाले । परब्रह्म श्रीकृष्ण पालखी निजले ।
जो जो रे जो जो जो ।।
वर्णन करीती हरि नामाकारणं । उद्धरी धरीती कृष्णचरण ।
जो जो रे जो जो जो ।।

या पाळण्यामध्ये श्रावणात येणाऱ्या जन्माष्टमीच्या निमित्ताने त्या वेळच्या चालरीतीप्रमाणे भगवान श्रीकृष्णाची हकिगत सांगितलेली आहे. कृष्णासारख्या देवाचा जरी हा पाळणा असला तरी सामान्य माणसाप्रमाणे सर्व रीतरिवाज आणि शंकाकुशंकाही यशोदेच्या--मातेच्या--भावनेतून प्रकट

झालेल्या आहेत. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणे नंदराजाने दिलेल्या इनामाचाही इथे गौरवपूर्ण उल्लेख आलेला आहे.

**जो जो रे जो जो श्रीरामचंद्रा । दशरथपुत्रा लागूंदे निद्रा ।। ध्रु० ।। केवळ कांचनी-पाळणा आणिला । तुजसाठी बाळा रेशमी विणिला ।। १ ।। खूर रुप्याचे चहुबाजूंना । हंतरीलासे आत बिछाना ।। २ ।। भर्जरी चांदवा रेशमी शेला । चिमण्या मोत्यांची झालर त्याला ।। ३ ।। हंस कोकीळ ते इंद्रनीळाचे । बसवीले शुक मोर पोवळ्यांचे ।। ४ ।। हालवी कौसल्या दशरथ बाळा । वंदिले कृष्णा त्या विश्वपाळा ।। ५ ।।**

श्रीप्रभुरामचंद्र यांचा हा पाळणा आहे. रामनवमीच्या निमित्ताने तो म्हटला जातो. पण आपल्या मुलांनाही हा पाळणा बायका नेहमी म्हणतात. आपला मुलगा रामासारखा व्हावा ही त्यामागची भावना असते. अतिशय भाविक स्त्रीला आपल्या पोटी रामानेच जन्म घेतला आहे या कल्पनेने या पाळण्याचे विशेष कौतुक वाटते. या पाळण्यात वैभवशाली रामाच्या पाळण्याची व अंथरुणाची कशी व्यवस्था असे एवढाच उल्लेख आलेला आहे. हे वैभव त्या वेळच्या जुन्या काळच्या सामाजिक स्वास्थ्याचे निदर्शक ठरेल असे म्हटल्यास वावगे होणार नाही. राजाच्या घरी आपल्या मुलाचे कौतुक कसे करीत, त्याचा हा एक मासलेवाईक नमुना आहे.

**जो जो जो ग वेल्हाळ । करि निद्रा गुणी बाळा जो जो जो ग ।। कन्यारत्न ही जन्मली । बहु सुकृत चांगली । ऋषीने शोधुनिया पाहिली । शुद्धमती गायिली । जो जो जो ग ।। पालक चंदनसा कातियला । रंगवुनी तयार केला । खिडक्या कंगूरे हिरे मोती त्याला । गोफ चहूबाजूला । आणुनी मंदिरी बांधियला । वरी चांदवा दिला । वाजंत्री वाजती सदरेला । भिमक संतोषला । जो जो जो ग ।। कुंच कुंचली चढवुनी । घडवुनी बाळ लेणी । सखया येताती घेवोनी । शुद्ध ओटी भरुनी । नाव ठेविले रुक्मिणी । गूळपान वाटोनी । जो जो जो ग ।।**

या ठिकाणी मुलगी झाली असता खास म्हटलेला पाळणा दिलेला आहे. मुलगी झाली म्हणजे भीमक राजाला झालेला आनंद आपल्याला व्हावा आणि तिचे नाव रुक्मिणी ठेवावे अशी अपेक्षा इथे व्यक्त झाली आहे. तसेच तिच्या सुसंस्कृतते-बद्दलचाही उल्लेख इथे आलेला असून बाकीचे वर्णन इतर पाळण्यांच्यामध्ये

आलेल्या ऐश्वर्याच्या वर्णनासारखेच आहे. हा पाळणा तसा फार लहान आहे. कदाचित मुलीचाच तो आहे तेव्हा अधिक लांबड कशाला, अशी ती रचणाराची भूमिका असणे शक्य आहे !

**काय ही जमीन । त्यात वाढले तन । जावे सद्गुरुपाशी शरन । बाळा जू जू र ।। एक नांगर । कोरीला डोंगर । आधार मंत्राचा । दोरा पतंगीचा । बाळा जू जू र ।। दोर धरून । खेळू अवघेजन । दोहींचे खंडान । नांगरली जमीन । बाळा जू जू र ।। वज करू जमिनीची । कुरपा सद्गुरुची । झाली पेरनी । आली उगवूनी । बाळा जू जू र ।। करून राखान । सत्त्वाची गोफन । मन भावे धरून । पिकाची राखान । बाळा जू जू र ।। तिवडा रवीला । चार वेद जुंपिले । झालं मळण । वारा सुटं मंजुळ । भक्तिरस परिमळ । झाली आवड । करू या चडाओडा । बाळा जू जू र ।। गाड्या भरून । उरली आक्षारं दोन । माज्या सद्गुरूंनी जडीलं जडान । पहावं वाचून । बाळा जू जू र ।।**

हा पाळणा इतर पाळण्यांच्यापेक्षा अगदी निराळा आहे. खास शेतकरी कुटुंबांतील पण शहाण्या व्यक्तीने तो रचला असावा, असा त्याचा येथून तेथून सगळा तोंडवळा आहे. आपल्या जमिनीची निगा कशी राखावी याची कल्पना इथे बाळाच्या कानावर घातली गेली आहे ! जुन्या काळच्या एकत्र कुटुंबामधील ही भावना आहे. देवाला शरण जाऊन जमिनीची निगा राखली पाहिजे असा याचा आशय आहे. जमिनीमध्ये तण वाढू नयेत, डोंगर पोखरणाऱ्या नांगराने देवाचे नाव घेत ती नांगरावी, मतभेद नाहीसे करून जमिनीची वज राखून पेरणी करावी, सत्त्वाची गोफण करून आलेले पीक राखावे, मनापासून जमिनीची काळजी घ्यावी, तिवडा रोविला असता त्याला जुंपले जाणारे बैल हे वेदासारखे पवित्र मानून मळणी करावी, वाऱ्याच्या झुळुकीने धान्य स्वच्छ करावे, ही झुळूक म्हणजे देवाची भक्ती मानावी, गाड्या भरून धान्य घरी नेताना उरलेसुरले देवाचे म्हणणे मानून ते वाचून पहायचा प्रयत्न करीत अंग मोडून काम करावे, असा या पाळण्याचा एकंदर आशय आहे. खऱ्या शेतकऱ्याने आपले काम कसे करावे त्याचे हे उत्तम मार्गदर्शन आहे व बोधचिन्हही आहे. मात्र या पाळण्याची मर्यादा फक्त शेतकरी कुटुंबाइतकीच सीमारेषित झाली असावी ! इतरांना त्यात विशेष उत्सुकता नाही ! ज्यांना ध्वनिकाव्याची आवड असेल ते कदाचित

जमीन म्हणजे आपला देह असे समजून हा पाळणा म्हणत असतील. ते माझ्या ऐकिवात मात्र अद्याप आलेले नाही! पण हा भाग अगदीच विरळा.

मथुरेमध्ये अवतार झाला । देव कृष्णजी जन्मासि आला । तोडुनी बेडी बंदी सोडिले । चरणाच्या प्रतापी मार्गी लागले । जो बाळा जो जो रे जो ।।

गोकुळी मध्यान्हि देवजी आले । नंदाच्या घरी आनंद ल्याले । गुड्या तोरण शीघ्र लावीले । गगनी देवपुष्प नाचले । जो बाळा जो जो रे जो ।।

तिसऱ्या दिवशी वाजंत्री वाजे । नैवेद्या गर्जे कर्णाचे नादे । ऊठ ऊठ छंद ना गोविंद । जो बाळा जो जो रे जो ।।

चवथ्या दिवशी सटवाईची चौकी । लिंब डाळींब नारळ आणीतो । सगळ्या मिळूनी जिवत्या काढीती । जो बाळा जो जो रे जो ।।

पाचव्या दिवशी पाटा पूजन । बांधिली फुलवरा वाटचा तोरण । सर्व साखळी टोपडं अंगडं । जो बाळा जो जो रे जो ।।

सहाव्या दिवशी सटवीचा फेरा । गोपा बाळासी आवरून धरा । रात्रीच्या वेळी लावा अंगारा । जो बाळा जो जो रे जो ।।

सातव्या दिवशी श्रावणी पूजन । हळदीकुंकवाचे वाण करीन । पान सुपाऱ्या सर्व्या वाटीन । जो बाळा जो जो रे जो ।।

आठव्या दिवशी आठवी चिंतीते । गोपा बाळाला नववी शिणीते । सुइणी घेऊनी जाग्रण करीते । जो बाळा जो जो रे जो ।।

दहाव्या दिवशी बळी राजा पूजीती । नगरच्या नारी धाऊनी येती । गोपाच्या जोडीला बळीराणा घेती । जो बाळा जो जो रे जो ।।

बाराव्या दिवशी बारसं करीती । पक्वान्नाचा सारा थाट उडवीती । लाडू बर्फीनी ताटं भरीती । जो बाळा जो जो रे जो ।।

पुत्र जन्मला देखोनि नयनी । हिरा शोभला जैसा कोंदणी । पूर्वेचा चंद्र जातो अस्मानी । त्याला देखूनी लज्जित मनी । जो बाळा जो जो रे जो ।।

रत्नजडित पिंपळपान शोभते भाळी । नयनाच्या कोरा काजळ घाली । दंडी बाजूबंद मुद्रिका करी । पायीचे तोडे पैंजण वरी । वाळ्याचा नाद उमटतो दारी । सोन्याचा दाब कमरेच्या वरी । मोत्यांची कंठी त्यावर सरी । यशोदा बैसली मंचकावरी । नाव ठेवीले परब्रह्म हरी । जो बाळा जो जो रे जो ।।

मागे दिलेल्या कृष्णाच्या पाळण्यासारखाच हा पाळणा आहे. परंतु याचे अंतरंग थोडे निराळे आहे. प्रत्यक्ष कृष्णजन्माच्या वेळची त्या घरची धांदल, गडबड लक्षात घेऊन इथे वर्णन केलेले आहे. कृष्णदेव जन्माला आले आणि लोक बंधमुक्त झाले, तसेच नंदाच्या घरचा हा आनंद बघून गोकुळात घरोघरी गुढ्यातोरणे उभारली गेली, हा या पाळण्यातील सुरुवातीचा प्रसंग त्या वेळच्या सामाजिक जीवनाची कल्पना देत आहे. त्याचप्रमाणे कोंदणात शोभणाऱ्या हिऱ्यासारखा तेजस्वी मुलगा जन्माला आल्यामुळे पूर्वेचा चंद्रदेखील पडदानशीन झाला, ही अभिमानाने व कौतुकानेही व्यक्त केलेली भावना दृष्ट लागण्यासारखी आहे ! बाकीचे सर्व वर्णन वैभव आणि चालरीत दर्शविणारे आहे. मुलाच्या अंगावर बारशाच्या वेळी घातल्या जाणाऱ्या दागिन्यांची—रत्नजडित पिंपळपान, बाजूबंद, मुद्रिका, तोडे, पैंजण, वाळे, सोन्याचा दाव, मोत्यांची कंठी, सरी इ.—ही नोंदही जुन्या काळच्या हौसेचे प्रतीक म्हणून पहाण्यासारखी आहे. सामान्य माणसे घर चंद्रमौळी असले आणि अठरा विश्वे दारिद्र्य भोवती नाचत असले, तरी हा पाळणा म्हणताना दिसतात, त्यावेळी त्यांच्या चेहऱ्यावर विलसणारा आनंद पाळण्यातील कल्पनांना फिक्का पाडील एवढ्या दिमाखाने पहाणारांच्या नजरेत भरतो !

पूर्वीच्या काळी आणि गेल्या पाचपन्नास वर्षांतही आपल्याकडे कोकेवाले आणि गोंधळी रस्त्यावर भिक्षा मागत फिरताना पाळणे म्हणत असत. त्यामुळे बारशाच्या वेळी ऐकू येणारे पाळणे इतर वेळीही ऐकायला मिळायची संधी सापडे. अजूनही कुठे कुठे खेड्यामध्ये असे पाळणे ऐकायला मिळतात ! परंतु त्या पाळण्यांची सुरावट आणि साजशिणगार तोच असला तरी अंतरंग मात्र कालमानाप्रमाणे आता बदललेले दिसून येते. तथापि देशकालपरिस्थितीप्रमाणे हा फरक पडणे स्वाभाविकही आहे.

महाराष्ट्रामध्ये लोकप्रिय झालेला एक अलीकडचा पाळणा असा आहे :

**सन आठराशे सत्याण्णव सालात । आनंद झाला करविर शहरात । पहिल्या शुक्रवारी श्रावण महिन्यात । चंद्र उगवला लक्ष्मी महालात । पुत्र जाहला शाहू राजास । जू बाळा जू जू जू ॥**

**शाहूच्या गादीला चढलं भूषण । आनंद झाला पुत्र पाहून । करूनी सत्कार बाळावरून । वाटीती पेढे मानाप्रमाणं । जू बाळा जू जू जू ॥**

शाहू राजाची पुण्याई थोर । गुडचा उभारूनि होई तोफेचा भार । अ
झाला होतो गजर । पानसुपारी वाटा साखर । जू बाळा जू जू जू ।।

बिजलीच्या बत्तीचा प्रकाश भारी । लखलखला राजमंदिरी । पाहून
झाल्या नगरच्या नारी । आणूनी ओतीती पाण्याच्या घागरी । खणा नारळ
ओटचा सावरी । जू बाळा जू जू जू ।।

दोनी हिरकण्यावरती जन्मला हिरा । मोठमोठ्या शहरी पाठवल्या तार
बंदी कैद्यांच्या फोडल्या मोहरा । जागोजागी निशाण उडे फरारा । जू ब
जू जू जू ।।

पहिल्या दिवशी पहिला मजकूर । दुसऱ्या दिवशी दुसरा प्रकार । हत्तीवर
वाटी साखर । घोडे कोतवाल जीलभेरी म्होरं । रुणझुण बाजा वाजे सुंद
जू बाळा जू जू जू ।।

तिसऱ्या दिवशी त्रिभुवन येती । दत्ताची छाया बालकावरती । आप
नावाची गर्जना करिती । करूनी शिणगार ओवाळी आरती । जू बाळा जू जू रे जू

चवथ्या दिवशी चंद्र पुनवेचा । गजानन महाराज आला द्वारकेचा । खे
होता कृष्ण कृष्ण गोकुळिचा । प्रकाश पडला म्हाली सूर्याचा । जू बाळा जू
रे जू ।।

पाचव्या दिवशी सटवीचं येणं । तिला आज्ञा केली परमेश्वरानं । लिहि
अक्षरं आपल्या हातानं । सुवर्णाची पूजा होई सन्मान । हळदीकुंकू घेऊन नगर
जाणं । जू बाळा जू जू रे जू ।।

सहाव्या दिवशी साव्वा उल्लास । सडासारवान केलं वाड्यास । तेल सुवासि
लावी अंगास । पाणी घालीती तान्या बाळास । जू बाळा जू जू रे जू ।।

सातव्या दिवशी साती अप्सरा । गुप्त रीतीने घालीती फेरा । लिंबू ना
टाका उतारा । पाणी घालीती सख्या सुंदरा । दिष्ट काढूनी लावा अंगारा
जू बाळा जू जू रे जू ।।

आठव्या दिवशी आठवा आनंद । पोटी जन्मला बाळ गोविंद । हार पुष्पां
सोडीतो गंध । तेलाचा वास करी नगरा धुंद । जू बाळा जू जू रे जू ।।

नवव्या दिवशी नवस केला । खेळणा पाळणा वाहीन तुला । कृष्ण बाळ ब
लाभू दे मला । जू बाळा जू जू रे जू ।।

**अकराव्या दिवशी अकरावी पूजा । दारी आली उभी सारजा । अंगणी वाजला नवीन बाजा । जू बाळा जू जू रे जू ।।**

**बाराव्या दिवशी आले बारशाला । सोन्याचा पाळणा मोत्यांनी विणला । अंगडं टोपडं किनखापी त्येला । हिरे जोडीले पिंपळपानाला । शाहूच्या गादीला प्रभु नीजला । राजाराम नाव जाहीर सर्वांला । जू बाळा जू जू रे जू ।।**

कोल्हापूरच्या शाहू महाराजांना मुलगा झाला त्या वेळच्या प्रसंगाचे या पाळण्यात वर्णन आलेले आहे. हा पाळणा मला मिळाला तसा मी इथे दिला आहे. कदाचित त्यातला काही भाग इतर कोणी म्हणत असतील त्या मानाने कमी-जास्तही असणे शक्य आहे. तथापि आहे तेवढ्यावरूनही कोल्हापूरच्या गादीला वारस मिळाला म्हणून राजघराण्याप्रमाणेच उभ्या राजधानीलादेखील झालेला आनंद कोणत्या प्रकारचा असला पाहिजे हे स्पष्ट दिसून येते. या पाळण्यामध्ये आलेली सटवाईकडून लिहिल्या जाणाऱ्या भविष्याच्या अक्षरांची कल्पना सामान्य लोकांच्यामध्ये सर्रास बोलून दाखविली जाणारी आहे. हा पाळणा मुळात कोणीही रचला असला तरी सर्वसामान्य स्त्री-मनातील तो भावनाविष्कार आहे हे या पाळण्यातील वर्णनावरून दिसून येईल.

कोकेवाल्याकडून मला मिळालेला आणखी एक पाळणा असा आहे:

**पहिल्या दिवशी आनंद झाला । मोत्या पवळ्यांनी धर्म वो केला । हत्तीवरी ती अंबारी घाला । जू जू रे जू जू जू ।।**

**दुसऱ्या दिवशी खांदली न्हाणी । पाणी घालीती बारा बारा जणी । पुत्र राज्याला झाला या धनी । जू जू रे जू जू जू ।।**

**तिसऱ्या दिवशी तिसरडं करिती । हाती सोन्याची आरती घेती । घडोघडीला शरण जाती । हरिनामाची पूजा करिती । जू जू रे जू जू जू ।।**

**चवथ्या दिवशी डाग घडविती । वाक्या बिंदल्या बाळा आणीती । कानीचा डूल वाकी घडविती । आपुल्या घरी सोनार बोलावीती । जू जू रे जू जू जू ।।**

**पाचव्या दिवशी वाजली घंटा । बळिराम बसले चांदीच्या पाटा । आनंद झाला पंचांग वाटा । जू जू रे जू जू जू ।।**

**सहाव्या दिवशी करिती सहावं । येण्या जाण्याला असावा भाव । मायबापांचं राखावं नाव । जू जू रे जू जू जू ।।**

**सातव्या दिवशी सटवीचा फेरा । अक्षरं पाडिती सखी सुंदरा । तेत्तीस कोटी देवा मारी हाकारा । जू जू रे जू जू जू ।।**

**आठव्या दिवशी आठवी चौकी ती । गोपा बाळाला न्हाऊ घालीती । तान्या बाळाची नवती खुलती । सख्या जमुनी जागृत करीती । जू जू रे जू जू जू ।।**

**नवव्या दिवशीचा बाळ ग राजा । दहा खंडीचा होईल राजा । चंद्र सूर्याच्या लावील तेजा । धन्य माऊली पुत्र ग तुजा । जू जू रे जू जू जू ।।**

**दहाव्या दिवशीचा माझा ग बाळ । बाई वंशाला आलंया फळ । मायबापांला क्षेत्र दावील । जू जू रे जू जू जू ।।**

**अकराव्या दिवशी अकरावा थाट । उदबत्त्या लावील्या तीनशेसाठ । सडा रांगूळी केलीया दाट । बाळ खेळला सारंग पाट । जू जू रे जू जू जू ।।**

**बाराव्या दिवशी बारसं करिती । गोरगरीबा आवातनं देती । थोरामोठ्यांचे आहेर येती । हौसेनं नाव श्रीकृष्ण ठेविती । जू जू रे जू जू जू ।।**

**तेराव्या दिवशी पाळणा बांधीला । मोत्या पवळ्यांच्या झालरी त्याला । माय बापांनी झोका ग दिला । नऊ महिन्यांचा शीण तो गेला । जू जू रे जू जू जू ।।**

अगदी सामान्य माणसाच्या घरातील ही भावना आहे. बाळ जन्मल्यापासून त्याचे बारसे होईपर्यंत जे जे सोपस्कार होतात त्या सर्वांचा इथे उल्लेख आलेला आहे. अगदी साध्याच पण मोजक्या शब्दांनी हा पाळणा नटलेला आहे. बाळ जन्माला आले म्हणून मोत्या पवळ्यांनी दानधर्म करायचा, हत्तीवरून घरोघर ही बातमी पोचवायची, न्हाणी खांदून काढावयाची, बारा सवाष्णींनी बाळाला न्हाऊ घालायचे, देवाचे नामस्मरण करून बाळाला आयुष्य मागावयाचे, बाळाला दागदागिने घडवायचे, पंचांग वाचायचे, नातेगोते जोडायचे, सटवीची पूजा करायची, बाळाला दहा खंडीचा राजा हो म्हणून आशीर्वाद द्यावयाचा, बाळाने तीर्थक्षेत्र दाखविले या भावनेने आनंद मानावयाचा, उदवत्त्यांचा सुगंध दरवळू देऊन आणि सडारांगोळी घालून घर नटवावयाचे, बारशाला गोरगरिबांना व श्रीमंतांना बोलावून बाळाचे नाव ठेवायचे वगैरे ह्या पाळण्यातील कल्पना अतिशय सुसंस्कृत आणि जुन्या घराण्याला शोभतील अशा आहेत. आईवडिलांनी बाळाला झोका देताना जो अखेरीस आनंद उपभोगला, तो नऊ महिन्यांचा आलेला शीण घालवणारा ठरला, ही आलेली कल्पनादेखील फारच

हृद्य आहे. त्या क्षणी मनात निर्माण होणाऱ्या भावनेचा हा एक सुंदर आविष्कार आहे.

या प्रकारच्या मोठ्या पाळण्याप्रमाणेच बाळाला रोज निजविताना अंगाई वा पाळणा गावयाची पद्धत सर्वत्र रूढ आहे. गोड गाणे गाऊन बाळाला निजवावे हा त्या मागचा हेतू असतो. या प्रकारच्या पाळण्याला—अंगाईला—प्रामुख्याने ओवीचे माध्यम स्वीकारण्यात येते. अशा ओव्या कितीक आहेत. त्या सर्वांचा उल्लेख इथे करण्यापेक्षा काही वैशिष्टयपूर्ण ओव्यांची ओळख या ठिकाणी करून घेता येईल.

**पालख पाळणा मोत्यांचा खेळणा**
**जोजवीते बाई माझा लाडका चिमणा**
**शिंपांचा मळा बाई स्वातीनं शिंपला**
**मोती मोती टिपुन तुझ्या छताला गुंफला**
**सागर सांडूनी माणीक धुंडूनी**
**चंद्र सूर्य जडविले इवल्याशा गगनी**

या ओव्या किती सुरेख आहेत हे त्या वाचताना आणि गातानाही चटकन लक्षात येते. बाळाला सुंदरसा पाळणा तयार करावयाचा, त्यावर मोत्यांचा खेळणा बांधावयाचा आणि मग आत गोजिरे बाळ निजवावयाचे. शिंपांच्या मळ्यावर स्वातीचे पाणी शिंपून निवडक मोती तयार करावयाचे आणि पाळण्याच्या छताला लावावयाचे. सागराला उलथापालथा करून वेचक असे माणिक शोधावयाचे आणि मग बाळाच्या पाळण्यावरील खेळण्याला चंद्र-सूर्यांनाही लावून शोभा आणावयाची. या ओव्यांतून व्यक्त झालेली ही भावना आईच्या कौतुकाचा परमोच्च बिंदू तर दर्शवितेच, परंतु तिच्या कल्पकतेलाही कौतुकाचे पाणी चढविते, यात शंका नाही.

**पालक पाळयीना वर खेळना प्रकाराचा**
**माज्या ग बाळायाचा मामा मैतर जिनकराचा**
**पालक पाळयीना वर खेळना सोलापुरी**
**माजा ग बाळराज आत नेनंता मजा करी**
**पालक पाळयीना मोती लावीते दोरीला**
**माज्या ग तान्यायाला नीज म्हणीते हरीला**

खेड्यातील शेतकरणीच्या मनात येणारी ही भावना वर दिलेल्या पांढरपेशा स्त्रीच्या भावनेपेक्षा वेगळी आहे. सामान्य आहे. पण हाही एक सहजसुंदर असा भावनाविष्कार आहे. बेगडेचा खेळणा जिनकराकडून करून आणून तो पाळण्यावर बांधावयाची खेड्यात चाल आहे. त्यामुळे एवढा सुंदर खेळणा घरी आहे म्हणजे माझ्या बाळाचा मामा जिनकराचा मित्र आहे ही कल्पना! त्याखेरीज हे होणे जणू नाहीच! खेडोपाडी या ना त्या निमित्ताने अलुत्या-वलुत्यांशी अशी नाती जोडताना शेतकरणीला कसलाही कमीपणा न वाटता उलट अभिमानच वाटतो. या ओवीमधून सोलापुरी पाळण्याचाही उल्लेख आला आहे. म्हणजेच जुन्या काळी सोलापूर गाव हे सुंदर खेळणा करण्यासाठी प्रसिद्ध असावे! इथेही पाळण्याच्या दोरीला मोती आले आहेत! म्हणजे आपल्या बाळाला राजाच्या मुलाच्या बरोबरीने बसविण्यासाठी एखाद्या आईने आपल्या कल्पनेमध्ये या प्रकारचे सगळे ऐश्वर्य जमा केले असणेही शक्य आहे!

**पाळणा पाचूचा वर खेळणा मोतियांचा**
**आत बाळ नवसाचा निद्रा करी**
**निजसर आले बाळा तुझे डोळे**
**अंथरुण केले जाई जुईचे**
**अंथरुण केले पांघराया शेला**
**निजविते बाळा तुला राजसा**
**अंथरुण केले जाई मोगऱ्याचे**
**बाळ गोजिरे ग माझ्या ताईचे**
**नीज नीज बाळा म्हणू किती तुला**
**गुलाबाच्या फुला राजसा**
**नीज नीज बाळा सोन्याच्या पालखी**
**तुला रक्षण जानकी रघुनाथ**
**तिन्ही सांज झाली दिवे लागणीची वेळ**
**थांबवीशी खेळ राजसा**
**नीज नीज बाळा लाडक्या विठ्ठला**
**अंगाई ही तुला चिमण्या**

या ओवीगीतांमधून बाळाबद्दलची थोडी वेगळी भावना प्रकट झाली आहे. चारचौघींच्या समोर बाळाला गाणे गाताना प्रकट होणारे राजविंडे ऐश्वर्य इथे आलेले नाही. आई बाळाला पाळण्यात निजवून अगर मांडीवर घेऊन एकटीच निजवीत बसली आहे असा हा प्रसंग. तरी पण इथेदेखील पाचूचा आणि मोत्यांचा खेळणा आला आहेच ! हा केवळ कौतुकाचा भाग आहे. बाळाला झोप आली आहे, हे त्याच्या डोळ्यांवरून ओळखून आई त्याला निजवीत आहे–बाळाला शांत झोप यावी आणि विसावा मिळावा म्हणून आई इथे जाईजुईचे आणि मोगऱ्याचे नाजूक अंथरूण घालून पांघरण्यासाठी शेला देते आहे ! बाळ म्हणजे तिच्या दृष्टीने गुलाबाचे फूल. त्यामुळे त्याच्यासाठी ह्या नाजूक अंथरुणाची ती करीत असलेली ही योजना किती चित्तवेधक आहे ! सोन्याच्या पाळण्यात-–पालखीत निजणाऱ्या बाळाला सांभाळणारी रामसीता आहेत, अशी आईने इथे व्यक्त केलेली भावना ' मातृदेवो भव !' म्हणून तिच्याबद्दल होणाऱ्या मंगल उल्लेखाला साजेशीच आहे. स्वत:मध्ये या निमित्ताने देव पहाण्याची ही कल्पना जशी उदात्त तशीच वैशिष्टयपूर्णही म्हणावी लागेल ! अखेरीस दिवेलागणीची वेळ झाली तेव्हा आता स्वयंपाकाला लागले पाहिजे, ही सूचना देऊन बाळाला आई इथे निजायला सांगते आहे. अशा सुंदर कल्पनांनी नटलेली ही ओवी घरगुती जीवनातील श्रेष्ठ आनंदाच्या क्षणांचीच जणू इथे नोंद करीत आहे.

पाळणा हा असा आहे. कालमानाप्रमाणे त्यात भर पडते आहे. म्हणून त्याची थोरवी गावी तेवढी अपुरीच पडणार आहे. स्वत:च्या मुलाविषयी जवळच्या सर्वश्रेष्ठ भावनेला आवाहन देऊन आई इथे गाते आहे. तिच्या कल्पनेला बोलता बोलता गेयता आली आहे. स्वरविलासांनी तिची भावना जणू न्हाऊन निघाली आहे ! जवळचे सर्वश्रेष्ठ कल्पना सौष्ठव इथे वापरले गेल्याकारणाने पाळण्याची भाषा आकर्षक झाली आहे. मोजक्या आणि शेलक्या शब्दांचा वापर करून निर्माण झालेले हे काव्य प्रामाणिकपणे मनात आलेल्या भावनेचा आविष्कार करणारे झाले आहे. या भावनेने मोत्यापोवळ्यांचा आणि हिऱ्यामाणकांचा केलेला जागोजागचा वापर जुन्या काळच्या स्वास्थ्याची आणि वैभवशाली जीवनाची साक्ष देत आहे.

■ ■ ■



# उखाणा (आहाणा)

आपल्या रोजच्या कामाच्या व्यापामधून माणसाला फावली वेळ मिळाली, तर आपल्या जिवाभावाच्या मंडळींशी मोकळ्या मनाने बातचीत करायला त्याला मोठा आनंद होतो. अशा वेळी मनातील खरीखुरी गोष्ट इतरांच्यापुढे ठेवताना त्याला विशेष समाधान वाटते. जणू आपली कर्तबगारी, आपले वैभव, आपला चांगुलपणा चारचौघांच्यासमोर ठेवायची संधी मिळाल्याच्या आनंदात, झाल्यागेल्या बऱ्यावाइटाचा सारा शीण विसरून, एक प्रकारचा मानसिक विसावा घेतल्याचे सुख तो अशा वेळी अनुभवीत असतो.

विशेषत: सर्वसामान्य स्त्रियांना अशी संधी मिळाली म्हणजे चारचौघींच्या पुढे मनातील सारे ईर्षेने मांडण्यात त्या दंग होऊन जातात. या वेळचे त्यांचे बोलणे साधेसुधेच असते आणि त्या सांगतेली गोष्टदेखील जुनीच असते, पण ती नव्याने सांगितल्याचा आनंद आगळा असतो. त्यामुळे अशा वेळी ह्या गप्पागोष्टी एवढ्या रंगलेल्या असतात की, जे सांगावयाचे ते शेलक्या शब्दांत व मोजक्या वेळेत सांगून ऐकणाराचे भान हरपून जावे. एखादी बाई आपल्या मुलावर जर रागावली असेल तर सरळ सरळ तसे न सांगता ती ठसक्याने म्हणते, 'पोराची माया मेली राखेवानी आनीक आईची माया म्हनशीला तर

लाखेवानी !' म्हणजे आईचा राग कितीही पराकोटीला गेलेला असला तरी मूल समोर दिसताच तिची त्याच्याबद्दलची माया काळजातून उफाळून वर येते आणि राग कुठल्या कुठे पळून जातो ! अशा वेळी अशा प्रकारच्या बोलण्यामुळे आपण काही विशेष केल्याचे समाधान त्या बाईला मिळते आणि मग ती खूप बोलत रहाते. त्यामुळे 'असे का ?' म्हणून कोणी विचारलेच तर म्हणते कशी, 'बाई ग, केसानं केलाय दावा तरी माजा जीव हाय नवा.' म्हणजे वय वाढले म्हणून केस पांढरे झाले असले तरी माझा उत्साह अजून मावळलेला नाही. उलट माझी हौस अजून तरणी आहे, असे तिला मुद्दाम सांगावेसे वाटते. अशा प्रकारच्या या बोलण्याला 'उखाणा' किंवा 'आहाणा' असे म्हटले जाते.

उखाणा किंवा आहाणा म्हणजे कोडे, कूटप्रश्न, म्हण, उक्ती, वचन, अलंकार, यमकयुक्त वाक्यरचना इत्यादी प्रकारचा अर्थ लक्षात घ्यावा लागतो. हे सगळे अर्थ दर्शविणारे उखाण्यांचे प्रकारही वेगवेगळे आहेत. त्या सर्व प्रकारांशी आमच्या स्त्रियांनी अतिशय जिव्हाळ्याने संबंध ठेवलेला आहे.

एखादी बाई वरून दिसायला साधीभोळी असली आणि वेळ प्रसंगी फटाकड्यांची माळ उडावी तशी भराभर उखाणा घालीत काही बोलायला लागली, म्हणजे तिच्या पाठांतराबद्दल मोठा अचंबा वाटायला लागतो. जन्मात कधी हातात पाटी पेन्सिल किंवा पुस्तक न धरलेली बाई अशी घडाघड कशी बोलू शकते, याचे चटकन उत्तर सापडू शकत नसल्याने आपले मन एक प्रकारच्या कोड्यात गुरफटून जाते! घरच्या वडीलधाऱ्या बाईने कधी काळी केलेली गोष्ट केवळ ऐकून जशीच्या तशी मनात साठवून घ्यावयाची आणि वेळप्रसंगी ठेवणीतील जिन्नसासारखी दिमाखाने बाहेर काढावयाची, म्हणजे मोठी जादू वाटते, यात शंका नाही.

'जात्यावर बसले की आपोआप ओवी सुचते' असे म्हणतात. म्हणजे त्यावेळी आठवणीतील सगळ्या ओव्या भराभर बाहेर पडतात. अखंडपणे. धबधब्यागत. पावसाच्या सरीप्रमाणे. स्त्रियांच्या ओठांवर खेळणाऱ्या या वेळेच्या भावविश्वातील सौंदर्य विलक्षण भुरळ पाडणारे असते. ओवीची जी गत तीच उखाण्यांचीही. 'हं, घे बाई आता नाव' असे एखादीने दुसरीला काही कारणानिमित्त म्हटले म्हणजे आठवणीच्या कप्प्यातील सारी भावना उफाळून वर

येते. लाजत मुरकत का होईना, बाई मोठ्या दिमाखाने नवऱ्याचे नाव घेते अशा वेळी खरे म्हणजे नवऱ्याचे नाव असते साधेच चारचौघांसारखे. पण ते आहे तसे एका शब्दात न सांगता त्याच्या आवतीभोवती आपले बुद्धिचातुर्य पणाला लावून अशी शब्दरचना उभी करावयाची आणि अशा ठसक्यात त्याचा उच्चार करावयाचा की, ऐकणाराने थक्क होऊन तोंडात बोट घालावे; किंवा याहीपेक्षा ईर्षेने पुढे होत आपली कल्पना नटवून सजवून सांगायला उतावीळ व्हावे! याच ईर्षेमधून अशा वेळी उखाणा जन्माला येत असतो.

## फुगडीचा उखाणा

स्त्रियांच्या आयुष्यामध्ये उखाणा घालावयास पहिल्यांदा सुरुवात होते ती त्या बाळपणातच, फुगडी खेळायला आरंभ करतात त्यावेळी. सणासुदीच्या निमित्ताने अगर चारचौघी खेळायला जमल्याच्या कारणाने मुली अगर मोठ्या बायका सर्व खेळांमध्ये मोठ्या आवडीने फुगडी खेळतात. विशेषतः मुलीबाळी थोडे जरी रिकामपण सापडले, तरी मैत्रिणीचा हात धरून आपल्या बोबड्या बोलांनी उखाणा घालीत फुगडी खेळताना नेहमीच सर्वत्र दिसून येतात. अशा वेळी ऐकलेले असते ते लक्षात घेऊन तोंडाला येईल ती पुष्टी त्याला जोडताना त्या कसलीही भाडभीड ठेवीत नाहीत. एवढेच नव्हे तर एकमेकींचे उणेपुरे काढायलाही त्या मुळीच भीत नाहीत! पण सारे काही मोठ्या खेळीमेळीने चालते. सर्व काही तिथेच ऐकावयाचे आणि तिथेच सोडून द्यावयाचे असते.

एखादीने आपल्या जोडीदारणीला जर—

**'साल म्हन साल बाभळीची साल; नीट घुंबर घाल माजी पैठनी लाल**
**लाल लाल लकूटा आवळून घाल कासूटा; न्हाई तर धरीन तुज्या बचूटा'**

असा ठेक्यात दम दिला तरी त्यामुळे ती मुळीच रागावत नाही. पण शेराला सव्वाशेर या न्यायाप्रमाणे तिच्यावर मात करीत तीही बोलून मोकळी होते:

**'इकडून आली तार तिकडून आली तार, आज माझा मंगळवार बाई बोलू नको फार.'**

आणि मग रुसारुशी अगर चिडाचीड न होता सारे काही शांतपणे, गोडी-गुलाबीने, चालू रहाते.

फुगडी खेळावयाची म्हणजे तोंडाने पिंगा घालता आला पाहिजे आणि उखाणाही घालता आला पाहिजे असा एक दंडक ठरलेला असतो. त्यामुळे एकमेकींचे हात हातात येताक्षणीच कुणी तरी बोलून जाते :

**'लाही बाई लाही भाताची लाही, मुक्याने फुगडी शोभत नाही.'**

फुगडी खेळणाऱ्या मुली अगर मोठ्या बायकाही तोंडाने पिंगा घालीत सारे घरदार अगर अंगण घुमवून टाकतात आणि तापलेल्या तव्यात लाही फुटावी त्याप्रमाणे एकेक उखाणा दुसरीच्या तोंडावर भराभर फेकून देतात :

१. **फुगडी खेळताना जमीन झाली लाल, जमीन झाली लाल, माझ्यासंगं फुगडी खेळतीस पक्वा तरी घाल.**

२. **बटाटयाच्या भाजीला खोबरं लावते खिसून, तू हो ग मोटर मी जाते बसून.**

३. **एवढासा पाटा बाई जिरीमिरी वाटा, जिरीमिरी वाटा, छोटया शामाचा ठमकारा मोठा.**

४. **ओवा बाई ओवा, रानोमाळ ओवा, माझ्यासंगं फुगडी खेळतो गणपती बोवा (जाडजूड बाई, गरोदर स्त्री)!**

५. **बाजाराचं खोबरं खवट ग खवट ग, पाटलाच्या पोरी तुम्ही चावट ग!**

६. **ह्या दारी त्या दारी फुलवली चवरी, फुलवली चवरी, भिऊ नको प्रेमाताई उद्या होशील नवरी.**

७. **अक्कण माती चिक्कण माती पाय घसरला, पाय घसरला, भीमाचा नवरा बाई शेला विसरला.**

८. **नमस्कार करते तुम्ही आशीर्वाद द्या, आशीर्वाद द्या, लहानग्या सुनेला सांभाळून घ्या.**

९. **फुगडी खेळता खेळता जमीन झाली काळी, जमीन झाली काळी, हत्तीच्या सोंडेवर मोत्यांची जाळी.**

१०. **खोल खोल विहिरीला उंच उंच चिरे, उंच उंच चिरे, तुझी माझी फुगडी गरगर फिरे.**

११. **आम्ही दोघी मैत्रिणी माडीवरी, माडीवरी, गुलाबाचं फूल माझ्या साडीवरी.**

१२. बटाटयाच्या भाजीला पळी पळी तेल, पळी पळी तेल, पहा पहा सासूबाई सुनेचे खेळ.

१३. सुया बाई सुया, पोलादी सुया, आम्ही दोघी फुगडी खेळू नणंदा भावजया.

१४. हमरस्ता पायपुस्ता, देवाला जाऊ आपण पाच वाजता.

१५. समुद्राची वाळू चाळणींनी चाळू, चाळणींनी चाळू, आपण दोघी मैत्रिणी गंजिफा खेळू.

१६. पत्री बाई पत्री, रानोमाळ पत्री, रानोमाळ पत्री, जेजुरीच्या खंडोबाला सोन्याची छत्री.

१७. पावसाचं पाणी कवलात ग, कवलात ग, पाटीलांची राधा डौलात ग.

१८. अलंगडीवर पलंगडी, पलंगडीवर खुर्ची, माज्यासंगं फुगडी खेळती लवंगी मिरची.

१९. आरंडयावर करंडा, करंडयावर मोर, करंडयावर मोर, माझ्यासंगं फुगडी खेळती चंद्राची कोर.

२०. कोथिंबिरीची काडी लवती कशी, लवती कशी, शोभावहिनी मला लाजते कशी.

२१. आपण दोघी मैत्रिणी झोकात ग, झोकात ग, गुलाबाचं फूल माझ्या डोक्यात ग.

२२. आपण दोघी मैत्रिणी ऐटीच्या, ऐटीच्या, साडया नेसू पट्टीच्या.

२३. आपण दोघी मैत्रिणी आदराव ग, आदराव ग, राघूमैना काढू चला पदराव ग.

२४. आपण दोघी मैत्रिणी जोडीच्या, जोडीच्या, हातात पाटल्या तोडीच्या.

२५. आपण दोघी लेकी थोराच्या, थोराच्या, कानात बुगडया मोराच्या.

२६. ये ग पोरी धर ग फुगडी का ग लाजतीस, डब्बल खुर्ची च्याचा कप बिस्किट मागतीस ?

२७. तुझ्या माझ्या घरी आहे बिंदली सरी, आहे बिंदली सरी, फुगडी खेळताना बाई नको तालीवारी.

२८. आपण दोघी मैत्रिणी एक पान खाऊ, एक पान खाऊ, सकाळ उठूनी शाळेला जाऊ.

२९. पाऊस येतो झिरीमिरी भिंती झाल्या काळ्या, भिंती झाल्या काळ्या, सोनाराच्या पोरींच्या लांब भिगबाळ्या.

३०. आपुट्पू आले पाटातुनी गेले, काचेचे बेल माझे फुटूनी गेले.

३१. माळ्याच्या मळ्यात जाईचं झाड, जाईचं झाड, किशी मला बोलती रोज फाडफाड !

३२. कोरा कागद काळी शाई, माझ्या लग्नाची तुला का घाई ?

३३. केळं बाई केळं, राजेळी केळं, एवढी मोठी झाली तर लग्न नाही केलं.

३४. काळा कासोटा भुई लोळतो, भुई लोळतो, जेजुरीचा खंडोबा फुगडी खेळतो.

३५. आपण दोघी मैत्रिणी एक मत करू, एक मत करू, आईतवार सोमवार नेमानं धरू.

३६. बटाट्याची भाजी आंबली का, खेळून खेळून दमलीस का ?

३७. आंबाड्याची भाजी आंबली कशी, माझी मैत्रीण दमली कशी ?

३८. फुगडी फुल्लदार, भाऊ शिल्लदार, आकाशाची घार, माझी सासू दगडेदार, लिंबाला आला भार, माझा सासरा हवालदार.

३९. उंच उंच बुचडे पुणेकरणी, कासोट्याच्या पट्ट्या सातारकरणी, नाकात मोती बारामतीकरणी, डोक्यावर हांडे बोरगावकरणी, टाचा फुटक्या गोवेकरणी, भल्या ग दांडग्या फलटणकरणी, फुगडी खेळू दण्णा दण्णा, रुपये मोजू खण्णा खण्णा, भल्या बापाची लेक, माझी फुगडी पारखून देख.

४०. आज मला आईतवार उद्या मला सोमवार, जोडव्या झनकार, इरुद्या कनकार, दारी होती मेख, मी पवारांची लेक.

४१. आयरीखाली पायरी, पायरीखाली चिरा, दाजीबा दिरा, आंगूळ तरी करा न्हाई तर मागं तरी सरा.

४२. चुना बाई चुना, परातभर चुना, सारविल्या भिंती आम्ही गुंजाळाच्या सुना.

४३. वरी बाई वरी, डोंगरीची वरी आमच्या गौरीला सोन्याची सरी.

४४. **चिपाड बाई चिपाड, जोंधळ्याचं चिपाड, आण्णांनी बायको केली माझ्यापेक्षा धिप्पाड.**

४५. **आपण दोघी मैत्रिणी गळा घालू मिठी, गोड गोड बोलू जशी साखरेची पिठी.**

४६. **फुगडी खेळू एकी, नदीच्या टोकी, आला कोल्हा घेऊन गेला, आठल्यांच्या लेकी.**

४७. **फुगडी खेळू दण्णा दण्णा, रुपये मोजू खण्णा खण्णा, रुपयाचा घेतला देवरपाट, देवरपाट हालंना, सवत माझी बोलंना. बोल बोल सवती, निऱ्यात खवती, यील मेला सांगीन त्येला, चिंचेच्या पानानं दडवीन त्येला, आंब्याच्या फोकानं बडवीन त्येला !**

अशा प्रकारचे फुगडीचे उखाणे किती तरी आहेत. या प्रकारच्या उखाण्यांमधून घरगुती जीवनातील अनेक कल्पनांचा वापर स्त्रियांनी केलेला आहे. तसेच आपले काहीना काही कल्पित वैशिष्टय निर्भयपणाने बोलूनही दाखविले आहे. त्यामुळे साथ असलेल्या गाण्याप्रमाणे या उखाण्यांच्या सहवासात बायका मुली मोठ्या ईर्षेने आपली फुगडी घुमवीत असतात. येथे अर्थापेक्षा यमक जुळविण्याकडेच मनाचा कल अधिक असलेला दिसून येतो. खेळाच्या सान्निध्यामधूनच या प्रकारच्या उखाण्यांचा जन्म होत असल्याने अर्थपूर्णतेचे बंधन या ठिकाणी लागू होत नाही. त्यामुळे या उखाण्यांचा पहिला भाग अर्थहीन असला, आणि पहिल्या ओळीचा दुसऱ्या ओळीशी संबंध लागत नसला, तरीही काही विघडत नाही ! तथापि असे असूनही ठसकेदारपणे मनातील गोष्ट बोलून दाखविण्यासाठी याचा फार उपयोग होतो, हे विशेष होय. त्यामुळेच या उखाण्यांचा जीव दिसायला लहान असला, तरी त्यांच्यात अधूनमधून तिखटपणा फार येत असल्याने त्यास ' लवंगी मिरची ' असेही म्हणतात.

## हुमाणा ( हुमान )

फुगडीच्या उखाण्याप्रमाणेच दिसायला एवढेसे पण अंगी कर्तबगारी मोठी असे ज्याचे वर्णन करता येईल असा उखाण्याचा दुसरा लोकप्रिय प्रकार म्हणजे 'हुमाणा'. याचा अर्थ कोडी घालणे असा होतो. म्हणजे चार माणसे एकत्र

जमली आणि ख्यालीखुशालीच्या गोष्टी चालल्या, म्हणजे एकमेकांच्या बुद्धीचे माप घेताना प्रश्नोत्तरांमधूनच सर्वांनी बोलावयाचे. या प्रकारचा उखाणा लहानमोठ्या सर्व माणसांना घालता येतो. केवळ मुलीबाळी आणि मोठ्या बायका यांनाच तो येतो असे नसून पुरुषमंडळीही या प्रकारच्या उखाण्याचा उपयोग करीत असतात.

पुष्कळदा असे होते की, रोजच्या व्यवहारामधील बोलणेदेखील उखाण्यांमधूनच करावयाची सवय काही लोकांना, विशेषतः स्त्रियांना असते. या नेहमीच्या वापरातील उखाण्यांच्यामधील वर्णन इतके सुंदर केलेले असते आणि एवढे ओळखीचे वाटते की, त्यावरून उत्तर सहज सापडावे ! पण ही भाषा सरावात नसेल तर हे उत्तर चटकन सापडत नाही. एवढेच नव्हे तर पुष्कळ वेळ विचार करूनही समाधानकारक अशी त्याची दाद लागत नाही ! मात्र हुशार मनुष्य या उखाण्यातील शब्दांच्या रेखीव मांडणीवरून तावडतोब उत्तराचा अंदाज बांधू शकतो.

एखादी बाई जर एखादे वेळी सहज कुणाजवळ तरी असे म्हणाली की, 'एवढंसं कार्टं पण घर कसं राखतं !' तर ऐकणाराला चटकन् वाटते की, असेल एखादे मूल घरी तेव्हा म्हणतेय तशी. पण नाही. तिला निराळेच सांगावयाचे असते. म्हणूनच बोलण्यापूर्वी ती अगोदरच बजावते, 'हुमान घालतीया हं ?' आणि तरीसुद्धा सराव नसलेल्या माणसाच्या चटकन ते लक्षात येत नाही ! पण खेड्यातील लोकांच्या वापरात दिसलेल्या या 'हुमान'चा अर्थ स्पष्ट केला म्हणजे मग कळून चुकते की, ती बाई दाराला लावलेल्या कुलुपाला उद्देशून तसे म्हणत होती !

हा हुमाणा शहरापेक्षा खेड्यातील लोकांच्याच तोंडात अधिक आहे. त्यापैकी मला मिळलेले काही हुमाणे त्यांच्यापुढे दिलेल्या कंसातील उत्तरांसह असे आहेत :

१. **पांढरं वावर काळं बी चतुर म्हणतो पेरीन मी. (लेखक)**
२. **एवढासा पक्षी पण कठीण फळं भक्षी. (अडकित्ता)**
३. **पांढरं देऊळ त्याला वाटच नाही. (अंडे)**
४. **उंच उंच बंगला त्याला शिपाई टांगला. (नारळ)**

५. तीन पाय त्रिकोनी, एक पाय गंगनी, असा राजा पराकरमी, सर्व झाडाला घाली पानी. (कुत्रे)
६. काळी कुत्री नि डोंगर उतरी. (फणी)
७. बाजारातून आणायचं नि पुढे घेऊन रडायचं. (कांदा)
८. ताडकन तोडलं नि भिंतीला जोडलं. (शेंबूड)
९. आरदार बैल त्येची मान गरदार, दिल्लीला जातो पन पान्याला भितो. (कागद)
१०. धा मानसात गोष्ट सांगावी खरी, बापाविना पुत्र जलमला आई पन नव्हती घरी. (लव्हाळा)
११. आगदाणी बागदाणी, बागेत पडल्या चौघीजणी, हिरवं लिंबू कुंकवा-वाणी. (नागवेलीचा पानविडा, पोपट)
१२. तार तार तारले, बेलापूर मारले, बारा वर्षं तप केले तरी हाती नाही लागले. (उंबराचे फूल)
१३. हा हा मदाणा हा हा, चिरली पकाली ही ही, आतली बीबाणी ही ही. (भोपळा)
१४. तीन मेल्यांचा माळा, वर कुशाबा काळा. (चूल, तवा)
१५. अलीकडं ये म्हनं पलीकडंच बरी, पांघरून घे म्हनं उघडीच बरी. (सावली)
१६. तार तार तारशी, डोळ्यावर आरशी, जित माझा उखाना न्हाई तर रातीत मरशी. (झोप)
१७. पाण्याहून पातळ, लिंबाहून कडू, जी माजा हुमाना जिकल त्येला दीन सोन्याचा गडू. (धूर)
१८. तांबडी गाडी, हिरवा दांडा, आत बसल्या बोडक्या रांडा. (मिरचीचं बी)
१९. आधी गोल गोल, मग लाल लाल, मग थैय्यम थैय्या. (उखळ, मुसळ, मिरची)
२०. अत्ताडी म्हैस, तिला फत्ताडी शिंगं, खायला गेलं तर तिची गुळमाट बोंडं. (केळी)
२१. उलथ्यावर पालथं, वर्षांनी हालतं. (घरावरचे कौल)

२२. आगदाणी, बागदाणी, वागावरची शाय, ज्या रांडेनी पुरुष मारला तिचं नाव काय ? (अफू)

२३. साता समुद्रापलीकडे राजाने लावल्या केळी, हलतात पण उपटत नाहीत. (हाताची बोटे)

२४. सूपभर लाह्या, त्यात एकच रुपाया. (चांदण्या व चंद्र)

२५. अशाला मशाला, चार शिंगं कशाला ? (लवंग)

२६. झुक झुक झोळणा, आकाशी पाळणा, बायको बाळंतीण नवरा तान्हा. (चिंच व चिंचोका)

२७. गोल डोके, लांब शेपूट, पळा रे पळा. (मोठी पळी)

२८. काळी कपिला गाय, तिचे लोखंडी पाय, राजा बोंबलत जाय तरी हाती लागत नाय. (आगगाडी)

२९. साता समुद्रापलीकडे राजाने केला भात, भांडे खाल्ले व भात फेकून दिला. (खारीक)

३०. आभाळातून पडली घार, तिला मारली ठार, रक्त पिते घुटूघुटू, मांस खाते कुरूकुरू. (नारळ)

३१. पाव्हणा आला गडबड झाली, झिपरी पोरगी मध्ये आली. (केरसुणी)

३२. बत्तीस चिरे, त्यात नागीण फिरे. (दात, जीभ)

३३. तीन पायांचा केला मळा, त्यात बसला रामजी काळा, त्याच्या कपाळी गंधाचा टिळा. (चूल, तवा, भाकरी)

३४. दोघे भाऊ शेजारी, भेट नाही संसारी. (डोळे)

३५. पिवळ्या घोड्यावर बसवत नाही, हाती चाबूक धरवत नाही, जाईच्या फुलाकडे बघवत नाही. (वाघ, साप, सूर्य)

३६. बाप खरबुडा, आई झिपरी, लेकरं सोन्यासारखी. (फणसाचे गरे)

३७. आही माही, शिक्यावरचं दही, पाचच जिनसा जगात नाही. (आकाशाला खांब, समुद्राला झाकण, जिभेला हाड, कोंबडीला स्तन, तळहाताला केस)

३८. एवढीशी साळूबाई देवा आधी निवद खाई. (माशी)

३९. हरण पळतं, दूध गळतं. (जाते, पीठ)

४०. आकाशातून पडला धोंडा, कचेरीला लागली ठेच, असं बकरं बेस. (आंबा)

४१. एवढीशी बिबी, चुलीपुढे उभी. (फुंकणी)

४२. घमघमाटा, विषाचा काटा, रुप्याची देवळं, सोन्याची घंटा. (फणसाचे गरे)

४३. आजघरात माजघर, माजघरात विहीर, विहिरीवर वेल, वेलावर फूल. (समई, वात, ज्योत)

४४. तन तारीक, मन हारीक, कंबर बारीक. (मुंगळा)

४५. आत जाती, गरभार रहाती, बाहेर जाती, बाळंतीण होती. (मोट)

४६. आई जळती, लेक शिजती. (तुरकाडी)

४७. आई हळदीचा उंडा, बाप कुराडीचा दांडा, ल्योक जलमला काळतोंडा. (कोरटा, कारेळे)

४८. काळ्या रानात हत्ती मेला, सगळ्या गावाने उपसून नेला. (कापूस)

४९. काळ्या रानात सोन्याच्या मेका, उप्पड उप्पड राजाच्या लेका. (गाजर)

५०. काळी गाय काटक हाय, पानी बघून उभी न्हाय. (चप्पल)

५१. इथंच हाय, पर दिसत न्हाय. (वारा)

५२. चल ग पोरी कोलापूरला बिनदेठाचा लिंबू आनायला. (अंडे)

५३. कोकनातून आल्या सक्या, त्येंच्या मानेत दिल्या बुक्क्या, सगळ्या घरभर पसरल्या लिक्या. (लसूण)

५४. एवढंसं कारटं चटणी किती खातं. (वांगं)

५५. दिवसभर फिरतं नि पैशाएवढ्या जागेत बसतं. (काठी)

५६. एवढीशी टिटवी, खळंभर पाणी आटवी. (दिवा)

५७. साता समींदराच्या पल्याड रामानं केला भात, आनीक एकेक शीत नऊ नऊ हात. (शेवया)

५८. साता समींदराच्या पल्याड रामानं केली रोटी, आनीक एकच गरब दोगींच्या पोटी. (शिपला)

५९. सरळ सरळ खोप, त्यावर हजारो लोक. (जोंधळ्याचे कणीस)

६०. आट आटुकली, बारा पिटुकली, जमिनीनं केला जोर, बिब्बी नाचीवतीया मोर. (रहाट, घागर, पाणी)

६१. खोल्यात खोल्या सात खोल्या, मदल्या खोलीत मोतीदाना, हुमान वळकील त्यो लई शाना. (डाळिंब)

६२. झाडावर झरा, तोडाया येतो पर प्याला येत न्हाई. (नारळ)

६३. चंदनाच्या झाडाखाली जेवण केलं, सोन्याची अंगठी विसरून गेलं. (विस्तव)

६४. अत्रीअत्री झाड, कात्री कात्री पान, हुमान माजं वळीक न्हाई तर तुला मसुबाची आन. (एरंड)

६५. आटंगान पटंगान, जेजुरीचं रान, बत्तीस पिपळाला एकच पान. (जीभ)

६६. अगाड, बगाड, नाहीस दगाड, संबू शेटे, लांब दोऱ्या, पदम गावच्या बायका गोऱ्या. (शेवया)

६७. न्हवं चंद्र, न्हवं इंद्र, शाई जाळीचा मासा, वेड्यानं घातलं हुमान, शान्याला पडला फासा. (टोळ)

६८. एवडीशी न्हनूबाई, साऱ्या गावाच्या आदी बोनं खाई. (माशी)

६९. एवडीशी न्हनूबाई, साऱ्या वाटेनं गीत गात जाई. (घंटी)

७०. कन कन कुदळी, मन मन माती, चंद्र उगावला मध्यान राती. (उंबराचे फूल)

७१. हत्तीवानी तुमी, नकावानी आमी, आनीक मस्करी केली तर रडता का वो तुमी? (विंचू)

७२. आधी होती साधी भोळी, मग ल्याली हिरवी चोळी, मग आली रंगाला, हात लावू देईना अंगाला, मग ल्याली तापता, जन लोक चाखता. (मिरची)

७३. आभाळातून पडली धार, त्याच्या कचेरीला लागली ठेच, असं पाखरू दाणा वेचून खातं, त्याच्या काळजाला केस. (आंबा)

७४. झाडावर आहे पण पक्षी नव्हे, तीन नेत्र पण शंकर नव्हे, भगवी वस्त्रे पण संन्याशी नव्हे, नव्हे इंद्र, नव्हे चंद्र, नव्हे पृथ्वीचा राजा; जो माझा उखाणा जिंकील त्याला देईन जिलेबीचा घास ताजा. (नारळ)

**७५. इकडून आले खेडकर, तिकडून आले बेडकर, खेडकर विचारतात बेडकरला, कशी काय खबर? खबर मोठी जबर, दोन्ही आण्या कोवळ्या, मधी निबर.** (त्रिकाल)

अशा प्रकारचे हे उखाणे (हुमाणे) आणखी किती तरी असतील. मोजायला गेलेच तर त्यांची संख्या सांगता येऊ नये एवढे अमाप! सर्वसामान्यांच्या आयुष्यात साधे बोलणे नाहीच. ह्याचाच सतत वापर. त्यामुळे काही माणसांच्या जिभेवर असे बोलणे अखंडपणे वावरताना दिसते.

ह्या उखाण्यांची एकंदर घडण आणि कंसामध्ये दिलेले त्याचे उत्तर मोठे मजेदार आहे. अशिक्षितांच्या बुद्धिवैभवाचा हा दिमाख मोठा आगळा तर खराच, पण शहाण्यांना माघार घ्यायला लावणारा आहे! त्यामुळे त्यांच्या बुद्धीची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. अडाणी मनातील शहाणपणाचा हा एक सुंदर आरसा आहे! स्त्रियांना आपल्या जीवनात स्वयंपाकातल्या मीठमिरचीप्रमाणे हरघडी त्यांचा उपयोग होत असल्याने त्यांच्या मनातील प्रत्येक भावनेला इथे वाचा फुटली आहे. त्यामुळे त्यांच्या संभाषणाला चव तर आलीच आहे; पण मराठीलादेखील हा एक घनसर अलंकार मिळालेला आहे. सर्वसामान्यांच्या जीवनातील बुद्धीची ही चाचणी अपूर्वाईची आहे.

## साधा उखाणा

स्त्रियांनी व पुरुषांनी (पतिपत्नींनी) नेहमीच्या व्यवहारात एकमेकांचे नाव उच्चारावयाचे नाही, अशी एक परंपरागत चाल पडलेली आहे. स्त्रीने पतीचे नाव उच्चारावयाचे म्हणजे त्याचे आयुष्य कमी होते, अशी कल्पना रूढ झालेली आहे! त्यामुळे 'इकडून येणं झालं', 'इकडची स्वारी म्हणाली' अशा प्रकारे नवऱ्याबाबत बोलण्याची पद्धती पूर्वी असे. तथापि प्रसंगविशेषी नवऱ्याच्या नावाभोवती गमतीदार शब्दरचना करून मग त्याचे नाव घ्यावयाचे असा प्रघात आहे. पुरुषांचे बाबतीतही हेच आहे. 'मंडळी म्हणाली', 'ही आली' या रीतीने संभाषणात पत्नीचा उल्लेख होतो. पण अलीकडे काळ बराच बदललेला असल्याने व शिक्षणाचा प्रसार बराचसा झाला असल्याने, उखाणा घालून एकमेकांचे नाव घ्यावयाची चाल पूर्वीच्या मानाने मागे पडत चालली आहे. परंतु महाराष्ट्रात

अद्यापही सर्वसामान्य मनाला ती न पटल्याने विशिष्ट प्रसंगी का होईना उखाणा घालायची पद्धत अस्तित्वात आहे.

उखाणा घालून पतीचे नाव घ्यावयाचे म्हणजे मोठी कौशल्याची गोष्ट असते. परंतु सर्वांनाच ती चांगली साधते असे नाही. त्यामुळे 'नाव घ्यावयाचे' म्हणजे स्त्रीजीवनातील एक परीक्षेचीच वेळ मानली जाते !

सामान्यतः सर्वसामान्य स्त्री दोन अडीच ओळींचा अगर फार फार तर तीन ओळींचा उखाणा घेऊन आपले कल्पनावैशिष्टच प्रकट करण्याचा प्रयत्न करीत असते. या प्रकारच्या लहानशा उखाण्यास **साधा उखाणा** असे म्हणतात. या प्रकारचे काही उखाणे असे आहेत :

१. **लवंगी वाडी बदामी बंगला × × × रावांच्या प्रपंचात जीव माझा रमला.**

२. **मोठे मोठे डोळे पहाण्याची खुबी × × × रावांची मूर्ती माझ्या नजरेसमोर उभी.**

३. **वडिलांनी शिकविली विद्या, आईनं शिकविलं गृहशिक्षण × × × रावांची विद्या हेच माझं भूषण.**

४. **नको गोट, नको तोडे, नको मोती माणीक × × × रावांच्या जिवापेक्षा काही नको आणीक.**

५. **विद्येने विभूषित, विनयानं साजे × × × रावांची कीर्ती जगभर गाजे.**

६. **चांदीच्या भांड्यात केशराचे पाणी × × × रावांच्यासारखा शहाणा जगात नाही कोणी.**

७. **अप्सरा मेनकेच्या पोटी जन्मली शकुंतला × × × रावांचे गुण बघून अर्पण केली मला.**

८. **हिंदमातेच्या हिंदुस्थानात, उभी होते सज्जात × × × रावांचे नाव घेते काँग्रेसच्या राज्यात.**

९. **रामराज्यात मारले बाण, कृष्ण राज्यात खाल्ले दही × × × रावांच्या राज्यात करते मी सही.**

१०. **द्राक्षाच्या वेलीला त्रिकोणी पान × × × रावांचं नाव घेते राखते सर्वांचा मान.**

११. शीतल चांदणं पडलं रामाच्या रथात, मी आहे × × × रावांच्या संसारसुखात.
१२. कुलीन कुलात जन्मले, सुशील कुलात आले × × × रावांच्या जिवावर भाग्यशाली झाले.
१३. संसार सुखी सागरात पतिपत्नींची नौका × × × रावांचं नाव घेते सर्वजण ऐका.
१४. संसार सुखी सागरात पतिपत्नींची होडी × × × रावांचं नाव घेते ठेवा जन्माची गोडी.
१५. शंकर पार्वती बसली कैलासावर, गणपती बसला अंकावर × × × रावांचं तेज झळके माझ्या कुंकवावर.
१६. निळ्या निळ्या आकाशात उगवला शशी × × × रावांचं नाव घेते बारशाच्या दिवशी.
१७. चैत्र वैशाखात वसंतऋतु येतो × × × रावांच्या मुलाबाळांत सहज वेळ जातो.
१८. संध्येच्या पळीला नागाची खूण × × × रावांचं नाव घेते × × × ची सून.
१९. पेटी वाजे, तबला वाजे, सुंदर वाजे वीणा × × × रावांचं नाव घेते वंदेमातरम् म्हणा.
२०. विसाची साडी तिसाचा पदर × × × रावांच्या नावाला हळदी-कुंकवाचा गजर.
२१. पेरूच्या झाडावर राघू पाकळला × × × रावांचं नाव घेते चंद्र सूर्य झाकळला.
२२. यमुनेच्या तीरी कृष्ण करतो नाच × × × रावांना आयुष्य मागते शंभरावर पाच.
२३. चंदनाच्या पाटाला रुप्याचं ठसं × × × राव वर बसं मला बाई किष्णत सारकं दिसं, आनीक मी लाजत्याली बगून वरचा चांदसूरव्या हसं.
२४. चहा देते करून, पेरू देते चिरून, केळीची काढते साल × × × रावांच्या जिवावर कपाळी कुंकू लाल.

२५. गळा भरला ठुशीनं, हात भरला गोटपाटल्यानं × × × रावांचं नाव घेते सर्वांच्या खुषीनं.

२६. तांब्यावर तांबे ठेवले वीस, मधल्या तांब्यात घावला रस × × × रावांच्या पटक्याला मोत्यांचा घस.

२७. घट्ट घट्ट दह्याला उत्तम चमचा × × × रावांचं नाव घेते आशीर्वाद तुमचा.

२८. चांदीचं कारलं सोनारानं घडीवलं × × × रावांचं नाव घ्यायला दिवाणसाबांनी अडीवलं.

२९. हिरवं लुगडं पानाचं, हळदकुंकू मानाचं × × × रावांच्या राज्या-सारखं राज्य नाही कुणाचं.

३०. वज्रटिकीचा गोंडा कलाबुतीनं आवळला × × × रावांचं नाव घेते चंद्रसूर्व्या मावळला.

३१. चांदीच्या ताटात फणसाचे गरे × × × राव दिसायला बरे पण वागवतील तेव्हा खरे.

३२. काळी चंद्रकला आडकली तोडचात × × × रावांचं नाव घेते बाळंतिणीच्या वाडचात.

३३. मागंपुढं गोट पाटल्या मधे भरते केरवा × × × राव मुंबईला गेले परवा तेव्हा शालू आणला हिरवा.

३४. हिरवं लिंबू गारसं × × × रावांच्या बाळाचं आज आहे बारसं.

३५. चांदीच्या ताटात बदामी हलवा × × × रावांचं नाव घेते वडील माणसं बोलवा.

३६. पेढयांचा पुडा साताराच्या बाजारी × × × रावांची खुर्ची साहेबांच्या शेजारी.

३७. समोरच्या दिवळीत होती लोणच्याची फोड × × × रावांना डोळे वटारायची लई वाईट खोड.

३८. महादेवाच्या पिंडीवर बेल वहाते ताजा × × × रावांचं नाव घेते पहिला नंबर माझा.

३९. खंडीभर सुपाऱ्या मापून घ्या काय जोकून घ्या, पण × × × राव तुमचा बिड्यांचा नाद तुम्ही सोडून द्या.

४०. चांदीच्या डबीत अत्तराचा बोळा × × × रावांचं नाव घेते शंभर रुपये तोळा.

४१. काळी घोडी कर करी, नेऊन बांधली सरकारी, सरकारनं दिली सरी, आत्याबाईंना केले गोट, मला केल्या पाटल्या × × × रावांच्या मंदिलाला हिरकण्या दाटल्या.

४२. सुपभर सुपारी मोजू कशी, गळ्यात ठुशी वाकू कशी, पायात पैंजण चालू कशी, आत्याबाई बसल्यात तुळशीपशी × × × रावांचं नाव घेते पोथीच्या पूजेदिवशी.

४३. काळी करुळी, दाजीबाची आरूळी, तेलच्याची चवड, नंदाव्याची दवड; तेलच्याची पाटी, नणंदेची दाटी; ताकाचा डेरा, आत्या-बाईचा फेरा, रुप्याची माडी, पाटलाची उडी × × × रावांच्या हातात शंभराची घडी.

४४. पाचशेची बैलं चारशेच्या झुली × × × रावांचं नाव घेते मीच सदाफुली.

४५. अडचाल डोंगर पडचाल डोंगर, मधी चुरमुऱ्याचा भारा × × × राव मला चमकी बांगडी भरा, न्हाई तर दुसरी बायकू करा.

४६. वाटेवर होती बोर, तिला आला मोहोर × × × रावांच्या जिवावर मी झाले चंद्रकोर.

४७. आदघर, मदघर, मदघरात होता खांब, खांबाला आला घाम × × × राव आता लवकर उठा बैलं गेली लांब.

४८. तारामती राणी, हरिश्चंद्र राजा, रोहिदास पुत्र × × × रावांच्या जिवावर मी घालते मंगळसूत्र.

४९. कुरुंदाची सहाण, चंदनाचं खोड × × × रावांचा शब्द अमृतापेक्षा गोड.

५०. हिरवा पाचू चमकतो पोतात × × × रावांचं नाव घेते सासरच्या गोतात.

**५१. आभाळ भरलं पाण्यानं, खळं भरलं दाण्यानं; मधी तिवडा गणराज × × × राव माज्या डोरल्याचा साज.**

सामान्यत: बहुतेक स्त्रिया अशा प्रकारचे उखाणे घालून पतीचे नाव घेत असतात. अशा प्रकारचे उखाणे आणखी शेकड्यांनी सापडतील. पण त्यांचा तोंडवळा कळून येण्यासाठी वरील उखाणे पुरेसे आहेत. आपल्या प्रिय पतीची थोडक्यात ओळख करून देण्याची ही पद्धत आटोपशीर तशीच मनोहरही आहे. मनात आले ते यमक जुळवीत सांगून टाकले असा हा प्रकार आहे. तथापि वेळ-प्रसंगाप्रमाणे इथे समयसूचकताही खूप साधलेली आहे. सामान्य स्त्रीचे भाषाज्ञान व मांडणी आणि तिच्याजवळचा धीटपणा हे सर्व यावरून अजमावता येते.

या लहानलहान उखाण्यांमधून त्या त्या वेळची सामाजिक चालरीत, घरातील सासुरवाशिणीचे स्थान, तिची अपेक्षा, नवऱ्याबद्दलचे तिचे प्रेम इत्यादींची माहिती मोठ्या कौशल्याने आलेली आहे.

## जानपद उखाणा

खेडोपाडीच्या अशिक्षित बायका आपल्या पतीचे नाव काही प्रसंगांनिमित्त घेते वेळी जो लांबलचक उखाणा घालीत असतात त्यास **जानपद उखाणा** असे म्हणतात. शहरामध्ये असा उखाणा सहसा आढळत नाही. त्यामुळे कुणी कुणी यास **कुणबाऊ उखाणा** असेही म्हणतात. एकमेकींच्या आठवणींच्या कुपीत पिढ्यान्‌पिढ्या जतन केलेल्या या उखाण्यात स्त्रियांचे खेडवळ मन एकजीव झालेले दिसून येते. त्याचप्रमाणे या उखाण्यांमधील वर्णने व कल्पना-चातुर्य बघून ह्या बायकांना एवढे सुचले तरी कसे याचा मोठा अचंबा वाटायला लागतो!

**‘झुण् झुण् झुण्यात, बसले मेण्यात, खणचोळी अंगात, शेंदूर भांगात, जायफळ वाटीत, लवंगा मुठीत, सोन्याची किल्ली, चांदीचं कुलूप, हाती दिली किल्ली, उघडली खोली, खोलीत हुते हंडे सात, हंड्यात हुती परात, परातीत भात, भातावर वतलं तूप, तुपासारकं रूप, रूपासारखा चिरेबंदी वाडा, चंद्रभागेला पडला येडा × × × राव आता तुमी काम सोडा पण आधी मला म्हायाराला धाडा.’**

माहेरी जाण्यासाठी उतावीळ झालेल्या जुन्या काळच्या सासुरवाशिणीची ही भावना आहे. त्या वेळच्या चालीरीतीनुसार ती या प्रकारे आपल्या घरचे वैभव बोलून दाखवतानाच माहेरची ओढदेखील विलक्षण असल्याचे इथे सांगते आहे.

**'झुनुक झुनुक जात होते, खिडकीवाटे पाहात होते; तिकडून आला व्यापारी, त्यानं दिली सुपारी; उभी राहिले अंगणी, हाती दिली कंगणी; उभी राहिले तुळशी, हाती दिली कळशी; उभी राहिले न्हाणी, हाती दिली फणी; उभी राहिले दारात, हाती दिली परात; उभी राहिले कोनात, हाती दिली बनात; बनातीवर खेळं तान्हं बाळ, बाळाच्या हातात चांदीची डबी, डबीत होता पैका × × × रावांचं नाव आनंदानं घेते सर्वजण चित्त देऊन ऐका.'**

या उखाण्यामध्ये माहेरी गेल्यानंतर काय काय घडले त्याची हकिगत आलेली आहे. तसेच जरूर त्या सर्व प्रकारच्या गोष्टी घडून आल्याने नाव घेण्यास आनंद वाटत असल्याची शेवटी दिली गेलेली कबुलीही मोठी मजेदार आहे.

**'आर्डभित पर्डभित पर्डभितीला हुती दिवळी, त्यात ठेवलेवते बक्षी गहू, बक्षी गव्हाच्या पोटी जन्मले तिर्रसिंगराव, तिर्रसिंगराव म्हनत्याती नगराला जाऊ, नगराची भिंगरं, भिंगराची काचरं, सोलापुरात घेतली धोतरं, पंचवीस रुपयांची घेतली गाडी, गाडीचा झाला चक्काचूर, पुढं लागलं मिरच्यापूर, मिरच्यापुरात घेतला जोडा, कोरेगाव ठेसन सांगत्यात उजगाराला, बांदा भाकरी चला जाऊया रोजगाराला, रोजगार न्हाई केला, तीन दिवस तसंच कटलं. मग एका भाकरीचं घेतलं पीठ, भाकरी कराय काय यीना नीट, भाकरीला लागतंया दूध, मग लगीच येतीया भाताची सूद, माता झालीया बरी, भाकरी आली खरी, खानावळ खावी परघरी, वाळच्याचा तांब्या ओसरीला ठेवला, पाडाचा आंबा म्हादेवाला वाहिला, पोळयाचं जेवान सासुरवाडीला जेवलं, अस्तुरी मावसभैनीला भेटलं, पुन्याच्या पारावर बरनी आली समईची आनीक × × × राव मला हवा सांगत्यात म्हमईची.'**

एखाद्या हटवादी अगर अजागळ गप्पीदास नवऱ्याची थट्टा करावी म्हणून केवळ गमतीदाखल हा उखाणा नाव घेते वेळी बायका घालतात, मग खूप हशा पिकतो. घरामधील कोनाड्यात ठेवलेले बक्षी गहू खाऊन लहानाचे मोठे झालेले तिर्रसिंगराव प्रवासाला निघतात आणि मग काय काय घडते, त्याची

मनोरंजक हकिगत इथे देण्यात आलेली आहे. हाच उखाणा पुढीलप्रमाणे कुठे कुठे थोडया वेगळ्या पद्धतीने असाही घालण्यात येतो :

**'आर्डभित पर्डभित, पर्डभितीत देऊळ, तितं जलामले पांजणभाऊ, त्यांत एक निगाला तिर्रसिंगराव, त्यो म्हनतो नगराला जाऊ, नगराची भिंगरं, सोलापुरात घेतली धोतरं, पुढं आलं मिरच्यापूर, मिरच्यापूरच्या आठसापूरची बंडी, बंडीचा साचा, रत्नागिरीचा काचा, काच्याची काय वाट, म्होरं आस्तुऱ्या आल्या दाट, आस्तुऱ्यांचा पडला येडा, गारुदौंडत घेतला जोडा, केडगावचं ठेसान, सांगते उजगाऱ्यांनी रोजगार केला जैनसैन, घरची अस्तुरी मावसभैन, आंबा पाडाचा महादेवाला वाहिला, उठा उठा × × × राव पुणे देश पाहिला न् बाई देश राहिला.'**

त्या त्या भागाप्रमाणे गावांची नावे बदलावयाची आणि एखाददुसरी नवी कल्पना जोडावयाची यापलीकडे या उखाण्यामध्ये फारसा फरक पडत नाही. पण कधी तो पडलाच तर मग मात्र तो घालणाऱ्या बाईला इतर बायका विचारतात, 'कोन गावची पाव्हणीबाई ?' आणि मग प्रश्नोत्तरे होऊन त्यावर चर्चाही करतात. या उखाण्यांमध्ये अस्तुरी मावसभैन असा जो उल्लेख आलेला आहे त्याचा मात्र नीटसा बोध होत नाही.

**'तार पुण्यात केली, बातमी मुंबईत गेली, तिकडून आगीनगाडी आली, बोरीबंदर लाईनला गेली, बोरीबंदर लाईनला झाडी मोठी दाट, नीट कराडाची वाट, कराडात दोनी मनुऱ्यांची जोडी, तितनं लागली किष्णा थडी, किष्णा थडीची हवा पहा, ठेसनं लागली सहा, पुढं कोळशाची भट्टी पेटली, कळ कोपऱ्याला दाटली, नीट बल्लारी गाठली, तितनं गाडी बेळगावला गेली, बेळगावात बदली खल्लास झाली, तितनं गाडी कोलापूरला जाती, कोलापूरला प्रदक्षिणा घालून पंढरपूरला जाती, पंढरपुरात देवाचं दर्शन घेती, उभी येऊन पुन्यात रहाती, चहा कप घेती, सरकारनं केलीया बहुत कीर्ती × × × रावाचं मुख बघून तहान भूक हरती.'**

महाराष्ट्रामध्ये आगगाडीचा प्रवास सुरू झाल्यानंतर प्रवास करणाऱ्या घरधन्याने कुठे कुठे प्रवास केला आणि काय काय पाहिले, याची हकिगत या उखाण्याने सांगितलेली आहे. खेरीज आगगाडीच्या नव्या सुधारणेने सामाजिक

जीवनामध्ये घडून आलेल्या बदलाचा इतिहासही येथे नोंदविण्यात आलेला आहे. सामान्य मनाने नव्या सुधारणेचे केलेले स्वागत म्हणून हा उखाणा उल्लेखनीय ठरेल. तशी ही एक साधीच गोष्ट खरी. पण सरळ सांगावयाची ती उखाण्यात गोवून दिल्याने सर्वांच्या तोंडी व्हायला सोपी झालेली आहे!

**'चांदीचं घंगाळ आंगुळीला, जरीकाठी धोतर नेसायला, चंदनाचा पाट बसायला, केशरी गंध लावायला, भागवत वाचायला, दिल्लीचा आरसा पहायला, समई मोराची, चांदीचे गडवे पेले, आत गंगाभागीरथीचं पाणी, राजगिरी अत्तर, सुगंधी वासाचं तेल, उदबत्त्यांची झाडं, रांगोळी पुढं, पाची पक्वान्नांचं भोजन जेवायला, वर तरेतरेच्या कोशिंबिरी, सतरंजीची शोभा, पान पिकलं पुण्याचं, चुना लोणावळ्याचा, कातगोळ्या धारच्या, वेलदोडे इंदूरचे, जायफळ नगराचं, जायपत्री मद्रासची, चिक्कनसुपारी सोलापूरची, एवढं सामायन विड्याचं, ताट बिल्वराचं, घुंगराचा आडकित्ता बागनीचा, उषा किनकापाच्या, हांड्या झुंबरांचा लकलकाट, समया लावल्या तीनशे साठ × × × रावांच्या जिवासाठी मी ह्यो केला थाट!'**

आपल्या घरी एवढे ऐश्वर्य असो अगर नसो, पण चारचौघींच्या समोर आपल्या घरचा रुबाव मोठ्या ईर्षेने मांडण्यासाठी हा उखाणा पतीचे नाव घेते वेळी बायका घालतात. घरच्या श्रीमंतीबरोबरच देशाचा भूगोलही या ठिकाणी सांगण्यात आलेला आहे! कुठे कुठे काय काय तयार होते ते सर्व गोळा करून घरी आणताना एवढ्या लांब लांब आपले स्नेहभाव गुंतले आहेत, असा दिमाखही इथे खुबीने सूचित करण्यात आलेला आहे. हाच उखाणा थोड्याफार फरकाने कुठे कुठे असाही आढळून येतो:

**'चांदीचं घंगाळ पाणी विसणायला, रुप्याचा गडवा पाणी प्यायला, पिवळा शालू अंग पुसायला, जरीकाठी धोतर नेसायला, फिरके पाट बसायला, सान येवल्याची, खोड बडोद्याचं, पिकलं पान पुण्याचं, लवंग काशीची, चुना कळीचा, आरसा विलायतचा, पंढरपुरी श्री भरला बाजार, रुपये लागले हजार, त्यातली उरली दमडी, दमडीच्या घेतल्या करड्या, करड्याचा भरला घाना, घान्याची लावली डीकमाळ, डीकमाळेची हवा, पलंग घेतला नवा × × × रावांचं नाव घेते लक्षात ठेवा.'**

या उखाण्यामध्ये मागच्या उखाण्यापेक्षा पंढरपूरच्या बाजाराचा उल्लेख अधिक आलेला आहे. तथापि नवऱ्याचे वैभव सर्वांच्यापेक्षा उठून दिसावे म्हणून चाललेली धडपड मात्र सारखीच आहे. तथापि घरगुती वैभव बोलून दाखविण्याची ही पद्धत त्यामुळेच विलोभनीय झालेली आहे.

**'उभी ऱ्हाइली सवाष्णीच्या मेळचात, गुलाबाचं फूल माळ्याच्या मळचात, नवरत्नांचा हार सासूबाईंच्या गळचात, सासूबाईंच्या पोटी जन्मला हिरा, मामाजींच्या मंदिलात मोत्यांचा तुरा, मी पुजते तुळस, कळस सोन्याच्या खांबी, पाडगुडीचा आंबा, नाजूक केळीचा गाबा, हाय साक्षीला उबा, डाव्या डोळ्याचा रोक, कमरला करदुऱ्या गोप, वर हाय निऱ्याचा झोक, बोलनं तरी कसं बोलते गालातल्या गालात, इचारत्याती आईन म्हालात, आईन म्हालाची नक्कल किती, बत्तीस गावचा कारभार हाती, हजाराची बांधली हवेली, हवेली ताडमाड, परसदाराला काडला आड, आडावर रामफळीचं झाड, साकार एकडाव फिक्की पडल पन × × × रावांचं नाव लई ग्वाड.'**

या उखाण्यामध्ये नवऱ्याची ओळख करून देताना घरच्या माणसांमधील त्याचे स्थान, त्याचे सौंदर्य, त्याचा पोषाख, त्याचे बोलणे चालणे, घरचा महाल, मोठी हवेली, परसदारीचा आड वगैरे सर्व गोष्टी इथे मोठ्या हौसेने सांगितलेल्या आहेत. त्यामुळे हा उखाणा ऐकणाऱ्या बाईलाही वाटते की, आपल्या घरचे असेच काही आपण जरूर सांगितले पाहिजे! म्हणून मग त्याच ईर्षेने ती याहीपेक्षा उत्तम उखाणा घालून नाव घ्यायला स्वखुषीने राजी झालेली दिसून येते :

**'वटसावित्रीचा पुजते वड, बेंदरानं केला चड, बेंदरांची घेते काव, नागपंचमीचा पुजते नाग, नागपंचमीच्या दिडाची करते न्ह्यारी, आली गवराय गणपतीची स्वारी, गवराय गणपतीला वाहते दूर्वा, गवराय गणपतीचं घेते दोरं, आलं म्हाळाचं महिनं म्होरं, म्हाळाच्या महिन्याची निवडते डाळ, आली घटाची माळ, घटाच्या माळाला देते गाठी, शिलंगनाची झाली दाटी, शिलंगनाचं घेते सोनं, दोन दिवाळ्यांनी केलं येनं, दोनी दिवाळ्यांची पाजळते पंती, आली संक्रांत नेनती, संक्रांतीचं पुजते सुगड, आली माही पुनव जुगड, माही पुनवेची पुजते वोंबी, शिमगा खेळे झोंबी, शिमग्याची करते पोळी, पुढे रंगपंचमी आली, रंगपंचमीला उधळला रंग, पाडवा आला टोलेजंग, पाडव्याची**

**उभारते गुडी, आखितीनं मारली उडी, आखितीचा पुजते करा, आनिक दिवाळी दसरा होस्तोवर जरा दम धरा, मगच ××× राव येईन मी तुमच्या घरा, न्हाई तर माघारी फिरा !'**

हाच उखाणा कुठे कुठे असाही घेतात :

**'कांडून कुटून केला पोळा, पंचीमबाईनं उगडला डोळा, पंचीमबाईचा पुजते नाग, गौराबाईला आला राग, गौराबाईचं काडते चित्र, पुढं आली भादवी पित्रं, पित्राची निवडते डाळ, पुढं आली घटाची माळ, दसऱ्याचं घेते सोनं, दिवाळीबाईनं केलं येनं, दिवाळीबाईची लावते पणती, संक्रांत आली नेणती, संक्रांतीचं पुजते सुगड, म्हाई पुनव आली दुगड, म्हाई पुनवेची ओंबी, शिमगा खेळं झोंबी, शिमग्याची करते पोळी, रंगपंचमी आली खेळी, पंचमीचा करते रंग, पाडवा आला टोलेजंग, पाडव्याची उभारते गुडी, आखितीनं मारली उडी, आखितीचा पुजते करा ××× रावांचं नाव मी एक डाव सोडून धा डाव घेते, पर आदी गलका बंद करा !'**

तर कुणी कुणी हीच हकिगत पुढीलप्रमाणेही उखाण्यात गोवून सांगतात :

**'शिराळं गाव शार, भवतनं बारा वेशी, बारा वेशीला बारा बुरूज, बारा बुरुजाला बारा तळी, आत एकशेसाठ बळी, बळीच्या तोंडात मोत्याचा चारा, नवस करते शंकर सारा, नवसाला धाडते पत्र, पंचमीला काडते चित्र, पंचमीचं पवतं, आलं गवरी भवतं, गवरीचं घेते दोरं, आलं शिलंगान म्होरं, शिलंगनाचं सोनं घेती ताटी, दुई दिवाळींनी केली दाटी, दुई दिवाळींचं न्हाते पाणी, संक्रांत आली तानी, संक्रांतीचा पुजते ववसा, नव्याची पुनव आली आठ चौ दिवसा, नव्याच्या पुनवंचं पुजते नवं, शिवरात घेती उपासाची सवं, शिवरातीचा पुजते पाट, शिमगा आला घनदाट, शिमग्याची हुंदे बोंब; शिपनं म्हनतं थांब, शिपन्याचा खेळते रंग, आला पाडवा जबरदंग, पाडव्याची उभारते गुढी, आली आकिती लाडीलाडी, आकितीचा पुजते करवर, बेंदूर आला म्होरं, बेंदराचं पुजते बैल आनिक ××× रावांचं गाडीघोडं यील तवाच म्हणावं येनं जानं हुईल, न्हाई तर आकाड एकादशीलाच भेट घडंल !'**

या वेगवेगळ्या ठिकाणी, देशकालपरत्वे घेतल्या जाणाऱ्या उखाण्यांच्या-मधून एकच प्रकारची प्रमुख गोष्ट सांगण्यात आली आहे आणि ती म्हणजे

हिंदूंच्या सामाजिक जीवनात येणाऱ्या बारा महिन्यांतील सणांची माहिती ही होय. या ठिकाणी प्रत्येक सणाच्या उल्लेखाबरोबरच त्याचे वैशिष्टचही सांगितले असल्याने आज कित्येक वर्षे टिकून राहिलेली चालरीतही इथे नमूद झालेली आहे. आमच्या घराण्यातील संस्कृतीचे हे एक सत्यदर्शन आहे. सामान्यत: प्रत्येक सणाला माहेरच्या गणगोतामध्ये आनंदात वेळ काढावा, ही जुन्या काळच्या लहानग्या सासुरवाशिणीची इच्छा असल्याने, तिच्या मनातील ही माहेरवासाची आवडती अभिनव कल्पना या प्रकारे व्यक्त झालेली आहे. त्याचप्रमाणे नवऱ्याला मुराळी म्हणून यावयास त्याने किती दम धरला पाहिजे, हेही इथे एवढ्या सुंदर रीतीने सांगितले आहे की, वरकरणी तो धाक दिसत असला तरी त्या मागची प्रेमळ भूमिकाही त्याने जरूर लक्षात घ्यावी !

या प्रकारचे हे उखाणे म्हणजे नव्या पिढीला जुन्या पिढीने घडविलेले एक प्रकारचे सांस्कृतिक दर्शनच आहे. वाडवडिलांची ही चालरीत जतन करून ठेवून ती पुढच्या पिढीला हवाली करण्याचे भाग्य आपल्याही वाट्याला येवो, अशी सुखद भावना स्त्रियांच्या मनात निर्माण करण्याचे सामर्थ्य या उखाण्यांच्या अंगी निश्चित आहे.

**‘नाव घेते एक, मी हाय आबांची लेक, नाव घेते लाडी, मी हाय रावसाहेबांची ध्वाडी, नाव घेते मी ग पावनी, मी हाय रामचंदरची म्हेवनी, नाव घेते गहिन, मी हाय सदाशिवरावाची लाडकी भैन, नाव घेते खाशी, मी हाय येश्वदीची मावशी, आनीक अशा म्हायारला जायला मी हाय लई खुशी पर × × × रावांच्या मनात शिरलीया येडीपिशी.’**

या उखाण्यामध्ये माहेरच्या नात्यागोत्यांची मोठी सुरेख गुंफण केलेली आहे. शिवाय अखेरीस अशा माहेरी धाडायला राजी नसलेल्या नवऱ्याच्या वेडेपणाची नोंद केल्याने एक प्रकारचा विनोदही येथे निर्माण करण्यात आलेला आहे. त्यामुळे सासुरवाशिणीच्या मनात चालू असलेल्या गमतीदार घालमेलीचीही यावरून ओळख पटते.

**‘काळी चोळी कणखर, पुण्याची हिनकर, आलीवती दारी, मी न्हवते घरी, चिनगती वाढा, सोन्याचं कुलूप, रुप्याचा हात, आत उगडून बगते जिरसाळीचा भात, भातावर तूप, तुपासारखं रूप, रूपासारखा जोडा, चंद्रभागेला पडला येडा,**

**बया बडाम कशाचं, नकुल-बोटव्याचं, झाड झुंबराचं, फूल उंबराचं, लाटनं पिंपळाचं, सोजी गव्हाची, भैन भावाची, सून सासूसासऱ्यांची, रानी भरताराची, यीनी आल्यात भेटीसाटी, नेसाय देते पिवळी धाटी, जाईजुईची फुलं राई-रुक्मिनीच्या कानी, हसतमुखानं नाव घेते × × × रावांची पट्टरानी.'**

या उखाण्यामध्ये लग्नाच्या वेळी मुलीकडील मंडळींनी मुलाकडील मंडळींना द्यावयाच्या एका चालीरीतीची नोंद झालेली आहे. त्यामुळे या 'वडाम' नावाच्या चालीरीतीसाठी लागणारी सर्व सामग्रीही इथे सांगितलेली आहे, (नवऱ्या मुलाच्या न्याहारीसाठी अगर जेवणासाठी जे खास पदार्थ करून न्यावयाचे त्यास 'वडाम' असे म्हणतात.) त्याचबरोबर पुण्याच्या सुंदर विणीच्या काळचा चोळीची खरेदी वेळेला करता न आल्याची चुटपूट आणि शेवटी आपण आपल्या नवऱ्याची खास पट्टराणी आहोत हे बोलून दाखवावीशी वाटलेली इच्छा यांचाही या ठिकाणी समावेश झालेला आहे. त्यावरून असे दिसून येते की, जुन्या काळी एकीपेक्षा अधिक वायका करायची जी पद्धती होती, तिची कळत नकळत का होईना इथे नोंद झालेली असावी.

**'गावंदरीला पेरला भात, भाताचा बांधला भारा, आनून टाकला दारा, गाई आली हुंगून गेली, म्हैस आली खाऊन गेली, म्हशीला झाला रेडा, गाईला झाला पाडा, आईबापांनी दिला जांभळा घोडा, जांभळ्या घोड्याची लुटूक लुटूक धाव, न्हाई पाहिलं गाव, गावाच्या लांबलांब वेशी, ठसे पडले चौदेशी, चौदेशीचं उंबर गाजं × × × रावांच्या मंदिलाला शोभं तुरं ताजं.'**

या उखाण्यात खास शेतकरी जीवनाचा उल्लेख आलेला असून माहेरच्या माणसांनी लग्नाचे वेळी आंदण म्हणून दिलेल्या जांभळ्या घोडीचे आणि नव्या गावाचे वर्णनही आलेले आहे. या सर्व वर्णनावरून जुन्या काळच्या सार्वजनिक जीवनाची कल्पना येणारा हा संक्षिप्त इतिहास उल्लेखनीय ठरेल.

**'मोत्यांचे कंगण रुक्मिणीच्या हाती, माणिकमोती लावून केली आरती, शनिवार पेठ मंडईच्या वरती, शनिवार पेठवाल्यांचा आखाडा, विराच्या मारुती-पुढं नित वाजे चौघडा, नवरा निगाला देवाला, गळ्यात गोफ पायात तोडा, इंग्रजी बाजा वाजला, वराडांचा गाडा धडाडला, त्याला दिला शेला, पुढं वाजंत्र्याचा थाट वेशीत आला, वेसकऱ्याची आट त्याला दिली, पासुड्याची घडी पुढं केली,**

आली वर ओवाळणीची पाळी, तिला दिली चोळीपातळाची घडी, ब्राह्मणांनी मारली उडी, ब्राह्मण म्हणतो आवरा आवरा लग्नघटका राहिली थोडी; लगीन लागलं, नवरा हसला, नवरीचा मामा कन्यादानाला बसला; कन्यादानाचा ताट तांब्या, लाजाहोमाची तूपलोटी, खाली मांडली पायपाटी, पुढं शेस भरायला झाली दाटी, विहीण म्हणती आणा काखळ्याची पाटी, नवरीचा भाऊ देतो काखळ्याची पाटी, काढा कानपिळीची अंगठी, विहीण म्हणते कानपिळीच्या अंगठीची मोडली चाल, भाऊ म्हणतो इकडंही आमचे रेशनिंगनी केलेत हाल, तर मी × × × रावांचं नाव घेत म्हणते की, घ्या आता मला भर्जरी शाल.'

जुन्या काळच्या थोडचा मोठचा गावातील लग्नाच्या वेळची चालरीत दर्शविणारा हा उखाणा आहे. वदलत्या काळानुसार इथे कानपिळीची अंगठी देण्याची चाल मोडल्याचा आलेला उल्लेख आणि त्याचबरोबर रेशनिंगमुळे होणाऱ्या हालाची झालेली नोंद या गोष्टी ग्रथित झालेल्या आहेत. काळ बदलेल त्याप्रमाणे स्त्रिया आपल्या अक्कलहुशारीने जुन्यावरच नवा साज कसा बेमालूमपणे चढवू शकतात आणि जुन्या काळचा उखाणा हळूहळू कसा बदलत जातो, हेही यावरून लक्षात येते.

'लग्नं निगालीत शिताळी काय मार्कोटात, न्हवरा हिकुलंक्यात, न्हवरीच्या मनाला बातमी कळली नात्यापुत्यात, गडबड झाली जुंदळदेशात, जाती टाकली अक्कलकोटात, दळनं झाली शिरवडचात, घेतलं बाशींग येरवडचात, मांडव घातला पंढरपुरात, परटीन बसली रत्नागिरीत, चौक भरला इसलामपुरात, सवाष्णी सांगितल्या सोलापुरात, हळदी लागल्या कोलापुरात, भिजानं वाटलं रंकाळतळ्यात, बकरं मारलं येराडाव, देवाक आलं कराडाव, समस्त मंडळी हात धुण्यास बसली पंचगंगेला, सुपारी फोडून विडे वाटायला गेली मांडवात, न्हवरान्हवरी नासकात, आयार झालं आशीत काय दुशीत, भवलं घातलं भाईर गावाला, शेसा भरल्या वाळकीशराला, काय मोठचा रस्त्याला, गोपा घेतला कलिनीत, आगीनगाडीला वाटा फुटल्या मुंबईत, रुखवत भरला बडोद्यात, उतारला पारगावात, संतमंडळी ऐकाय बसली मिरजेत, न्हवऱ्याचा बाप हाय विजापुरात, न्हवऱ्याची आई रामखंडात, न्हवऱ्याचा उल्लास झाला चाफळ सर्कशीत आनीक × × × रावांचं नाव घेते मी हाय खुशीत.'

या उखाण्यामध्ये विलक्षण अतिशयोक्ती आलेली आहे. एखाद्या बाईला गप्प बसवावी आणि आपल्या बुद्धीचा प्रभाव तिच्यावर पडावा या ईर्षेने बायका असा उखाणा घालतात. इथला अतिशयोक्तीचा भाग सोडला तर लग्नाच्यापायी कुठे कुठे फिरणे भाग पडते याचा भला मोठा अंदाज येतो. त्याचबरोबर या ना त्या कारणापायी चहूकडे पसरलेल्या नात्यागोत्यांना जमा करावयाचे म्हणजे कोण धड-पड करावी लागते याचीही कल्पना येते. हा उखाणा ऐकला म्हणजे तो घालणाऱ्या बाईच्या सर्वसामान्य ज्ञानाची कल्पना मनाला थक्क करून सोडते! कारण लग्नाची सगळी चालरीत न चुकता इथे एवढ्या मोठ्या पसाऱ्यात इतकी सुंदर बसविलेली आहे की, मी मी म्हणणाऱ्यानेही तोंडात बोट घालावे !

(१) **'झुन झुन जात होते, खिडकीवाटं पहात होते, खिडकीला पाच तारा, अडकित्त्याला घुंगरं बारा, पान खात्यात कराकरा, घाम येतूया दरादरा, घेते पदर घालते वारा × × × राव जात होते कुणाच्या घरा न् आत्तीबाई ताकीद करा न्हाई तर माजा राग न्हाई बरा.'**

(२) **'काढणीत काढणी तुरीची, अवघड पायरी विहिरीची × × × रावांचे सखूबाई भाकर आण न्ह्यारीची म्हंजे चोळी घेतील जरीची.'**

(३) **'उभी होते माडीला, ऊन लागलं साडीला × × × राव जुंपा गाडी न् चला जाऊ तुमच्या सासुरवाडीला.'**

(४) **'झाड वेलाचं, झाड बेलाचं, झाड सुरूचं, झाड पेरूचं, कराकरा लवती मोगरा जाई × × × रावास्नी झोका देती येशवदीबाई.'**

(५) **पाऊस पडतो झिरीमिरी, पाभरी चालल्यात नानापरी, शेताला जाते हारकत, राशीला माज्या बरकत, अधोली माजी सकी, कोल्यानं टाकली हुकी, खळ्यातली ज्वारी झाली पक्की न् × × × राव उभ्यानं गोण्या झोकी.'**

जानपद उखाण्यांचा तोंडवळा या प्रकारच्या लहानलहान उखाण्यांनीदेखील सजविलेला असतो. असले उखाणे लहानलहान मुली एकमेकींना लग्नापूर्वी शिकवीत असताना खेड्यातून अद्यापही दिसून येतात. या उखाण्यांतून जानपद जीवनाची मोठी सुंदर पेरणी झालेली दिसून येते.

जुन्या काळच्या सामाजिक जीवनाची कल्पना देणारे असे आणखी पुष्कळ उखाणे असतील. पण मला जेवढे मिळाले तेवढे मी इथे दिलेले आहेत.

आपल्या पतीचे नाव उठावदार रीतीने सर्वांच्या समोर यावे म्हणून खेडुत स्त्रियांनी केलेला हा भावनेचा साजशिणगार मोठा हृद्य तसाच अभ्यासू मनाला विचार करावयास लावणारा आहे. आजकाल हे दुर्मिळ होत चालले आहे. त्याची आवडही नव्या पिढीला राहिलेली नाही. तथापि आमच्या वाडवडिलांची माहिती देणारी ही किमया मोलाची आहे यात शंका नाही. आमची वडील मंडळी कोणत्या काळात रहात होती, त्यांनी कशा प्रकारचे वैभव उपभोगले होते, त्यांच्या मनाची घडण कशी झाली होती, त्यांना काय आवडत होते इत्यादींची हकिगत हे उखाणे अभिमानाने सांगत आहेत. या उखाण्यांतील वेचक शब्दांनी आणि आटोपशीर भावनेने गुंफलेले विचारसौंदर्यही वाखाणण्यासारखे आहे. तशीच इथे वापरात आलेली कल्पकताही रसपूर्ण असून सुशिक्षित मनाला अचंबा वाटायला लावणारी आहे. त्यामुळे या उखाण्यांनी पतीच्या नावास माधुरी आणली आहे, असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

## रुखवताचा उखाणा

सामान्यत: नवऱ्याचे नाव घेण्यासाठी बायका ज्याप्रमाणे उखाणा उपयोगात आणतात, त्याचप्रमाणे खेड्यातील स्त्रिया लग्नसमारंभाचे वेळी **रुखवत** आणतानाही उखाण्याचा उपयोग करीत असतात. खेड्यामध्ये नवरीच्याकडील मंडळी निरनिराळ्या प्रकारचे खाण्याचे पदार्थ करून दुरड्यांत भरतात आणि ह्या दुरड्या नवऱ्याचे घरी नेऊन पोहोचत्या करतात. अशा वेळी ह्या दुरड्या पत्रावळीने झाकलेल्या असून मोठ्या समारंभाने वाजत गाजत आणलेल्या असतात. त्यामुळे ही प्रत्येक दुरडी उघडते वेळी नवऱ्याकडील बाईने उखाणा घालावयाची चाल आहे. मात्र इथे नवऱ्याचे नाव त्या उखाण्यात गोवलेले असतेच असे नाही. केवळ 'सुग्रीण'पणाचे मोजमाप करण्याच्या ईर्षेने गमतीदार उखाणा घालावयाचा एवढीच यामागची भूमिका असते.

**रुखवत** आणावयाचा म्हणजे वधूकडील मंडळींनी वराकडील मंडळींना खाण्याच्या पदार्थांची देणगी द्यावयाची. अशा वेळी एकमेकींच्या उणेपणाची भरपाई करण्यासाठी दोन्हीकडील बायका उखाणा घालीत असतात. उत्तराला प्रत्युत्तर सारखे चालूच असते. जणू एक प्रकारच्या अक्कलहुशारीची इथे शर्यतच

लागते ! त्यामुळे प्रत्येक दुरडी उघडताना बायका अहमहमिकेने नवा उखाणा घालीत समोरच्या मंडळींना चकित करून सोडतात. अशा उखाण्यांची लांबी-रुंदीही भरपूर असते.

**'पहिली दुरडी फुलाचा भार, ईवाय मिळाला हौसदार; दुसरी दुरडी केळाची फणी, रुखवत उघड न्हवऱ्याचे भैनी; तिसरी दुरडी साकरशायी, रुखवत उघड न्हवऱ्याचे आई; चौथी दुरडी साकरभाता, रुखवत उघड न्हवऱ्याचे गोता; पाचवी दुरडी गव्हाची लापशी, रुखवत उघड न्हवऱ्याचे मावशी; साव्वी दुरडी अनारसं लाडू, रुखवत उघड न्हवऱ्याचे साडू; सातवी दुरडी साकरसोजी, रुखवत उघड न्हवऱ्याचे आजी; आठवी दुरडी ताजा खांडवा, रुखवत उघड न्हवऱ्याचे बंधवा; नववी दुरडी भरले काजू, आनीक आता × × × रावांचं नाव घेते तवा द्या बगूया सगळीजनं बाजू.'**

या उखाण्यामध्ये खाण्याच्या पदार्थांचा, गणगोतांचा व दुरडचांच्या संख्येचा उल्लेख आलेला आहे. शिवाय नाव घेण्यासाठी अडविलेल्या मंडळींना शेवटी उत्तर दिले असल्याचेही दिसून येत आहे.

**'आला आला रुखवत, त्यात हुत्या शेंगा, सुपारी गंगा, जाऊन भागीरथीला सांगा. यमुनाची परात, काशीनं घेतली घागर, सपाट केलं नगर, इतका का ग उशीर? वारंधटी. फवं भाजाय बसली साळू, कांडाय बसली बया न् बाळू. झिंगाई म्हनती बिस्कीट किती दळू? हरीक मिरीक चांगुनाबाई, हातात लाटनं तुळजाबाई, कुठं गेली माजी बाई? घरात मानूस मात न्हाई. कळस फनी, नकस्-गिरी चांदसूर्व्या मजेसिरी. गितानं केली पातळ सोजी, नकुल तोंडीत बसली राज दरवाजाच्या तोंडी. अंबाबाई बसली परसदाराशी, समजी केली त्या दिशी. भिमानं केली सीमा. मिरगानं मारली गोळी. चंद्रानं बांदली जाळी. वाडगं येताळी. तुतळी पत्रावळी टाकी. सकू दुरान लावी. बया भात वाडी. आकू कडी वाडी. बकू भाजी वाडी. इतकं करून दिलं येताळच्यापशी. येताळच्यानं दिलं तिरताळच्यापशी. परतेक गावच्या सुगरिनी आल्या मिळून. पाय धुया गेली दरू. नाव तिचं सरू. कुंकू लावाय गेली नगू. नाव तिचं छबू. विहीनबाई राजहंसाच्या लग्नाला खरच आला किती? पाचशे गेले रुखवताला. नऊशे गेले लग्नाला. हिशेब दावा न्हवऱ्याच्या बावाला. हिशेब करते मी खडाखडी पन वर आदी टाका पाटावाची घडी.'**

या उखाण्यात रुखवताच्या निमित्ताने होणारी सर्व प्रकारची घरगुती हालचाल व्यक्त झालेली आहे. नावांच्या विविधतेबरोबरच इथे कामाचीही विविधता दिलेली आहे. तसेच प्रत्यक्ष लग्नघराचीही हकिगत सांगितलेली आहे. कुणाचे टोपण नाव दिले तर लगेच खरे नावही या ठिकाणी उघड केलेले आहे. शेवटी उखाणा घालणाऱ्या बाईने लग्नाचा खर्च विचारताच अतिशयोक्तीचे उत्तर आल्याने आपण स्वत: उत्तम हिशेब करून दाखवतो हे आव्हान स्वीकारले असून त्यासाठी पातळाची घडी मागितलेली आहे ! कुठे कुठे दुरडीवर खण अगर पातळाची घडी ठेवण्याची जी चाल आहे, ती इथे मोठ्या खुबीने व्यक्त झालेली आहे. या उखाण्यातील हीच कल्पना कुठे कुठे अशा रीतीनेही सांगतात :

**'शाकुनवडी घाली रांगा, जाऊन भागीरथीसी सांगा. परात यमुनासी मागा, तिंबायासी. काशीनी घेतली घागर, शोभे तिंबीती नागर. का ग उशीर वरणाला बोटव्यासी. अशी म्हणे माझी सई, कुठं गेल्या आत्तीबाई ? शाकुनवाडचा कशा घालाव्या सांगा आम्हासी. येश्वदीनं धरली वाट, साऊबाई लावी भाजीला पीठ, भीमबाई म्हणे आणा सुंठ. पहिल्यानी घरातून आली गिरजाबाई, हाती लाटणं घेऊनी. बुंदी पाड ग रमा उमा, तिनं मोठी केली सीमा (जलदी), शेवायाचा रवा तिम्मा, कृष्णाबाई. येऊबाई चौरंग मांडिती, नानीबाई वऱ्हाडाचे पाय धुती, द्वारकाबाई लामनदिवा धरती, येहनीशी रुखवत दावीती कमळाबाई. शाकुन लग्नाची समई, रुखवत भरायची घाई, हळदकुंकू देती सती भामाबाई. बत्तासे देती जानकाबाई. नारळ देती अनसाबाई. फुलं देती लक्ष्मीबाई. अत्तर देती आन्नपूर्नाबाई. वऱ्हाडला मूळ जाती सरस्वताबाई. बोलायासी सगळी चारुळी काढुनी, सगळे बदाम फोडुनी, खारका काडल्या निवडुनी, चिक्कन सुपारी. गुळाचा पाक कर ग राधा. चुलीला जाळ लावा साधा. वरती धर झारा. मग बाई रांगूळ्या काढाव्या. समया आणून लावाव्या, उदबत्तीचा घमघमाट. केला चटनी कोशिंबिरीचा थाट. यीनीला म्हनती बसा नीट पाटावरी. नर्मदीनं वाढला वरण भात. कमळानं वाढली पुरणपोळी. यिनीला म्हणती व्हा तय्यार जेवायासी. यिहीन म्हणे आणा आमटी. तिकडून आली भिकूबाई हिमटी वाढायासी. यिहीन म्हणे आणा रस्सा. ठकूबाई म्हणे जाईबाई बसा. चंद्रज्योतीचा करा तमाशा यिहीनीपुढं. गहू तांदळाच्या कोटच्या,**

**खणानारळाच्या ओटचा. अत्तरदाणी गुलाबदाणी, यिहीन बैसली आपल्या मनानं आत्ता लोडापासी.'**

इथे मागच्या उखाण्यापेक्षा सर्व चालरीत अधिक विस्ताराने आलेली असून विहीण खूष झालेली दाखविलेली आहे. त्याचप्रमाणे पूर्वीच्या मानाने सगळा थाटही थोडा श्रीमंती दाखविलेला आहे. आपल्या घरी खरोखरच काही असो अगर नसो दाबून बोलायला हयगय करायची नाही, अशी जी या वेळची स्त्रियांच्या मनाची प्रवृत्ती झालेली असते, तिचाही इथे भरपूर वापर झालेला दिसून येतो. तसेच या लग्नकार्यासाठी गणगोत व शेजारणीपाजारणी किती आपुलकीने खपत असतात, याची कल्पना या उखाण्यात आलेल्या नावांच्या यादीवरून यावयास हरकत असू नये, एवढी इथे नावांची गर्दी झालेली आहे.

**'आला आला रुखवत मांडवांचे दारी, आत काय परी, शेवाया सरी. शेवाया साजूक, तेलच्या नाजूक. पानाच्या पट्टचा, खोबऱ्याच्या वाटचा, गुळाचं खडं, उडदाचं वडं. पापडहार हारी, घारी, सजुरी. बुंदी बरफी झुलाप झारी. जिरं साकार ऱ्हाई पुरी. शेंडीसकट पाच नारळ. देटासकट पिकली केळं. दराक्ष हंजीर रामफळं. करनी केली धनसंपत्तीच्या बळं. रुखवत उघडते खडाखडी. आनीक पाईजे तर × × × रावांचं नाव वर घेते, पन अगूदर रुखवतावर ठेवा चोळीपातळाची घडी.'**

या ठिकाणी रुखवत कशाकशाचा आणला आहे हे नवरीकडील बाई सांगते आहे. त्याचबरोबर एवढ्या थाटाने हे सर्व आणले आहे, तर आपली करणी बघून योग्य तो मानपान राखण्यासाठी चोळीपातळाची घडी दुरडीवर ठेवण्याची ती विनंती करीत असल्याचे दिसून येते. मानापानाची ही भावना स्त्रियांच्या मनावर एवढी बिंबलेली असते की, त्यापायी वाकुडपणा येण्याचादेखील संभव निर्माण होतो ! अशा वेळी आपला पण मोठेपणा दाखविण्यासाठी दुसऱ्या पक्षाकडून हमखास उत्तर येते की,

**'आला आला रुखवत, त्येला चार घोड्यांचा टांगा. टांग्याच्या मोडल्या खिळा. घोड्याच्या गमावल्या घुंगूरमाळा. मी काय यीन करनीची न्हवं व्हय? करायचीच हुते, आनीकबी काय काय करीनच म्हनते . . . यिहिनीला वजरटीक करीन म्हटलं ठशाची. नथ फाशाची. मी काय यीन करनीची न्हवं**

व्हय? करायचीच हुते, आनीकबी काय काय करीनच म्हनते . . . यिहिनीला गळसुरी करीन म्हटलं तोळ्याची, युवायाची टुकडपट्टी आली खालच्या मळ्याची. मी काय यीन करनीची न्हवं व्हय? करायचीच हुते, आनीकबी काय काय करीनच म्हनते . . . यिहिनीला करीन म्हटलं राकडी पन सोनाराची बायकू पडली माज्यासंगं वाकडी. यिहिनीला घीन म्हटलं लुगडं तांबडं, तर युवायाचं मेलं शंभर कोंबडं. मी काय यीन करनीची न्हवं व्हय? करायचीच हुते, आनीकबी काय काय करीनच म्हनते . . . यिहिनीला करीन म्हटलं गोट पन सोनाराचं मोडलंया बोट. यिहिनीला करीन म्हटलं झुबा पण सोनाराचा मोडलाय खुबा. मी काय यीन करनीची न्हवं व्हय! करायचीच हुते आनीक बी करीनच म्हनते . . . यिहिनीला जेवान करीन म्हटलं पोळ्याचं पन पानी आटलंय तळ्याचं न् रेडं मेलंय कोळ्याचं. यिहिनीला जेवायला पाडीन म्हटलं बुंदी पन राधी बामनीनीची म्हस गमावली फुंदी. मी काय यीन करनीची न्हवं व्हय? करायचीच हुते, आनीकबी काय काय करीनच म्हनते. यिहिनीला करीन म्हटलं बारा भार जोडवी पन यीन फोडतिया येता जाता दह्याची खोडवी. यिहिनीला घालीन म्हटलं कांकनं तर राती कासाराला आलंया दुखनं. मी काय यीन करनीची न्हवं व्हय? करायचीच हुते, आनीकबी करीनच म्हणते . . . यिहिनीला घालीन म्हटलं न्हाऊ तर रातीच कोळ्याला आलंय हिवू, यिहिनीला शिवीन म्हटलं चेपल्या बाजारी तर चांभार पडलाय आजारी. मी काय यीन करनीची न्हवं व्हय? करायचीच हुते न् अजून करीनबी म्हणते . . . यिहिनीला वाडीन म्हटलं ताक तर डेऱ्याखाली गेलाय साप. यिहिनीला वाडीन म्हटलं दूधभात तर राती म्हशीनं दिली लाथ न् चरवी सांडली अंगनात. यिहिनीची भरीन म्हटलं वटी तर राती उंदरानं नेली खोबऱ्याची वाटी. मी काय यीन करनीची न्हवं व्हय? करायचीच हुते आनीक अजूनबी करीनच म्हणते . . . युवायाला शिवीन म्हटलं बाराबंदी तर रातीच शिंपी गेलाय आळंदीला घेऊन दिंडी. युवायाला कमरी करगोटा करीन म्हटलं गोपाचा, शंभर रुपयाच्या झोकाचा, तरी युवाय म्हनतो लोकाचा. मी काय यीन करनीची न्हवं व्हय? करायचीच हुते आनीक काय काय करीनबी म्हनते . . . रुखवतात सूप साजरं आनीक रुखवत भरनारनीच्या हातात मोत्यांचं आलं गजरं.'

या लांबलचक उखाण्यामध्ये करणी करण्याच्या मोठेपणाची भुलावणी भरपूर आली असून त्या रुखावाला तोंडावर फेकतानाच या ना त्या कारणाने वसणारा खोही सांगितलेला आहे. त्यामुळे या थापेबाज विहिणीचे पालुपदासारखे येणारे स्वत:च्या कर्तबगारीचे वाक्य ऐकताना चिक्कार हसू आल्याखेरीज रहात नाही. त्याचप्रमाणे अमुक करायचे होते पण अशाने असे झाले हे कारण वरचेवर पुढे केल्याने, दुसऱ्या बाजूच्या विहिणीलाही भरपूर चीड येत असल्याने एकंदरीने मांडवातील सर्व वातावरण भरपूर गरम होते ! पण अशा चिडाचिडीमुळे उगाच भलतेच वाकडे येऊ नये म्हणून आपल्या करणीचा प्रकार कसा झाला हे सांगताना विरुद्ध वाजूची बाई सरसावून पुढे येत म्हणते :

**'आला आला रुखवत त्यात रुपय हुते बारा, यीन मागती हाराडेरा तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरले धा. यिनोची करनी पहा, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरले नऊ, यीन मागती घऊ, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरले आठ यीन मागती ग्वाट, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरले सहा, यिनीची करनी पहा, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरले पाच यीन मागती माच, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरले चार, यिनीचं आलं प्वार, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरले तीन, यिनीची आली यीन, तिथं एक रुपाया खरचला. रुपय उरले दोन, यिनीचं आलं कोन कोन, तिथं एक रुपाया खरचला. असं रुपय बाराच्या बारा आटलं, यिवाय रागंरागं उठलं, यिवाय गेलं बंदरा, तेनी रुपय आणले पंदरा, पंदरा रुपयाची आनली ठुशी, तवा यीनीबाईच्या मनाची झाली खुशी आन् मग आल्या मांडवापाशी न् शास भराय गेल्या बावल्यापाशी.'**

इथे जुन्या काळच्या स्वस्ताईच्या दिवसांत कशी चालरीत करीत असत त्याची कल्पना आलेली आहे. विहिणीच्या घरच्या किती लोकांना काय काय करावे लागे व खुद्द विहिणीचाही हट्ट कसा पुरवावा लागे याचे हे एक उत्तम उदाहरण आहे. या उखाण्यामध्ये पुन:पुन्हा आलेले 'तिथं एक रुपया खरचला' हे वाक्य मोठे ठसकेबाज असून मागच्या व पुढच्या करणीचे मध्यंतर दाखवून किती राबावे लागते हे सूचकतेने सांगणारे असे आहे ! हा उखाणा ऐकताना बायकांची हसून हसून मुरकुंडी वळून गेलेली दिसून येते.

**'आला आला रुखवत मांडवाच्या दारी, वाटा सोडा पाट टाका. पाट न्हवं धोंडा, चवरंग मांडा. दात घासायला वासा, वासा पुरेना तुळी तासा. तोंड धुवायला हंडा, हंडा पुरना रांजून मांडा. बारा पायल्यांच्या केल्या भाकरी, न्हवऱ्याच्या घरी लईजन हाईत चाकरी. बारा पायलीच्या केल्या तेलच्या, यीन म्हनती हाईत्या शिळ्या कालच्या. बारा पायलीच्या केल्या पिठाच्या, यीन म्हणती आता न्हाई इटायच्या. बारा पायलीच्या केल्या वड्या, यीन म्हनती झाल्या थोड्या. बारा पायलीचा केला रस्सा, यीन म्हनती पुरल कसा. बारा पायलीची केली भजी, यीन म्हनती शिळी का ताजी. बारा पायलीच्या केल्या रोट्या, यीन म्हनती न्हान का मोट्या. बारा पायलीच्या केल्या शेवाया, यीन यीना झालीय जेवाया. बारा पायलीचा केला भात, तवा यिनीनं धुतला हात. ततनं युवाय गेलं अष्टचाच्या पेटत, घेतलं बारा खन. सा खनाची केली चोळी. सा खनाची केली लाकपट्टी. आनीक × × × रावांनी जवा घेतली साठ रुपयांची ठुशी तवा कुठं यिनीबाईच्या मनाची झाली खुशी!'**

एका विहिणीने दुसऱ्या विहिणीला चिडविण्यासाठी केलेली खटपट या उखाण्यात आलेली आहे. भरमसाट बोलून विहिणीवर असे आरोप केल्याकारणाने अगर तिचे दोष दाखविल्याने, शिवीगाळ होईपर्यंत मांडवात कधीकधी हे प्रकरण गाजते! असा टोमणा मारलेला कुणाला खपत नाही. खादाडपणाचा केलेला असा उल्लेखही मग कुणाला सहन होत नाही. अशा वेळी समजुतीचे अनेक प्रकार पुढे येऊन कसावसा राग कमी करण्याचा प्रयत्न होतो.

या ठिकाणी गणगोतांच्यासाठी पुरवठ्याला म्हणून केल्या गेलेल्या बारा पायलींच्या जिनसांची आलेली नामावळ गणगोतांच्या मोठ्या खटल्याची साक्ष देते.

**'विहीणीच्या भैनी, नको बोलू उणं, म्होरं लागलं पुणं. पुण्याची नऊलाख पायरी. म्होरं लागली धायरी. धायरीचं वांगं. वांगं पचना. भाऊ पुसना. भावाला न्हाई मया. जाते तळेगाव पहाया. तळेगावचा कांदा. दुही टाकळी बांधा. दुही टाकळीच्या मधी भेंड्याच्या भिंती, शिकरापुरी धावा घेती. शिकरापूरचा आड, बोखरीला आला पाड. बोखरीचा आला फेरा, पिंपळगावानं केला जोरा. पिंपळगावाला दोराच्या नावा, राहूला कवा कवा जावा. राहूचा पाडावा, पिंपळगाव दडवा. राहूनंतर यवत, यवताच्या गाया. छाक झाल्या बाया. नानाचं**

**नानगाव. पानाचं परगाव. दहीतनं खामगाव. आम्मळ न् चिम्मळ. केडगाव जमलं. केडगाव हाजारी बाजारी. आंदळगाव शेजारी. म्होरं लागलं जवळं. जवळयाची काय सांगू इगूत, इंद्रर पाबाळ निगूत. निगतात निगाला हत्ती, कवठ्याला जाती. कवठ्याचा बाजार, थैमान शेजार. थैमानात इकतो गूळ, मांजरीकराला धाडा मूळ. मांजरीकर पैक्याच्या भरात, युवाय पडला तुरंगात. रुपय भरलं तीनशे साठ, धरा थिऊर कोलीवडीची वाट. थिऊर कोलीवडीच्या जमल्या आयाबाया, गेल्या पुरना डोंगर पहाया. पुरनी डोंगरातनं घसरल्या, लोणीत यिऊन पसरल्या. लोणीकरांनी दिली लाथ, पडलं यीनीचं दोनी दात. विहीन उठली रागंरागं, धाकलं घोडं लागलं मागं. थोरल्या घोड्याला मळंतळं, आपटीकर यिऊन पळं. आपटीकराला धावला कौल, बगा मरकळीचा डौल. मरकळात इकत्यात गहू, मावडीकर म्हनतो वजं वजं जाऊ. मावडीकरानं जुंपली गाडी, बेंदाच्या वडगावांनी मारली उडी. रुखवत आला रुखवत आला माका आनीक आमच्या कोंबडीला झालाय वाखा, तर तुमची गाडीबैलं उतरून टाका.'**

लग्नासाठी म्हणून गावाला आले असताना जवळपासचा मुलूख बघायला उतावीळ झालेल्या विहिणीची व तिच्या लोकांची कशी फजिती झाली ते इथे दाखविलेले आहे! रुखवताच्या वेळी उखाणा घालावयाचा म्हणजे उणेपुरे बोलून थट्टा करावयाची हा प्रमुख भाग असतो, तो इथे पुरेपूर अमलात आणलेला आहे. त्यामुळे पुष्कळ विनोद निर्माण करण्यास हा उखाणा उपयोगी पडतो. हा उखाणा पुणे जिल्ह्यात मला मिळाला आहे. त्याकारणाने इथे आलेली गावांची नावेदेखील त्या भागातीलच आहेत. इतरत्र हा उखाणा त्या त्या विभागातील गावे घालून घेतलेला आढळून येतो. या ठिकाणी शेवटी कोंबडीला वाखा झाला म्हणून व्याह्याने आपली गाडीबैलं उतरून टाकावीत अशी केलेली विनंती मात्र विलक्षण गमतीची आहे!

**' हिरवे किंकर लाल मोती, खेडेगाव शहराच्या धरती. नारायणगाव शहर, चहूकडून डोंगर. डोंगराचा तुटला कडा. गावकुशी मारुतीचा वाडा. नित्य वाजे चौघडा. गेला आडवा वऱ्हाडाला गाडा. गाड्याला दिला शेला. नवरा शिवपूंजनाला गेला. शिवपूंजनाचा थाट. पुढं कोळ्याची पडली आट. कोळ्याची पुजत होती कावड. वेशीत महारणीची दवड. महारणीला दिली वाटी. नवरा देवळात**

**जाण्याची दाटी. देवळी जाऊन पोषाक चढे. वरधावा गेला पुढे. तो गेला घाई घाई. तेलसाडी घेऊन करवली येई. वर ववाळण्यास मावळण जाई. मावळणीला दिली साडी. बामणांनी मारली उडी. बामण म्हणे आवरा आवरा लगीन घटका थोडी. बामण मंगल बोले कसा. तांदुळ पडे पसा पसा. मामा कन्यादानास बसा. नवरदेवा मनात हसा. कन्यादानाची थाळी वाटी. लाजाहोमाची तूपरोटी. जानवस घरी माणूस दाटी. जानवस घरी केरसुणी दिवा. केरसुणी दिव्याची आट. येऊद्या करवल्यांचं ताट. करवल्यांचं ताट येई झटपट. येऊद्या आता वर-बापाचं ताट. वरबापाच्या ताटाची मजा. रुखवताचा वाजतो बाजा. रुखवत बघून हसले. राजबिंदीला बसले. कुणी खेळती रंग. कुणी घालती आहाणे. कुणी पहाती रुखवताकडे. न्याहरीत टाकला रुपाया. नवऱ्याला केले कंठीकडे. वरमाईला दिले चारी ग्वाट. भानुमतीला पहायची काढली मोठी आट. तिला पहाता आली तेढी. वऱ्हाडानं जुंपली गाडी × × × रावांचं नाव घेते मी पडले भाबडी.'**

लग्नाच्या अगोदर आणि नंतर खेडोपाडीची चालरीत कशी असते, याच्या काही खुणा इथे सांगण्यात आलेल्या आहेत. तसेच मानापानाला हपापलेल्या भावनांचाही उल्लेख आला असून, किती केले तरी मुलीमध्ये काही तरी खोड काढून शेवटी वऱ्हाड एकदम कसे चालू लागते आणि रंगाचा बेरंग कसा उडतो, याची ही मजेदार माहिती या ठिकाणी आलेली आहे. हा प्रसंग रुखवताच्या वेळी उखाण्यात आला म्हणून त्याची मजा. पण एरवी प्रत्यक्षात तसे घडते तर मात्र तोंडचे पाणीच पळावयाचे, एवढा हा गंभीर प्रसंग ! परंतु घडले ते सांगितले या पलीकडे याचे गांभीर्य यावेळी कुणाला भासत नाही. त्याकारणाने सगळे काही खेळीमेळीने चालले आहे असे समजून निर्माण होणारी चिडाचीड वायका विसरू शकतात ! नाही तर लग्नासारख्या मंगल प्रसंगी मारामारीचीच वेळ यायची आणि भलतेच व्हायचे !

**'मांडवाच्या दारी विहीण बसली आंगुळीला. पाणी आणा गंगेचं. मखर बांधा भिंगाचं. सात खिडक्या रंगीत महाल. तिथं जाऊन पलंग घाल. पलंग विणला हारोहारी. विडे केले नानापरी. हातात घेऊन मुखात घाला. गरम झालं वारा घाला. देशोधडी बंदरा धाडा. भिलानं धरला घाट. रुपये मोडले बेलपत्री. कारकुनाचा पैका. विहीणबाई आता नाव घेतात सर्वजण कान देऊन ऐका.'**

या लहानशा उखाण्यामध्ये विहीणबाईची करता येईल तेवढी स्तुती केली असून तिची वडदास्त कशी ठेवली पाहिजे हेही सांगितलेले आहे. विहिणीला खूष करण्याचाच हा एक प्रकार होय. त्याचबरोबर त्यासाठी वैभवदेखील एवढे उभारलेले आहे की, अशक्य गोष्टी शक्य झाल्याचा भास ऐकणाराला व्हावा!

**'मांडवाच्या दारी शिध्याची पाटी. विहिणीच्या कपाळाला पडली आठी. व्याही बसला तसा उठी. बाईला मातुर आला घुस्सा. विहीणबाईचा घुस्सा काढा. वीस भुयांची पालखी बसायला धाडा. अवो अबो, मला कशाला पालखी? मी तुळशीच्या फुलाहून हलकी. सहज बसली घालून मांडी तर मोडली पालखीची दांडी. आनीक जोकून बगीतलं तवा वजन भरलं आकरा खंडी.'**

या उखाण्यात विहिणीची भरपूर थट्टामस्करी केलेली आहे. अंगाने जाडजूड असलेल्या तिच्या वजनाचा तर अगदी आवाक्यावाहेरचा हिशोब इथे केलेला दिसतो! विहिणीच्या स्वभावाचे इथे आलेले वर्णनही गमतीदार वाटते.

**'लाडभाऊ साडभाऊ, लाडवाचे लाड गेले वाळवंटी, वाळवंटीचे गहू. घोर-पडीचे मांडे, तळेगावचे उंडे. सात दुरडचा रोटचाच्या, सात दुरडचा पुऱ्याच्या. सात थाळे नकुले. सात थाळे बोटवे. एकटा मी जेवतो. पोटावर हात ठेवतो. काय बाई अंधार छपके. दिवा नाही करू काय? खरचला लोभ. घडविला दिवा. पाठविला विहिणीच्या गावा. फलटणचा तांब्या. ओझरची वाटी, पारनेरची तिबई. जेवणं होती संगमनेरी. विडे होते जुन्नरी. बोलवा जुन्नरचे तेली. आधी गाळा खोबरेल. मग गाळा मोगरेल. मोगऱ्याची भाजी गोडाची. फोडणी दिली तेलाची. फोडणी दिली ओतुरी. वास गेला कोठूरी. अशी विहीण पुतळी की सव्वा मणाची कोथळी.'**

या उखाण्यामध्ये गावच्या नावाबरोबरच माणुसकीचा उच्चार झाला असून खादाडपणाचीही नोंद झालेली आहे. समोरच्या मंडळींना आवाच्या सवा कचकून बोलून घ्यावयाच्या वृत्तीचा हा उखाणा निदर्शक ठरेल! तसेच अतिशयोक्ती पराकोटीला किती जाऊ शकते, हेही यावरून दिसून येईल.

**'आला आला रुखवत गाडी केली बारामती. धारान पाहिली सोलापुरी. माप केलं कोलापुरी. वस्ती केली महाडमंदी. पानी पेली भोरामंदी. पेठ पावी शिरवाळची. दिपवाळी पावी मुंबईची. दसरा पावा बडोद्याचा. बोरगावी घेतले**

**तांदूळ. सडले किल्ल्यावरी. सूप सासवडी. बिछाना धानवडी. खजपुर खंजवडी. मजपुर मंजवडी. बेळगाव शेळगाव. दह्यातलं खामगाव. भिवरीन बोपगाव. नको मला तोंड दावू. युवाय मिळाला आंधळ्या न् चंभळ्या तोंडाचा. शिरी टिकला गंधाचा. धोंडा खाईना बांधाचा. हुबळीधारवडी लावली जाई. खरंच यिनीबाई तुमच्या गावाचं नाव काय? गड सातारा नळाची दाटी. वाईधोम कृष्णाकाठी. हात धोंडचाव केंजाळ. धावजी बुवानं दरोजा बांधला. रुपये पटले तीनशेहजार. त्याला खिडक्या लावल्या दाट, जाती येळचाला वाट. येळचाची वाट. नऊखंड जबर. घेते धायगुड्या पाटलाची खबर. कुडाळी गावात कुडाळी गंगा. हडताळ मसव्याला जाऊन सांगा. हडताळ मसवं केलं माळ्यांनी साजरं. युवायाला घीन म्हटलं हार गजरं. हार गजऱ्याला सोन्याच्या काड्या. खाली निवाल्या बारा वाड्या. बारा वाड्या शिलेदारी. शेवगावी केला शिरा. गोपगावचा पानमळा. कलकत्त्याची सुपारी. मंमईची जायपत्री. पुण्याचा चुना. चिलावळीची पानं आणा. यिनीला घीन म्हटलं फडकी. खाली आली खडकी. खाली आला मरड्याचा घाट. या घाटाला पायऱ्या तीनशेसाठ. चल माहुलीला जाऊ. किष्णाबाईचं दर्शन घेऊ. कोरेगाव पाण्याचा ठाव. यिनीला यीना पाण्याची चव. आणा डिसकळचं गहू. रुखवतात जाईजुई. माज्या आण्याला पुढं येऊन उत्तर देणारी कोण हाई?'**

या उखाण्यामध्ये प्रतिपक्षाला उत्तरादाखल बोलावयास पुढे येण्याचे आव्हान केले आहे आणि गावोगाव फिरून रुखवत कसा तयार केला याची मोठी मनोरंजक माहिती दिली आहे. हौसेबरोबरच निर्माण होणारा पसाराही इथे स्पष्टपणे सांगितलेला आहे. तसेच कृष्णामाईचे दर्शन घेऊन आल्याची सूचनाही दिलेली आहे. आपापल्या परीने आपली हौस आणि चालरीत भागविताना ओळखीच्या मुलखाचा इथे आलेला उल्लेख उठून दिसतो आहे.

**'आला आला रुखवत त्यात हुती आरती, उघडून बघते तर विठ्ठलाची मूर्ती. आला आला रुखवत त्यात हुता मळा, उघडून बघते तर विठ्ठलाचा चोकामेळा. आला आला रुखवत त्यात हुता कुंकवाचा पुडा, उघडून बघते तर चंद्रभागला पडला येडा. आला आला रुखवत त्यात हुते माणीक, उघडून बघते तर भक्त कुंडलीक. आला आला रुखवत त्यात हुती गोळी, उघडून बघते तर वाल्मिकी**

कोळी. आला आला रुखवत त्यात हुतं फूल, उघडून बघते तर गोऱ्या कुंभाराचं मूल. आला आला रुखवत त्यात हुतं उंबार, उघडून बघते तर गोरा कुंभार. आला आला रुखवत त्यात हुता हात, उघडून बघते तर गोरखनाथ. चांदवडी फुलं ऱ्हाई रुक्मिनीच्या कानी × × × रावांचं नाव घेते त्यंची लाडकी रानी.'

ह्य उखाणा पूर्वीच्या उखाण्यांच्या मानाने अगदी निराळा आहे. भाविक मनोवृत्तीच्या स्त्रीची ही कल्पना आहे. रुखवतासाठी तिने आपल्या ओळखीच्या संतमंडळींना गोळा केले आहे! पाककौशल्याची करामत करून दाखविताना तिने जवळचे सर्व चांगले ते देवाला वहावे ह्या कल्पनेवर भर दिलेला आहे. त्याचप्रमाणे हे सर्व करीत असताना आपण आपल्या नवऱ्याच्या आवडत्या आहोत, ही शेवटी तिने व्यक्त केलेली कल्पनाही मोठी हृदयंगम आहे.

'कालं बेलं कासेगाव. वंडू मंडू नांदगाव. साळशिरंबं वाटेगाव. हातात कांदा गुंडवाडकरणी, पाटीवर गोंडा मोराळकरणी, बारवचं पाणी निमसूडकरणी, चिपटयात नांद ग म्हासूर्णकरणी, टेकाव रहा ग गडकरणी, भाजी खा ग पळसगावकरणी, तव्याचं काळं खरसिंगकरणी, तळयात पव ग औंधकरणी, देवाला जा ग नांदूसकरणी, कलागत कर ग कळंबीकरणी, आंबरस कर ग उच्चठाणकरणी, सैपाक कर ग पुसावळकरणी, टेंब्यात बस ग कुर्लेकरणी, खिडीत रहा ग शामगावकरणी. ऊस लाव ग किवळकरणी, ऊस खा ग चिखलकरणी, अडसाराला रहा ग नाजगीरकरणी, पान तोड ग अर्वीकरणी, कुराड कर ग वाठारकरणी, तेलाचं टीप ग रहिमतपूरकरणी, ठेसनाव उभी कोरेगावकरणी, काला खा ग कालगावकरणी, धार लाव ग नांदगावकरणी, काटया पाड ग कोपर्डेकरणी, वतात रहा ग कवठंकरणी, टेकाव रहा ग खेरडकरणी, शेरडं पाळ ग इंदूलकरणी, बाजार भर ग चरेगावकरणी, अड्डयावर बस ग उंब्रजकरणी, मेवा खा ग शिवडकरणी, वरण कर ग वराडकरणी, बनात रहा ग कोनेगावकरणी, जागा सोड ग तासावडकरणी, अफू पाळ ग बेलावडकरणी, ढोल बांध ग नऊशीरकरणी, दुपारती टाक ग कोपर्डोकरणी, कयताळ वाजीव नागावकरणी, माळावर रहा ग मुंढेकरणी, टेकडावर घर ग गोटकरणी, टुंगीत रहा कराडकरणी, संगमावर रहा ग सैदापूरकरणी, ठेसनावर रहा ग गडकरणी, पळून जा ग करवडकरणी, वाघ मार ग

**वांगीरकरणी, रेशीम भर ग रिसवडकरणी, टाका मार ग आतवडकरणी, गाया पाळ ग सुरलकरणी, धारा काड ग कामटीकरणी, औषध उडीव ग कडेपूरकरणी, सवतीवर नांद ग सवलकरणी, दारू काड ग तोंडलकरणी, बकरं काप ग शाळगावकरणी, सांगावा ने ग रायगावकरणी, कैफ आण ग हिंगणगावकरणी, फिर्याद कर ग कोळजकरणी, साक्षी दे ग खेरडकरणी, खटला चालीव ग येतगावकरणी, सुपारी फोड ग चिखलहोळकरणी, दंड काढ ग नागवाडीकरणी, पान खा ग घानवडकरणी, तंबाखू खा ग गार्डीकरणी, नाक्यावर रहा ग विटेकरणी, नदार राक ग निवरीकरणी, तांदूळ चर ग ढवळसरकरणी, भात कांड ग भाळगणीकरणी, चटणीला जवास आळसुंदकरणी, जेवाय वाड ग कार्वेकरणी, पारवं पाळ ग पारेकरणी, माप घाल ग सांगलीकरणी, माप घे मिरजकरणी, नारळ तोड ग तासगावकरणी, डोंगराव पीर ग डोंगरकरणी, लाह्या भाज ग जोंधळखिडीकरणी, नथीचा आकडा वेजेगावकरणी, माती उकर ग सांगलकरणी, चाळशी घाल ग साळशिगकरणी, काकडं नाचीव ग वलकाडकरणी, कंबरला खुरपं माहूलकरणी, पट्टा वड ग इबतकरणी, खिडीत रहा ग तरसवाडीकरणी, कांदा खा ग झरकरणी, वस्तीला रहा ग महुदकरणी, दर्शन कर ग पंढरपूरकरणी, गाया पाळ ग लोटवाडीकरणी, भित बांध ग लिंबूडकरणी, सनई वाजीव ग वरकूटकरणी, कुत्रं पाळ ग पिंपरीकरणी, खाद्याव खोरं मांडवकरणी, धयाचं गाडगं दहीवडीकरणी, गोंदून काड ग गोंदावलकरणी, खेळण्याचा अड्डा नरावणकरणी, बक्षीस दे ग खातवळकरणी, बोरं खा ग बोंबाळकरणी, पाटीवर गोंडा मोराळकरणी, आटत उभी ईकळकरणी, कुंकवाचा टिळा मायणीकरणी, आकूड बांधा शेडगंवाडीकरणी, निर्मळ धुणं चितळकरणी, सीतासावित्रीचा रुखवत आला बघून घ्या, आमच्या आण्याचा दुणावा भरून द्या.'**

या उखाण्यामध्ये अशा प्रकारे लग्नाला गोळा झालेल्या आणि आमंत्रण करूनही न आलेल्या गणगोतातील व इष्टमैत्रीतील बायकांचे व त्यांच्या गावचे वैशिष्टय त्या त्या गावांच्या नावांसह दिलेले आहे. त्यामुळे हा उखाणा ऐकताना मोठी मजा येते. खेरीज एवढे मोठे सर्वसामान्य भूगोलवजा ज्ञान सर्वांच्यापुढे ठेवताना लक्षात घेण्याजोगे आहे तेव्हा ह्या उखाण्याची भरपाई करून दाखवा म्हणून प्रतिपक्षाला केलेले आव्हानदेखील मोठे आहे.

रुखवताच्या उखाण्यांचा प्रकार हा असा आहे. असे उखाणे खेडोपा
शेकड्यांनी सापडतील. पण तऱ्हा जवळजवळ अशीच असते असे म्हणावय
हरकत नाही. रुखवताच्या वेळी नाही म्हणायला आणखी एक प्रकारचा उखा
घेतात, तो असा असतो :

**'आला आला रुखवत आंब्याच्या बनात, नवऱ्याची कुरवली म्हणती
एकली, हाना वरमायला चेपली. वरमाय म्हणती मी नवऱ्याची माता,
वराडाला लाता. वराड म्हनतं आमी सुकाची पाकरं, घ्या वाजंत्र्याची धोत
वाजंत्री म्हनत्यात आमी मौजंचं गडी, उपटा पुडायताची दाडी. पुडायत म्हनत्य
आमासंगं का वाकडं, घाला भटाच्या पाटीत लाकडं. भट म्हनतो माजी कव
कातडी, काडा वधूबापाची कातडी. वधूबाप म्हनतो मी काय केलं, धनसंप
बगून लेकीला दिलं.'**

इथे प्रतिपक्षाचे भरपूर वाभाडे काढलेले आहेत. हा सरळ सरळ शिवीगाळीच
प्रकार आहे! समजुतीने न घेता भांडणाचे पर्यवसान पराकोटीला गेले की अ
होते. पण मग त्यामुळे हा उखाणा जी बाई घालील तिच्यासाठी विहिणी
मन सांभाळणे जड होऊन बसते. कारण असे उखाणे घरच्यापेक्षा दारच्य
बायकाच अधिक घालीत असतात आणि मग सगळेच घरच्या बाईला निस्तरा
लागते! या उखाण्यामध्ये सांगितल्याप्रमाणे अशा वेळी परस्परांवर सगळे ढकलू
टाकण्यात सर्वजण पटाईत असतात. तथापि असा प्रसंग निर्माण होऊ नये
याची शक्य तो खबरदारी घेऊनच मुलीची आई मांडवामध्ये सर्वांना सावरण्याच
प्रयत्न करीत असते.

**अहो अहो यहिनीबाई
आमचे मागणे थोडेथोडे
नवऱ्या मुलीला पैंजणतोडे
पैंजणतोडयाची हौस भारी
चितांगाखाली सरी
सरीला मोती भारी
सरीला पडला पिळा
दंडी बाजूबंद येळा**

**येळाची दिसं भर दाट**
**हातामधी चारी गोट**
**अंगठ्यांनी भरली बोटं**
**नाकामधी सर्ज्याची नथ**
**नथीला आरयिली**
**काळचा पोतीला डोरयिली**

रुखवताच्या वेळी या प्रकारचा गीतवजा उखाणा पुणे भागात घालतात. इथे लई थोडे मागणे म्हणून विहिणीकडे सर्व प्रकारच्या दागिन्यांची नोंद करून मुलीकडच्या बायका मोकळ्या झाल्या आहेत.

खेडोपाडीच्या स्त्रियांच्या तोंडी असलेल्या अशा या उखाण्यात ठराविक अक्षरगण अगर मात्रागण किंवा अक्षरावली अगर मात्रावली यांचे बंधन दिसून येत नाही. त्याचप्रमाणे या ठिकाणी ओळींचे बंधनही असलेले आढळत नाही. यमकांचा भरपूर वापर करीत मनात आले ते सांगून मोकळे झाले असा हा प्रकार आहे. त्यामुळे या उखाण्याबावत 'म्हटले तर गद्याप्रमाणे वाचावा अगर पद्याप्रमाणे म्हणावा,' असे कोणी कोणी म्हणतात, ते एकपरी खरे वाटू लागते. कारण अलीकडेच मराठीमध्ये रूढ होत चाललेल्या, 'मुक्त छंदा'चे आवरण ह्या उखाण्याभोवती असल्याचे दिसून येईल. या उखाण्यांचा उपयोग मनातील गोष्ट ठासून सांगण्यासाठी पार्श्वसंगीताप्रमाणे होत असतो. त्यामुळे अर्थापेक्षा इथे यमकांचेच प्राबल्य विशेष! तथापि पुष्कळदा जरूर तो अर्थ सांगण्यासाठीही काही उखाण्यांचा चांगला उपयोग होत असतो.

उखाणे घालण्याची ही चाल महाराष्ट्रात फार जुनी आहे. मागोवा काढीत गेले तर त्याबाबतचा उल्लेख ज्ञानेश्वरीमध्ये असा सापडतो :

**जैसें न सांगणें वरी। काळापतीसी रूप करी।**
**बोलु निमालेपणें विवरी। अचर्चातें ॥**

(अ. १५/४६८, साखरे प्रत)

म्हणजे नवी नवरी नवऱ्याचे नाव न उच्चारताच जसे ते अकर्तेपणे सुचविते, तसेच ब्रह्माचे वर्णन काही न बोलूनच करता येते असे ज्ञानदेवांनी येथे म्हटलेले आहे.

उखाणा घालून पतीचे नाव घेण्याची पद्धती समाजामध्ये रूढ असल्याचा उल्लेख एकनाथांच्या वाङ्मयातही आलेला आहे. 'रुक्मिणी स्वयंवरा'त १५ ते १८ या अध्यायांमध्ये तत्कालीन विवाहाच्या पद्धतीची जी माहिति आली आहे तीमध्ये पुढील वर्णन सापडते :

**रेवती म्हणे जी यादवा। आधि घ्या ईचीया नांवा।**
**हळदी मग ईसी लावा। देवाधिदेवा श्रीकृष्णा ।।**

मराठी भाषेतील हा वाङ्मयप्रकार अगदी मूळचा असा आपल्याकडीलच आहे. त्यासाठी परक्या भाषेची अगर विचारांची आवश्यकता आमच्या बायका-मंडळींना कधी भासली नाही. मराठीचा जुना खजिना आणि भाषेचे अस्सल सौंदर्य त्यांना पुरेसे वाटले. त्याच कारणाने वाडवडिलार्जित अशी ही आपली संपत्ती आमच्या बायकांनी आपल्या मराठमोळा भाषेच्या बळावर व आठवणीच्या शक्तीवर वर्षानुवर्षे सांभाळलेली आहे. एका पिढीने हे बोल स्वखुषीने आणि मोठ्या भक्तिभावाने पुढील पिढीच्या हवाली केलेले आहेत. बालवयातच मिळविलेली ही बौद्धिक देणगी स्त्रियांना मोठेपणी बौद्धिकदृष्ट्या मोठी वैभवशाली वाटत आलेली आहे.

कै. डॉ. कमलाबाई देशपांडे यांनी या वाङ्मयप्रकारास अपौरुषेय वाङ्मयातील 'अनुष्टुभ् छंद' असे म्हटले आहे. अनुष्टुभ् छंद हा वाल्मीकि ऋषींना सहजस्फूर्त झालेला असा अभिजात संस्कृतातील पहिला छंद आहे. त्या दृष्टीनेच या वाङ्मय-प्रकारास हे नाव देण्यात आलेले आहे.

## म्हणी

सामान्यतः लोकांच्या तोंडी असलेल्या म्हणी ह्या दिसायला उखाण्या-सारख्याच आहेत. गद्यमय रचना आणि यमक असणे या गोष्टींचा विचार केला तर त्यांचा तोंडवळा उखाण्यांसारखाच आहे. परंतु दोहोंच्या स्वभावात अंतर मात्र भरपूर आहे. निरर्थक शब्द म्हणींमध्ये खपावयाचे नाहीत. उलट आटोपशीरपणे व अगदी मोजक्या शब्दांनी आपल्या मनातील भाव लोकांना सांगणे हे म्हणीचे काम असते. इथे मनोरंजनाला थारा नसून शहाणपणाची मोजदाद होत असते.

कितीकदा व्यावहारिक जीवनाचा विचार करताना असे आढळून येते की, पुष्कळांना आपल्या नेहमीच्या बोलण्यामध्ये म्हणींचा वापर करण्याची सवय फार असते. अर्थात ते अगदी सहजगत्या होत असते. म्हणींचा उपयोग स्त्रियांप्रमाणे पुरुषही करीत असतात. त्यामुळे कोणतीही म्हण सर्वांच्याच तोंडी रुळलेली असते. तथापि प्रमाणच पहावयाचे झाले तर स्त्रियांकडून म्हणींचा वापर अधिक झालेला दिसून येतो. त्या संदर्भात उदाहरणादाखल म्हणून काही म्हणी इथे देत आहे :

१. सवत साहीना मूल होईना.
२. जिकडे गेली वांझ तिकडे झाली सांज.
३. सून आली घरात नि सासू पडली केरात.
४. दिसायला गरती नि गावभर फिरती.
५. नाजूक नार, मोत्यांचा हार, पर चाबकाचा मार.
६. साप म्हणू नये बापडा नि नवरा म्हणू नये आपला.
७. पहिल्या बरा न् तूच बरा.
८. जाळावाचून कढ नाही व मायेवाचून रड नाही.
९. जात्यावर बसं नि ववी सुसं.
१०. केसांनी केलाय दावा तरी जीव हाय नवा.
११. पोराची माया राखेवानी नि आईची माया लाखेवानी.
१२. गळा न् वळा गाव झाला गोळा.
१३. खाण तशी माती.
१४. पुण्य करता ऊन लागतं.
१५. घरोघरी मातीच्या चुली.
१६. जित्याची खोड मेल्याशिवाय जात नाही.
१७. बळी तो कान पिळी.
१८. पळसाला पानं तीनच.
१९. कानामागून आली नि तिखट झाली.
२०. ऊस गोड लागला म्हणून मुळासकट खाऊ नये.

अशा प्रकारच्या म्हणी शेकडो आहेत. आजवर त्यांचा संग्रहही अनेकांनी केला असून त्यांचे प्रकाशनदेखील झालेले आहे. त्यामुळे या ठिकाणी त्याबाबत

अधिक विचार झालेला नाही. तथापि या वाङ्मयप्रकारासंबंधी एवढे दिसून येते की, काळ कितीही बदललेला असला तरी सुशिक्षित मंडळींच्याही तोंडी म्हणी असलेल्या सर्वत्र ऐकावयास मिळतात! त्यावरून एक गोष्ट लक्षात येते की, म्हणींची लोकप्रियता अद्यापही कायम आहे.

## पुरुषांचा उखाणा

पतीचे नाव घेण्यासाठी स्त्रिया ज्याप्रमाणे उखाण्यांचा उपयोग करतात त्याप्रमाणे पत्नीचे नाव घेण्यासाठी क्वचित प्रसंगी पुरुषही उखाण्यांचा उपयोग करताना दिसून येतात. पण उखाणा घालून पुरुषाने नाव घेण्याचा प्रसंग फार क्वचित येतो. लग्नकार्याच्या वेळी चुकूनमाकून कोणी आग्रह केलाच तर ही वेळ येते. एरवी पुरुष बायकोचे एकेरी नाव घेऊनच हाक मारीत असतात.

पुरुषमंडळी घेत असलेल्या उखाण्यांच्यापैकी नमुन्यादाखल म्हणून काही असे आहेत :

१. **आंगर काठी, डोंगर काठी, सातारा गाव, झणकाऱ्यानं कुंकू लावती तिचं × × × नाव.**
२. **श्रावणात पडतो पाऊस आणि × × × हिच्या नावाची मला फार हौस.**
३. **उगवला सूर्य, प्रकाशिलं ऊन, सीताभाई मातुःश्रीची × × × सून.**
४. **भाजीत भाजी मेथीची × × × माझ्या प्रीतीची.**
५. **चांदीच्या ताटात बुंदीचे लाडू, ऊठ ऊठ × × × सोमवार सोडू.**

परंतु अशा उखाण्यांची संख्या एकंदरीने कमीच आहे. तथापि जे उखाणे मला मिळाले आहेत त्या उखाण्यांमध्ये मनोरंजनाच्या दृष्टीने अगर विचार करायला लावणाऱ्या वाक्यरचनेच्या दृष्टीनेही काही विशेष नाही. त्यामुळे या उखाण्यांबाबत कुठे गाजावाजा झालेलाही ऐकिवात नाही!

या सर्व प्रकारच्या उखाण्यांच्यावरून एक गोष्ट ध्यानात येते की, स्त्रियांच्यामध्ये असलेला धीटपणा, समयसूचकता, बुद्धिचातुर्य आणि रचनाकौशल्य यांची पारख यावरून निश्चितपणे करता येण्यासारखी आहे. एवढेच नव्हे तर या अडाणी अंतःकरणात हे एवढे सुंदर वैभव मावले तरी कसे, असा सुशिक्षित मनाला भ्रम पाडण्याची यामध्ये ताकद आहे. तथापि फाटक्या लुगड्याखाली

झाकलेल्या मनाला साधी मीठभाकर खाऊन एवढे सुचले तरी कसे ही मोठी विचार करण्यासारखी गोष्ट आहे, यात शंका नाही! उत्तम प्रकारच्या अलीकडील वाङ्मयाची कसोटी लावून या वाङ्मयप्रकाराची पारख करता येणार नाही. तथापि असे म्हणावयास हरकत नाही की, कुठे कुठे आढळणारी रचनेतील शिथिलता अगर निरर्थक शब्दांचा भरणा सोडला, तर अभ्यासू मनाला जुन्या मराठीची ओळख करून देणारी ही एक अपूर्वाईची किमया आहे. एवढेच नव्हे तर अभिमानाने 'ही आमची मराठी' म्हणून मराठीच्या दरबारातील मानाचे हे शाब्दिक रत्नभांडार विद्वानांच्यापुढे ठेवावयास कुणालाही हरकत वाटू नये, एवढा हा उखाणा वैभवशाली आहे.





# माजघरातील गाणी

**सुगीसराई** संपली आणि उन्हाळकाम आटोपले म्हणजे बायका दुपारच्या वेळी शेजारणीकडे गोळा होतात. अशा वेळी संसारातील सुखदु:खांच्या जोडीलाच एकमेकींना येत असलेली गाणी सहज गंमत म्हणून एकमेकींना सांगावयाची आणि घटकाभर मजेत वेळ घालवावयाचा, असे कुठे कुठे घडून येते. या गाण्यांना कुणी माजघरातील गाणी तर कुणी बैठकीतील गाणी असेही म्हणतात.

ही गाणी विविध प्रकारची असतात. तसेच या गीतांची चालदेखील मोठी शेलकी अशी असते. सामान्यत: या प्रकारची गाणी अगदी म्हाताऱ्या बाईकडूनच ऐकावयास मिळतात असा अनुभव आहे.

**धन संपत्तीला काय उणं सख्या वो — आपल्या जी घरी जाऊयीनी**
**पिवळी शेलारी यावी घेऊनी — अवघ्या नगी लव भरजरीची**
**घडी रुमालात घालुनी — आणावी चौकशी करूनी**
**एवढं वरचेवरी ऐकुनी — पिवळी शेलारी यावी घेऊनी**
**श्रावण शुद्ध आला महिना — नागर पंचीम आली साजणा**
**मन पूजा करीन गौरीची — आवड मला पिवळ्या शेलारीची**
**राधा नेसुनी रूपसुंदर — लोळे पतीच्या ग चरणावर**

जिच्या घरी भरपूर संपत्ती आहे अशी एक स्त्री आपल्या नवऱ्याला पिवळ्या शेलारीची आपली हौस भागविण्यास इथे सांगते आहे. अमुक एक प्रकारची सुंदर साडी आणण्याचा तिचा हट्ट पतीने पुरवावा, म्हणून ती सणासुदीची कारणे देत आहे व शेवटी ही हौस भागल्यानंतर आनंदाने पतीच्या चरणांवर लोळण घेत आहे. सामान्यत: प्रत्येक स्त्रीला असणारी ही नव्या कपड्याची हौस या प्रकारे इथे व्यक्त झालेली असल्याने हे गाणे ऐकताना इतर वायका 'हा हा अक्षी बराबर!' असा समाधानाचा उद्‌गार काढतात.

**हरीभक्त बोधला भला सारंगधर फकीर झाला**
**बोधल्याच्या वाड्याला गेला जाऊनी उभा राहिला**
**दान करावं आमाला दानाला दुर्वा धान्य**
**नको आमाला दुर्वाधान्य तुमच्या घरची भागीरथी सून**
**ती द्यावी आमा दानाकारनं तुमची भागीरथी सून**
**फकीर तिथुनी निघाला आपुल्या घरासी आला**
**आज्ञा तिनं पतीची घेतिली पतीनं पाडिले कान**
**आज्ञा पुत्राची घेतिली तुमी सांगाल त्या प्रमानं**
**तुमचं मोडायचं हाये कोन अन्नपूर्णा न्हाऊ घातिली**
**आनंदानी वटी भरली वाड्याभाईर निघाली**
**गेली येशी चौकामंदी गावाशी गाव मिळालं**
**कैकांच्या पाणी डोळ्याला फकीरांनी धरली हाती**
**वाटं वनाच्या लागला गावाभाईर चालला**
**एक वन वलांडिलं दोन वनं वलांडिली**
**तीन वनं वलांडिली चौथ्या पाचव्या वनायाला**
**फकीर बोले अन्नपूर्णाला तुमचं जेवाण डाळरोटी**
**मी फकीर मागतोय तुकडा जावं आपलं माघारी**
**न्हाई जायाची माघारी माजा आईचा रोकड**
**बोधल्याचं नाव केवढं तुमा ठावं सगळं**
**फकीर कापं थरथरा दिली सोडून गुप्त झाला**
**वाड्या बोधल्याच्या गेला तुज्या सुनेला देव भेटला**

जा घेऊन ये तिजला टाळ मुरदुंग वाजती
दिंडी संतांची नाचती हरीभक्त बोधला राजा
वैकुंठी लावील्या ध्वजा गाव त्येला मानी राजा

महाभारतकालीन समाजामध्ये अतिथीला जरूर ते दान नि:संकोच मनाने करण्याची जी भाविक प्रथा होती, तिचा आविष्कार या गाण्याच्या निमित्ताने झालेला आहे. हरीची भक्ती करणाऱ्या माणसाने सारंगधर (देव) फकीर होऊन दारी आल्यानंतर त्याच्या इच्छेनुसार सुनेला दान केले; आणि त्याच्या स्वामि-भक्तीवर खूष होऊन देवाने त्या सुनेला दर्शन देत तो भक्त माणूस राजा करून सोडल्याची ही कथा आहे. सत्त्वपरीक्षेच्या कसोटीला उतरून पुण्य पदरात पाडून घेतलेल्या थोर मनाच्या माणसाची ही कथा मनाला चटका लावून सोडत असल्याने ती कानावर पडताच समाधानाने माना डोलाविणाऱ्या वायकांच्या चेहऱ्यावर उसळणारा आनंद शब्दापलीकडचा असतो.

सोमवती अमूशा येती लई लोकं वाईला जाती
वाईखाली किष्णाबाई व्हाती लई लोकं सत्त्व सांगती
टाळवीना घेऊनी हाती गावात लोक अभंग गाती
राऊळात कीर्तनं होती देवळात गुरव नाचती
पंडित पोथी वाचीती आले बामन दान देती
लई लोक निगाले जायाला पंढरपूर पहायाला
देव बसवले व्हते ठायाला गुंतले ईश्वर मायाला
तीर्थ बा घडले घाट शिंगणापूरचे चढले
भुलेश्वर शाम कडकडले त्यासी वाहुनि बेलफुले
येते आळंदीशी जाऊनी तुका उभा हट्ट घेऊनी
सांगतो देवाची बा खूण सांडव शोभेचा हुकूम
करा विठ्ठलाचे ध्यान मुखी असूदे नारायण
खाली इंद्रायनीचा घाट वर ज्ञानोबाचा मठ
चमत्कार झाला तुका वैकुंठासी गेला
वर हालं झाडाचा पाला बारा वर्सं पुण्य केलं
सालं सिगस्ताची आली नाशकात दान मी केलं

तिरंबक नाही पाहिले परतुनि माघारी आले
भिमाशंकरात राहिले पुढे तप्त नर्मदा चाले
ह्याही पाण्याला वड फार ह्यांनी घाट फोडीले फार
हौसंनी बडूदं चल पाहू चल रामेश्वराला जाऊ
हाय द्वारकी ठावू चल बेट द्वारकेला जाऊ
दुही हातांनी दर्शन घेऊ देवाघरीची हवा बघू
गाडीत बैसुनी आले थेट पुन्यामंदी उतरले
नऊखंड पुणं पसरलं दहाखंड काशी भरली
न्हाई मनीची हावस पुरली पुना वाट काशीची धरली
जवळ आली काशीची रानं जागोजाग देवाची ठानं
तिथं करा पिंडदान नदीकाठी घ्या दर्शन
हिरे माणीक मोती वाटी बामन आले दर्शनासाठी
आत जागा तीर्थाची थोर सोन्याचा मंडप हाई वर

सोमवती अमावास्येच्या निमित्ताने तीर्थयात्रा करणाऱ्या सामान्य मनाचे चित्रण या गाण्यामध्ये आलेले आहे. भारतामधील प्रमुख तीर्थस्थळांना भेटी देण्याची मनीषा इथे प्रकट झालेली आहे ! त्याचप्रमाणे पुणे व काशी या ठिकाणचे अतिशयोक्तिपूर्ण केलेले वर्णनही कल्पकतेचा एक मजेदार नमुना म्हणून पहाता येईल. खेड्यातील सर्वसामान्य माणसाला आपली बुद्धिमत्ता कोठवर वापरणे शक्य होते, याचे हे गाणे म्हणजे एक मासलेवाईक उदाहरण म्हणता येईल. धार्मिक मनोवृत्तीचे या गाण्यामध्ये आलेले वर्णनही भाविक मनाला भुरळ पाडणारे आहे.

आलं गंगाला मागनं पावना घ्यावा पारकून
बसायला टाका पिढपाट पुसायची जातगोत
याची जात धनगराची आमची गंगा बामनाची
याची आमची सोयरीक न्हाई आमची गंगा द्याची न्हाई
जागा पाहू जागाईत मळा पाहू बागाईत
नवरा पाहू रूपशाई तिथं देऊ गंगाबाई
गंगा ऐकेनाशी झाली गेली आईच्या जवळी
अग अग माझे आई आपल्या बारवाच्या तीरी

एक जोगी नवलापरी घेतो सोन्याची किनरी
वाजवीतो नवलापरी मी जाते त्याच्या घरी
येडी झाली गंगूबाई ती कुनाचं ऐकत न्हाई
जागा पाहू जागाईत मळा पाहू बागाईत
नवरा पाहू रूपशाई तिथं देऊ गंगाबाई
गंगा ऐकेनाशी झाली गेली बापाच्या जवळी
अरे अरे माझ्या बापा आपल्या बारवाच्या तीरी
एक जोगी नवलापरी हाती सोन्याची किनरी
वाजवीतो नवलापरी गंगा त्याजला वरी
येडी झाली गंगूबाई ती कुनाचं ऐकत न्हाई
जागा पाहू जागाईत मळा पाहू बागाईत
गंगा ऐकेनाशी झाली गेली घराच्या दाराशी
गेली मान मुरडोनी गेली वल्या पदराशी
लागली पैल्या वनाला उभा रहा तू गड्या
माझी पावलं वडती घरी पिताजी रडती
लागली दुसऱ्या वनाला उभा रहा तू गड्या
माझी पावलं वडती घरी माताजी रडती
एवडी पित्याची फेरी मी का जोग्याची बरी
लागली तिसऱ्या वनाला उभा उभा रहा तू गड्या
मला सराटं मोडती घरी बंधूजी रडती
एवडी बंधवाची फेरी तू का जोग्याची बरी
चवथ्या पाचव्या वनाला आलं जोग्याचं नगर
गंगा घातली जटयीत मग गेला महालात
गिरजा गेली शेज घरी दिलं आंगूळीला पानी
पैला तांब्या जटंवरी मग तांब्या अंगावरी
गिरजा गेली लोकाघरी आकाशाच्या आयाबाया
पैला तांब्या जटंवरी मग तांब्या अंगावरी
असू दे ग गिरजाबाई त्येचा असल विचार काही

गंगा आणि शंकर यांच्या विवाहाची चटकदार गोष्ट सांगणारे हे गाणे आहे. सामान्य लोकांच्याप्रमाणे देवमाणसांच्या लग्नाची, आणि त्यातल्या त्यात प्रीति-विवाहाची, ही कथा गाताना व ऐकताना स्त्रियांना जणू आपल्याच घरचे सर्व काही चालावे एवढा स्वाभाविकपणा वाटत असतो. या गीतामध्ये व्यक्त झालेले सामाजिक जीवन सर्वसामान्य लोकांच्या माहितीचे असल्याने जुन्याला लाभणारा नवेपणा इथे मोठा चित्ताकर्षक वाटतो. या गाण्यात आलेली पुनरावृत्ती, झाली गोष्ट मनावर नीट ठसवून लक्षात घ्यावी या हेतूने झाल्याने हृदयंगम वाटते. सामान्य माणसांच्या गंगेच्या निमित्ताने 'स्थळा' बद्दल व्यक्त झालेल्या अपेक्षा आणि गंगेने आपल्या इच्छेनुसार केलेली पतीची निवड, ह्या या गाण्यात सांगितल्या गेलेल्या गोष्टी व त्या निमित्ताने इथे व्यक्त झालेले इतर वातावरण मनोवेधक आहे.

**कळ नारंदाची खुटी । गमन तीन तळाच्या तळवटी । राजांतरी पडल्या तुटी । कस्तुरीत पडली हिंगाची चिठी । सोन्याची बिगाडली भटी । वडील गंधारी कुंती धाकटी । श्रीपान हात्तीच्या शिरी । कळ निर्माण झाली खरी । आता ववसून गेलीया गंधारी ।। १ ।।**

**आज ववसा अस्तानापुरं । तिथं काय नांद कैवर (कौरव) चातुर । याक आगळा बंधु शंबर । शंबराची दुष्ट नदार । त्यांनी बसुन केला विचार । त्यांनी काय न्हाई पाहिलं दुरी । कळ निर्माण झाली खरी । आता ववसून गेलीया गंधारी ।। २ ।।**

**केला मुरतीकीचा (मातीचा) हात्ती । त्येला चाकं बनविली सुती । रंग दिला काळा कुसरी । कळ निर्माण झाली खरी । आता ववसून गेलीया गंधारी ।। ३ ।।**

**अंबारीचं खांब सोन्यारी । सोन्या कळस चमकतो वरी । हात्ती सजीवला भवतापुरी । गळ्या काय घाट सर दुहेरी । कळ निर्माण झाली खरी । आता ववसून गेलीया गंधारी ।। ४ ।।**

**अंबारीत बसुन ह्या मातला । कैक वडती हात्तीला । हात्ती काय दोर-सुद चालला । वान दिलं नगर नारीला । नगरी बसवुनी हात्ती फिरविला । शस्तार धरलं कुंतीवरी । कळ निर्माण झाली खरी । आता ववसून गेलीया गंधारी ।। ५ ।।**

**कुंती म्हादेव बसली हौदात । गेली कैवाराच्या वाड्यात । बरीच विष्णु राखिली पत । घ्या पूर्वीचं सुक्रीत । हात्ती दाखल इंद्राघरी । कळ निर्माण झाली खरी । आता ववसून गेलीया गंधारी ।। ६ ।।**

**अर्जुन म्हनी भिऊ बळी । चिखलाची गोष्ट न्हाई बरी । धाडुनी पत्र इंद्राघरी । ह्या इंद्राचं जानं भाईरी । पोचले बाण इंद्रकचेरी । त्यांनी पाहिलं वाचुनी । हात्ती पाठुन द्या लवकरी । कळ निर्माण झाली खरी । आता ववसूनी गेलीया गंधारी ।। ७ ।।**

**अर्जुन मंत्रासी जपला । भिऊ बाणाचा निसटला । कुंतीनं वरच्यावर झेलिला । भिऊ म्हनी लज्जा न्हाई अंतरी । घ्या उस्नं आपलं लौकरी । कळ निर्माण झाली खरी । आता ववसून गेलीया गंधारी ।। ८ ।।**

**भोळा बुरुंज समंद कवटाळी । कैक बसवील्या खवील्या तळी । वाट मिळंना झाली आरूळी । भुल पडली अस्तीनापुरी । कळ निर्माण झाली खरी । आता ववसून गेलीया गंधारी ।। ९ ।।**

**आज ववसा घ्या तिळगूळ । ह्या ववशापासुन मातली कळ । तू झुराळ मी सागर । तिथं काय दत्तात्रीचं देवळ । किष्ण देव आमचं कैवारी । आताच ववसून गेलीया गंधारी ।। १० ।।**

कौरवपांडवांच्या काळातील घरगुती प्रसंगाने निर्माण झालेला पेचप्रसंग या गाण्याने सांगितलेला आहे. संक्रांतीच्या वेळी वायका घरोघरी 'ववसा' पूजा करीत असतात. म्हणजे संक्रांतीच्या निमित्ताने आणलेला खण (मातीची भाजीव गाडगी) हळदकुंकू लावून, चुन्याने रंगवून आणि तिळगूळ, गव्हाच्या ओंब्या, भुईमुगाच्या शेंगा, उसाचे गरे, गाजराचे तुकडे, ओला हरभरा, बिबट्या, पावटयाच्या शेंगा वगैरे जिन्नस घालून पुजावयाचा असतो. नंतर बायका एक-मेकींच्याकडे जाऊन या खणांपैकी एकेक गाडगे (सुगड) पदर लावून गुडघ्याला व डोईला टेकवीत 'आला आला ववसा सीताचा, जन्मोजन्मीचा', 'आला आला ववसा नगरी, उगडून वगा दारी, मानून घ्या पदरी' अशा पद्धतीने उखाण्यात बोलून एकमेकींना देतात व एकमेकींकडून घेतात. पूर्वीच्या काळी थोरामोठयांच्या वायका हत्तीवरून वाजतगाजत मिरवणुकीने जाऊन घरोघरी 'ववसा' पूजन करीत. याच पूजेच्या निमित्ताने गांधारीच्या जीवनात वरील गाण्यामधील

जो पेचप्रसंग निर्माण झाला त्याचीच इथे हकिगत आलेली आहे. मातीचा हत्ती करून आणि सुती म्हणजे सुरळीत चालणारी चाके बनवून कौरवांनी आईचा हा प्रश्न सोडविल्याने कुंतीला राग आला आणि मग हे प्रकरण गाण्यामध्ये सांगितल्याप्रमाणे वाढत गेले!

महाभारतकालीन कथेचे हे पद्यमय रूपांतर स्त्रियांच्या परिचित प्रसंगावर आधारलेले असल्याने तोंडोतोंडी सर्वत्र पसरले आहे आणि टिकूनही राहिले आहे. त्यामुळे बायका कधीकधी मोठ्या अभिमानाने ह्या गाण्याचा उल्लेख करून असलेच आणखी एखादे गाणे 'ववसा' म्हणून देवघेवीसाठी मनातून बाहेर काढावयाची सूचना करीत असतात!

या गाण्यामध्ये जुन्या काळच्या वाङ्‌मयात वरचेवर आढळणाऱ्या नारदाचा सुरुवातीलाच उल्लेख आलेला असल्याने, जुन्या कथा ऐकून बायका लोकगीत कसे तयार करीत असाव्यात हे यावरून दिसून येते. या गीतातील बाण मारून इंद्राकडे पत्र पोचते करण्याची प्रकट झालेली कल्पना जशी हृद्य आहे तशीच या गीतामध्ये व्यक्त झालेली जुनी चालरीत आणि त्या निमित्ताने निर्माण झालेल्या पेचप्रसंगाची केलेली सोडवणूकही चित्ताकर्षक आहे.

**'दुष्ट दुर्योधन कुरुकुळीत कसा ग जन्मला। द्यूत खेळूनी आरी आणिले पांडवाला। दुष्ट हा शकुनी दुष्ट बुद्धि शिकवी कपटाला। सापळा ग एक गोविले पाची वासराला। सोडिला बाण शब्दाशी चढे गुणाला। पाहि अंतरी कळ काढी माया प्राणाला। लागली ग चिंता शरण जाऊ कोणाचे पायी। धाव रे धाव किष्णा श्रीरंगे माझे आई। संकटी पडले मी एकदा भेट मज देई।। १ ।।**

**धरोनी मृदुवेणी दुःशासन हासडुनी पाडी। फरफरा ओढीत नेतसे सभेत तातडी। डाव्या अंकावरी बस म्हणीतो जोडी। नको ग धरू ममता भलत्याची आशा सोडी। धावोनी ये रे धावोनी ये दीनदयाळू वत्सला। संकट आले मजवरी दयाळा। नको सख्या गुंतू कोठे आयुधा राहिली थोडी। वस्त्रहरणाचा कैफ मांडिती सारी घाई। संकटी पडले मी एकदा भेट मज देई ।। २ ।।**

**क्षीरसागरीचा विलासी मोठा ध्यानीमनी। अर्जुनि कसा ग येईना सावळा चक्रपाणी। रंगमहाली नेला का ग सत्यभामानी। वाट बघूनि शिणले नेत्र माझे**

**दोन्ही । होईल रे हानी सख्या सोडवी येऊनी । संकटी पडले मी एकदा भेट मज देई ।। ३ ।।**

**न सोडी सत्त्व तो धर्मराज गंभीर । भीमअर्जुन भाकेला गुंतले शर । नकुल सहदेव रणी भैरव वीर अनीवार । न बोलता म्हणती रागावला ईश्वर । न अंधी भीष्म द्रोण आला विदुर । सभा लोक पाहे टकमका थोर थोर । एकली मी आहे त्याला गत करावी काई । संकटी पडले मी एकदा भेट मज देई ।। ४ ।।**

**ऐकोनी इतके गहिवरले जगजीवन । कोण्या वेड्यानं गांजिली माझी हरीण । ऐकोनी धावा मनी योग ठाकोनी । नाभी नाभी शिष्टाचा ध्वनी ऐकोनी । खवळले प्रेम झाले अंगाचे स्फुरण । सावरल्या जाईजुई । संकटी पडले मी एकदा भेट मज देई ।। ५ ।।**

**दुर्योधनाने हासडिता निरी । फेडिली पहिली सोनेरी चवकट अंजिरी । फेडिली दुसरी शेलारी वैजापुरी । फेडिली तिसरी पुन्नड नागद भर्जरी । हिरवा दोरवा कंचुकी गोरु पटचावा नेसली । चुन्ना खंबाईत हिरवी जाई । संकटी पडले मी एकदा भेट मज देई ।। ६ ।।**

**सोडिली दिंडं काडिली बोभाटाची खजोरी । डाळिंबी काळी चंद्रकळा झळझळी । गुलाबी हिरवी वाण पुरीची खंजुरी । डाळिंबी शेवटला म्हणोनी । आपला पितांबर झाकी । भेटला मजला देव श्रीहरी । द्रौपदीला हर्ष झाला । धाव रे धाव किष्णा श्रीरंगे माझे आई । संकटी पडले मी एकदा भेट मज देई ।। ७ ।।**

द्रौपदी वस्त्रहरणाची महाभारतामध्ये आलेली हकिगत या गाण्यामध्ये सविस्तर आलेली आहे. ह्या गाण्यास 'द्रौपदीचा धावा' म्हणून स्त्रिया ओळखतात. ह्या गाण्याची एकंदर भाषा लक्षात घेता थोड्या जाणत्या बाईकडून त्याची रचना झाली असली पाहिजे असे दिसते. मला हे गाणे १८९७ सालच्या एका जुन्या वहीत सापडले आहे आणि त्या गाण्याखाली 'बायका हे गाणे नेहमी सांगतात.' असा मजकूरही मिळाला आहे. परंतु त्या वहीवर कोणाचे नाव नसल्याने ते कोणी व कोणाकडून मिळविले याचा अंदाज मात्र बांधता येत नाही. तथापि बायका ते नेहमी सांगतात, असा उल्लेख त्याच्याखाली आल्याने त्यावरून ते एक लोकप्रिय लोकगीत आहे, असे अनुमान काढावयास हरकत नसावी.

द्रौपदी वस्त्रहरणाची ही कथा मोठी चित्ताकर्षक आणि द्रौपदीविषयी सहानुभूती निर्माण करणारी असल्याने ती ऐकताना सामान्य स्त्रियांच्या डोळ्यांत पाणी उभे राहते. त्यामुळे आठवेल तेवढी कौरवपांडवांची कथा व विशेषतः पांडवांचा वनवास त्या गद्यामध्ये सांगून मन हलके करू पहातात. एकदा तर मी हे गाणे दिवाळीच्या सणाचे वेळी शेणाच्या गौळणी आणि पांडव घालणाऱ्या म्हातारीच्या तोंडून ऐकले. त्यावेळी पांडवांना आणि द्रौपदीला आपल्या परीने मानाचे स्थान देणारी स्मृती या दृष्टीने ती कलाकृती तयार करण्यासाठी तिची चाललेली धडपड मला मोठी विलोभनीय वाटली.

**भाऊबीज माझे सदनी हर्ष मनी झाला**
**दीनबंधु करुणासिंधु ओवाळिन त्याला ।। ध्रु० ।।**
**नवलपरीची नव पक्वान्ने करीन स्वये आजी**
**श्रवणाचे शंकरपाळे कीर्तन करंजी**
**हरी स्मरण केली कैसी जिलेबी ताजी**
**चरण सेवनाचे लाडू वळुनी वाढूया त्याला ।। १ ।।**
**आर्चनाचे अनारसे वंदन चीरोटे**
**दास्यत्वाचे दिसती कैसे धीव गोमटे**
**सख्यत्वाचा साखरभात वाढावासा वाटे**
**आत्मनिवेदन मांडे आवडती त्याला ।। २ ।।**
**कल्पनेचे कडबोळे नको तेलकट**
**पंचवीस भाजणीचे नको थालीपीठ**
**कामक्रोध लोभाचे नको तीळकूट**
**श्रद्धेचा तो रंगीत पाट त्याला बैसायाला ।। ३ ।।**
**वैराग्याच्या चांदीचे ते घडविले ताट**
**भूतदया रांगुळी ही काढिली दाट**
**दया क्षमा गडवा पेला काय सांगू थाट**
**त्रयोदश गुणी विडा करूनी देती तयाला ।। ४ ।।**
**भाऊबीज ऐसी केली द्रौपदीचे घरी**
**पंचप्राण पंचारती ओवाळी सुंदरी**

**भावार्थाचा नारळ हा दिला त्याचेवरी**
**सुबुद्धीची भारी चोळी त्याने दिली तिजला ।। ५ ।।**
**कधी ऐसी भाऊबीज पाहीन नयनी**
**तळमळ वाटतसे रात्रंदिन मनी**
**हरी ताप हरील कृपा जरी मोक्षदानी**
**पुरविली हौस मनीची गायनी त्या कृष्णाला ।। ६ ।।**

कृष्णासारखा भाऊ 'बीजे'साठी घरी आल्यानंतर द्रौपदीने त्याला केलेले 'जेवण' आणि तिला भाऊबीजेची मिळालेली ओवाळणी या गीतामध्ये सांगितलेली आहे. द्रौपदीसारखी विचारी आणि स्वाभिमानी बहीण आणि कृष्णासारखा जगाला तत्त्वज्ञान सांगणारा थोर भाऊ या गीताने जास्तच ओळखीचा करून दिलेला आहे. कृष्णाच्या स्वभावाला धरून त्याची ओळखलेली आवडनिवड आणि त्याने द्रौपदीला घातलेली ओवाळणी हे सर्वच इथे मोठ्या कुशलतेने वर्णिलेले आहे. ही 'बीज' देवमाणसांची आहे. सामान्य माणसाप्रमाणे तिथे साधे खाणेपिणे आणि जिन्नसांची ओवाळणी घालणे हा प्रकार नाही. हा सर्व उच्च-पदावरून केलेला भावनेचा मंगल आविष्कार आहे. पण रीतभात मात्र येथून तेथून सामान्यांचीच आहे हे विशेष!

भगवद्गीतेमध्ये भगवान श्रीकृष्णांनी सांगितलेला माणुसकीचा थोर धर्म या गीताने अवलंबिलेला आहे. या थोर महापुरुषाने 'सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज' ही अर्जुनापुढे केलेली घोषणा सामान्य मनाने या रीतीने सांभाळून ठेवलेली आहे! श्रीकृष्णाच्या अत्यंत थोर कल्पनेची ही अगदी सामान्य स्त्री-मनाने केलेली जपणूक आहे. 'भाऊबीजे' चा हा एक सर्वश्रेष्ठ आविष्कार होय.

**सांगा प्रभूला सैंपाक झाला । विठुजी जेवायला चला ।। ध्रु० ।। रांगोळ्या काढुनिया लावील्या समया । लाविल्या उदबत्त्या सुगंधीया । चांदीचा हा मांडूनी पाट । कनकाचे शोभते बघा ताट । पेला घेतिला पाचूचा काठ । सर्व थाट घडवुनी सुंदर केला । विठुजी जेवायला चला ।। १ ।।**

**शोभे पान केळीचे लिंबलवणी । डाळीची नारळाची वाटली चटणी । कोशिंबीरी पेरू केळीची फणी । रायती रुचिर झाली साजणी । भरीत वांग्या**

दोडक्याचे भोपळ्याचे । आवडीने देवा केले मी तुजला । विठुजी जेवायला चला ।। २ ।।

वाटलेली डाळ आंब्याची केली । सर्व तऱ्हेची लोणची वाढियली । चिंचेचा बघा ठेचा हा केला । पापड पापडीही तळली पानाला । आळूवडचा पाखडचा पूरवडचा वडा । हावसेने मी घागराही केला । विठुजी जेवायला चला ।। ३ ।।

कुरवडचा सांडगे आणीक फेण्या । वाढीयल्या देवा तुम्हा खाण्या । शिकरण आंबरस बेत हा खास । भजी झाली आज खमंग सुरस । आळूवडचा, साटोऱ्या केल्या कचोऱ्या । चिरोटा, मांडा, कानवलाही केला । विठुजी जेवायला चला ।। ४ ।।

बटाटे फुलवर कोवळी वांगी । भोपळा नवलकोल यांची हो भाजी । डब्बल बी बिरडचा आणि मटक्या । केल्या उसळी कणसा चवळ्यांच्या । रसाळी त्रिपळी अंगरस घातिला । विठुजी जेवायला चला ।। ५ ।।

कटाच्या आमटीने वाटी भरली । सांबार कढी सार सर्व वाढीली । गव्हाची तया करूनी खीर । घातले तयासी सुंदर केशर । लाडु दळीया, मूगदळिया, बुंदीकळिया । मोतीचूर बेसनही देवाला केला । विठुजी जेवायला चला ।। ६ ।।

गूळपोळी, साखरपोळी, पुरणपोळी । श्रीखंड, बासुंदी, घीवर जिलेबी । आंब्याचा तो काढुनिया रस । मी पुडीच्या त्या लावीला वास । साखर नारळीचा मटाराचा भात केला । विठुजी जेवायला चला ।। ७ ।।

दूध, तूप, ताक, दही, आदमोरे । तूप वाढी लिंबू पिवळे भातावर । घेऊनी आपोष्णी घाली मी प्रीती । स्वस्थ जेवावे तुम्ही देवा आजला । विठुजी जेवायला चला ।। ८ ।।

विठ्ठलासारख्या फार मोठ्या देवाला अगर त्याच्या निमित्ताने इतर देवांना घरी जेवायला बोलवावयाचे म्हणजे झाडून सर्व पक्वान्नांची उलाघाल करावयाची ! अशा देवादिकांसाठी केलेल्या जेवणाची हकिगत देणारे हे गाणे आहे. इथे पाककौशल्याच्या दृष्टीने स्त्रियांना येणाऱ्या बहुतेक सर्व पदार्थांची नोंद झालेली आहे ! स्वयंपाकघरामध्ये पाकशास्त्रातील कोणकोणत्या कलाकृती मोठ्या हौसेने तयार होत असतात आणि बायका उत्तम 'सुगरिणी' म्हणून कशा नावारूपाला येतात, त्याचा हे गाणे म्हणजे एक उत्कृष्ट नमुना ठरेल. स्वयंपाकाच्या कलेमधील

सर्व पदार्थांची नोंद करण्यापलीकडे आणि जेवणाचा थाट वर्णन करण्यापलीकडे या गाण्यात विशेष काही नाही. परंतु केवळ निरनिराळ्या पदार्थांची इथे एकत्र आलेली माहितीच एवढी गमतीदार आहे की, ऐकणाराचे मन थक्क होऊन जावे! आपल्याकडे स्त्रियांप्रमाणे पुरुषही स्वयंपाक (आचारी म्हणून) करीत असतात, त्यामुळे हे गाणे एखाद्या पुरुषानेही रचले असणे शक्य आहे! परंतु अधिक प्रमाणात ते बायकांच्याच तोंडी असल्याने स्त्री-जीवनात त्यास विशेष स्थान मिळालेले आहे.

माजघरातील अगर बैठकीतील गाण्याचा थाट हा अशा प्रकारचा आहे. आणखी कितीक अशी गाणी असतील कुणाला माहीत! यापेक्षा त्यांची जडण-घडण आणि विषयही वेगळे असतील. पण मला जी सापडली ती ही गाणी आहेत. त्यांचा प्रत्येकाचा तोंडवळा निराळा आहे. अंतरंग वेगळे आहे. आणि त्यांच्या मागची बैठकही थोडी उच्च आहे. त्यामुळे असे म्हणता येईल की, या गाण्यांचे स्वागत काही निवडक स्त्रियांकडून झाले असावे आणि थोड्या जाणत्या बायकांनीच आपल्या आठवणींच्या कुपीत त्यांना ठेवले असले पाहिजे! जुन्या काळच्या कथांवर, पोथ्यापुराणांवर आधारलेली ही गाणी आहेत. त्यामुळे इतर लोकगीतांपेक्षा ह्या गाण्यांचे वातावरण अगदी निवडक आणि निराळेही झाले आहे.





# कौटुंबिक जीवन

## दळण

**पूर्वीच्या** काळी गावोगाव गिरण्या नसत. त्यामुळे घरोघरीच्या बायकामुली भल्या पहाटेच्या उठून दळण दळीत असत. अशा वेळी घरचा पसारा असेल त्या मानाने एक किंवा अधिक जाती चालू होत. भल्या पहाटेच्या वेळी कोंबडा आरवला म्हणजे बायका दळायला उठत. एका दमात त्यांना बरेच दळण दळावे लागत असे. त्यामुळे हे श्रम जाणवू नयेत म्हणून दळत असताना ओव्या गावयाची चाल निघाली असली पाहिजे.

गाण्यामुळे श्रम हलके होतात हा या गीतांचा एक फायदा होतो; आणि दुसरा फायदा असा होतो की, निवांत वेळी जवळपास कुणी नसल्याकारणाने मनातील सर्व भावना मोकळ्या मनाने ओठांवर खेळू शकल्याचे समाधान वाटते.

'जात्यावर बसले की, ओवी सुचते' अशी वस्तुस्थिती आहे. त्यामुळे ऐन वेळी मनात येईल तो विषय यावेळी बोलण्यात निघाला तरी तो वैयक्तिक न मानता सामुदायिक जीवनात जमा होतो. त्याचा फायदा असा होतो की, एखादी सासुरवाशीण जर घरच्या त्रासाबद्दल गीत घोळवू लागली तर सासू तिकडे लक्षच देत नाही! त्यामुळे तिचे मन हलके होते. दिवस उगवायच्या आत त्या पिठाच्या भाकरी थापून ठेवायला मग तिला उत्साह वाटतो!

अशा वेळी माहेरच्या सुखाचीही मनमुराद याद करता आल्यामुळे बायकांना विशेष आनंद होतो. एरवी हे कुणाजवळ बोलणे शक्य नसते. म्हणून हा आनंद उपभोगण्यासाठी वाटेल तेवढे दळायला लागले तरी त्या मग राजी होतात!

जाते म्हणजे जणू स्वत:च्या सुखदु:खाशी एकजीव होणारी जिवलग मैत्रीण. सासुरवाशिणीला स्वत:शी गुजगोष्ट करायला मिळणारी एवढीच जागा असते. त्यामुळे इतर अनेक विषयांवरील गीतांच्याप्रमाणे त्यावेळी जात्यालाही ईश्वर मानून व विश्वचक्र समजून त्या संदर्भात बायका दळणाच्या आरंभाबद्दल आणि अखेरीबद्दलही आपखुषीने बोलत असतात.

**थोरलं एवढं जातं गुंड्या घागरी गोलायाचं**
**लाडके मैनाबाई माळी सोप्याच्या तोलायाचं**
**थोरल्या जात्याची ग म्या ग केलीया भिंगरटी**
**बयाचं पेली दूध सये खेळतं मनगटी**
**थोरल्या जात्याचं ग नाव ठेवीलं हत्तीरथी**
**बया माज्या मालनीच्या सुना दळीती भागीरथी**
**जात्याचं ग तोंड जशी खोबऱ्याची वाटी**
**जात्याचा कारागीर बाई नांदतो वाल्याघाटी**
**थोरलं ग जातं त्येला कशाला व्हव्या तिघी**
**जाऊ माजे तू मालनी आपुन शीनच्या दळू दोगी**
**थोरलं एवढं जातं जसं हरण पळतं**
**बया माझ्या मालनीचं दूध मनगटी खेळतं**
**जात्या ईसवरा नको मजला जड जाऊ**
**बयाच्या दुधाचा सया बगती अनूभाऊ**
**दळण दळताना माझी मनगटं लोखंडाची**
**बया मालनीनं घुटी दिलीया एखंडाची**
**जात्या तू ईश्वरा कुण्या डोंगरचा तू ऋसी**
**बया मालनी सारखं हुरदं उकलीलं तुज्यापशी**
**थोरल्या जात्याचा फेर येतोया बेगीबेगी**
**दळण दळायाला माजी सौंगड मना जोगी**

**दळण दळताना चोळी घामानं झाली चोथा**
**माजी ती बाळाबाई रामाच्या घरी सीता**

या गीतांनी जात्याच्या बरोबरीने स्त्रीच्या शक्तीची तुलना केलेली आहे. दळणारी बाई जाता जाता आपल्या घरच्या मोठेपणाचा उल्लेख करून इथे सांगते आहे की, आपले जाते गुंड घागरीसारखे गोल आहे. जुन्या काळी लहान लहान चार कळशा अगर सांगली माठाच्या दोन घागरी मावतील एवढ्या मोठ्या तांब्या घागरी (गुंड घागरी) पुरुष माणसे वापरीत असत. लांबून पाणी आणावयास ते सोईचे असे. कुणी कुणी तांब्याच्या अशा घागरीप्रमाणेच मातीच्याही घागरी वापरीत असत. त्याच प्रकारच्या घागरीचा इथे उल्लेख आला असून जातेदेखील तेवढे मोठे असल्याचे सांगितले आहे.

जाते मोठे असेल तर त्यास भिंगरी बसवून एकटी बाई पूर्वी दळत असे. असे जाते ओढावयाचे म्हणजे शक्तीचे काम. त्यामुळे आईचे प्यालेले दूध मनगटात शक्ती आणीत असल्याचा अभिमान इथे प्रकट झालेला आहे. कारण दळण्यावरून पूर्वी बाईची पारख करण्यात येत असे! या ठिकाणी माहेरच्या भावजयींना भागीरथी म्हणून गौरविले असून त्या फार मोठे जाते ओढू शकतात असे म्हटले आहे. पूर्वीच्या बायकांनी चांगले काम केले तर त्यांच्याएकी पवित्र नद्यांच्या नावांचा उच्चार करून त्यांचा गौरव करण्याची चाल होती, त्याचेच हे प्रतीक होय.

मोठे जाते ओढावयाचे म्हणजे शिणजोडीच्या बायका लागतात. तेव्हा इथे जावाजावांची बरोबरी केली असून या जात्यासाठी तिसरीची गरज नाही असे म्हटले आहे. मोठ्या जात्याने दळले तर दळण लवकर होत असल्याने त्यासाठी दोघीजणींची आवश्यकता असल्याचे मात्र या गीतात सूचित झाले आहे.

खोबऱ्याच्या वाटीसारखे जात्याचे तोंड घडविणारा कारागीर कुरुंदाचे दगड असलेल्या बालाघाटामध्ये रहात असल्याने तेथून हे जाते आणले आहे, असेही इथे मुद्दाम सांगितले आहे.

**दळण्याचा बाई कंदी करूनी कंटाळा**
**सावळे राजूबाई घरी येतूया गोपाळा**
**जात्या ईसवरा तुला घडूनी पाहिलं**
**मावलीचं दूध तुज्या कारनी लावीलं**

जात्या ईसवरा जड जाशील दाटूनी
तुझ्या शीनयाची आनू सवंगड कुठूनी
पारवं घुम्मती पित्या माज्याच्या माडीचं
पहाटंचं दळान भावज गुजरी लाडीचं

इथे एकटीला दळावे लागणाऱ्या स्त्रीचे मनोगत व्यक्त झाले आहे. दळत असताना पंढरीच्या विठ्ठलाने जनाबाईला मदत केली ही कथा ऐकून प्रसन्न झालेले भोळेभावडे मन इथे गोपाळदेवाची गाठ पडायची संधी आयती चालून येत आहे म्हणून दळायचा कंटाळा करू नये असे अभिमानाने सांगते आहे! त्याचप्रमाणे खुद्द जात्यालाच ईश्वर मानून दळणारी बाई इथे जात्याला विनंती करते आहे की, 'हे ईश्वरा, मुद्दाम अडून बसून माझा अंत बघू नकोस. मी बरोबरीची मैत्रीण आणू कोठून? तेव्हा माझ्याशी नीट सहकार्य दे आणि आईचे दूध मी तुझ्यापायी कारणी लावले हे समाधान मला मिळू दे!' किती सुंदर ही कल्पना!

एकटीने दळण होईल हे सिद्ध करण्यासाठी इथे माहेरी वडिलांच्या माडीवर असलेले पारवे घुमत असल्याचे सांगताना त्यासाठी पहाटे दळणाऱ्या भावजयीचा दाखला घेतलेला आहे.

स्वतःच्या शक्तीबाहेरचे काम हसतमुखाने करावयाची ही पद्धती मोठी विलोभनीय अशी तर आहेच परंतु इतरांना आदर्श ठरणारीदेखील आहे यात शंका नाही!

नको तू दळू लागू बस माज्या ग जवळी
लाडके प्रेमाताई तुजी मनगटं कवळी
नको तू दळू लागू मला उलीसा हात लावू
लाडके बाळाबाई तुज्या मयाचा अंत पाहू

आई एकटी दळते आहे म्हणून तिला हौसेने हात देणाऱ्या लाडक्या लेकीशी तिने केलेली ही आकर्षक कानगोष्ट आहे. इथे आई मुलीची शक्ती बेताची आहे म्हणून एक वेळ तिची नक्की पारख करण्यासाठी, आपल्यावरील प्रेम किती आहे हे बघावे या भावनेने, तिला थोडासा हात लाव म्हणते आहे. परंतु तिला ते झेपत नाही हे बघून तिच्या कोवळ्या हातावर ती मायेची फुंकर घालीत आहे!

जुन्या काळी मुलीला दळणकांडण हे आलेच पाहिजे अशी शिस्त असल्याने व बाळपणीच लग्ने होत असल्याने मुलीची आई वरचेवर तिची अशी चाचणी घेत असे.

अनेक प्रकारच्या भावनांनी नटलेली गीते जात्यावर या नमनानंतर सुरू होत आणि मग अखेरीस दळण दळताना एखादीने एकही ओवी गायिली नाही, तर तिला समज दिली जाई :

**मुक्यानं दळान गिरजा नारीला हुईना**
**माता चांगुनाच्या घरी ऋषी भोजन करीना**
**मुक्यानं दळान तुला कसं ग व्हतं नारी**
**भाऊ भाचीयांचं दल्ल तुज्या उतरलं दारी**
**जात्यावर बसावं तंवर जात्याशी बोलावं**
**सव्वाशेराचं लुगडं आपल्या ध्याईव तोलावं**

बाईने दळावयाचे तर आनंदाने गीत गात दळायला हवे आहे असे सांगताना चांगुणेचे सत्त्व ऋषीने पाहिले, तशी वेळ येईल असा इशारा इथे दिला आहे. आपले म्हणणे पटवून देण्यासाठी कथा-पुराणातील दाखले देणाऱ्या स्त्रियांच्या सवयीचा हा एक नमुनेदार मासला म्हणावा लागेल.

आपल्या घरी भाऊ आणि भाचे पाहुणे आले असतानादेखील तू मुकाट्याने कशी दळू शकतेस याबद्दल इथे एक स्त्री दुसरीबाबत बोलताना शंका व्यक्त करीत आहे! भाऊ पाहिला की, भावना उचंबळून आलीच पाहिजे असा तिचा जणू दावा आहे.

जोपर्यंत आपण जात्यावर बसतो तोपर्यंत त्याच्याशी बोलले पाहिजे, म्हणजे मग सव्वाशेर वजनाचे रेशमी लुगडे अंगावर यायला हरकत नाही, अशा प्रकारचा मोठा सुंदर अभिमानही या गीताने बोलून दाखविलेला आहे ! भरपूर काम केले तरच इच्छापूर्ती होत असल्याची ही एक सूचक कल्पना होय.

**जात्याला वैरण ग घालू नये लई थोडी**
**कष्टी होतो ईसवर मूठ घ्यावी एक जोडी**

दळावयाचे म्हणजेदेखील एक कला आहे. लहान मोठा घास घातला तर जाते नीटपणे ओढणे जड जाते, म्हणून घास एकसारखा घालण्याची सूचना इथे

मुद्दाम केली गेली आहे. जात्याला ईश्वर म्हणून घासाला इथे वैरण म्हटले आहे! या दोन्हीही कल्पना शेतकरी जीवनाच्या दृष्टीने सुंदर आहेत.

**सरलं ग दळान माजं पायली पायली**
**विसाव्याची जागा बाई माजी ती मावली**

खूप वेळ दळण झाल्यानंतर कष्टाची जाणीव होऊन आईची आठवण मनात घोळते आणि मग विसावा घेण्यासाठी दळणारणीला माहेरी जाण्याचा मोह झाल्याविना रहात नाही.

**सरीलं दळायानू सूप सारीते पलीकडं**
**सासरी म्हायेरी राज मागीते दुहीकडं**
**सरीलं दळायानू पदर मी घेते डोई**
**आऊक्षाची ओवी तुला गाते बयाबाई**
**सरीलं दळायानू निघळनं चंदनाचं**
**हळदीवर कुंकू माजं जडीव कोंदनाचं**
**सरीलं दळायानू माज्या सोन्याच्या हातानं**
**लाडक्या बाळराजा भाग्यवंताच्या जात्यानं**

दळण संपते वेळी मनाला लाभलेले समाधान या प्रकारे व्यक्त झालेले आहे. दळण संपले म्हणून सूप बाजूला सारताना सासरी आणि माहेरी दोन्ही घरी सुखाचे दिवस येवोत अशी अपेक्षा केली गेली आहे.

दळण संपते वेळी खाली घसरलेला पदर माथ्यावर ओढताना आईला उदंड आयुष्य इच्छिलेले असून, आपल्या लाडक्या बाळाच्या घरचे जाते म्हणजे भाग्य-वंताचे असे मानून ते आपल्या सोन्याच्या हातांनी दळण संपवू शकले, अशी इथे कल्पना केलेली आहे. म्हणून घरची बाई म्हणजे लक्ष्मी आणि तिचा हात घरा-दारावर फिरेल तर सोन्याचे दिवस येतात, अशी खेडूत मंडळींची कल्पना असते.

बराच वेळ दळण दळल्यामुळे अंगाला घाम आला असून कपाळावरून तो टिपला असता, हळदीवर लावलेले कुंकू हे अखंड टिकावे म्हणून त्यास जडीव कोंदण असल्याची कल्पना करीत नवऱ्याबद्दलचा आदर इथे व्यक्त झालेला आहे. तसेच हे दळण चंदनाप्रमाणे बारीक दळले गेल्याचाही उल्लेख इथे आवर्जून आलेला आहे.

सरीलं दळन मला आनीक घेनं झालं
देवा माज्यानं ग अवचित येनं केलं
सरीलं दळन पीठ भराया परायीती
पावनं राती आलं रामासंगं ग मारुयीती
सरीलं दळन शीग मोडाया न्हाई मुबा
माज्या राजसाच्या हाई पाठीशी बंदु उभा
सरीलं दळन माज्या सुपात पाच पसं
देवानं दिलं भाचं माज्या डोरल्याचं ठसं
सरीलं दळन सरीलं मी कसं म्हनू
राम ग राजाच्या हाई पाठीशी लक्षीमनू

देवादिकांच्या यात्रेच्या निमित्ताने पाहुणे आल्यानंतर दळण संपते वेळीही ते पुन्हा घ्यावे लागले असता, राग न मानता जणू देवच घरी आले, असे समजून इथे समाधानाचा सुस्कारा सोडला गेला आहे ! या गीतातील देवांची नावे इच्छेप्रमाणे या दळणाऱ्या बायका बदलू शकतात ! पण मूळ भावना हीच कायम रहाते.

दळते वेळी जात्याच्या पाळीला पिठाची धार चांगली यावी आणि दळायला सोपे जावे, म्हणून वर शिगेला येत चाललेले पीठ बोटाने खाली पाडण्यात येते, परंतु इथे तसे केल्याने मुलाला वाईट असते असे कल्पून त्यामागची भावना व्यक्त केलेली आहे. अशा भावनांना कोणीही बांध घालू शकत नसल्याने त्यांचा सर्वत्र अगत्याने वापर होत असतो असे दिसून येईल !

सुपातील पाच पसा (पसा म्हणजे खोलगट केलेला हाताचा पंजा) धान्य म्हणजे भावाच्या मुलांचा आपल्या मंगलसूत्रावरील ठशाप्रमाणे गौरव होय, अशी इथे सांगितलेली कल्पना हृदयंगम आहे. घरी आलेल्या भाच्यांचे हे स्वागत हेवा करण्यासारखे खास आहे. पूर्वी मंगळसूत्राच्या वाटयांवर अगर त्याच्या जोडीला असलेल्या साजातील इतर पानाडयांच्यावर ठसे असत. त्या ठशांच्याप्रमाणे ही मुले चमकदार आहेत अशी ही कल्पना !

खेडयातील बायकांची एक समजूत अशी असते की, दळण संपले असे कधी म्हणू नये ! त्यांच्या मुलांना ते वाईट असते. कारण एखाद्या क्षणाला संपणारे दळण हे तात्पुरते संपते. दुसऱ्या दिवशी पुन्हा ते सुरू होत असतेच ! तेव्हा

मुलांचे आयुष्य भरपूर वाढावे म्हणून मनात घोळणारी भावना या गीताने या रीतीने बोलून दाखविलेली आहे.

**सरलं दळायानू माज्या सुपात चाराचुरा**
**लक्ष्मी आली घरा मोत्या पवळच्यांनी वटी भरा**
**सरलं दळायानू सरता अभंग मला येतो**
**रामराजाच्या रथावरी कुंचा मोराचा ढाळ देतो**
**सरलं दळायानू सरती आरती कापूराची**
**कपाळीच्या कुंकवासाठी सेवा करीते शंकराची**
**सरलं दळायानू सरती आरती सिदूबाला**
**हावस मला बाई दुरडी बेलाची म्हादेवाला**
**सरलं दळायानू सरती आरती कुनी केली**
**रामयाची सीतामाई दळू लागून मला गेली**

दळण संपते वेळी पाच दाणे सुपात ठेवायची जुनी चाल आहे. त्यामागची भावना अशी की, घरात लक्ष्मी असावी ! म्हणजे काही संपू नये. तर त्याच भावनेने इथे या लक्ष्मीची मोत्यापोवळच्यांनी ओटी भरावी असे म्हटले आहे.

इथे शेवटी आरती आणि अभंग देवादिकांच्या निमित्ताने गायिले गेले आहेत ! कामाच्या सुरुवातीला आणि अखेरीस देवाचे नाव घेतले म्हणजे बरे असते, असे जे सामान्य मनाला वाटते ते इथे या प्रकारे प्रकट झाले आहे. महादेवाची पूजा कशी करावयाची आणि का करावयाची हे सांगतानाच इथे रामाची सीता आपल्याला दळू लागल्याने शीण आला नाही, याचाही या गीताने मुद्दाम उल्लेख केलेला आहे. कुणी कुणी इथे विठ्ठलाच्या रुक्मिणीचाही रामाच्या सीतेऐवजी उल्लेख करीत असतात.

**सरलं दळायानू माज्या सुपात येडी गंगा**
**द्रुपदी वव्या गाती तुला प्रीतीच्या पांडुरंगा**

हातातील दळण संपते वेळी अखेरचा घास जात्याच्या तोंडामध्ये सारताना व्यक्त होणारी ही चित्ताकर्षक भावना आहे. इथे भावनेच्या भरात प्रेमाने बेहोश होऊन कृष्णाला ओव्या गाणाऱ्या द्रौपदीचा साक्षात्कार सामान्य स्त्रीला झाला आहे ! स्वत:ला देवादिकांच्या आयाबहिणींत जमा करून देवाशी नाते

जोडायची संधी मिळाल्याने होणारे परमोच्च समाधान सामान्य वाईने या निमित्ताने या गीतामुळे उपभोगिलेले आहे !

जात्याचे मला पहावयास मिळालेले माहात्म्य हे असे आहे. या सौंदर्याची प्रभा आणखीही अन्य प्रकारांनी फाकलेली असणे शक्य आहे. परंतु मी जी बघू शकले ती मात्र अशी विशेष आगळी आहे.

## बाळराजा

आपल्या पोटी बाळ जन्माला येणे म्हणजे जीवनातील सर्वोत्तम आनंद उपभोगणे अशी दृढ श्रद्धा मनाशी बाळगूनच सर्वसामान्य बाई आपल्या जीवनाकडे पहात असते. तिचे बाळ म्हणजेच जणू तिचे उभे आयुष्य. त्यामुळे घरच्या ठेवीरेवीने, उठबशीने आणि कामाधामाने आलेल्या थकव्याचा विसर पडावा, म्हणून आपल्या बाळाच्या सहवासाची तिला विलक्षण ओढ लागते. एवढेच नव्हे तर बाळाचे दर्शन हाच तिचा विसावा असतो. मग ते बाळ लहान असो अगर मोठे असो, तिच्या या भावनेत बदल म्हणून नाही. फार तर वाढत्या वयाचे लेणे बाळ अंगावर चढवीत राहील तशी तिची कौतुकाची तऱ्हाही बदलत जाईल एवढेच म्हणता येईल.

**पुतबीराची फळं बाई उदंड देवापाशी**
**लाडके मैनाबाई दिल्यावाचुनी घ्यावी कशी**
**पुतबीराची फळं तुला देवाजी देता झाला**
**माज्या ग बाळाईनं वटा शालूचा पसरीला**
**पुतबीराची फळं बाई देवाजी वाटीयीत**
**सावळे राजूबाई वटा पसर दाटनीत**
**शंबर माजं गोत न्हाई गोताची मला चाड**
**लाडक्या बाळराजा केळी नारळीमंदी वाड**

एखादीला मूलबाळ लवकर झाले नाही तर इतर बायका तिच्याभोवती पुत्रप्राप्तीचे श्रेष्ठत्व असे गात बसतात. मूल म्हणजे जणू देवाची देणगी हीच त्यांची भावना. शास्त्रीय जगताकडे पहायची त्यांची तयारी नाहीच. त्यामुळे देवाला प्रसन्न करीत पुत्रप्राप्ती करून घ्यावी याकडेच त्यांच्या मनाचा कल अधिक.

म्हणून देवाच्या घरी पुत्रांची भरपूर फळे आहेत, पण ती त्याने दिल्याखेरीज घ्यावयाची कशी असा इथे प्रश्न पडलेला आहे! परंतु लगेच खुलासाही केला गेला आहे की, शालूचा पदर पसरल्याने देवांनी अशी फळे देऊन टाकली आहेत. देव प्रसन्न झाला आहे. या गीतामध्ये देव पुत्रांची फळे वाटतो आहे म्हणून झालेल्या गर्दीमध्ये घुसून आपली वर्णी लावून घेण्याविषयी केलेली विनंती मोठी गमतीची आहे! परंतु तशी ती थट्टेवारीच नेऊ नये म्हणून इथे केळीनारळींची उपमा मुलींना देऊन त्यांच्यामध्ये वाढत असलेल्या मुलग्याचा मात्र सर्व गणगोतांपेक्षा अधिक वाटणारा अभिमान आवर्जून आला आहे!

**दिवस उगवला उगवताना तानं बाळ**
**शिरी सोन्याचं जावळ**
**दिवस उगवला उगवतीला पाणी पडं**
**माज्या चुड्याला रंग चढं**

सकाळच्या प्रहरी पुढ्यात दिसणाऱ्या बाळाला उद्देशून केलेली ही कल्पना आहे. सूर्य उगवते वेळी तो लहानग्या बाळाप्रमाणे दिसत असून त्याच्या डोक्यावरील जावळ सोनेरी दिसत आहे, असे आपल्या लाडक्याकडे बघून इथे माउली म्हणते आहे. त्याचप्रमाणे पूर्वेकडे दिसणाऱ्या पाण्याच्या धारेप्रमाणे आपल्या बाळामुळे सौभाग्याला सौंदर्य प्राप्त झाल्याचेही ती इथे सूचित करते आहे!

**सदरी सोप्यामंदी नारुशंकर तांब्या लोळे**
**लाडका बाळराजा माजा जावळाचा खेळे**
**बारीक बांगडी गोऱ्या हातात चमक्या मारी**
**लाडका बाळराजा जावळ कुरळं मागं सारी**

मुलाचे जावळ काढावयाचे म्हणजे त्याच्या मामाला बोलावून समारंभानिशी पार पाडावयाचा एक कौतुकाचा सोहळा असतो. हा सोहळा अजून व्हावयाचा आहे असे येथे जावळाचे मूल घरात आहे या कल्पनेने बोलले गेले आहे. बाहेरच्या ओसरीवर नाशिककडून आणलेला चिमुकला तांबडा तांब्या लोळत असून त्याच्याशी बाळ खेळत असल्याची माहिती इथे आली आहे. त्याचप्रमाणे या बाळाचे कुरळे केस मागे सारताना आपल्या गोऱ्या, नाजूक हातातील राजवर्खी बांगडी चमकत असल्याचेही गीत गातेलीने मोठ्या अभिमानाने सांगून टाकले आहे.

घागऱ्या घुळूघुळू नको येऊस माझ्या मागं
तुला सयांची दृष्ट लागं
घागऱ्या घुळूघुळू दणाणिला माझा वाडा
कुठं खेळतो बैल गाडा
घागऱ्या घुळूघुळू दणाणिली माझी आळी
कुठं खेळती चाफेकळी
कुण्या पापिणीची दृष्ट पाळण्यावरनं गेली
लिंबलोणाला जलदी केली
लेकुरवाळी झाली तिचं जाईना पोरपण
माता करिती लिंबलोण
लक्ष्मीबाई आली रस्त्याला का ग उभी
चल घराला जाऊ दोघी
लक्ष्मीबाई आली दाराला देती थाप
माझ्या बाळाची पहिली झोप
भरल्या तिनीसांजा, तिनीसांज ती फुलली
दारी लक्ष्मी बोलवली
लक्ष्मीबाई आली चढे ओसरीचं जोतं
लाडक्या बाळासाठी सोडी साखरेचं पोतं
अवकाळ बाळराज केळी नारळीवर चडं
लाडक्या बाळराजा तुजी मावशी पाया पडं
उभ्या मी गल्ली जाते माज्या पदराची सारासारी
सावळा बाळराजा माजा रागीट पारावरी
आकाशी वावडी ग चंग लावूनी सोडीयीली
माज्या ग बाळकांनी नगरी मामाची येडीयीली
माळ्याच्या मळ्यामंदी माळी मळ्यात येऊ दीना
लाडका बाळराज फुलं जाईला ऱ्हाऊ दीना
समोरल्या सोप्या कुनी सांडिली तूपपोळी
लाडकी बाळाबाई माजी जेवली चाफेकळी

शेजीच्या घरी गेले
बस म्हनीना जोत्यावरी
लाडका बाळराज
हाई अवकाळ कडेवरी

दुरून वळकीतो
तुज्या चालीचा गरका
लाडका बाळराजा
डोलं मुन्सुबासारका

माज्या ग अंगनात
काळी निळी दोन घोडी
रामचंदर दौलती
भीम अर्जुनाची जोडी

रांगत रांगत
बाळ गेलंया उंबऱ्यात
लाडका बाळराज
हिरा झळकतो बंगल्यात

या गीतांनी अवखळ बाळाच्या लीलांचे वर्णन केले आहे. इथे आलेला केळीनारळीचा उल्लेख कोकणपट्टीत असलेल्या आजोळाची किंवा पानमळा असलेल्या घराची साक्ष देत आहे.

रागारागाने बाळ झाडावर चढत असून मावशी त्याला चढू नको म्हणून विनवणी करीत आहे, पदर सावरीत धावत जाऊन आई त्याला पारावरून (मोठ्या झाडाच्या बुंध्याला बांधून काढलेली जागा) माघारी आणते आहे, गावभर मुलांनी उडविलेल्या वावडयांनी (पतंगांनी) मामाच्या घराला शोभा आली आहे, बागेतील जाईची फुले बाळ तोडतो म्हणून माळी त्याला प्रतिबंध करीत आहे, त्याचा अवखळपणा ओळखून शेजारीण त्याला बैस म्हणत नाही, त्याच्या चालण्यावरून तो लांबूनही ओळखू येतो आहे इत्यादी प्रकारच्या बाळ-लीलांनी नटलेला हा भावनाविष्कार आहे. इथे बाळ मुन्सफासारखा चालतो आहे या कल्पनेने आईच्या मनातील त्याच्या विषयीच्या अपेक्षांना वाचा फुटली आहे ! उंबऱ्यावरील रांगते बाळ घरामधील हिऱ्यासारखे शोभून दिसत असल्याचे सांगून इथे अंगणातील ही रामचंद्र व दौलती नावाची मुले भीमार्जुनांसारखी दिसत असल्याचे कौतुकाने आई बोलते आहे. त्याचप्रमाणे घरी लक्ष्मीआई आल्यामुळे बाळासाठी घरात ती साखरेचे पोते सोडीत आहे असा इथे आलेला उल्लेखही कौतुकास्पद असाच आहे.

या गीतात तूपपोळी सांडल्याच्या निमित्ताने मुलीचा आलेला उल्लेख मोठा सुंदर आहे. तसेच आईने आपल्या या मुलीला इथे चाफेकळीची उपमा देऊन तिच्या सौंदर्याचा केलेला गौरवही मनोवेधक आहे !

**पोथी पुस्तक वाचताना बाई कानीचा डूल हालं**
**लाडका माझा बाळ सये कागदासंगं बोलं**
**पोथी नि पुस्तकाचं बाई मांडीला झालं वज्जं**
**लाडक्या बाळराजा हाई गिन्यानी हुरदं तुजं**
**साळंला जातो बाळ पाटी मागतो बेगडीची**
**लाडक्या राजसाची बोली कळंना बोबड्याची**
**शाळेच्या पंतोजीला देऊ केली म्या चंबूवाटी**
**माज्या ग बाळायाला लिनं बारीक यीयासाठी**
**मोठं नि मोठं डोळं सई रागूबा रतनाचं**
**लाडका माजा बाळ वाची कागद वतनाचं**

लिहायला वाचायला शिकणाऱ्या बाळराजाच्या कौतुकाने या ओव्या नटलेल्या आहेत. बाळाच्या कानांतील डूल हालताना बघून तो कागदाबरोबर बोलत असल्याची (वाचीत असल्याची) आईने बांधलेली खूणगाठ मोठी हृद्य आहे. त्याचप्रमाणे पुस्तकांच्या भाराने बाळाच्या मांडीला ज्याअर्थी ओझे होत आहे त्याअर्थी ते पेलू शकणाऱ्या बाळाचे अंत:करण ज्ञानी असले पाहिजे, असा तिने केलेला अंदाजही हृदयस्पर्शी आहे.

बाळाचे डोळे राघूप्रमाणे आणि रत्नाप्रमाणे चमकदार असून तो वतनाचे कागद वाचीत असल्याची इथे आलेली माहिती जुन्या काळच्या वतनदारी पद्धतीची कल्पना देत आहे.

आपल्या पाटीची किनार चमकदार बेगडीची असावी म्हणून बोबड्या बोलांनी मागणी करणाऱ्या बाळासाठी इथे कौतुक आनंदले आहे; आणि त्याला वळणदार लेखन यावे म्हणून त्याच्या पंतोजीला बक्षीस म्हणून देऊ केलेली चंबूवाटी इथे अभिमानाने तंबते आहे. गुरुजींना या वस्तू द्यावयाच्या म्हणजे बाळाच्या वयाच्या त्यांच्या मुलाच्या त्या उपयोगी आहेत असे सूचित करावयाचे ! गुरुजींच्या मुलाबरोबर याचेही शिक्षण आपुलकीने व्हावे, अशी त्या मागची भूमिका आहे.

**इसाचं नेसयीनं माजं रुपाया भारायाचं**
**पोटीचं बाळराज दोनी पदर जरायाचं**

नार लेणं लेती / ईस पुतळ्या बोरमाळ
माजा ग बाळराज / सये उगडा चंद्रहार
पुतळ्याची माळ / बाई लोंबली पाठीपोटी
माजा ग बाळराज / चंद्रहारानं केली दाटी
लेन्या लुगड्याची / न्हाई कशाची जोडी केली
पोटीचं बाळराज / माजी ठेवनीची शालजोडी

दागदागिन्यांचा आणि भारी कपड्यांचा आपल्या मुलापुढे आपणाला मुळीच हव्यास नसल्याचे इथे आई अभिमानाने सांगते आहे. तसेच तिचे सर्व प्रकारचे सुख तिच्या मुलामध्येच केंद्रिभूत झाले असल्याचे सांगताना तिला जणू ब्रह्मानंद होतो आहे! शेजारणीने अगर नात्यातल्या बाईने अमुक एक केले म्हणून अभिमान दाखविला, तर घरच्या गरिबीची री न ओढता अगर त्याबद्दल वाईट वाटू न देता, ती या रीतीने आपल्या श्रीमंतीचा दिमाख बोलून दाखवीत आहे!

एक रुपया भाराच्या लुगड्यावर खूष होऊन आई इथे त्या लुगड्याचा जरीचा पदर म्हणून मुलाकडे बोट दाखवीत आहे. त्याचप्रमाणे लोकांच्या गळ्यांतील दागिन्यांची पर्वा न करता ती आपला चंद्रहार बघा म्हणून मुलाकडे बोट करते आहे. एवढेच नव्हे तर लेण्यानेसण्यामुळे प्राप्त होणारे वैभव केवळ ह्या मुलांच्यामुळे आपणाला प्राप्त झाल्याचा तिला अभिमान वाटतो आहे! म्हणूनच ठेवणीच्या शालजोडीशी तिने मुलांची तुलना केली आहे!

पाटाला जातं पाणी / ऊंसासंगट जाईला
सईला किती सांगू / सुक बाळाच्या आईला
बुट्टीचं दळायानं / बाई दुरडीमंदी आलं
बाळ जोडीला ग आलं / दिस नाचारीचं गेलं

बाळाच्या आगमनामुळे परिस्थितीमध्ये झालेला फरक इथे मोठ्या सुंदर रीतीने सांगितलेला आहे. पाटाच्या पाण्याने मळा पिकल्याचे सांगून जाईला पाणी मिळावे तसा आईला बाळाने आनंद दिला आहे असे सांगताना मोठ्या आकर्षक तुलनेने आईचे मन इथे मोहरले आहे! बाळामुळे दिवस चांगले आल्याची खूण म्हणून दळणही मोठे झाल्याची माहिती देताना या गीताने साधलेला हा दृष्टान्त मोठा सुरेख आहे.

**रडू नको बाळा तुला खाऊ देते गूळ**
**सोड पदराचा पीळ**

या गीतामध्ये खाऊचा हट्ट घेऊन रडत बसलेल्या बाळाची समजूत आई घालीत आहे. बाळाने आईचा धरलेला पदर आणि घेतलेला हट्ट इथे 'पीळ' या शब्दाने व्यक्त झाला असून, गूळ खावयास दिल्याने तो संपेल असेही त्याच्या उल्लेखावरून लक्षात येते. पूर्वीच्या काळी मुलाला गप्प बसविण्यासाठी हातात गुळाचा खडा देत असत, असे यावरून दिसते.

**नेनंता (लहान) मुराळी जातो वाटेनं खेळयीत**
**ढग वळवाचा गाळीयीत जरी पटका लोळवीत**

सासरी गेलेल्या बहिणीला आणायला म्हणून गेलेल्या छोटया बाळाचे हे कौतुक आहे. वळवाच्या पावसातही जरीपटका लोळवीत बाळ आनंदाने खेळत खेळत बहिणीकडे जात आहे असा हा सुंदर देखावा आहे.

**दिष्ट नि झाली म्हनू शाळेला जाता जाता**
**माज्या ग बाळकानं जरी पोषाक केला हुता**
**दिष्ट नि झाली म्हनू तालीम तक्क्यावरी**
**लाडका बाळराज झाड सुरूचं नाक्यावरी**
**दिष्ट नि झाली म्हनू मीठमोहऱ्यांनी हुईना काई**
**बाळाला झाली दिष्ट येसबंदाला जाते बाई**
**दिष्ट नि झाली म्हनू मीठमोहऱ्या काळा बिब्बा**
**माजा ग बाळराज बाई अंगनी चंद्र उबा**
**दिष्ट नि झाली म्हनू घेतो मोहऱ्या घोळुयीनी**
**माजा ग बाळराज आला लेजीम खेळुयीनी**
**दिष्ट नि झाली म्हनू मिर्च्या उतरीते बारा**
**माजा ग बाळ राजा हाई दृष्टीजोगा हिरा**

मुलाच्या विविध गुणाविष्कारांमुळे अगर चांगल्या दिसण्यामुळे त्याला दृष्ट होते अशी सामान्य स्त्रीची कल्पना आहे. याच कल्पनेचा आविष्कार दृष्टीची ही ना ती कारणे दर्शवीत इथे आलेला आहे. दृष्ट झाली म्हणजे बाळाचे काही बरे-वाईट होईल ही धास्ती आईला वाटते. त्यामुळे असे होण्याची कारणे शोधीत ती

बाळावरून येसबंद, शेणकूट, केस, मिरच्या, मीठ, मोहऱ्या बिब्बा वगैरे सामान दोन्ही हातांत गच्च धरते आणि ते पाचसातदा मुलावरून उतरून चुलीत टाकते. अशा वेळी बाळाला पाहिले असेल त्या सर्वांच्या नावांचा उच्चार करून ती पुटपुटते की, '...ह्या सगळ्यांच्या डोळ्यांत खाराकुट्टाची राख पडू दे!' आणि मग तिचा जीव हलका होतो! चुलीतल्या निखाऱ्यावर हे दृष्टीचे सामान फुटायला लागले म्हणजे मग आल्यागेल्यांच्या नावाने बोटे मोडीत चुलीचे काजळ मुलाच्या कपाळावर लावून ती निश्चित मनाने इतर कामाला लागते. तरी पण—

**दिष्ट नि झाली म्हनू मीठमोहऱ्या चुलीबाई**
**दिष्ट झालीया करू काई**
**दिष्ट नि झाली म्हनू मीठमोहऱ्या काळी माती**
**चंद्र कोम्याला एका राती**

अशी रुखरूख तिच्या मनात बराच वेळ रहाते शिवाय एका रात्रीत आपला चंद्र कोमेजला या कल्पनेने तिला धास्ती वाटते ती वेगळीच.

**उजेड पडयीतो नाक्याच्या ग कंदीलाचा**
**लाडक्याच्या माज्या जर झळकतो मंदिलाचा**
**देखनं एवडं पन डोळे भिवया आकाखाली**
**माजा ग बाळराज चाले जान्नीच्या झोकाखाली**
**किती नटशील बाळा नटनटूनी काय हुतं**
**लाडक्या बाळराजा रूप लागलं कुटं जातं**
**काळ्या मानसाला नका म्हनूसा काळा काळा**
**माज्या ग राजसाचा इटूसारका तोंडावळा**

मुलाच्या फाजील नटण्यामुरडण्याची कल्पना इथे आलेली आहे. काळ्या मुलाने आपल्या रूपाबद्दल वाईट वाटून न घेता विठ्ठलासारखे आपण आहोत म्हणून समाधानात रहावे असे इथे आईने मोठ्या खुबीने सुचविले आहे.

पूर्वीच्या काळी मंदील (रेशमी जरीचा फेटा) बांधण्याची चाल होती. तेव्हा त्याचाही इथे उल्लेख आला असून त्याची चाहूल रात्रीच्या वेळी नाक्यावरून येणारा मुलगा कंदिलाच्या उजेडात दिसल्याने लागली आहे.

उगाच कृत्रिमतेने सौंदर्य वाढविण्याची खटपट न करता आहे ते रूप, विशेषत: तारुण्यातील रूप, चांगले मानून रहावे असे आई मोठ्या प्रेमाने इथे सांगते आहे.

**मोटं नि मोटं डोळं आबाळीचं ढग**
**लाडक्या बाळराजा दिष्ट हुईल खाली बग**
**नटत नटत कुठं निगाला पेटेत**
**माजा ग बाळराजा जाई मोगरा लुटीत**
**सावळी सुरतू लई नसावी पुरुषाला**
**बाळराजा माजा नित जायाचा उरसाला**

या गीतांनी मुलाच्या सौंदर्याची व नटण्यामुरडण्याची तारीफ केलेली आहे. आभाळाच्या ढगांशी बाळाच्या डोळ्यांची केलेली ही तुलना मोठी विलोभनीय आहे. आईच्या भावड्या मनाने केलेले हे अतिशयोक्तिपूर्ण वर्णन होय! आपल्या कपड्यांना व अंगाला अत्तर वगैरे माखून नटूनथटून बाळ बाजारपेठेत जात असल्याची खूण इथे 'जाई मोगरा' या शब्दांनी दर्शविली आहे.

पुरुष माणसांना नेहमी यात्रेला आणि उरसाला जावे लागत असल्याने त्यांना सावळे सौंदर्यसुद्धा जास्त असू नये असे आई मुद्दाम इथे सांगते आहे.

**कुस्तीच्या फडावरी लिंबू नारळ आदी फोडा**
**लाडक्या बाळाला शीन बगूनी गडी सोडा**
**कुस्तीच्या फडावरी उभा पैरन काडूनी**
**माज्या ग बाळकांनी दिली रंजक (उत्सुकता) झाडूनी**
**कुस्तीच्या फडावरी कोन कुनाला मारी हाळी**
**बाळानं कुस्ती केली झाली सक्याची ग टाळी**
**कुस्तीच्या फडावरी कोन हिरव्या छतरीचा**
**माजा बाळराजा पैलवान खातरीचा**
**शेरभर दूध बाई पैलवानाची न्ह्यारी**
**माजा बाळराज गुंड उचली शिरीहरी**
**कुस्तीच्या फडावरी सबा बसली थोरांची**
**माज्या बाळायाची हुती बैठक मोराची**

**कुस्तीच्या फडावरी सबा बसली ऱ्हानथोर**
**सावळा बाळराज मोर नाचतो अनीवार**
**पैलवान झाला चिट्ठी आलीया लांबची**
**बाळाला थंडाई न्ह्यारी देते मी खोबऱ्याची**

पूर्वी खेड्यामधील शेतकरी कुटुंबातील मुलाने कुस्तीमध्ये कौशल्य दाखविणे व पैलवान म्हणून नाव कमाविणे ही फार अभिमानाची व भाग्याची गोष्ट मानीत असत. या गीतांनी नेमके हेच इथे सांगितलेले आहे.

माझ्या बाळाला त्याच्या बरोबरीचा जोडीदार बघून मग त्याला फडामध्ये न्या असे सांगताना, त्याला दृष्ट होऊ नये म्हणून आई इथे लिंबू नारळ अगोदर फोडा असे सुचवीत आहे. अंगावरील कपडे काढून आपला उत्साह दंड ठोकून व शड्डू मारून मुलगा दाखवीत असल्याचेही तिने अभिमानाने इथे सांगितले आहे. त्याचप्रमाणे लांब लांबून त्याच्या लौकिकाची हकिगत कानांवर आल्याने थंडाई, खारीक, खोबरे, दूध इत्यादींची त्याला न्याहारी देणारी आई त्याला श्रीहरी मानून तो गुंड घागर (वाटोळी मोठी घागर) उचलून दाखवितो, असेही कौतुकाने सांगते आहे. मोरासारखा दिमाखाने आपला बाळ नाचत असून सर्वांकडून त्याचे कौतुक होत आहे आणि त्याने कुस्ती जिंकली म्हणून मित्र-मंडळींकडून त्याची वाहवा होत आहे, याही गोष्टीचा तिने मोठ्या अभिमानाने इथे उल्लेख केलेला आहे.

**अंबारीचा हत्ती बाई माझ्या वाड्याला भिडला**
**तान्या माझ्या बाळानं काय किराना धाडीला**
**गुळाच्या एवड्या गाड्या बंदरी झाली दाटी**
**माझ्या बाळायांनी नेली गाडी पैक्यासाठी**

मुलाच्या कर्तबगारीचा आईने केलेला गौरव दर्शविणारा हा सुंदर प्रसंग आहे. जुन्या काळी हत्तीवरून मालाची ने आण होत असे, त्यामुळे दारात हत्ती आलेला बघून बाळाने काय काय वस्तू पाठविल्या आहेत ते पहाण्यासाठी आनंदाने आई इथे सामोरी आली आहे! त्याचप्रमाणे पर ठिकाणाशीही मुलाचा व्यापार सुरू असून त्याने गूळ विकून आलेले पैसे आणण्यासाठी बैलगाडी नेल्याचे सांगताना मोठ्या कौतुकाने तिचा ऊर भरून आलेला आहे.

**लाडकी माजी बाळ नको निजूस भुईला**
**चिमणे इंदूबाई गोंडा राक ग डुईला**
**लेका परायास लेक कशानं झाली उणी**
**सईला किती सांगू हिरा न्हवं ती हिरकणी**
**लेक म्हनुयीनी नका करूसा हेळसांड**
**लेकाच्या शेजायीरी लेकीचा पाट मांड**

मुलाच्या बरोबरीने मुलीचीही किंमत मानून तिचे कौतुक केले पाहिजे अशी कल्पना इथे आली आहे. त्याचबरोबर मुलीचा गौरव हिरकणी म्हणून केलेला असून, तिला जमिनीवर झोपू न देता गोंडा सांभाळीत कशावर तरी नीज असे आईने सुचविले आहे. पूर्वीच्या काळी मुलींच्या वेणीला चांदीचा मोठा सुरेख गोंडा बांधीत, त्याला उद्देशूनच हा उल्लेख आलेला असावा.

**ज्याच्या घरी हत्ती घोडे त्याच्या पडपायी जाऊ नका**
**लाडक्या सोनुलीला सासूशिवाय देऊ नका**
**लेकीचा जलयीम जसा गाजबीराचा ओपा**
**जेचीबी त्येनं नेली झाला रिकामा माळी सोपा**

जुन्या काळी मुलींची लग्ने लवकर करावयाची चाल होती. या गीतांनी त्या चालीचा उल्लेख सूचित केला असून नुसत्या श्रीमंतीवर भाळून न जाता सासू असेल त्या घरात मुलगी द्यावी असे म्हटले आहे. गाजराच्या वाफ्याप्रमाणे मुलीचा जन्म आहे अशी इथे व्यक्त झालेली कल्पना मोठी हृद्य आहे !

**बाळ निगाली सासऱ्या घोडं धरील ज्येचं त्येनं**
**माज्या ग बाळायानं पाय झाकील बंधुजीनं**
**बाळ निगाली सासऱ्या म्होरं बंधुजी मागं दीर**
**माजी ती बाळाबाई मंदी फुलली कोतमीर**

मुलगी सासरी जात असताना तिला फुललेल्या कोथिंबिरीसारखी मानून तिच्या रसरशीत बांध्याचा इथे केला गेलेला उल्लेख विलोभनीय आहे.

या निरनिराळ्या प्रकारच्या ओव्यांप्रमाणेच वेगवेगळी अशी लहान लहान लोकगीते गाऊनही स्त्रिया व पुरुष आपल्या मुलांचे कोडकौतुक पुरविताना दिसून येतात. या गीतांना बाळगाणी असे म्हटले जाते.

सामान्यत: बरीचशी बाळगाणी मुलांना व मुलींना सारखीच असतात. त्यामुळे घरची वडीलधारी माणसे पोरात पोर होऊन ती मोठ्या आवडीने 'आम्ही आमच्या वेळी कसं खेळलो' हे साभिनय दाखवीत सदासर्वकाळ गात व शिकवीत असतात :

**चांदोबा चांदोबा भागलास का भागलास का**
**लिंबोणीच्या झाडावर लपलास का**
**लिंबोणीचं झाड करवंदी**
**मामाचा वाडा चिरेबंदी**
**मामाच्या घरी येऊ जाऊ**
**तूप रोटी खाऊन जाऊ**
**घाल ग मामे तुपाचि धार**
**तुपाचि धार गेली वाऱ्यावनं**
**आई आली चुडद्यावनं**
**बाप आले घोड्यावनं**
**भैनी आल्या पालखीतनं**
**भाऊजी आले काळ्या कुत्र्यावनं**
**कावो भाऊजी रुसला**
**काळा विंचू डसला**
**काळा विंचू पापी**
**रांजणाच्या काठी**
**रांजण गेला गडगडी**
**पाऊस आला धडधडी**

चांदण्या रात्री अंगणात काळ्यामाळ्या घालून (स्वत:भोवती फिरून) किंवा एकमेकांसमोर टाळ्या वाजवीत बसून मुले हे गाणे म्हणतात. चांदोबाला उद्देशून म्हटलेल्या या गाण्याच्या मागे एक फार महत्त्वाची कल्पना लपलेली आहे. तशी ती थोडी नाजूकही आहे. पण सर्वांच्या मनाला भुरळ पाडणारी आहे. सगळ्यांत सगळी आणि मनाची मोकळी अशी ती मोठी आगळीही आहे.

आईला वरचेवर माहेरी जावयाला मिळावे म्हणून ती आपल्या बाळाला हे गाणे शिकवते. चांदोबाला मामा समजून आई त्याला मुराळी म्हणून बोलावते ही ती कल्पना होय. उगवत्या चंद्राला बघून कडेवरच्या बाळाला घास भरवीत आई हे गाणे म्हणत असते. सगळ्या भावांपेक्षा हा नियमितपणे दारी येणारा भाऊ तिला आवडतो! मुलांनाही चेंडूसारखे वाटोळे दिसणारे व चकाकणारे हे बिंब पसंत पडते. कधीकधी ते खेळायलाही हवे म्हणून ती हट्ट घेतात. ते मिळावे म्हणून नाचत नाचत हे गाणे गातात. ह्या चांदूमामाच्या मागे लागणारे पोर त्याला 'आलास का? लिंबोणीच्या झाडावर बसून लपंडाव खेळायला लागलास का?' असे विचारते. आणि मग लिंबोणीचे करवंदी रंगाचे झाड मामाच्या चिरेबंदी वाड्यासारखे आहे असे त्याला वाटते. यावेळी आजोळची आठवण येते. मामाच्या घरी गेले असता मामीने तूपरोटी खायला घालावी ही अपेक्षा. पण मामी रागराग करते. तूप वाढताना त्याची धार वाऱ्याने गेली असे सांगते. ती बातमी लगोलग आईबाबांना कळते व मग सगळे जण आपापल्या परीने त्याचे खरेखोटे करायला म्हणून येतात. पण भाऊजी मात्र कुत्र्यांवर बसून आल्याने शेवटी हशा पिकतो व ही रुसारुशी थांबते. शेवटी भाऊजींना चावलेल्या काळ्या विंचवाच्या अखेरच्या विपर्यासाने तर हसून हसून मुरकुंडी वळवीत हे गाणे संपते.

पुष्कळदा ह्या गाण्याचा उत्तरार्ध इतर काही लोकगीतांचाही उत्तरार्ध म्हणून आलेला आहे! त्यामुळे असे दिसते की, एखादे लोकगीत म्हणताना माहीत असलेल्या दुसऱ्या गाण्याचा भागही त्यास जोडून द्यायचा प्रघात जुन्या काळी असावा!

साताऱ्याकडे लोकप्रिय झालेले हे चांदोबाचे गाणे कुणी कुणी इतरत्र असेही म्हणतात :

**चांदोबा चांदोबा भागलास का**
**निंबोणीच्या झाडावर लपलास का**
**निंबोणीचं झाड करवंदी**
**मामाचा वाडा चिरेबंदी**
**मामाच्या वाड्या येऊन जा**
**तूपरोटी खाऊन जा**

तुपाची धार गेली वाऱ्यानं
कमळी नेली चोरानं
चोराच्या हातची सुटली
थोरांच्या हाती लागली
मामंजींनी पाहिली
सासूबाईंनी ठोकली

या गीतामधील शेवटच्या चार ओळी मागच्या गाण्यापेक्षा वेगळ्या आहेत. यातील ही कमळी कोण व तिच्यावर पुढील प्रसंग का ओढवला याचा अंदाज एवढ्यावरून नेमका लागत नाही ! तथापि कोणा तरी एखाद्या सासुरवाशिणीची ही कथा आहे एवढे फार तर म्हणता येईल. परंतु त्या प्रसंगाचा या गीतातील पूर्वार्धाशी मात्र तसा अर्थाअर्थी संबंध जोडता येत नाही !

चांदोबाचे हे गाणे कुणी कुणी असेही म्हणतात :

चांदोबा चांदणं भोगलंस का
लिंबाच्या झाडावर बसलास का
लिंबाचं झाड बाई वाटोळं
गौराय नेसली पाटोळं
नांगर खुंटी मोडली
बैलामागं जोडली
बैल पळतो खळ्यातनं
घाटी वाजते मळ्यातनं
मळ्या मळ्या माणसा
सजूरीच्या कणसा
एक कणीस पिकलं
सोळ्या खंड्या विकलं
पैका निगाला खोटा
पाऊस आला मोठा

इथे शेतकरी जीवनातील प्रसंग चित्रित झालेला आहे. परंतु वाटोळ्या लिंबाच्या झाडाच्या जोडीला पाटोळं नेसलेल्या गौराईचा उल्लेख या ठिकाणी का

आला आहे समजत नाही! पुढचा भाग मात्र मळणीच्या वेळचा आहे. उत्तम पिके आल्याने सोळा खंडचा धान्य निघाल्याचा हा उल्लेख त्या वेळच्या सधन सामाजिक जीवनाचे निदर्शक ठरतो. ऐन वेळी नांगराची खुंटी निसटल्याने प्रसंगावधान राखून वेळ कशी निभावून नेली, हेही येथे मोठ्या खुबीने सांगितलेले आहे. शेवटच्या दोन ओळी इथे उगाच आलेल्या आहेत असे वाटते. कारण एवढे धान्य निघाल्यावर त्याचा येणारा पैसा खोटा ठरून पाऊस मोठा यायचा ह्या गोष्टीची इथे बांधाबांध कशी होते हे ध्यानात येत नाही. तथापि यमक साधण्यासाठी असे केलेले दिसते. लोकगीतामध्ये अशा अनावश्यक गोष्टी अनेकदा आलेल्या दिसतात. केवळ गीत म्हणायच्या भरात चटकन मनात आले ते मागचा पुढचा संबंध लक्षात न घेता घुसडून दिले असे अशा काही गीतांमधून दिसून येते.

चांदोवाच्या या गाण्याचा उपलब्ध झालेला सर्वांत जुना पुरावा असा सापडतो :

**चांदुबा चांदुबा । भंगु ल्हासि गा ।।**
**लिंबोळिची जाळि । लोपल्हासि गा ।।**
**लिंबोळिचे जाड । कळवंति ।।**
**माम्हासि वाडचा । श्रीमंती ।।**

श्रीगौरीदेवीने चांगदेवास उद्देशून हे गीत तयार केले आणि त्या गीताच्या आधारे चांगदेवांनी आपल्या ‘ लिंबोळी ’ची रचना केली असा उल्लेख महानुभावांच्या वाङ्मयात या संदर्भामध्ये आढळून येतो. या गाण्यामध्ये मामाच्या घरी श्रीमंती असल्याचा उल्लेख आहे. तो इतरत्र आढळत नाही. या गीताची रचनाही जुन्या मराठीची आहे.

**गण्या गण्या गणपति चारी कमळं झळकती**
**एक कमळ मोठं विशी विशी रोटी**
**हंडा हंडा कढी डेरा डेरा भात**
**आमचा गण्या जेवतो जेवून विडा खातो**
**विडा खावून शाळा जातो शाळेत जाऊन विद्या शिकतो**
**छडी लागे छम छम विद्या येई घम घम**
**छडीची पडली सावली विद्या आम्हा पावली**

गणपतीला उद्देशून म्हटलेले हे गाणे मुलेमुली दोघेही म्हणतात. या गाण्यात झळकणाऱ्या मोठ्या कमळाचा, वीस वीस रोट्या, हंडा हंडा कढी व डेरा डेरा भात खाणाऱ्या गण्याचा (मोठ्या पोटाच्या गणपतीचा) उल्लेख आलेला आहे. अशा भव्य आणि अद्भुत गोष्टींची मुलांना विशेष आवड असते. त्यामुळे मुले हे गाणे डोळे मिचकावीत गमतीने म्हणतात. बाकीचा या गाण्यातील भाग अलीकडच्या काळात जोडलेला दिसतो.

**हर हराची पंखं मोराची**
**गाय दुधाची वासरं मायेची**
**तिकडुन आला जटा गोसावी**
**तो प्येला भांग**
**सूर्व्या नारायणा दिस केउति आहे**
**खरं खरं सांग**

संध्याकाळच्या वेळी मावळत्या सूर्याकडे बघून हे गाणे म्हणतात. इथे हरीचा, मोराच्या पंखाचा, दुभत्या गाईचा, मायेच्या वासरांचा असा शुभ उल्लेख आला आहे. त्याच्या जोडीलाच जटाधारी गोसावी भांग पिऊन आल्याची गोष्ट दिली आहे. पण लगोलग त्याला बघून मुले घाबरतील व काही काळेबेरे होईल ही भीती वाटल्याने दिवसाला अजून तो किती वेळ आहे अशी विचारणा केलेली आहे.

**वाकडी तिकडी बाभळ तिच्यावर बसला व्हला**
**त्येला दिला टोला गंगनाला गेला**
**गंगनाची मानसं लिंबराची कनसं**
**भलेगाव पळतं कडेगाव जळतं**
**लिबाच्या झाडावर डाग डाग वाजतं**

एखाद्या मुलाला खांद्यावर घेऊन गमतीने पळत व स्वत:भोवती फिरत मोठी पुरुष माणसे हे गाणे म्हणतात. त्याचप्रमाणे—

**आबुलाल बबुलाल संभाजी कोतवाल**
**पिरपरि पगडी म्हादेव रगडी**
**निळ्ळी घोडी चाबुक तोडी**
**चाबुक तुटंना वळ काय उटंना**

सखुबाई सरदार　　　कोंबडी गरवार
कोंबडीचं अंडं　　　व्हल्याचं भांडं
भलेगाव दळतं　　　कडेगाव जळतं
लिंबाच्या झाडावर　　　डाग डाग वाजतं

हे गाणेही मागच्या गाण्याप्रमाणेच खेडोपाडी गमतीजमतीने म्हणतात. या दोन्ही गाण्यांमधून अशक्य कोटीतल्या काही गोष्टी घालून गंमत निर्माण केली गेली आहे. त्यामुळे कशाचेच कशालाही सोईरसुतक नसले तरी मुलांची फार करमणूक होते.

व्हला व्हला गाजी　　　ढवळा बैल पूजी
ढवळ्या बैलाची येसन　　　निळ्या घोडीव बसन
निळ्या घोडीचा खरारा　　　वाघ मारीतो भरारा
वाघ्या पिलाचं रं जाळी रं जाळी
सीता कुंडली रं माळी रं माळी
माळ्या मुदन रं काटा रं काटा
गय्या निगाल्या रं वाटा रं वाटा
वाटंतिटंच्या रं नांद्या रं नांद्या
जानी गई डराकलि रं पांड्या रं पांड्या
पांड्या पुतळ रं मासा रं मासा
गय्या निगाल्या रं देसा रं देसा
देशादेशाची रं शितळी रं शितळी
जानी गई भडाकली रं पुतळी रं पुतळी
पुतळ्या शिगांत रं गोंडा रं गोंडा
धया दुधाचा रं लोंडा रं लोंडा
दे म्हातारे वाटी न्हाई तर घालतो ढोपरात काठी

टाळ्या वाजवीत मोठ्या गमतीने उलटसुलट फिरत मुले हे गाणे म्हणतात. या ठिकाणी अनेक कल्पना एकत्र आलेल्या आहेत. व्हल्याचे गाणे, ढवळ्या बैलाची पूजा, निळ्या घोड्यावर बसणे, वाघाची शिकार, त्याची जाळीदार गुहा या गोष्टी सुरुवातीला आल्या असून नंतर गुराख्यांनी सांगितलेली गाईंची हकिगत आली आहे. ही हकिगत सांगणाऱ्या ज्या ओळी आहेत त्यांचा अर्थ अनेक

प्रकारांनी लावता येईल. कारण एकाच ओळीत आलेल्या दोन गोष्टींचा परस्पर संबंध चटकन लावता येत नसल्याने तर्क करण्याखेरीज गत्यंतर नाही. शेवटच्या ओळीने केवळ विनोद निर्माण केला आहे. हे सगळे गाणे ऐकून आणि हा नाच बघून वाटी भरून दूध दे नाही तर काठीने मारण्याची धमकी एका म्हातारीला इथे दिली गेली आहे !

**दिव्या दिव्या दीपत्कार**
**कानी कुंडली मोती हार**
**दिव्या पाहुनी नमस्कार**

हे गाणे देवापुढे हात जोडून व आलकटपालकट घालून एकाग्र चित्ताने बसलेली मुले म्हणतात. दिव्याचे तेज नजरेत भरणाऱ्या पणतीला नमस्कार करणाऱ्या मुलांच्या अंगावरील तेजस्वी दागिन्यांचा इथे उल्लेख आलेला आहे.

**गणपति बाप्पा मोरया**
**अर्धी भाकरी चोरया**
**अर्धी भाकरी कुणाची**
**गणपतीच्या बापाची**

हे गाणे गणपतीच्या उत्सवाच्या वेळी म्हणतात. गणपती ही विद्येची देवता. त्यामुळे मुलांनी या देवतेची पूजा करावी ही कल्पना. अशा देवतेनेदेखील आपल्या वडिलांची अर्धी भाकरी चोरण्याचा गुन्हा केला आहे ! तेव्हा अशी सवय वाईट हे या निमित्ताने मुलांना सुचविले असावे. कदाचित देवांच्या उदाहरणाने असे काही समजावून दिले म्हणजे मुले उगाच वाद न घालता मुकाटचाने ऐकून काय तो बोध घेतील, ही भावनाही त्यामागे असावी !

**आडगुलं मडगुलं सोन्याचं कडगुलं**
**रुप्याचा वाळा तान्ह्या बाळा**
**तीट लावू काजळ घालू**

लहानग्या बाळाला मांडीवर घेऊन मोठचा ठेक्यामध्ये डोलत डोलत आई अगर घरातील वडीलधारी बाई हे गाणे म्हणत असते. या गाण्यामध्ये कौतुकाचा विषय आलेला आहे. त्यामुळे हे गाणे म्हणणारणीच्या चेहऱ्यावर ते संपूर्णपणे प्रतिबिंबित झालेले दिसून येते.

**काऊ काऊ ये, चिऊ चिऊ ये**
**दाणा खा, पाणी पी, भूर उडून जा**

लहान मुलांना उत्तम प्रकारचे सोबती खेळायला मिळावेत म्हणून हे गाणे शिकवतात आणि मुलेदेखील ते नाचत नाचत अगर उड्या मारीत आनंदाने गातात.

**काव काव सोन्याचे पाव**
**कुणी पावणा यायचा असेल तर भूर उडून जाव**

सकाळच्या प्रहरी दारी कावळा ओरडला तर घरी पाहुणा येत असतो अशी एक जुनी समजूत आहे. त्या समजुतीप्रमाणे या गाण्याची रचना झाली आहे. हेतू हा की, पाव्हणा यायचा नसेल तर भरपूर मोकळीक मिळाल्याचा आनंद दिवसभर उपभोगता यावा. शिवाय पाहुणा येणार असल्याने उगाच वाटणारी काळजीही मोठ्यांच्या मागची दूर व्हावी!

**आपडी थापडी गुळाचि पापडी**
**धम्मक लाडू तेल पाडू**
**तेलंगीचं एकच पान**
**धर ग बिब्बे हाच कान**

एकमेकांच्या मांडीला मांडी लावून हातावर हात उलथेपालथे करीत एकदा डावीकडे आणि एकदा उजवीकडे डुलत मुले हे गाणे म्हणतात. नंतर शेवटची बोळ म्हणताना एकदम कुणाचा तरी कान पकडून खूप हसतात. पण कोणीही आपला कान पकडू नये म्हणून प्रत्येकाने यावेळी खबरदारी घ्यावयाची असते. या गाण्यात टाळ्यांच्या तालांचा, गुळाच्या पापडीचा, धम्मक लाडूचा उल्लेख आलेला आहे. म्हणजे खेळ, खाणे व धाक या सर्वांना इथे आपल्या मर्यादेने बसविले आहे. तेल गाळावयाचे आणि तेलंगीचे पान घ्यावयाचे या गोष्टी इथे वेगळ्याच आलेल्या आहेत. त्यांचा मागच्या गोष्टींशी संबंध लागत नाही.

**च्याऊ म्याऊ, पखालीचं पाणी पिऊ**
**भूर उडून जाऊ**

एकमेकांचे कान धरून एकदा डावीकडे आणि एकदा उजवीकडे असे पाळी-पाळीने डोलावयाचे आणि मधूनच डोके खाली वाकवून पुन्हा वर करीत

पाठीमागे व्हावयाचे असा हा खेळ मुलामुलांत चालतो. पूर्वीच्या वेळी पखालीने पाणी आणीत असत, त्याचा इथे उल्लेख आलेला आहे.

**डोल ग बाई डोलाची**
**डोक्यावर पाटी सोन्याची**
**राणी हो ग राजाची**
**चोळी ले ग खणाची**
**लोणची खा ग आंब्याची**

लहानग्या बाळीला एकावर एक पाय घालून घेऊन बसावयाचे आणि तिला डोलावीत हे गाणे म्हणावयाचे असा प्रघात आहे. या गाण्यामध्ये लहानग्या पोरीच्या भवितव्याचा उल्लेख आलेला आहे. डोक्यावर सोन्याची पाटी घ्यायची, अंगात खणाची चोळी घालायची आणि आंब्याचे लोणचे खावयाचे, हे त्या वेळच्या शेतकरी जीवनात मोठेपणाचे लक्षण मानीत असे यावरून दिसून येते.

**आरंगळी : करंगळी : मधलं बोट : चाफेकळी :**
**अंगठा : तळहात : मनगट : दणकट :**
**कोपरं : ढोपरं : हनुवटी भाताबोळकं :**
**शेंबडं नळकं : काजळा डब्ब्या : फुलपाटी :**
**म्हातारीचं मडकं : डुगडुगडुग :**

हातांची बोटे मुठीत झाकून घेऊन नाचत नाचत हे गाणे मुले म्हणतात. त्यामागे हेतू असा की, डोळे झाकून मुलांनी एकदम मुठीतील बोट ओढून घ्यावयाचे आणि ते नेमके ओळखावयाचे या कलेत मूल पारंगत व्हावे. पण ते जमले नाहीच तर मग मुलाने हार खाल्ली समजून, त्यास शरीराच्या सर्व भागांची गाण्यात दर्शविल्याप्रमाणे ओळख करून द्यावयाची. शेवटची ओळ अगदी मजेखातर असा काही तरी आवाज काढणारी आहे, या पलीकडे तिला अर्थ नाही. मुलांना गमतीने असा आवाज काढण्याची सवय असते.

**दळू बाई दळू**
**जात्याला नाही पाळू**
**दळतीया नकटी साळू**

एकावर एक असे दगड घालून त्यांच्यामध्ये माती घालावयाची आणि वरचा दगड खालच्या दगडावर फिरवावयाचा. अशा रीतीने खेळ खेळणाऱ्या मुलांना चिडविण्यासाठी हे गाणे मुलेच गमतीने आपापसात म्हणतात. 'साळू' हे नाव प्रातिनिधिक म्हणून आहे. खरी दळणारी जी असते तिच्या हातून जात्यात बरोबर हवा तेवढा घास गेल्याने जात्याची पाळी नीट भरते. तशी ती न झाल्याने हे गाणे डिवचण्यासाठी म्हणतात. किंवा एखादी चिमुरडी नकटी पोर दळायला बसली म्हणजे मग कौतुकानेही हे गाणे म्हणतात.

लहान मुले व मुली एकत्र खेळून म्हणत असलेली अशी किती तरी लोकगीते आहेत आणि त्यांच्या खेळांचेही अनेक प्रकार आहेत.

आपल्या मुलावद्दल आईने गायिलेली गीतगाथा ही या थाटाची आहे. या गाथेची या परीची आणखी किती पाने मनोवेधक असतील त्याचे गणित करता येत नाही. या गीतगाथेचे अंतरंग हे वात्सल्याने दाटलेले असून कवतिक हा तिचा स्थायीभाव आहे. आपल्या मुलाच्या कोडकौतुकाची जी रीतभात असते तिचाच हा एक मोठा सौंदर्यशाली असा आविष्कार होय.

## बहीणभाऊ

दाटल्या जिव्हाळ्याने, मोकळ्या मनाने, आपुलकीने आणि भल्या प्रेमाने, एकमेकांशी एकजीव होत सुखदु:खाच्या गोष्टी करणारी अशी जिवाभावाची आणि नात्यागोत्याची माणसे म्हणून बहीणभावांचा लौकिक आहे. बालपणापासून एका आईच्या प्रेमळ सावलीत बहीणभावांची वाढ होत असल्याने स्वाभाविकच ती जिव्हाळ्याने एकमेकांच्याकडे पहात असतात, विचार करीत असतात, उपयोगी पडत असतात.

सासरी गेलेल्या बहिणीला त्यामुळेच भावाची विशेष ओढ असते. आपल्या भल्याबुऱ्याची व जिवाभावाची कानगोष्ट करण्यासाठी भाऊ हीच एक तिला विसाव्याची जागा वाटते! म्हणून सासरहून माहेरी न्यायला येणारा हक्काचा एवढाच एक माणूस या भावनेने तिचे डोळे त्याच्या वाटेकडे नेहमी लागलेले असतात. अर्थात भाऊदेखील बहिणीला भेटायला तेवढाच उत्सुक असतो. त्यामुळे

फार दिवस भावाची गाठभेट झाली नाही, म्हणजे वहीण त्याच्या भेटीसा
उतावीळ होते. अशा वेळी,

**म्हायार मला केलं बाई केलं ग ईरसर**
**थोरल्या बंदुजीनं केला गळ्याबीवर सर**
**धाकल्या बंदुजीनं खन घेतला पैठणीवर**
**पिता माजा म्हनीयीतो झालं म्हायार मनहर**
**भावज गुजरी म्हनीती मोत्या पवळ्यांनी वटी भरा**
**भैना मालन सांगीती राकडी केवडा भांग भरा**
**चुलता पंडीत म्हनीतो बाळ आवर भराभर**
**भाचं बाळ म्हनीती बसा लौकर घोड्यावर**
**सावल्या आल्या जोत्यावर रथ उबा ग शिवंवर**
**लाडके बाळाबाई आडवं भरतार येशीवर**

माहेरहून येताना घडलेला हा सगळा प्रसंग तिच्या नजरेत येऊ लागतो व म
ती कासावीस होते.

जुन्या काळच्या सासुरवाशिणीला मोठ्या जिव्हाळ्याने व हौसेने झाले
हे माहेर आहे. उतार वयातील वडिलांना आपल्या लेकीसाठी तिच्या मोठ्य
भावाने केलेला सोन्याचा सर, धाकटचा भावाने घेतलेली पैठणी आणि ख
वघून इथे आनंद वाटतो आहे. भावजय या गीतात नणंदेची मोत्यापवळ्यांन
ओटी भरते आहे आणि वहीण वहिणीच्या डोक्यावर पूर्वीच्या चालीरीतीप्रमाण
सोन्याचे दागिने (राकडी केवडा) घालते आहे. त्याचप्रमाणे लवकर आटोपण्याच
इशारा चुलता देत असून भावाची मुले (भाचे) वेशीवर रथ घेऊन जावई पाहुण
आले आहेत असे सुचवीत तिला घोड्यावर बसायची घाई करीत आहेत, अस
हा मोठा सुंदर प्रसंग आहे.

या गीतात आलेल्या रथाच्या उल्लेखावरून समाजजीवनातील सुखवस्त
कुटुंबाची कल्पना येते. शिवाय जुन्या काळातील या वाहनाच्या वापरावरून
या गीतांचे जुनेपणही मनात भरते.

**बंधुजी पावईना मला आल्याला ठावं न्हाई**
**शेला वलनी झोका खाई**

बंधुजी पावईना आला साकर शाईचा
ल्योक लाडका आईचा
बंधुजी पावईना आला अवचित ग दारी
चोळी खिशात अंजीरी
बंधुजी पावईना बाई म्या देकीला अंगनात
झारी बुडविली रांजनात
बंधुजी पावईना पाट चंदनाचा टाकीला
जिरसाळ ग भोजनाला
बंधुजी पावईना येळी लवंगाची करते शाक
आज थाटाचा सईपाक
बंधुजी पावईना जान जमकाना ढेलजंत
गेला मातला सांगयीत
बंधुजी पावईना केली भैनानं चालरीत
बंधु असावा जलमात
बंधुजी पावईना हौस विचारी कशायाची
चाल निगाली ठुशीयीची

घरी अवचित आलेल्या भावाच्या आगमनामुळे झालेला आनंद बहीण इथे मोठ्या अभिमानाने बोलून दाखवीत आहे. आईच्या लाडक्या मुलाचे आणि आपल्या भावाचे आगमन जणू साखरेवरच्या सायीसारखे तिला गोड वाटते आहे. भाऊ आला आहे हे अंगणातील वलणीवर ( कपडे ठेवायच्या काठीवर ) लोंबणाऱ्या त्याच्या शेल्यावरून ध्यानात येते, ही इथे व्यक्त झालेली भावना चित्ताकर्षक आहे. पूर्वीच्या काळी परगावी जाताना अंगावर शेला घेऊन जाण्याची चाल असावी असे यावरून दिसून येते. त्याचप्रमाणे भाऊ बहिणीच्या भेटीला जायाचा म्हणजे खिशात अंजिरी चोळी असावयाचीच हेही जणू त्यावेळी ठरलेले असावे !

भावाचे दर्शन घडताच त्याला रांजणातील पाणी झारीने काढून चूळ भरा-वयास द्यावयाचे, त्याच्यासाठी जिरेसाळीचा भात रांधावयाचा, पुरणपोळीचे जेवण करावयाचे, चंदनाचा पाट बसायला टाकावयाचा, जेन (लोकरीचे अंथरावयाचे आसन) आणि जमकांना (सतरंजी) ढेलजेत (दरवाजाजवळील

बाहेरच्या खोलीत) वसायला घालावयाचा इत्यादी प्रकारांनी त्याचे स्वागत करताना बहीण इथे आनंदली आहे. तिने केलेली ही चालरीत भावाने आईच्या कानावर घातली तेव्हा तिलाही समाधानाचे भरते आले असून, जन्माला येऊन भावाचे हे सुख एक वेळ आपणही उपभोगावे असे तिला वाटते आहे. एवढेच नव्हे तर ठुशीची (गळ्यातील एक जाडजूड असा सोन्याचा नक्षीदार दागिना) चाल सगळीकडे निघाली आहे तेव्हा आपल्या लेकीला ठुशी करावयाची हौसही तिच्या मनामध्ये डोकावली आहे.

जुन्या काळची ही हौस आणि चालरीत पाहिली की, आजच्या सामान्य बाईला आपण त्या काळात जन्माला येतो तर बहार येती, असे बोलून दाखवायचा मोह अनावर होतो.

**सणामंदी सण आली पंचीम खेळायाची**
**वाट बघती मुराळ्याची**
**सांगून धाडीती आल्या गेल्या माणसाला**
**धाडा मुराळी दसऱ्याला**
**हिरव्या चोळीवरी रागू काडीते कुंकवाचं**
**बंदु मुराळी हुकमाचं**
**वाट मी किती बघू ह्या ग झाडाझुडूपाची**
**माज्या हरनीच्या पाडसाची**

या गीतांनी भावाच्या आगमनाची तीव्रतेने अपेक्षा व्यक्त केली असून, इथे मुलीने आल्यागेल्यांजवळ आईला निरोप धाडून भावाला पाठविण्यास सांगितले आहे. हिरव्या चोळीवर कुंकवाचे राघू काढून भावाची हक्काने वाट पहावयाची या गीतात आलेली कल्पना मोठी गोड आहे.

**अंगड्या टोपड्यांनी पेठ करीती झगाझगा**
**भाचा मामाचा टोपीजोगा**
**माझ्या ग अंगणात खेळ खेळीती पोरी पोरी**
**भाची बाळ मामाची लई गोरी**
**अंगड्या टोपड्याचा शिंपी वाड्यात बोलवावा**
**भाचा कडीचा मामा दावा**

टोप्याच्या टकुच्याला गोंडं लावीती झेंडं झेंडं
भाची मामाच्या मागं हिंडं
पिंपळपानाचो ग पडं सावली जोत्यावरी
भाचा मामाच्या कडीवरी

माहेरी गेल्यानंतर भावाने आपल्या मुलांचे केलेले कौतुक बहीण या गीतांद्वारे सांगते आहे. इथे बाळाच्या भारी कपड्यांनी गावची पेठ झगझग करीत आहे, टोपाच्या टोपड्याला झेंड्याप्रमाणे मोठे गोंडे लावले आहेत, मुलाच्या कपाळावर पिंपळपान नावाचा मोती लावलेला दागिना लोंबतो आहे, इत्यादी प्रकारचा आलेला उल्लेख जुनी चालरीत दर्शवीत आहे. पूर्वीच्या काळी घरची परिस्थिती कशीही असली तरी मुलांची ही हौस भागवीत असत, असे यावरून दिसून येते.

शिलंगनाला गेला हरी झाली शिलंगनाची दाटी
सावळ्या बंदुजीनं सोनं घातीलं माज्या ताटी
दिवाळ सनादिशी मी का ओवाळी गाई घाटा
माज्या ग बंदुजीच्या निम्म्या हिश्यात माजा वाटा
दिवाळ सनादिशी भाऊबीजेचं लुगयीडं
सावळ्या बंदुराजा दार पित्याचं उगयीडं

सणासुदीच्या निमित्ताने माहेरी गेल्यानंतर भावाने बहिणीला दिलेल्या देणगीची हकिगत या गीतात आलेली आहे. वडिलांच्या घरचे दार आपल्यासाठी सतत उघडे असल्याचे सांगून ही बहीण भाऊबीजेच्या लुगड्याची आणि दसऱ्याच्या सोन्याची अपेक्षा करीत आहे! शिवाय तिने भावाच्या हिश्श्यामध्ये आपली वाटणी असल्याचेही सांगून टाकले आहे!! आजच्या काळातील नवीन वारसा कायद्याचे हे जुने प्रात्यक्षिकच होय!

पिवळा पितांबर मला पुशीतो सारा गाव
सावळा बंधुराज म्या ग लुटीला बाजीराव
पिकलं उंबयीर सका डोंगर दरवळीतू
वानीचा बंधुराज पाड कशाचा विचारीतू
तुजी वाट बगता बाई शिनल्या साज्या कोरा
सावळ्या बंधुराजा कंदी भेटल श्यासम्होरा

बाजाराच्या वाटं भाऊ भैनीला भेटला
वळवाचा पाऊस ढग अस्मानी फुटला
दुबळं माजं पन जन लोकांला झाईरू
वानीचा माजा बंदु हुंडा मोलाचा भाईरू
गावाला गेला म्हनू माज्या बुगबिडीचा रवा
ताईता बंदु माजा बाई गेल्याला यील कवा
नदीच्या पलीकडं कोन पतंग अंग धुतो
वानीचा बंदुराज चंद्रासारका ढाळ देतो
लोकाच्या आयारानं झाला मांडव लाली लाल
बंदुच्या आयाराची आली परात हिरवीगार
लोकाच्या आयाराची घडी ठेवीली खुट्टीवर
बंदुच्या आयाराचा जरी पदर पाठीवर
भैन भावांडं ग एका डब्यातील मोती
माय मालनी ग माजी भरती गंगाला आली व्हती
चवघी आमी भैंनी एकच्च भाऊराया
झाकुनी गेल्या मोगऱ्याखाली जाया

बहीणभावांमधील प्रेमाची थोरवी ही गीते गात आहेत. बहीण भाऊ म्हणजे गंगेच्या (आईच्या) डब्यातील मोती आहेत ही इथे आलेली कल्पना मोठी सुंदर आहे. भावाने केलेला आहेर तेवढा अंगावर नेसावयाचा आणि इतरांचे आहेर जमा करावयाचे ही वस्तुस्थिती बहीण इथे बोलून दाखवीत आहे. खेडोपाडी अशी चाल आहे की, माहेरचा आहेर हा जरूर स्वीकारावयाचा, नेसून फाडावयाचा. पण इतरांचे मात्र परत करावयाचे !

आपल्या अंगावरील पिवळा पीतांबर कुणी घेतला म्हणून गावच्या बायका विचारीत असता आपण भावाला लुटल्याची माहिती बहीण इथे अभिमानाने सांगते आहे. या ठिकाणी भावाची हौस तर आली आहेच परंतु जुन्या काळी पीतांबर नेसणे म्हणजे मानाची वा भाग्याची गोष्ट मानीत हेही इथे मुद्दाम सांगितलेले दिसते.

भावाला इथे बहीण आपल्या बुगडीचा (कानातील दागिना) रवा म्हणते आहे. त्याचप्रमाणे तो नदीवर आंघोळीसाठी गेला असता चंद्राप्रमाणे सुरेख

दिसतो असे तिचे म्हणणे आहे. आपला दुबळेपणा जगाला जाहीर झालेला आपल्या लाख मोलाच्या भावाला खपणार नाही अशी भीती इथे बहिणीला वाटते आहे! भावाविषयी तिला वाटत असलेला आदर आणि नितांत भक्ती यावरून दिसून येईल.

पिकलेले उंबर खाण्याची बहिणीची इच्छा भावाने इथे पुरविल्याचे सूचित झाले असून त्याची वाट बघून शिणलेली त्याची बहीण त्याला थोर पुरुष म्हणून गौरविते आहे!

**दिष्ट नि झाली म्हनू धोंडा फुटला बारवाचा**
**सावळा भाऊराया घड कोम्याला नारळीचा**
**तुज्या जिवासाठी जीव माजा झालाय हाऱ्याहुऱ्या**
**का म्हनून सुकलास माज्या शेतीच्या राजगिऱ्या**

भावाला झालेल्या दृष्टीमुळे वहीण इथे कासावीस झाली आहे. भाऊ म्हणजे नारळीचा घड आणि तो कोमेजला याची खूण म्हणजे विहिरीचा फुटलेला धोंडा! दृष्टान्त देऊन व्यक्त झालेली ही कल्पना चित्ताकर्षक आहे. त्याचप्रमाणे शेतातील सुंदर नाजूक राजगिऱ्याप्रमाणे दिसणारा भाऊ सुकल्यामुळे आपला जीव वाराहुरा-खुळाभैरा-झाला असल्याचेही वहीण इथे सांगते आहे. सामान्य मनाच्या कल्पनाशक्तीचा एक हृद्य नमुना म्हणून ही गीते पहाता येतील.

**भैन भावांडांची बाई पोटात त्येंची माया**
**हिरवं शिताफळ आत साकरची काया**

भाऊबहिणींमधील प्रेमाचा महिमा या गीताने अभिमानाने गायिला आहे. वरून हिरव्या दिसणाऱ्या सीताफळाला आत साखरेसारखी चव असते, तशी वरवर भांडणाऱ्या वहीणभावांमधील प्रीतीलाही गोडी असते अशी ही नितांत-रम्य कल्पना आहे.

**सावळी सुरयीत माज्या सपनी साऱ्या रात**
**ताईता बंदु माजा हिरा झळकतो काकनात**

स्वप्नामध्ये आलेला भाऊ हातातील वांगडयांमधला हिरा झळकावा तसा दिसत असल्याचे वहीण इथे अभिमानाने सांगते आहे. पण रात्रभर तो स्वप्नात आल्याने त्याच्यावद्दल तिला रुखरूखही वाटते आहे!

भावाबी परायास भावजय मिळाली रतयीन
आपुल्या सोन्यासाठी किल्ली करावी जतयीन
वैनीबाई तू भावजयी नको उभ्यानं कुंकू लावू
नारीला किती सांगू सात नवसाचा माजा भाऊ
पान्याला जाती नार तिची घागर सूर्या डोलं
सावळा बंदुराजा बाई गारुड्या विद्या बोलं
भावज गुजयीरी पाया पाडावं चांगयीलं
हळदी कुंकवानं माजं जोडवं रंगयीलं
पाटीबर डाग बाई कोन ग नार लेली
बंदुची माज्या रानी सई देवकाला गेली
भावजयी बाई खाली बसून कुंकू लाव
तुज्या ग चुड्या साटी लई नवशीले देव
भावजई बाई झाड वाड्याची पायरी
सावळा बंदुराया चंद्र निगाला भाईरी
भावजयी बाई तुजा पदर भिगाचा
लाडक्या बंदुजीचा बाई पटका जरीचा
चार बंदु माजे माजा चाहोरी ग सर
भावजई बाई तू कर पदर बरूबर
बंधूजी चोळी देतो वैनी गुजरी देती दोरा
कुनाच्या जिवावरी सांग चालतो तुझा तोरा

नणंदेने भावजयीशी केलेली ही प्रेमळ कानगोष्ट आहे. भावापेक्षा भावजय चांगली मिळाली या आनंदात बहीण भावजयीकडूनही आपल्याला चांगली वागणूक मिळावी म्हणून मुद्दाम सांगते आहे. भाऊ म्हणजे जणू कुलूप घातलेल्या पेटीत ठेवलेले सोने आणि वहिनी म्हणजे त्याची किल्ली ही तिने व्यक्त केलेली कल्पना मोठी आकर्षक आहे!

पाटीभर दागिने घालणाऱ्या भावजयीला नणंद म्हणते आहे की, माझा साता नवसांचा भाऊ आहे तेव्हा तू बसून कुंकू लावीत जा. आणि माझ्या पाया पडताना माझी जोडवी रंगणार नाहीत, कुंकू लागणार नाही (ते कमी होणार

नाही), हे पहात जा. जुन्या काळच्या बायका तिळमात्रही कुंकू इतरत्र सांडणार नाही, याची कसोशीने किती खबरदारी घेत असत, हे यावरून दिसून येते.

नदीवरून पाणी घेऊन येणारी भावजय आपल्या भावाच्या नादात घागर डोलावीत चालते आहे, असे चेष्टेने नणंद इथे म्हणत असून तिच्या अशा चालण्याचे कारण देताना भावाला तिने गारुड्याची उपमा दिली आहे.

भावाच्या पायाला केर लागू नये म्हणून भावजयीला झाडलोट करावयाची सूचना नणंद इथे करीत आहे. भावजयीच्या अंगावरील लुगड्याचा भिंगाचा पदर आणि भावाचा जरीचा फेटा असा इथे आलेला उल्लेख माहेरच्या सधनतेची कल्पना देत आहे. या गीतात बहिणीने आपल्या भावजयींना एक गोड विनंती केली आहे की, चारी भावांना चार पदरांचा सर म्हणून आपल्या गळ्यात त्यांना घालण्यासाठी गुण्यागोविंदाने रहायची मुभा त्यांनी ठेवावी! म्हणजे सगळे सुखाने असू द्या असे ती सुचवीत असून माहेरी आपले स्थानही मानाचे राखण्याची तिची प्रबळ इच्छा आहे.

**बसाया बसकारू जेन टाकीती युवायाला**
**बंदु ढेलजी बसायाला**
**बसाया बसकारू ज्यान जमकाना लाल गादी**
**बंदु युवाया बस मंदी**
**बसाया बसकारू सोप्या टाकीला चांदवा**
**बस लाडक्या बंदवा**
**बसाया बसकारू टाका बनात दुसरी**
**बंदु युवायी आज घरी**

भावाला व्याही करणाऱ्या बहिणीने त्याच्याशी अगत्याने केलेली ही आपुलकीची भाषा आहे. खेड्यामध्ये भावाने आपली मुलगी बहिणीच्या मुलाला द्यावयाची चाल पूर्वी फार असे, त्या पद्धतीचाच हा आविष्कार होय. या गीतामध्ये बहिणीने भावाला बसायला म्हणून जेन, जमकाना, लाल गादी (खुतनीच्या कापडाची), चांदवा आणि बनात ह्या जुन्या आसनांची मांडणी केलेली आहे.

**पिकल्या पानांचा ग इडा बांदावा चवकोनी**
**लाडके मैनाबाई भाचा जावई नाती दोनी**

पिकल्या पानांचा ग  इडा सुकूनी गेला वाया
माजे तू मैनाबाई  कांत रुसला पड पाया
पिकल्या पानांचा ग  इडा बांदिते पीळदार
सावळे मैनाबाई  केळी लवंगाचं मोळं मार
पिकल्या पानाची  तुज्या कांताला आवयीड
माजे तू मैनाबाई  पान दिव्यानं निवयीड

जावई झालेल्या स्वतःच्या भाच्याला पानाचा चौकोनी विडा करून द्यावयाला आई मुलीला शिकवीत असताना, नवऱ्याला द्यावयाचा विडा ताजा पाहिजे, तो पीळदार पाहिजे आणि केळीच्या देठांचा अगर लवंगांचा मोळा (खिळा) मारला पाहिजे असेही बजावून सांगताना ती पुढे म्हणते आहे की, तुझ्या नवऱ्याला पानाची फार आवड आहे. तेव्हा तू दिव्यापुढे बसून पाने नीट निवडून पुसून घेत जा; आणि जर नवरा विड्यापायी रुसलाच तर पाया पडून, पडती बाजू घेऊन, त्याचा रुसवा काढीत जा. पूर्वीच्या काळी आई आपल्या लेकीला कशी शिकवण देत असे, त्याचा हा एक लक्षात ठेवण्यासारखा नमुना आहे.

पाची प्रकाराचं ताट  द्रोण तुपाचा कुठं ठेवू
  वाणीतिणीच्या बंदु जेवू
पाची प्रकाराचं ताट  द्रोण दुधाचा निवायाला
  तूप भिनविलं शेवायाला
पाची प्रकाराचं ताट  निरशा दुधात सोनकेळ
  तोंडी लावाया रामफळ
पाची प्रकाराचं ताट  भाजी मेथीची विसरली
  बंदु सरदारा चुकी झाली
पाची प्रकाराचं ताट  दुधा तुपानं भरली वाटी
  बंदु जेवतो जगजेठी

भावाला वहिणीने वाढलेल्या पंचपक्वान्नांचे हे सुंदर वर्णन आहे. शेवया, तुपाचा द्रोण, दुधाची वाटी, मेथीची भाजी, सोनकेळ, रामफळ इत्यादी पदार्थांवरून घरच्या गाईम्हशीमुळे लाभलेली दुधातुपाची सुबत्ता असे आणि परसदारीच्या बागेत येणारी फळे यांच्या सहाय्याने पंचपक्वान्नांचा आनंद पूर्वी लुटता येत

असे, हे यावरून दिसून येते. बाहेरचे पदार्थ गोळा करण्याची यातायात करीत न बसता आणि घरचे असेल त्यावरच भागवीत भावासाठी जेवण करीत असताना, वहिणीला सुगृहिणी म्हणून वाटणारे हे समाधान आगळे आहे.

**पोथी नि पुस्तकांनी माजं भरलं रांजन**
**लाडक्या बंदुजीनं मागं सारीलं बामन**

या गीतात शिकलेल्या हुशार भावाचे कौतुक वहीण करीत आहे. आपल्या घरी रांजण भरून पुस्तके जमा झाल्याने भाऊ ब्राह्मणांपेक्षाही हुशार असल्याचे हे भाबडे मन सांगते आहे. पूर्वीच्या काळी मोठ्या प्रमाणात ब्राह्मण वर्गच ज्ञानसंग्रह करीत असे, त्यामुळे त्यासही लाजवील अशी कर्तबगारी आपल्या ब्राह्मण नसलेल्या भावाने केली, म्हणून बहिणीला झालेला हा आनंद मोठा हृदयस्पर्शी तसाच समाधानकारकही आहे.

**जात्या ईसवरा कोण्या डोंगरीचा ऋषी**
**भावाभैनीवानी हुरदं उकलीलं तुज्यापाशी**

वहीणभावांनी एकमेकांशी खुल्या दिलाने गुजगोष्ट करावी त्याप्रमाणे आपण जात्याशी बोलू शकल्याचे समाधान बहिणीने इथे प्रकट केलेले आहे. तिचा हा भोळा भाव मनोहारी आहे. कोणत्या तरी डोंगरावरून आलेला ऋषीच जात्याच्या रूपाने समोर असल्याची व जात्याला ईश्वर म्हणून संबोधल्याची तिची ही कल्पनाही वाखाणण्याजोगी आहे.

वहीणभावंडांच्यावद्दल असे किती बोलावे तेवढे थोडेच वाटावे, एवढ्या या विषयावरील ओव्या अमाप आहेत.

या ठिकाणी खेड्यातील वहुजन समाजामधील स्त्रियांनी गायिलेली ही भावावहिणींची सुमधुर गीते आहेत. त्यांचे सौंदर्य आगळे आणि सगळ्यात सगळे वाटावे एवढे देखणे आहे.

## मायबाप

उभ्या आयुष्याच्या आपल्या बऱ्यावाइटाचे वाटेकरी होणारे भागीदार म्हणून माणसाला जन्मदात्या आईबापांचा मोठा आधार वाटतो. विशेषतः सासुर-वाशिणींना तर ह्या आधाराची अतिशय आवश्यकता वाटते. त्यांच्या आयुष्याची

सारी भिस्तच जणू आईवडिलांच्यावर असते ! चांगली कामगिरी केल्यानंतर कौतुक करायला, चुकले माकले तर सांभाळून घ्यायला, त्यानेसायची हौस भागवायला, थकल्या भागल्या जिवाला विसावा द्यायला आणि कोणत्याही प्रसंगाला पाठीशी उभे रहायला आईबापांखेरीज सासुरवाशिणीला इतर कुणी दिसत नाही, आठवत नाही. भाऊ झाले तरी ते गोड आहेत तोवरचेच. वहिणी झाल्या तरी त्यांच्या मनाप्रमाणे होतेय तोवरच्याच. आईबापांचे तसे नाही. त्यांच्या मायेला ना आदी ना अंत. त्यांच्याजवळ मुलीपासून कसलीही ना अपेक्षा ना प्राप्ती. सारे जणू निरपेक्ष. त्यामुळे बायका भल्या दिलाने आईवडिलांची थोरवी गात असतात.

| | |
|---|---|
| बापाजी समींदर | बया मालन व्हाती गंगा |
| दोगांच्या सावलीत | कर आंगूळ शिरीरंगा |
| बापाजी माजा वड | बया मालन वडजाई |
| दोगांच्या सावलीची | किती सांगू मी बडेजाई |
| काशी बनारसी | बनारसीचा डोंगूर |
| मायबाप माजी | सर्व तीर्थांचा आगर |
| ववी मी गाते | काशीतल्या नागनाथा |
| रामचंदर माजा पिता | सीता रानी माजी माता |
| ववी मी गाते | पित्या माज्या दौलताला |
| सावळ्या बंदुराया | बया तुळस शेजाराला |

आईवडील म्हणजे जणू तीर्थांचे आगर आणि त्यांची छाया म्हणजे जणू देवादिकांची छाया, अशा सुंदर धार्मिक भावनेने नटलेल्या व प्रेमळ श्रद्धेने फुललेल्या या ओव्या आहेत.

| | |
|---|---|
| माळीन सादवीती | देटासकट कारलं |
| मायबापांनी दिलं | साजासहित डोरलं |
| वैराळ सादवीतो | चुडे लियाच्या बाया किती |
| माजी ती माऊली | चौघी लेकींचं नाव घेती |
| पिता माजा चंदन | बया माजी गोंदन |
| हावस माजी हुती | दोनी झाडांच्या मधून |

काळी चंद्रकळा बगते दिव्याच्या मी ज्योती
पिता माज्या दवलता हिऱ्या किंमत सांग किती
हावस मला मोठी तांबडं लुगडं काळी चोळी
माय मालनी बोलती चल बाजारा येरवाळी
चोळ्यावरी चोळ्या किती फाडू मी शेलारीच्या
पिता माजा दवलत खेपा करीतो गालेरीच्या
उंच उंच चोळी मी ग लेतीया आडवारी
बयाच्या जीवावरी मी का भोगिते तालीवारी
बापाजी माजा वड बया मालन पिंपरण
दोगांच्या सावलीला झोप घेते मी संपूरण
बाजाराला गेली माजा बाजार थोडा थोडा
पिता माजा दवलत संगं वासाचा येलदूडा

आईवडिलांनी आपल्या लेकीची पुरविलेली हौस या गीतांतून साईन संगीत आलेली आहे. दारात येणारी माळीण देठासह कारल्याचा पुकार करीत (सादवीत) असताना वडिलांनी कोल्हापुरी साजाची दिलेली देणगी मुलगी आठवीत आहे. शिवाय वडिलांनी घेतलेली काळी चंद्रकळा दिव्याच्या उजेडात नजरेत भरलेली असल्याने तिच्या किंमतीची विचारपूस ती वडिलांच्याजवळ करीत आहे. अशा वेळी कौतुकाने वा अभिमानाने ती वडिलांना हिरा म्हणून संबोधिते आहे. आईवडिलांनी ग्वाल्हेरकडून मागविलेली भारी चोळी आपण नेहमी वापरतो असे सांगताना ही मुलगी आपली वाटेल ती हौस पुरविण्याची आईवडिलांची तयारी असल्याचे सांगते आहे. बाजारात जाताना बरोबर येणारे वडील हे वेलदोड्याच्या वासाप्रमाणे समाधान देणारे आहेत, असा इथे आलेला उल्लेख वडिलांच्याबद्दलचा तिच्या मनातील पराकोटीचा आदर दर्शवीत आहे.

आईवडिलांच्या सावलीमध्ये आपणाला संपूर्ण सुख मिळत असल्याची ग्वाही देऊन या गीतातील मुलगी, कासाराला केलेल्या बोलाविण्याच्या निमित्ताने आपल्या चारीही मुलींचा आईला अभिमान वाटत असल्याचे सांगते आहे.

या गीतात आलेल्या शेलारीच्या (जुन्या काळचे मौल्यवान कापड) चोळीवरून आणि ग्वाल्हेरच्या खेपेवरून पूर्वीच्या काळच्या हौसेमौजेची व ती पुरविण्यासाठी घेतल्या जात असलेल्या तसदीची कल्पना येते.

**लुगडयाची घडी बाई यीना ग माझ्या मना**
**पित्या माज्या दवलता बापा नेसूंदे तुमच्या सुना**
**लुगडयाची घडी दोनी पदर राम सीता**
**घडी घालीतो माजा पिता नेस म्हनीती माजी माता**
**लुगडयाची घडी मी का टाकीली बाकावरी**
**सावळे भैनाबाई माजा रुसवा बापावरी**
**लुगडयाची घडी त्यात रेशीम काय न्हाई**
**पिता राजस बोलतो लेकी एवढयानं झालं न्हाई**

आपल्या मनाप्रमाणे लुगडे घेतले नाही असे वाटल्यामुळे वडिलांच्यावर रुसलेल्या लेकीचे हे मनोगत आहे. आईवडिलांच्याजवळ हट्ट घेणाऱ्या मुलीची ही भावना स्त्रियांच्या नित्य परिचयाची असल्याने तिची गोडी थोडी अधिक वाटते! या गीतात हे लुगडे नाही मनाला आले तरी 'एवढयानेच संपले असे नव्हे तर मी पुन्हा दुसरे घेईन' अशी बापाने इथे लेकीची घातलेली समजूत तिने संयमाने वागावे ही शिकवण देण्याच्या दृष्टीने महत्त्वाची आहे.

**बया म्हनू बया सुटं तोंडाला पाजूर**
**माजी मदाची घागर**
**बया म्हनू बया तोंडाला येतं ग्वाडू**
**माजं मनूक्याचं झाडू**

लेकीने आईच्या प्रीतीचा गायिलेला हा महिमा मोठा सुंदर तसाच हृदयस्पर्शीही आहे. आईच्या प्रेमाची उपमा-अलंकारांच्या सहाय्याने केलेली ही वाखाणणी लक्षात घेण्याजोगी आहे.

**दंडावरची चोळी बाई आनीक वर सार**
**लाडके बाळाबाई बाजूबंदाला जागा कर**
**भरल्या बाजारात उंच किनाऱ्यामंदी पेरू**
**लाडके बाळाबाई साऱ्या गोतात पिता थोरू**

बारा बैलांची दावन | मागं म्हशीला डांब रवा
पित्या माज्या दौलताची | बाई राजाची बग हवा
बारीक बांगडी | नको भरूस कालाकिता
जोवर माजा पिता | राजवर्खीची काय कथा

बहिणीबहिणींच्यामध्ये वडिलांच्या कर्तबगारीसंबंधी होणारी ही भाषा आहे. वडील आहेत तोवर राजवर्खीसारखी भारी बांगडी भरायलादेखील हरकत नाही आणि अंगावर बाजूबंदासारखा दागिनाही ल्यायला हरकत नाही, ही या गीतांनी केलेली भाषा जुन्या काळच्या हौशी मायबापांची हकिगत सांगते आहे.

सावली शिताळ | हितं उतरील वज्जं
मावली माजी बया | इसाव्याचं झाड माजं
सुकादुकाच्या हुरदी | बांदील्या मी ग पुडचा
भेटली बयाबाई | आता सोडीते थोडचा थोडचा
गावाला कुन्या गेली | भैनभावंडांची जाळी
बंदु पोरसवदा | संगं भैन लेकुरवाळी
माय लेकींचं बोलनं | जशी दुधाची उकळी
लाडके राजूबाई | माता मनाची मोकळी

आई म्हणजे जणू विसाव्याचे झाड आणि हृदयात बांधून ठेवलेल्या सुख-दुःखाच्या पुडचा सोडून शांतता देणारी देवता, अशी या गीतांनी सांगितलेली गोष्ट विशेष कल्पनारम्य आहे. मायलेकींचे बोलणे फार खुल्या दिलाने होते असा या कल्पनेचा अर्थ असून, दुधाला उकळी फुटावी तसा त्या बोलण्याचा थाट असतो, असे इथे सुचविले गेले आहे.

पोरसवदा भाऊ आपल्या लेकुरवाळ्या बहिणीला घेऊन गावाला गेल्यामुळे आईला वाटत असलेली काळजी या गीतांनी विशेष चित्ताकर्षक रीतीने सांगितलेली आहे.

उभ्या मी गल्ली जाते | खडा हालंना भुईचा
| येल शीतळ जाईचा
उभ्या मी गल्ली जाते | नीट धरूनी पासवा
| कुन्या गरतीचा कुसवा

उभ्या मी गल्ली जाते म्हाई हालत पापनी
नाव बापाचं राखुनी
उभ्या मी गल्ली जाते काम येळंच्या येळंला
हुते गरतीच्या साळंला
उभ्या मी गल्ली जाते दंड भुजा झाकुयीनी
नाव आईचं राकुयीनी

आईबापांनी आपणाला कशा प्रकारची शिकवण दिली आहे त्याची मोठी सुरेख माहिती इथे देण्याचा प्रयत्न एका लेकीने केलेला आहे. आपल्या हालचालीवरून आपण कुणाची मुलगी आहोत हे सांगण्याचा हा प्रकार मोठा सूचक, तसाच आजच्या सुशिक्षित मुलींनी धडा घेण्याजोगाही आहे.

जागा बगुनी दिल्या पागा वतनं बगुनी दिल्या लेकी
पित्या माज्या दौलताला शाना चातुर म्हनू किती

वडिलांनी आम्हा वहिणींना किती चांगली स्थळे बघून दिली आहेत, हे सांगण्याची ही तऱ्हा मोठी सुंदर आहे. जुन्या काळी कशा प्रकारचे घर बघून मुलीला द्यावयाची पद्धती होती याचा अंदाज या गीतावरून येतो.

चांदणं टिप्पूर पुनवी बाईचं
शोभिवंत घर माझ्या माय मालणीचं
चांदणं टिप्पूर चांदण्या जोगी रात
पित्या राजसाला किष्ण देवाची सोबत

माहेरच्या घराचे चांदण्या रात्री दिसणारे हे वैभव आगळे आहे. कृष्णदेवाची सोबत वडिलांना आहे म्हणजे देवाचा वरदहस्त आपल्या माहेरी आहे, असे या गीतांनी सुचविले आहे.

नदीच्या पल्याड ग काडी हालती लव्हाळ्याची
तितं माजी हैती बाई मामा मावशी जिव्हाळ्याची
हिरव्या चोळीवरी कुणी काढीली गवळण
ह्या ग नारीला सांगू किती हाय हौसची मावळण
उचकी लागीयिली का ग उचकी तुजी घाई
मायेच्या मावशीनं सई काडीली कशापाई

आईवडिलांच्याप्रमाणेच माहेरच्या इतर गणगोतांच्या आपल्यावरील प्रेमाची साक्ष इथे सासुरवाशीण देत आहे.

नदीच्या पलीकडे असलेल्या मामामावशीच्या जिव्हाळ्याची खूण म्हणून लव्हाळ्याची काडी हालते आहे, मावशीने आठवण काढली म्हणून उचकी लागते आहे आणि हिरव्या चोळीवरील नक्षीमुळे आत्याची सारखी याद येते आहे, हा या गीतातील भावनाविष्कार अतिशय आकर्षक आणि स्त्रियांच्या स्वभावातील विशेष आवडीनिवडी दर्शविणारा असा आहे.

मायबापांची थोरवी गावयाची म्हणजे सागरापेक्षाही अधिक खोलीमध्ये बुडी मारावयाची आणि त्याच्या विस्तारापेक्षाही अधिक मर्यादा गाठावयाची असा प्रकार आहे. केवळ शब्दांनी ही भावना खुलत नाही. केवळ कल्पनेनेही ती नटत नाही. तिची खरी भव्यता शब्दातीत आहे.

## हावशा माझा कांत

उभ्या जन्माची जोखीम अंगावर घेतलेल्या आपल्या पतिराजाबद्दल सर्व-सामान्य स्त्रियांनी सांगितलेली गीते मोठी पहाण्याजोगी आहेत. पूर्वीच्या काळी घरातील वडीलधाऱ्या मंडळींच्या देखत नवराबायको बोलत नसत. एरवीदेखील त्यांचे बोलणेचालणे कुणाच्या पहाण्यात येत नसे. तेव्हा असे असूनही आपल्या नवऱ्याबद्दल सामान्य वाईने जात्यावर बसून स्वत:शीच केलेली गुजगोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे.

एक तर नवऱ्याच्या जिवावर जगावयाचे तेव्हा निमूटपणे घडेल ते पहावयाचे आणि तो सांगेल ते ऐकावयाचे अशी स्थिती जुन्या काळी असे; आणि दुसरे म्हणजे त्याच्याबद्दल बरेवाईट काहीही बोलावयाची सोय नसे ! तो म्हणजे जणू देव आणि त्याचे बोलणे म्हणजे जणू ब्रह्मवाक्य ! परंतु असे असूनही आमच्या खेडूत स्त्रिया आपल्या नवऱ्याबद्दल बोलल्या आहेत. मोकळ्या मनाने त्यांनी आपली भावना प्रकट केली आहे.

**नवस करीते मी कुळस्वामी जोतीबाला**
**हात जोडीत म्हनीते कुंकू जलमी कपाळाला**

आपणाला अखंड सौभाग्य लाभावे म्हणून एक सुवासिनी इथे देवाला घरच्या कुळस्वामीला, विनंती करीत आहे. नवस करीत आहे. त्यामुळे सामान्य स्त्रियांच्या दृष्टीने ही भावना बहुमोलाची आहे.

लेन्यामंदी लेनं कोलापुरी डोरलं
हिरकनी चोळीवरी लेनं लोळतं पिवळं
हौसेचा भरतार हौस करीता न्हाईना
राम अवतारी डोरलं बाई खिशात मावंना
लेन्यामंदी लेनं गळी डोरलं कानी फुलं
कपाळीचं माजं कुंकू बाई भाळीचा चंद्र डुलं
लेन्यामंदी लेनं नथ लेवावी येरल्याची
जाळीच्या मन्याखाली हवा पहावी डोरल्याची
जिचा भर्तार गुनायाचा तिचा संसार सुखायाचा
शेल्यानं बनातीचा जुवा बसला दुहीयीचा

जुन्या काळच्या गळ्यातील बहुतेक सर्व दागिन्यांचा उल्लेख करून त्यामध्ये मंगळसूत्राचे असणारे वैभवशाली स्थान या गीतांनी दर्शविलेले आहे. त्याचप्रमाणे नवरा हौशी असून त्याचे आपले फार प्रेमाने चालले असल्याचे इथे सांगितले गेले आहे. गुणी नवरा असेल तर शेला आणि बनात यांची संगत जुळावी तशी नवराबायकोंची मैत्री प्रेमाची होते, अशी इथे प्रकट झालेली कल्पना जेवढी सुंदर आहे, तेवढीच ती सामान्य मनातील कल्पनासौष्ठव दर्शविणारीही आहे.

चवघी आमी जावा पाचवी माजी सासू
नंद कामिनी मदी बसं माज्या चुड्याला सोबा दिसं
काळी ग चंद्रकळा दोनी पदर सारयीक
सावळे भैनाबाई हौशा कांताची पारयीक
बारीक बांगडी मला भरावी वाटली
हावशा कांतानं ग तार पुन्याला धाडीली
गावाला गाव शिवू पान मळ्याला पायरी
हावशाच्या जिवावरी दुनिया भरली दुहेरी

जोडव्याचा पाय हळू टाकावा मालनी
सईला किती सांगू कांत बगीतू चालनी
हळदी मिरचीला गिऱ्हाईक गूळ तितंच मोलयीला
हावशा माजा कांत धनी मालाचा बोलयीला
खोपीत खोपकरी कुठं गेल्याती मोटकरी
हावशा कांताचा जरीपटका धावंवरी
हिरव्या चोळीनं दंड करीतो रसारसा
हावशा कांतानं छंद पुरवीला व्हावा तसा
भरतार राजस कोण्यापूर्वीचा कोण होता
गोड बोलण्यात न्हाई आठवली मातापिता

घरामधील गणगोतात आपल्या पतीचे स्थान काय आहे हे सांगून बायका इथे त्याच्या कर्तबगारीची थोरवी गात आहेत.

उंच वाढलेल्या पानमळ्याला पायरी करून (पायऱ्यांची शिडी करून) नवऱ्याने नवी दुनिया निर्माण केली आहे, जोडव्याच्या पायाच्या चालीवरून वळण पारखले आहे, काळी चंद्रकळा हौसेने आणली आहे इत्यादी प्रकारे पतिदेवाने केलेल्या कवतिकाला बोलून दाखविण्याची ही पद्धती मोठी छानदार आहे.

आपल्या शेतकरी नवऱ्याची इथे त्याच्या धावेवर पडलेल्या जरीच्या फेटयावरून होणारी शोधाशोध आणि हळद, मिरची, गूळ याला आलेले गिऱ्हाईक बघून त्याच्यावद्दल वाटलेला अभिमान या दोन्हीही कल्पना विशेष हृदयंगम आहेत.

माळ्याच्या मळ्यामंदी केळी नारळी जावाजावा
मधी गुलाबा तुजी हवा वास घेणार गेले गावा
गावाला गेलं म्हनू गळ्याची ग गळपोत
हावशा माजा कांत चंद्र हिल्लाळाची ज्योत
गावाला गेलं म्हनू माज्या गळ्याचा ताईत
हावशा कांताला ग सव्या देशाची म्हाईत
गावाला गेलं म्हनू माजी खजीबीन्याची पेटी
लाडके भैनाबाई वाडा भयान लागं पाठी

नवरा गावाला गेल्यानंतर विरहामुळे मनाची होणारी कुत्तरओढ आणि वाटणारी रुखरूख या गीतांनी मोठ्या बहारीने रंगविली आहे. नवऱ्याचे नाव न घेता त्याला हावशा कांत म्हणून त्याच्या बायकोने तो गावी गेल्याच्या सांगितलेल्या या खुणा कल्पनारम्य आहेत. गळ्यातील भारी दागिना आणि भावनांच्या खजिन्याची पेटी म्हणून नवऱ्याचा इथे होणारा गौरव वाखाणण्याजोगा आहे.

**माज्या ग अंगनात सूर्या किरनाचं एक झाड**
**हावशा माजा कांत झाला उशीर सबा सोड**
**भरल्या सबेमंदी हात देते मी छतायाला**
**हावशा ग सरदार उबा काँग्रेस मतायाला**

भोळ्याभावड्या सामान्य स्त्रीने राजकारणामध्ये व निवडणुकीमध्ये भाग घेणाऱ्या आपल्या पतीचे रंगविलेले अलीकडच्या काळातील हे चित्र लोकगीतांच्या अखंड निर्मितीचे निदर्शक म्हणून अभ्यासण्याजोगे आहे. सूर्यकिरणाच्या अंगणातील झाडाच्या हालचालीवरून पतीच्या माघारी परतण्याची बांधलेली ही खूणगाठ मोठी खुबीदार आहे.

**प्रीतीचा एवढा कांत नको प्रीतीवर जाऊ**
**पान्यातलीबी नाव् न्हाई लागत अनुभाऊ**

नवऱ्याने आपल्यावर प्रेम केले म्हणून तेवढ्यावरूनच, त्याच्या अंतःकरणाचा ठाव लागला असे समजून चालू नये, कारण पाण्यातल्या नावेचा अनुभव कळत नाही, असा इशारा या गीताने सासुरवाशिणीला दिलेला आहे.

**दुबळ्या भरताराची सेवा करावी आदरानं**
**पाय पुसावा पदरानं**
**दुबळ्या भरताराची नको करूस हेळईना**
**कपाळीचं कुंकू सोनं दिल्यानं मिळईना**
**दुबळा भरतार बाई भाजीची आणी मोट**
**मी ग हासत सोडी गाठ**
**दुबळा भरतार न्हाई नारीच्या खातरत**
**भाजी वेचीतो धोतरात**

एखादीचा नवरा थोडा कमकुवत असेल किंवा कर्तबगार नसेल तर तिने त्याची हेळसांड करू नये अगर त्याच्याकडे दुर्लक्ष करू नये, असा महत्त्वाचा इशारा या गीताने सासुरवाशिणीला दिला आहे. त्याचबरोबर सौभाग्याचा हा धनी सोन्यानाण्यांनी मिळत नाही हेही सांगून टाकले आहे! म्हणून त्याची सेवा तर आदराने करावीच परंतु त्याच्या कर्तबगारीचीही वाहवा करावी, असे हे गीत सांगते आहे. या सर्व कल्पनाविष्कारावरून एक गोष्ट इथे अशी लक्षात येते की, जुन्या काळी नवऱ्याला देव मानून वागण्याची चालरीत बायका अवलंबीत असत! पुर्नविवाहाची चाल त्यावेळी समाजाला मान्य नसावी!

**रागीट भरतार बच्च्या नागाचा फुसकार**
**हावशाचा राग मी ग हसून केला गार**
**रागीट भरतार समजी करीते नानापरी**
**लाडके भैनाबाई आडवा दिला ग नरहारी**
**रुसला भरतार एक दिसाला दोन वेळ**
**पोटीचा बाळराज घाली धोतराला पीळ**
**भरताराचा राग डाव्या डोळ्याची तराटनी**
**अंतरीची ग शानी बाई हसत देते पाणी**
**भरताराचा राग जसा वारूळीचा नाग**
**लाडके बाळाबाई त्येच्या हुकमात वाग**

रागावलेल्या नवऱ्याचे हे शब्दचित्र मोठे मजेदार आहे! नागाप्रमाणे फूत्कार टाकणाऱ्या नवऱ्याच्या हुकमात वागायची आज्ञा करून या गीताने हसतमुखाने त्याला सामोरी जाणारी त्याची बायको रंगविलेली आहे. त्याचप्रमाणे त्याचा राग शांत करण्यासाठी त्याच्या धोतराचा सोगा धरून त्याच्यामागे लागलेला आपला बाळ त्याच्या हाती दिला असल्याची इथे आलेली माहिती वास्तवपूर्ण तशीच विलक्षण परिणामकारकही झाली आहे.

**इसाचं नेसयीनं माजं तिसाचं दांडीवर**
**हौसदारानं खंडीली मुंगी पैठण माडीवर**
**तांबड्या लुगड्याची निरी रुतली माज्या पोटा**
**चुड्याच्या जीवावर मला शालूला काय तोटा**

परटीन धुनं धुती लिंबं देते मी ताजी ताजी
चुड्या ग राजसाची दोनी धोतरं अमदाबाजी
शिंप्याच्या दुकानी चुडा बसला भोळा राजा
हौशाच्या मांडीवरी हिरवी साडी बामनवजा

आपली हौस पुरविणाऱ्या नवऱ्याचे कौतुक इथे बायको सांगते आहे! घरच्या गरिबीतूनही तिला त्याचे दिसणारे हे वैभव आजच्या स्त्रियांनी डोळे भरून पहाण्यासारखे आणि मन लावून जोपासण्यासारखे आहे! या गीतात आलेल्या तलम कपड्याविषयी प्रसिद्ध असलेल्या अहमदाबाद गावाची, बामनवजा लुगड्याची आणि मुंगी पैठणच्या यात्रेची माहिती जुन्या काळची हौस कशी खुलत असे याची कल्पना देत आहे.

विहीरीच्या धावंवरी बाभळबाई ती माऊली
हावशा कांताला मोटकऱ्याला सावली
हात जोडीते तुला विहिरीबाई सवंदरी
सांबाळ ग माजं चारी बैल मोटकरी
हात मी जोडीते रात बाई मी ग तुला
हावशा माज्याला झाला उशीर यायला

शेतीचे काम करणाऱ्या आपल्या नवऱ्याला उशीर झाला म्हणून त्याला घरी सुखरूप येण्यासाठी रात्रीला बायकोने केलेली ही प्रार्थना आणि फार वेळ मोट हाकणाऱ्या नवऱ्याला सांभाळ म्हणून तिनेच विहिरीला व मोटेच्या सवंदराला जोडलेले हात अशा या गीतातील कल्पना विशेष हृदयस्पर्शी आहेत. त्याचप्रमाणे विहिरीवरील बाभळ आपल्या नवऱ्याला सावली देत आहे, म्हणून बायकोला होणारा या गीतातील आनंदही मोठा बहारीचा आहे. सामान्य स्त्रीने घेतलेली नवऱ्याची ही काळजी भोळीभाबडी असली, तरी चित्ताकर्षक आहे.

वाटच्या वाटसरा नको करूस उभा घोडा
कांत माजा जंगलात मोजी वाघीणीच्या दाढा

या ओवीने बायकोला वाटणारा नवऱ्याचा धाक सांगितला आहे. आपल्या बायकोने इतर कुणाशीही बातचीत करता कामा नये म्हणून राग पाखडणाऱ्या नवऱ्याची ही तऱ्हा आहे. वाघिणीशी झुंज खेळण्याचे सामर्थ्य अंगी बाळगणाऱ्या

नवऱ्याशी गाठ आहे, तेव्हा तू आपला आल्या मार्गाने चालू लाग, अशी विनवणी इथे सासुरवाशीण ओळखीच्या माणसाला करीत आहे!

**दळण दळीते लोखंडाच्या बोटांनी**
**वेखंडाची घुटी मला दिली बयानी**

सासुरवास करणाऱ्या नवऱ्याचा जाच किती होतो आहे याची कल्पना या ओवीने दिली आहे! आईने जणू वेखंडाची घुटी बाळपणी दिली आहे व त्यामुळेच माझी बोटे लोखंडाची होऊन दळण दळीत आहेत, अशी ही काळजाला जाऊन भिडणारी भावना आहे!

**वाट मी किती पाहू गावा गेलेल्या सजनाची**
**येळ झालीया भोजनाची**
**वाट मी किती पाहू गावा गेलेल्या वकीलाची**
**चित्रं कोम्याली बंगल्याची**
**वाट मी किती पाहू गावा गेलेल्या रंगेलाची**
**पानं सुकली रतीबाची**

गावाला गेलेल्या पतीची वाट पहाणारी ही बायको मनाला वाटणारी हुरहूर इथे मोठ्या युक्तीने बोलून दाखवीत आहे. उघड उघड असे काही बोलून न दाखविताना रतिबाची पाने सुकली आहेत, जेवायची वेळ झाली आहे आणि घरातील सजीव व निर्जीव अशी दोन्हीही चित्रे कोमेजून गेली आहेत, अशी भाषा ती इथे करीत असल्याने या भावनेस विशेष गोडी प्राप्त झालेली आहे.

**वाऱ्यानं हालती ग पानमळ्याची शेवरी**
**दिष्ट नि झाली म्हनू माज्या कुंकवाच्या चिरी**
**लिबलोन करीती सासूबाईची पैली निरी**
**जतान कर देवा माजी कुंकवाची चिरी**
**दिष्ट नि झाली म्हनू अंगनी पाय धुता**
**हावशा माज्या कांता गोऱ्या बा रजपुता**

नवऱ्याला दृष्ट झाल्याची बातमी पानमळ्याच्या हालत्या शेवरीने बायकोला दिली असल्याची या गीतातील कल्पना मोठी हृदयंगम आणि विचारवंताल

चकित करणारी आहे. तसेच नवरा राजपुत्राप्रमाणे गोरा आहे म्हणून त्याला दृष्ट होताच सासूबाई लिंबलोण करीत आपल्या बाळाचे रक्षण करून आपल्या कुंकवाला दीर्घायुष्य चिंतीत आहे, ही या ठिकाणी व्यक्त झालेली भावनाही हृदयस्पर्शी आहे.

आहेव मरन मला द्यावं पारबती
चवघे माझे बंधु खांदे माझे घरगुती
आहेव मरन किती सयांनो मौज
पुढं चाले कंत मागं गोताची फौज
आहेव मरन जन म्हनती भलं भलं
हावशा भरतार फुलं उडवीत गेलं
आहेव मेली नार चला तिच्या घरी जाऊ
तिच्या ग करंडीचं कुंकू कपाळी लेवू

नवरा जिवंत असताना येणारे मरण मोठे सुखाचे असते, या कल्पनेने भारून गेलेल्या सामान्य स्त्रीने याची देही याची डोळा पाहिलेले आपले मरण या गीतात आलेले आहे. सौभाग्याची ही थोरवी सामान्य स्त्रीच्या दृष्टीने विलक्षण रोमांचकारी आहे!

गोड भरताराचं सुक सये सांगता येता जाता
भर दिवसा डोलला ग बाई सूरव्या पाणी पिता

रागालोभाने भरलेले हे प्रेमळ नवऱ्याचे सुख बोलून दाखवीत असताना मनाला केवढा विरंगुळा मिळाला आणि वेळेचे कसे भान राहिले नाही, याची मोठी सुंदर हकिगत या गीताने सांगितलेली आहे.

थोरलं माजं घर हंड्यागल्लास लोंबत्याती
सासूबाईचं बाळराज धनी वाड्याला सोबत्याती
माडीवरी ग माडी चडली सासर मामांजीची
उभी राहून बघते लंका तिथून माहेराची

आपल्या घरच्या वैभवाला साजणाऱ्या नवऱ्याचे हे कौतुक आणि या घरातून दिसणारे माहेरचे वैभव या दोन्हीही भावना या गीतातून मोठ्या दिलखुलास पद्धतीने व्यक्त झालेल्या आहेत. सासरी भरपूर वैभव नांदत असले आणि

नवराही त्या वैभवाला लाजवील एवढा चांगला असला, तरी माहेरची झोपडीदेखील रावणाच्या लंकेप्रमाणे दिसते आहे, ही इथे प्रकट झालेली सासुरवाशिणीच्या मनातील कल्पना विशेष लोकप्रिय झालेली आहे. हा स्त्रीस्वभावाचा एक सहजसुंदर आणि मनोरम असा मंगल आविष्कार आहे.

**सख्या भ्रताराचं सुख सांगताना देवदारी**
**पाची पांडवांची सभा बसवीन मी सामोरी**
**पुसे आवड एकांती हात गळ्यात घालोनी**
**म्हणे आणू का पिंजेची बोल नथ मैनाराणी**
**रोज काकणाचा हात भ्रताराच्या उशाखाली**
**लागे प्रीतीची झोप सख्याच्या रंगम्हाली**
**राज भ्रताराचं सुखी केलं कसं साधं भोळं**
**रोज जरीचं पातळ नेसते मी पायघोळ**
**गोड भ्रताराचं सुख राती सांगता अंगणी**
**हासे नाजुक चांदणी तारा तुटला गगनी**

देवपूजेच्या निमित्ताने एखादी बाई जर देवळात गेली आणि तिला तिच्या मैत्रिणीने तिथे त्यांची भेट होताच तिच्या नवऱ्याबद्दल चौकशी केली तर ती या परीने मोठे रुबाबदार उत्तर देते. ह्या ओव्यांनी श्रृंगाररसाला मोठ्या दिमाखाने खेळविले आहे आणि प्रीतिकाव्याचा एक आगळाच साक्षात्कार इथे घडविलेला आहे.

**शिवकळा भिवकळा**
**नऊरत्नांचा पुतळा बाई**
**सभेशी दोघं**
**तुम्ही रांजण मी घागर**
**तुमापरास मी नागर बाई**
**सभेशी दोघं**
**तुमी दार मी चौकट**
**तुमापरास मी बळकट बाई**
**सभेशी दोघं**

तुमी दवत मी लेखनी
तुमापरास मी देखनी बाई
सभेशी दोघं
तुमी चांद मी चांदणी
तुमी आगाशी मी गंगनी बाई
सभेशी दोघं
तुमी हंडा मी परात
तुमी दारात मी घरात बाई
सभेशी दोघं

झिम्मा किंवा टिपरी खेळताना म्हटल्या जाणाऱ्या गीतात स्त्री आपल्या नवऱ्याशी स्वतःची तुलना करीत असून संसारात (सभेशी) दोघांचे स्थान कुठे व कोणते आहे ते दाखविण्यासाठी दाखले देत आहे. शंकराचे व भीमाचे बळ दोघांच्या ठिकाणी असून जरी आपले स्थान वेगवेगळे असले तरी आपण दोघे मिळून संसाराला शोभा आणीत आहोत हे सांगण्याची ही रीत खरोखरच मोठी देखणी आहे. एखादी स्त्री आपल्या नवऱ्याशी आपली बरोबरी कशी आहे हे दाखविताना एवढ्या थाटात बोललेली क्वचितच पहावयास मिळते.

सामान्य स्त्रीने आपल्या नवऱ्याएकी केलेल्या पारखीपैकी काही पैलू असे आहेत. त्यांचे तेज विविध प्रकारांनी नटले आहे. 'चुडा' म्हणून नवऱ्याचा उल्लेख करून निर्माण होणाऱ्या स्त्रीसुलभ लाजेने या गीतांचे अंतरंग विशेष सजविले गेल्याने त्यांची गोडी अवीट आहे.

## सासुरवास

ज्या घरामध्ये नवरा बघून मुलीला द्यावयाची त्या घरामध्ये असेल त्यामध्ये सुख मानून तिने जगले पाहिजे, असा सक्त इशारा पूर्वी मुलीला दिला जात असे. त्यामुळे मुलगीही त्या भावनेला चिकटून रहावयाची शिकस्त करावयाची. कारण सुरुवातीला कितीही चांगले स्थळ बघून दिले तरी तेथील माणसे केव्हा विथरतील आणि कोणता आळ केव्हा घेतील याचा नेम नसायचा! त्यामुळेच

ही शिकवण मुलीला वडीलधारी मंडळी देत असत आणि मुलगीही ती पचनी पाडण्याचा प्रयत्न करीत असे !

परंतु एवढे करूनही सासुरवास नशिबाचा टळत असेच असे नाही. तो हटकून पुढे यायचाच ! अर्थात काही मुलींच्या नशिबी तो लिहिलेला नसेलही; परंतु अशी उदाहरणे फारच थोडी. सर्वत्र सासुरवास हा कानीकपाळी लिहिलेलाच असे ! नाही म्हणायला त्याचे प्रमाण वरीक कुठे कुठे कमी जास्त दिसून येई इतकेच काय ते.

एखाद्या मुलीला सासुरवास होतो आहे किंवा नाही हे सुरुवातीला कळत नसे; आणि मुलीखेरीज अगर प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज कोणाच्या तरी करवी तो ऐकायला आला, तर त्यावर कुणी सहसा विसंबूनही रहात नसे. तथापि या नको असलेल्या गोष्टीचा उलगडा होई तो मात्र असा :

भाऊ भैनीच्या ग दारी  भर उनाचा कहर
दोन पहाट दुपार
भाऊ भैनीच्या ग दारी  गेला कोण्या समयानं
गर्दी केली उनाळ्यानं
भाऊ भैनीच्या ग दारी  उबा न्हाईला अंगनी
न्हाई घंगाळात पाणी
भाऊ भैनीच्या ग दारी  सासुरवास ये कानी
झालं काळजाचं पाणी
आल्या पावली कसता  उभा गल्लीवर राही
भैन आतुनी पाही
भैनीचा ग सासुरवास  न्हाई ऐकवला कानी
जीन घोड्यावरी आनी
भैन 'मरूदे' म्हनूनी  घोडा फिरविला रानी
न्हाई पाहिले परतूनी
शेवया बोटव्यांनी  उतरंडचा आगाशी
भाऊ चालला उपाशी
घरी वासाचे तांदुळ  काय करता असून
सासुरवाशी भैन

घराच्या वळचनीत उभी न्हाईली भैन
म्हणे दादा जा भेटून
आंब्याच्या सावलीत कोयाळ बोले राधा
उपाशी गेले दादा

ऐकणाराच्या काळजाचे पाणी पाणी करून सोडण्याची शक्ती असलेल्या या गीतांनी सासुरवाशिणीच्या परिस्थितीचे फारच चित्तवेधक चित्रण केलेले आहे.

उन्हाळ्याचे दिवस तेव्हा विशेष कामाधामाची निकड मागे नाही, त्यामुळे बहिणीला भेटायला म्हणून आणि जमले तर तिला बरोबर आणावी या हेतूने बहिणीकडे गेलेल्या भावाने डोळ्यांनी बघितलेली ही हकिगत आहे. ऐन उन्हा-मध्ये तो दुपारी गेला असताना धावत येऊन बहीण त्याला घंगाळात पाणी ओतीत नाही, हातपाय धू म्हणीत नाही, उलट तिचा सासुरवास मात्र तिच्या घरच्या माणसांच्या तोंडून वेड्यावाकड्या भाषेत ऐकायला मिळतो आहे! त्यामुळे इथे भाऊ व्याकूळ झाला आहे. त्याच्या काळजाने ठाव सोडला आहे. त्याच्याच्याने घरच्या माणसांची बडबड आणि बहिणीचे होणारे हाल ऐकवेनात व सहन होईनात म्हणून तो रस्त्यावर जाऊन तिचे ओझरते दर्शन घडते का पहावे, यासाठी लांबूनच कसता होऊन डोकावतो आहे आणि तीही तो कुठे दिसतोय का म्हणून उतावीळ झाली आहे, अशी काळजाला जाऊन भिडणारी कथा ही गीते सांगत आहेत.

अशा अवस्थेत बहिणीला नेणे योग्य न वाटल्याने इथे भाऊ घोड्यावर बसून माघारी वळतो आहे. बहीण मेली समजून तो चालला आहे! त्याला माघारी-देखील बघवेना एवढा तो व्याकूळ झाला आहे.

आणि ते बघून इकडे बहिणीचे हृदय पेटले आहे! घरातील उतरंडी शेवया बोटव्यांनी भरल्या असतानाही आपण भावाला जेवू घालू शकलो नाही याचे तिला अपार दुःख झाले आहे. वासाचे तांदूळ घरात असतानाही भावाला तसेच जावे लागले, म्हणून ती घराच्या वळचणीखाली येऊन दूरवर दिसणाऱ्या भावाला डोळे भरून पहात असता आलेला हुंदका आवरीत आहे. दादाला भेटून तरी जा म्हणावयाचे आहे पण आवाज फुटत नाही! आंब्याच्या सावलीत उभी राहून विचारी कोकिळेसारखा साद घालते आहे की, 'माझे दादा उपाशी गेले!'

सासुरवाशिणीची मन:स्थिती दर्शविणारी ही गीते विशेष हृद्य आहेत.

सासुरवाशिणीचा दुसरा एक प्रकार यापेक्षा निराळा आढळतो तो असा :

**बंधुजी विचारीतो भैना सासुरवास कसा**
**सावळ्या बंधुराया बरम्या लिवून गेला तसा**
**बंधुजी विचारीतो भैना सासुरवास कसा**
**चिताकाचा फासा गळी रुतला सांगू कसा**

एखादा भाऊ बहिणीला भेटू शकला आणि त्याने कसे काय चालले आहे म्हणून तिच्याजवळ विचारपूस केली, तर ती असे मोठे हृदयस्पर्शी उत्तर देते आहे. ब्रह्मदेवाने कपाळावर ओढलेल्या रेघेप्रमाणे अगर विधिलिखिताप्रमाणे चालले आहे, असे सांगणाऱ्या बहिणीचे केवढे हे मोठे मन! घरच्या सासुरवासाबद्दल अवाक्षरही न बोलता नशिबात आहे तसे चालले आहे, हे मोघम बोलून नकळत काही सूचित करण्याची ही तऱ्हा विलक्षण चित्ताकर्षक तशीच कल्पनासौष्ठव दर्शविणारीही आहे.

हौसेने केलेला 'चिताका'सारखा सोन्याचा दागिना गळ्यात रुतल्याकारणाने नकोसा वाटावा, तसे माझे चालले असल्याचे एक निराळे उत्तर इथे बहिणीने भावाला दिलेले आहे! या उत्तरातही तिची अक्कलहुशारी दिसून येते आहे.

अशा प्रश्नोत्तराचे वेळी भाऊ मग बहिणीची समजूत घालायचा प्रयत्न करीत असतो, तोही पहाण्याजोगा आहे :

**बंधुजी म्हनीयीतो भैना दिल्या ग घरी ऱ्हावं**
**लाडके राजूबाई भांडं न्हवं ते बदलावं**
**आज सासुरवाशीन घरी जात्याचं झाडनं**
**पोटीच्या बाळकानं पुढं फिटल पारनं**

आहे त्यात सुख मानून दिल्या घरीच तुला रहाणे भाग असल्याची गोष्ट पटवून देताना भावाने इथे भांड्याचा दाखला घेतला आहे. एखादे भांडे बदलून घ्यावे तसा हा प्रकार नव्हे हे तो सांगतो आहे. या त्याच्या सांगण्यावरून जुन्या काळी पुनर्विवाहाची चाल निदान प्रतिष्ठित घराण्यात तरी नव्हती; आणि सर्व सहन करून गिळीत रहावे पण काडीमोडीची अपेक्षा करू नये, हे मनावर बिंबविण्याचा कटाक्षाने प्रयत्न होत असे, हे दिसून येत आहे. या ठिकाणी आज

त्रास होत असला तरी उद्या मुले तुझे नशीब उघडतील, हा आशावादही भावाने वहिणीपुढे ठेवलेला आहे.

| | |
|---|---|
| **सासर एवढा वस** | **नको करूसा सासूबाई** |
| **दारीच्या चाफ्यापाई** | **दूर देशाची आली जाई** |

सासुरवाशिणीने या गीतात सासूशी कानगोष्ट केलेली आहे. आणि ती करीत असताना तिने मोठी सुंदर उपमा तिच्यापुढे ठेविली आहे. ती म्हणते आहे की, तुझ्या दारात चाफा होता म्हणून त्याला बिलगण्यासाठी जाई होऊन मी आले आहे तेव्हा माझा अव्हेर करू नकोस! स्वत:ला मुलाप्रमाणे सांभाळ म्हणून सून सासूला करीत असलेली ही विनंती काव्यानंदाच्या दृष्टीने पहाण्याजोगी आहे.

| | |
|---|---|
| **सासुरवासिनी** | **मला येती तुजी कीव** |
| **सासरी गेली मैना** | **तिच्यापशी माजा जीव** |
| **सासुरवासिनी** | **बस माज्या ओसरीला** |
| **तुज्या ग शीनंची** | **मैना माजी सासऱ्याला** |

शेजारणीने सासुरवाशिणीची घातलेली समजूत इथे रंगविलेली आहे. याच मुलीच्या वयाची आपली मुलगीही सासरी असल्यामुळे तिला हिच्याबद्दल वाटणारी हळहळ तिने इथे व्यक्त केलेली आहे. जिव्हाळ्याने होणारी कानगोष्ट या दृष्टीने या ओव्या अभ्यासण्यासारख्या आहेत.

| | |
|---|---|
| **जातीसाठी माती** | **बाई खाताना लागं वाळू** |
| **पित्या माज्या दौलता** | **ढाण्या वागा मी तुजं बाळू** |
| **बारीक पिठायाची** | **बाई भाकरी चौघडी** |
| **बया माजीच्या जेवनाची** | **याद हुतीया घडीघडी** |

या गीतांनी सासुरवाशिणीने शेजारणीला दिलेले बाणेदार उत्तर सांगितले आहे. वडिलांच्या इभ्रतीसाठी मी हे सारे सहन करीत आहे, असे सांगून ती म्हणते की, माती खाताना वाळूचा घास तोंडात आला तरी बिनबोभाट गिळावा लागतो आहे. याचा अर्थ असा की, कोंड्याचा मांडा करीत ती दिवस काढते आहे किंवा शिळेपाके तिच्या वाट्याला येते आहे! अशा वेळी आईच्या हातच्या चार पदर सुटणाऱ्या भाकरीची चव तिच्या ओठावर घोळत असल्याचे सांगून ती आपले मन हलके करू पहात आहे.

आणि एवढे होऊनही जर ती एकांतात विचार करीत बसलीच तर मग जात्यातून पीठ घरंगळावे तशी शेकडो गीते तिच्या ओठांवर घोळू लागतात. हुंदक्यांच्या साथीवर ती आपल्या भावगीताला वाचा फोडते.

**जिवाला माझ्या जड कसं कळालं जाता जाता**
**माज्या त्या बयानं तांब्या ठेवला तोंड धुता**
**जिवाला माज्या जड कसं कळालं जाता जाता**
**सावळ्या बंधूजीनं सान सारीली गंध लेता**
**जिवाला माज्या जड कसं कळालं रानामंदी**
**माज्या ग पिताजीला कडू लागलं पानामंदी**

आपल्याला त्रास होतो आहे याची बातमी आईला, भावाला व वडिलांना कशी कळली याची हकिगत सासुरवाशिणीने तोंड धुताना तांब्या खाली ठेवणे, गंध लावता लावता सहाण बाजूला सारणे आणि पानामध्ये कडवटपणा येणे या क्रियांनी अनुक्रमे सांगितलेली आहे.

**जिवाला माज्या जड शेजी बघती सान्यातून**
**बया माज्या मालणीच्या गंगा लोटल्या डोळ्यांतून**
**जिवाला माज्या जड मी ग उंबऱ्या दिलं उसं**
**माज्या ग मालणीला न्हाई कळालं असं कसं**
**जिवाला माज्या जड जावा बगूनी गेल्या शेता**
**पिता माजा दवलत आला सुक्कीर उगवता**
**जिवाला माज्या जड आयाबायांनी भरला सोपा**
**माजी ती बयाबाई आली वाघीन टाकी झेपा**
**जिवाला माज्या जड कसं कळालं एकाएकी**
**सावळा बंधुराया हाती धोतर धूम ठोकी**

आपल्याला बरे नाही हे आईला कसे कळले नाही याची रुखरूख मनाला लागली नाही, तोच सगळ्या आयाबाया जमल्या असता वाघिणीसारखी झेपा टाकीत आई आल्याची हकिगत इथे सासुरवाशीण सांगते आहे. शेजारणी फटीतून (सान्यातून) डोकावून पहात आहेत, पण आईचे डोळे आसवांनी भरून आले आहेत; जावा बघून शेताला गेल्या आहेत, पण शुक्राच्या चांदणीच्या

उदयाबरोबर वडील येऊन पोचले आहेत, असा परस्पर विरोधी भावनाविष्कार इथे मोठ्या कुशलतेने व्यक्त झालेला आहे. एकाएकी बातमी कळल्यामुळे हातात धोतर घेऊन भाऊ धावत आल्याबद्दलचा अभिमानही या गीतामध्ये आलेला आहे. खेडूत मंडळी गावी जाताना बरोबर धोतर घेऊन जातात, या चालरीतीचाही इथे मुद्दाम उल्लेख आलेला आहे.

**जिवाला माज्या जड धरनी लोळती माजं केस**
**माजे तू बयाबाई डोकं घेऊनी मांडी बस**
**जिवाला माज्या जड कसं कळालं हरनीला**
**बया माज्या मालनीचा पाय ठरंना धरनीला**
**जिवाला माज्या जड कोन माज्या कळकळीचं**
**बयाची माज्या बाळं वाघ सुटलं साकळीचं**
**जिवाला माज्या जड माजी दुकती नकंबोटं**
**बया माजी मालन माजी वैदीन गेली कुठं**
**जिवाला माज्या जड कसं कळालं मायबापा**
**अंगनी होता चाफा कळ्या पडती झपाझपा**
**जिवाला माज्या जड कसं कळालं माज्या आई**
**अंगनी हूती जाई कळ्या पडती घाई घाई**
**जिवाला माज्या जड कोन्या कागदी जलदी लिवा**
**आत्ती माजी मावळण दूर देशीची यील कवा**

मोठे सुंदर दृष्टान्त देऊन आईवडिलांना आपल्या दुखण्याची बातमी कशी कळली याची चित्तवेधक हकिगत या गीतांनी दिलेली आहे. अंगणातील चाफ्याच्या व जाईच्या कळ्या भराभर पडल्यामुळे ही बातमी आईवडिलांना समजली, ही कल्पना खरोखरच मोठ्या कवीलादेखील वेड लावणारी आहे!

सासुरवाशिणीने इथे आपल्या दुखण्याचा उल्लेख केला असून आपणाला बरे करायला साखळी सुटलेल्या वाघासारखे भाऊ धावून आल्याचे अभिमानाने सांगितले आहे. त्याचप्रमाणे आई हरिणीसारखी पळत आल्याचे सांगून तिने दूर गावी असलेल्या आत्याला बोलावून घ्या म्हणून पत्र लिहायलाही सुचविले आहे.

पूर्वीच्या काळी लांबच्या गावाला दुसरा मुलूख अगर देश मानीत! इथे 'देश' हा शब्द त्याच अर्थाने आलेला आहे.

आपले केस धरणीवर लोळल्यामुळे सौभाग्याला धक्का पोचू नये या अपेक्षेने सासुरवाशीण इथे आईला मांडीवर डोके घे म्हणते आहे. जुन्या काळी सुहासिनीबाई केस मोकळे सोडीत नसे, या समजुतीचा हा आविष्कार असावा.

| | |
|---|---|
| **जिवाला माज्या जड** | **माज्या जिवाचं धनी कोन** |
| **सावळ्या बंधुराजा** | **शान्या शाईरा म्नी जान** |
| **जिवाला माज्या जड** | **कसं कळालं चावडीत** |
| **हावशा माजं कांत** | **कडू लागलं पानात** |
| **जिवाला माज्या जड** | **गरड लिंबाला घाली मिठी** |
| **हावशा माजं कांत** | **इष्ट मैतर झाले कष्टी** |

या गीतांनी सासुरवाशिणीच्या नवऱ्याचे चित्र रंगविले आहे. तो आपल्या जिवाचा धनी आहे आणि चावडीवर पान खात बसला असता त्याला ही बातमी समजली, असे सासुरवाशीण इथे बोलून दाखवीत आहे. जुन्या काळी इतर मंडळींच्या समोर नवराबायकोंनी न बोलण्याची चाल होती ती या उल्लेखावरून लक्षात येते. त्याचप्रमाणे खेडूत मंडळी सतत पान खाण्यात दंग असतात व पान इतरांना देऊ करण्यात अभिमान बाळगतात त्याचीही कल्पना यावरून येते. बायको आजारी झाल्याचे कळताच नवरा गरडच्या लिंबाला मिठी मारून दुःख शमवीत आहे व त्याचे मित्रमंडळ कष्टी झाले आहे, अशी या गीताने सांगितलेली माहिती काळजाचा ठाव घेणारी आहे!

| | |
|---|---|
| **सासू सुनांचं भांडान** | **ल्योक ऐकतो ग दारी** |
| **तू उगीच बस नारी** | **म्हातारीला तोंड भारी** |
| **सासू सुनांचं भांडान** | **ल्योक की ग दारी उभा** |
| **अस्तुरीला देतो मुभा** | **कर म्हातारीचा भुगा** |
| **सासू अत्याबाई** | **काम करू करू मेल्या** |
| **आमच्या राज्यामंदी** | **गिरन्या बाई आल्या** |
| **भरताराच्या राजी** | **काचंचा ग बंगला** |
| **पुतराच्या राजी** | **वारा धुंधूक लागला** |

सासूसुनांच्या मध्ये होणारी कुरबूर आणि त्यामुळे सासू, सून व नवरा यांनी व्यक्त केलेले विचार या ओव्यांनी गुंफिलेले आहेत. हा मोठा गमतीदार भावनाविष्कार आहे. एवीतेवी म्हातारीला फार तोंड सुटलेच आहे तेव्हा तू ऐकले न ऐकले करून शांत रहा किंवा बोलून बोलून तिला हैराण कर असा इशारा इथे नवरा बायकोला देत आहे! आणि ते ऐकून बायको सासूला सांगते आहे की, आमच्या राज्यात आता गिरण्या झाल्या आहेत, तेव्हा उठता बसता तुमच्या कामाचे कौतुक नको आहे! पण सुनेचे हे उलट बोलणे ऐकून सासू मनातल्या मनात चडफडते आहे की, नवऱ्याच्या ह्यातीत मी सुरक्षित होते, पण मुलाच्या राज्यात माझी धडगत दिसत नाही!

खेड्यामध्ये आईला 'म्हातारी' असे संबोधण्याची पद्धत आहे.

**गुज बोलायाला**
**माजे तू भैनाबाई**
**गुज बोलायाला**
**चांद माळीच्या गेला आड**
**दिव्याला भरायानं**
**वडील बहिनी**
**देऊनी घेऊनी**
**वडील बहिनी**

**दार माळीचं ढकलावं**
**मग हुरदं उकलावं**
**बाई तुळशीचं झाड**
**मायलेकींचं गुज गोड**
**घाला दिव्याला जोड वाती**
**गुज बोलूया साऱ्या राती**
**न्हाई पुरत डोंगर**
**तुज्या बोलाचा आधार**

इथे माहेरी आलेल्या सासुरवाशिणीला आईशी आणि मोठ्या बहिणीशी किती बोलावे नि किती नको असे झाले आहे! त्यासाठी ती दार बंद करून माजघरात किंवा तुळशीच्या कट्ट्यावर बसावे असे सुचवीत आहे. हेतू एवढाच की, इतर कोणी ते बोलणे ऐकू नये. हे बोलणे रात्रभर चालणार आहे व त्यातून इतर काही मिळाले नाही, तरी विश्वासाच्या माणसाजवळ मन मोकळे करून मिळणारे समाधान पदरी येणार आहे. त्यामुळे हाच काय तो जीवनाचा आधार होणार अशी काळजाचा ठाव घेऊन सोडणारी भावना इथे चित्रित झालेली आहे.

शाकुंतल नाटकाचा चौथा अंक डोळ्यांना पाणी आणतो, म्हणून महाकवि कालिदासाचे कौतुक करणारी मंडळी हा सासुरवास ऐकताना अक्षरशः रडू लागतील, एवढे प्रचंड सामर्थ्य या गीतांच्या अंगी आहे!

## गडयीन (मैत्रीण)

जिवाभावाची गोष्ट करायला बरोबरीचे, शिणजोडीचे माणूस या दृष्टीने माणसाच्या आयुष्यामध्ये मित्राला अगर मैत्रिणीला फार मानाचे स्थान आहे. कोणत्याही विषयावर निःशंकपणे विचारविनिमय करावयाचा झाला, तर त्यासाठी स्नेह्याची माणसाला फार आवश्यकता असते. जे घरच्या माणसांजवळ मोकळ्या मनाने बोलता येत नाही, ते अशा मित्राजवळ माणूस बोलू शकतो. लोकगीतांमध्येही या मैत्रीच्या जिव्हाळ्याचा आविष्कार झालेला आहे. विशेषतः आमच्या खेडूत भगिनींनी मैत्रिणीला गडन किंवा गडयीन म्हटले असून तिचे व आपले नाते मोठे खुलवून सांगितलेले आहे.

**गडन मी ग केली इंद्रसभेची पद्मीन**
**तुळशी दिल्यात्या जामीन**
**तुज्या ग जिवासाठी जीव माजा त्यो भिरीभिरी**
**एक ईळाची घाल फेरी**

इंद्रसभेची पद्मीन म्हणून एकजण आपल्या मैत्रिणीचा इथे गौरव करीत आहे! आणि ती पद्मीन मिळविण्यासाठी तुळशीसारखी पवित्र वस्तू जामीन दिल्याचे ती सांगते आहे! मैत्रिणीबद्दलची ही भावना मोठी उदात्त तशीच कल्पनारम्यही आहे. अशी ही मैत्रीण दररोज एकदा तरी भेटावी म्हणून जीव खुळाभैरा झाला असल्याची इथे आलेली हकिगत विशेष जिव्हाळा दर्शविते.

**गडन म्या बी केली बोल लोकांत नसावा**
**लोभ अंतरी असावा**
**गडन म्या बी केली गाव राहिलं बारा कोस**
**लोभ कशाला लावलास**
**गडनी गुज बोलू तुज्या गुजाचं मला याड**
**गेली चांदनी सोप्या आड**

चांदणी सोप्याआड होईपर्यंत गुजगोष्टी करावयाचे वेड लागले असताना, दूरच्या गावी गेलेल्या मैत्रिणीचा विरह सहन होत नसल्याची माहिती इथे आली

आहे. त्याचप्रमाणे अंतःकरणामध्ये लोभ असणे अगत्याचे आहे, मग चार लोकांत त्याची वाच्यता होण्याची गरज नाही, याही महत्त्वाच्या कल्पनेचा इथे सुंदर आविष्कार झालेला आहे.

**गडन म्या बी केली सये चांबाबीराची चिमा**
**बंदुच्या बुटावरी राघूमैना घाली झिम्मा**
**गडन म्या बी केली न्हवं आपल्या जातीयेची**
**जिवाला माज्या जड आली मध्यान रातीयेची**
**गडन म्या बी केली हाती निन्यायाचा घोळ**
**माजी ती गडयीन आली वाडचाला चंद्रावळ**
**वाटंवैला वड त्येला पारंब्या ठाईठाई**
**माजे तू गडयीनी येल इस्तार तुजा लई**

स्नेहाला जातीगोतीचे बंधन असू शकत नाही, अशी माहिती या गीतांनी अभिमानाने सांगितली आहे. भावाच्या बुटावरील (इथे पायांतील कोणत्याही पादत्राणाचा उल्लेख करतात.) नक्षीकाम बघून चांभाराची चिमा ही मैत्रीण असल्याचे सांगितले आहे. त्याचबरोबर ती आपल्या जातीची नसली तरी मध्यान्ह रात्रीलाही वेळप्रसंगी उपयोगी पडत असल्याचे म्हटले आहे! अशा मैत्रिणीच्या सौंदर्याचा उल्लेख 'चंद्रावळ' या शब्दाने केला असून तिचा थाट निन्यांच्या घोळावरून व्यक्त केलेला आहे. म्हणजे नऊवारी भरपूर लांबरुंद लुगडे ती नेसली होती असे यावरून दिसते. वडाला ज्याप्रमाणे पारंब्या त्याप्रमाणे मैत्रीचा वेलविस्तार मोठा असल्याची या गीतांनी व्यक्त केलेली कल्पना मोठी अभिनव आहे.

**तुजा माजा भावपना जना जायीरी नसावा**
**माजे तू गडयीनी बोल हुरदी नटावा**
**तुजा माजा भावपना घडी जाईना परायाची**
**माजे तू गडयीनी कडी उघड दारायाची**
**तुजा माझा भावपना कुनी कालीवोलं राळं**
**माजे तू गडयीनी नगं मनात आनू काळं**

आपले प्रेम मनातच असू दे आणि कुणी काही म्हटले (मनात राळे कालविले) तरी ते लक्षात न घेता आपण सुखाने नांदूया, अशी प्रेमळ विनंती करून या

गीताने घटकाभरही तुझ्याखेरीज करमत नसल्याने तू दार उघडून मला जवळ घे, अशी सूचना एका मैत्रिणीने आपल्या सखीला केली असल्याचे सांगितले आहे. ही मैत्रीण जणू रुसली असावी आणि म्हणून तिची समजूत घालण्याचा हा प्रयत्न केला गेला असावा!

**सुक सांगताना दुक माजं ग उचमळं**
**माजे तू गडयीनी नको पान्यानं भरू डोळं**
**गडन म्या बी केली मी ग तिला काय देऊ**
**माजे तू गडयीनी एक लवंग दोगी खाऊ**

आपल्या सुखदु:खाच्या गोष्टी ऐकून तू एवढी भावनावश होऊ नकोस म्हणून एक सखी इथे दुसरीला विनवीत आहे. दोघींच्या भावना जणू एकजीव झाल्याचीच ही प्रेमळ निशाणी होय. एकमेकींना देण्याजोगे जवळ काही नसले, तरी जे मिळेल ते दोघी खाऊया, अशी कल्पना लवंगेच्या निमित्ताने इथे व्यक्त झाली आहे. म्हणजे देण्याघेण्यापेक्षा प्रेमळ शब्दाला किती महत्त्व आहे, ते इथे मोठ्या युक्तीने सांगितलेले आहे.

**सारविल्या भिंतीवर सये चित्तार काडू किती**
**लाडक्या गडनीला तिला पत्तार धाडू किती**

मैत्रिणींच्यामधील निष्काम जिव्हाळ्याच्या प्रेमाने नटलेली ही ओवी जगापुढे एक फारच सुंदर कल्पना ठेवीत आहे.

घरची भिंत सारविली असता निर्माण होणारी रेखाकृती म्हणजेच जणू अक्षरावलींनी नटलेले पत्र ही इथे प्रकट झालेली भावना मोठी हृदयस्पर्शी तशीच कल्पनारम्यही आहे! एकीने भिंत सारविली असताना त्या घटकेला तिच्या मनात येणारे भाव दुसरीही भिंत सारवीत असता शेकडो मैलांचे अंतर तोडून एका क्षणात तिच्याजवळ जाऊ शकतात, अशी जिव्हाळ्याने रंगविलेली ही एक अद्भुतरम्य कल्पना आहे.

स्नेहाच्या बंधनांनी जखडलेल्या अशा कितीक भावना आणखी अन्य प्रकारांनी लोकगीतांनी बोलून दाखविल्या असतील देव जाणे!

परंतु मला गवसलेल्या या सुंदर गीतांनी खऱ्या मित्रप्रेमाचा महिमा गायिलेला आहे आणि तो सहज सुंदरही झाला आहे.

जुन्या काळी मैत्रीला जातीचे बंधन आडवे येत नसे, अशा या गीतांनी सांगितलेल्या एका अपूर्वाईच्या माहितीने नागपंचमीच्या 'चल ग सये वारुळाला' या गीतातही पुनरुच्चार केला असून आजच्या घडीला त्याचे महत्त्व विशेष असे आहे.

## शेजी

शेजारीण म्हणजे बहुधा दुखल्याखुपल्यावर मायेने फुंकर घालणारी जिवलग मैत्रीण. भल्याबुऱ्या बोलाची पारख करून प्रेमाने चार समजुतीच्या गोष्टी सांगणारी जिवाभावाची सोबतीण; घरकामात वेळ पडली तर मनापासून हात देणारी हक्काची सखी; किंवा घरात काही आहे नव्हे हे बघून वेळ प्रसंगी पुरवठा करणारी प्रेमळ पाठीराखीण असते. त्यामुळे बायकांना तिची विशेष आवड. एवढेच नव्हे तर,

**अंतबीरीचं गुज माज्या हुरदी झाली गोनी**
**मायेची शेजी बाई माप घेनार झाली रानी**

तिच्याबद्दलची ही विलक्षण भावना त्यांचे मन संभाळून रहाते. मनात आले याचा उलगडा करायची जणू शेजी म्हणजे एकमेव जागा! काळजातील विचारांच्या गोण्यांचे माप घेणारी जणू ती राणी!

**शेजी तू आईबाई तुजा संबाळ सोनचाफा**
**अवकाळ माजा बाळ सई मोडील त्येचा ढापा**
**शेजीचं एवढं बाई बाळ आलं तसं गेलं**
**माज्या ग राजसानं मन माजं रंजविलं**
**शेजारनी बाई तुजा शेजारी सोयीईचा**
**शीतळ हाय येल मदी ताटवा जाईयीचा**

आपल्या मुलाच्या दृष्टीने शेजारणीपाशी असलेले नाते या गीतामध्ये प्रकट झाले आहे. शेजारणीच्या मुलाला सोनचाफ्याची दिलेली ही उपमा आकर्षक आहे. आपले बाळ म्हणजे दोघींच्या मधला जाईचा ताटवा मानावयाचा ही कल्पनाही मोठी सुरेख आहे. लोकाचे बाळ घटकाभर येऊन मन रमविते पण आपले बाळ मात्र सतत मनाला विसावा देते, या सत्यकथेचाही इथे आवर्जून उल्लेख आलेला आहे.

बंधुजी पावईना — शेजी म्हनीती आला आला
चंद्र वाडयात उगवला
बंधुजी पावईना — शेजीबाईला पडलं कोडं
देते मी ग दूध पेडं
बंधुजी पावईना — जीव माजा धगाधगा
शिंगी जबर नवा जागा

आपला भाऊ घरी आल्यामुळे शेजारणीत व आपल्यात काय वातचीत झाली, त्याची माहिती इथे आलेली आहे.

माझा भाऊ म्हणजे वाडयात उगवलेला चंद्र आहे. तेव्हा तो आला म्हणून शेजीला कोडे पडले तरी मी दूधपेढे त्याला खाऊ घालीन हा बहिणीला इथे वाटणारा अभिमान आपुलकीचा आणि जिव्हाळयाचा आहे. त्याचबरोबर नवी तरणी घोडी घेऊन भाऊ घरी आल्याने काय प्रसंग ओढवेल ह्या धास्तीने ती अस्वस्थ झाली आहे ! ही कल्पनाही वस्तुस्थितीला धरून आहे.

उंच उंच चोळया — घरामागली शेजी लेती
माऊली माजी बाई — तिच्या परास चड घेती

शेजारणीच्या चोळया कितीही उंची असल्या तरी तिच्यापेक्षा माझ्या आईने घेतलेली आपली चोळी उंची असल्याचा हा अभिमान ईर्षा दर्शविणारा आहे. तुझ्यापेक्षा माझ्याजवळ जास्त आहे, हे बोलून दाखविण्याच्या स्त्रीसुलभ स्वभावधर्माचा हा एक आकर्षक आविष्कार आहे.

शेजारनी बाई — मला उसनी द्यावी सोजी
बया पावनी आली माजी
शेजारनी बाई — तू ग उसने द्यावे लाडू
बंदु पावना कसा वाडू
शेजारची साळू — घाल उसनी मला डाळ
पाव्हणं भैनीचं आलं बाळ
शेजीचं उसनं — मी ग फेडीते काडी काडी
बयाचं उसनं — माज्या भिनलं हाडोहाडी

शेजीचं उसनं मी ग फेडूनी टाकीलं
बयाचं उसनं न्हाई मनात राहिलं

एकमेकींनी एकमेकींच्याकडून उसने आणून चालती घडी भागवून घेण्याची जी रीत आहे, तिचा इथे उल्लेख आलेला आहे. वेळ पडेल त्याप्रमाणे शेजारीण कशी उपयोगी पडते व तिची परतफेडही कशी होते, त्याचा हा एक सुंदर दाखला असून लग्न झाल्यानंतर आईदेखील मुलीला कशी शेजारीण होते याची कल्पना मोठ्या हिकमतीने या गीतात सूचित झाली आहे.

हावस मला भारी बंदुसकट जेवायाची
आजी माजी गवळण दुरडी येळीती शेवायाची
बारा वर्सं झाली पंढरी केल्याला
अबीराचा वास अजून बंधूच्या शेल्याला
आंबारीचा हत्ती साजासकट उबा केला
बापाजी सांगत्याती बाळ अंदान दिला तुला
पाटानं जातं पानी ऊस पिऊनी खपलीला
माय मालन हाक मारी लेकीसंगट नातीयीला
मावळ्याच्या घरी भाची पावनी विलासाची
मामी पुरवी हटाला तिला पत्रावळी चिंचेची
मावळणी आत्याबाई एका म्हातारी दोगी जाऊ
माझे बापाजी तुमचे भाऊ

आपल्या माहेरच्या प्रेमळ माणसांची हकिगत इथे वायका शेजारणीच्या कानावर घालीत असताना आपली बाजू अधिक महत्त्वाची कशी आहे ते पटवून देत आहेत. माहेरचे हे राजविलासी वैभव अशा वेळी शेजीच्या मनाला खुपते आणि मग तिच्या नशिबी तसे नसल्याने ती नाराज झाली म्हणजे उगाचच अबोला धरते.

सया मी जोडील्या बाई वाटेनं जाता जाता
शेजी माजीला किती सांगू सोड अबूला बोल आता
धनसंपत्तीची नार लाडू बुंदीचं लागं कडू
गेली संपत्ता निगूनी मग अंबाडी लागं ग्वाडू

शेजीच्या घरी गेले ती बोलली उशीरानी
माजे तू गडयीनी न्हाई जायाची दुसऱ्यांनी
शेजारनी बाई एका दिलानं दोगी वागू
अंगनात खेळे तुझी मैना माझा राघू
शेजारनी बाई संबाळ तुजं ग वाळवन
आचपळ माजं बाळ माती करील मिळवन

शेजारणीने दुसऱ्याच्या सांगण्यावर भरवसा ठेवून कारण नसताना उगाचच अबोला धरला तर एकमेकींत समजुतीची बोलणी कशी चालतात, ते इथे चित्रित झालेले आहे. या गीतात आलेली श्रीमंत बाईची विलासी राहणी आणि गरिबीतील आयुष्य यामध्ये दाखविलेला फरक लक्षात घेण्याजोगा आहे. तसेच दोघींत पुन्हा एकदिलाने झालेली भाषाही वाखाणण्याजोगी आहे.

पारध्या माज्या बंदू तुजी पारध कुनीकडं
हरणीचं बाळ गेलं बाईच्या गावाकडं
पारध्या माझ्या बंदू तुजी पारध यवरथी (व्यर्थ)
हरणीची बाळं तुला बग दुवा देती
हरणीचं पाडस नको मारूस माज्या दिला
माज्या गळ्याची आन तुला
मोटं नि मोटं डोळं हरन्या बायानू भिऊ नका
माजा वाटेनं जातो सका

आपल्या घरच्या शिकारी कारभाऱ्याची आणि भावाची बोलता बोलता गोष्ट निघाली म्हणजे शेजीजवळ एखादी बाई अशी गुजगोष्टी करीत असते. हरणाबद्दल मुळातच सर्वांना प्रेम. तशात बायकांना हरिणीबाईच्या पाडसाची विशेष काळजी. यामुळे घरधन्याच्या व भावाच्या हातून हरिणाची शिकार घडू नये यासाठी त्यांच्या जिवाची होणारी घालमेल इथे जिव्हाळ्याने बोलून दाखविण्यात आलेली आहे.

शेवग्याच्या शेंगा अंतराळी लोंबत्यात्या
उंच उंच चोळ्या माज्या दंडाला सोबत्यात्या

**चाटचाच्या दुकायीनी उबी पाराला धरुयीनी**
**ताईता बंदुजीला घडी दावीते हेरुयीनी**
**भाऊबीजेच्या दिवशी काय भावानं करनी केली**
**सावळ्या राजसानं चंद्रहाराला सोबा दिली**

आपल्याला काय शोभून दिसते आणि त्याप्रमाणे आपला भाऊ भाऊबीजेच्या निमित्ताने आपली हौस कशी भागवितो याची कल्पना इथे शेजारणी एकमेकींना देत आहेत. या गीतात भारी किंमतीच्या चोळीमुळे किंवा उंची खणाच्या चोळीमुळे शेवग्याच्या शेंगेसारखे दंड शोभतात, अशी व्यक्त केली गेलेली कल्पना उपमा अलंकाराच्या दृष्टीने वाखाणण्याजोगी आहे.

**झाल्या तिनीसांजा दिव्याची वात सारा**
**लक्ष्मी आई आली मोत्या पवळ्यांनी वटी भरा**
**झाल्या तिनीसांजा दिवा लावीते लगेवरी**
**उजेड पडतो गाई म्हशींच्या पागेवरी**

तिन्हीसांज झाली आहे तेव्हा गोठ्यातील जनावरांच्यावर उजेड पडेल या बेताने मधल्या तुळईवर दिवा लावण्याची आणि लक्ष्मीआई बत्तीच्या रूपाने घरी आल्याकारणाने तिची मोत्यापोवळ्याने ओटी भरण्याची इथे केलेली घाई मोठी चित्ताकर्षक, तशीच जुनी चालरीत दर्शविणारी आहे. शेजारणी शेजारणी अशा चालीरीती एकमेकींना नेहमी शिकवीत असल्याचे खेडोपाडी दिसून येते.

**तू आपलं बाळ शेजी दे ग मांडीवरी**
**गुज बोलू खिनबरी**

एकमेकींचे तान्हे बाळ एकमेकींच्या मांडीवर घेऊन घटकाभर मोकळ्या मनाने गप्पागोष्टी करूया, अशी इच्छा इथे शेजारणींनी एकमेकींच्याजवळ व्यक्त केलेली आहे.

**ये ग ये ग तू गाई चरूनी भरूनी**
**बाळाला ग माझ्या दूध देई**
**ये ग ये ग तू गाई खा ग तू कणसं**
**बाळाला नीरसं दूध देई**

**नीज नीज बाळा म्हणू किती तुला**
**गुलाबाच्या फुला राजसा**
**नीजसर आले बाळा तुझे डोळे**
**अंथरुण केले पाळण्यात**

एकमेकींशी बोलताना मुले जर शांत राहिली नाहीत तर त्यांना शांत करण्यासाठी अशा प्रकारची अंगाई गात, शेजी आपल्या बोलण्यामध्ये येणारा अडथळा दूर करावयाचा कसोशीने प्रयत्न करीत असते. अशा वेळी आपल्या बाळाचे कौतुक तिच्या ओठांवर मोठ्या आवडीने खेळत असते. आणि मग कधीकधी तर शेजीच्या बाळावरसुद्धा एखादीचा स्वतःच्या बाळाप्रमाणे लोभ जडतो!

**लेन्यामंदी लेनं बाई लच्च्याचं झालं घाळ**
**चाल निगाली बोरमाळ**

जुने दागिने मागे पडून नवीन पुढे येत गेले म्हणजे ते स्वतःला घडवून घेण्यासाठी बायका नेहमीच धडपडत असतात. इथे काचेच्या रंगीत मण्यांची माळ (लच्च्या) मागे पडून सोन्याची बोरमाळ घालण्याची पद्धत निघाल्याची बातमी एक बाई आपल्या शेजीला देत आहे.

**पावना आला म्हनू नंदकामिनीचा पती**
**सोप्या समया लावू किती**
**पावना आला म्हनू सासू मालनीचा भाऊ**
**नंदकामिनी दिवा लावू**

घरामधील दिव्यांचा उजेड वाढलेला दिसला अगर दिव्यांची संख्या वाढलेली दिसली, म्हणजे त्या घरात कुणी तरी पाहुणा आला असला पाहिजे अशी खूणगाठ बायका बांधतात. शेजीने तसा प्रश्न केल्यावर मानाच्या पाहुण्याच्या आगमनामुळे तिला दिलेले हे उत्तर आहे.

**हावस मला मोठी बाई लुगडं भरजरी**
**नातू घेतला कडेवरी**

आपल्या मुलाबाळांना मुले झाल्यानंतर आजी म्हणून स्वतःला होणारा आनंद या गीताने शेजीच्या कानावर घातलेला आहे.

**शेजी घाली जेवू जना लोकांला दावूनी**
**बया वाडी जेवू दोनी कवाडं लावूनी**
**शेजी घाली न्हाऊ न्हाई भिजला माजा माथा**
**बया घाली न्हाऊ भरला रांजण केला रिता**

शेजीचा उपयोग आईप्रमाणे हरघडी होत असला, तरी आईची गोष्ट किती निराळी असते, याची माहिती देणारा हा एक उत्तम दाखला आहे. ही तुलना दाखविण्यासाठी या गीतात आलेली उदाहरणे इथे अगदी यथायोग्य आहेत.

**आगीन गाडीला लई लोकांड आटलं**
**जिला न्हाई लेक तिला नवाल वाटलं**
**मोटार गाडीचं बसनं घाई घाई**
**शाऊबाई सईचं बोलनं झालं न्हाई**

जुन्या काळची वाहने मागे सरून सुधारलेल्या नव्या जगात आलेल्या मोटार आणि आगगाडी या वाहनांची सामान्य मनाने केलेली ही पारख आहे. बदलत्या काळाप्रमाणे लोकगीतांची भावगंगा अखंड वहाती रहाते. त्या दृष्टीने ही गीते जरूर पहाण्यासारखी आहेत. त्याचप्रमाणे मुलगी सासरी जाताना या नव्या वाहनांच्यामुळे झालेली ही धांदलदेखील लक्षात घेण्याजोगी आहे. खेड्यातील बायका पूर्वी बैलगाडी अगर घोडा नजरेच्या आड होईपर्यंत वराच वेळ मुलीला निरोप देत उभ्या रहात असत. ती सोय या वाहनांनी नाहीशी झाल्याबद्दलची ही जणू आपुलकीची तक्रार आहे !

**गावाला जाती शेजी बाई नदीच्या निवाऱ्यानं**
**शालू भिजला दैवाऱ्यानं**

भल्या पहाटेची उठून आणि नवा शालू नेसून गावाला जाणाऱ्या शेजीची वाटचाल या गीतात आलेली आहे. नदीच्या किनाऱ्याने ती चालत गेल्याने दहिवराने तिचा शालू भिजल्याची माहिती इथे आली असून पूर्वी दळणवळणाच्या साधनांच्या अभावी परगावी पायी जावे लागत असे, हेही यावरून दिसून येते !

शेजारणीशेजारणींच्यामध्ये कधीमधी या ना त्या कारणावरून भांडणे निघतात. तर अशा वेळी मैत्रीचा भाव बाजूला सरतो आणि शत्रुत्वाच्या कल्पनेचे राज्य येते. त्यामुळे कोण कधी काय बोलेल याचा नेम नसतो.

**नार भांडान भांडते भुईचा भुईफोड**
**अंगावर आली बाई खिल्लारी कालवड**
**भांडत भांडत आली येसवा दारात**
**माय भैन मला बोले गर्ती फिरावं घरात**
**माझ्या ग अंगणात काळी कोंबडी पंख झाडी**
**घरच्या चुडयावरी शेजी नार ताल तोडी**
**काय पुसशील माजी जात शेजीबाई तू ऐक**
**हाई वाघाची भाची हाई रावणाची लेक**
**नवऱ्याचे नारी तुझा नखरा तुझ्या घरी**
**वासाची कोथमीर वास बागेच्या भाईरी**
**शेजी नारी काय बोलतीस पानचट**
**हात माजा नीट बाप माजा बळकट**
**दिल्या घेतल्यानं पाणी पुरेना नदीचं**
**शेजी तू मायभैनी कर बोलणं सुईचं**

अशा बोलण्याने मग रागलोभ उसळ्या मारून येतात. उणे पुरे निघते. जन्माचे हाडवैर उभे रहाते. त्यामुळे भांडणाला रंग चढून सारे गाव गोळा होते. मग कोणी तरी समजुतीच्या गोष्टी सांगू लागते. अनुभवाचे दाखले देऊ लागते. त्यामुळे आपल्या शक्तीची पारख करताना घरच्या, माहेरच्या, पाठिंब्याची बोलणी रुवावात निघतात. भांडण मिटवायचा प्रयत्न या परीने होतो. समजूत निघते. मध्यस्थीचा उपयोग होतो.

**गांधीया म्हाराजांचा नऊ खंडांत झाला डंका**
**नेली लुटून भाव लंका**
**गांधी या म्हनू गांधी कसला न्हाई तो पाहिला**
**झेंडा तिरंगी लावीला**

अगदी अलीकडच्या काळात गांधीजींचा खून झाल्यानंतर सामान्य स्त्रियांनी आपल्या राष्ट्रपित्याला वाहिलेली ही श्रद्धांजली आहे. एवढ्या मोठ्या माणसाची शेजीजवळ होणारी ही भोळ्या मनाची गुजगोष्ट आहे. देशाच्या स्वराज्य-प्राप्तीसाठी गांधीजींनी तिरंगी निशाण उभारले आणि नऊ खंडांत म्हणजे जगभर बोलबाला होईल अशी भावलंका लुटून नेली, ही इथे आलेली कल्पना विशेष हृदयस्पर्शी आहे. काळ बदलेल त्याप्रमाणे लोकगीतांचे विषयही कसे बदलत जातात, हे या गीतांच्या उदाहरणाने पहाण्यासारखे आहे.

**घर माझं निर्मळ ढगावाचून आभाळ**

जीवनातील हरेक बाबतीत शेजीशी होणारी बोलणी अखेरीस स्वतःच्या घरावर येऊन ठेपतात! माझं घर निरभ्र आकाशाप्रमाणे आहे असे सांगणाऱ्या सामान्य मनाच्या या कल्पनाशक्तीचे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे.

शेजीबद्दलचे गीत आयुष्यातील जणू प्रत्येक भावनेने असे नटलेले असते. स्थलकालाचे आणि विषयाचे त्यास बंधन म्हणून नाहीच!

## शेतवाडी

खेडोपाडीच्या बहुतेक सर्व लोकांचा उदरनिर्वाह शेतीवर चालत असतो. त्यामुळे शेती करणाऱ्या कुटुंबातील सर्व माणसे शेताला एखाद्या देवाप्रमाणे मानून त्याची उगानिगा करीत असतात. उभे जीवनच शेत पिकवून मिळेल त्यावर भागवावयाचे असल्याने, रात्रंदिवस त्यांच्या मनात शेताचाच विचार प्रामुख्याने घोळत असल्यास नवल नाही.

ह्या शेतकरी मंडळींचे मुख्यतः दोन प्रकार आहेत. एक स्वतःची शेती असून ती घरी कसणाऱ्या मंडळींचा आणि दुसरा म्हणजे लोकांच्या शेतावर मजुरी वा रोजगार करणाऱ्या मंडळींचा. परंतु ह्या दोन्ही प्रकारांतील मंडळी आपल्याला शेतकरी म्हणूनच अभिमानाने संबोधितात.

**शिवंच्या शेतामंदी उच्च मांडव कुनायाचा**
**नटव्या बंदुजीनं बैल बांधीला पाचशाचा**

शेतीसाठी जिवापाड मेहनत देणाऱ्या बैलांच्याबद्दल शेतकऱ्यांच्या मनात विलक्षण हौस नांदत असते. स्वतःच्या मुलाप्रमाणे त्याचा लळा बैलांना

लागलेला असतो. बैलाला सोडून शेतकरी कधीही जेवत नाही! एवढेच नव्हे तर स्वतः जेवणापूर्वी बैलाचे वैरणपाणी तो अगोदर पहातो आणि मग स्वतः जेवतो. तेव्हा अशा हौशी मालकाने बैलांचे कसे कौतुक केले व स्वतःची हौस कशी भागवून घेतली त्याची माहिती ही गीते देत आहेत.

बैलांना हौसेने दूध पाजणे, त्यांच्या अंगावर शेला घालणे, त्याने केलेल्या कामाचा अभिमानाने उल्लेख करणे, त्यांना चांगल्या नावाने हाक मारणे, त्यांच्यासाठी मांडव घालणे, त्याचा आवाज (डरकाळी) ऐकून आनंदित होणे इत्यादी प्रकारची हौस इथे मोठ्या सुंदर रीतीने प्रकट झालेली आहे. शेतकऱ्याला होणारा हा आनंद दृष्ट लागण्याजोगा आहे!

**दुरून वळकीती तुज्या गाडीची चक्कयीरं**
**बैल न्हवं ती पाकयीरं**
**दुरून वळकीतो तुज्या गाडीची धुम्मायीळ**
**बैल गाडीची संबायीळ**
**दुरून वळकीती तुज्या बैलाची मी जोडी**
**तट्टचा गाडीला नागमोडी**
**दुरून वळकीती तुज्या गाडीची काळी खोंडं**
**त्येला लावीली सरकी पेंड**
**दुरून वळकीतो तुज्या गाडीची खडाखड**
**फुल्या पालक नावं दंडं**

लांबून धावत येणाऱ्या बैलांच्या चाहुलीवरून ती कुणाची आहेत आणि त्यांचे अंगी कोणते गुण आहेत, याची पारख करणारी बहीण इथे भावाशी हितगूज करते आहे. पाखराप्रमाणे विलक्षण वेगात धावणारे बैल बघून इथे बहीण भावाला इशारा देत त्यांना सांभाळ म्हणते आहे. हेतू एवढाच की, बैल कदाचित असेच उधळतील आणि आटोक्यात न आले तर भावाला इजा होईल, अपघात होईल, तेव्हा तो टळावा!

या गीतामध्ये सरकी व पेंड खाणाऱ्या बैलांच्या काळ्या रंगावरून गाडीच्या नागमोडी तट्टयावरून आणि फुल्या व पालक या नावांच्या पुकारावरून

भावाचीच गाडी येत असल्याची खूणगाठ बहीण मनामध्ये बांधीत असल्याची मोठी चित्तवेधक हकिगत आली आहे.

सामान्य स्त्रीमनाने केलेले हे रोजच्या जीवनातील अचूक अंदाज सुशिक्षित मनालाही हेवा वाटावा असेच आहेत.

**मारक्या बैलाला ग बाई भेतंया सारं गाव**
**धन्या लाडक्या दावं लाव**
**मारक्या बैलाला ग चाळ साकळच्या काळं कंडं**
**चेंडू चिताऱ्या नाव दंडं**
**मारक्या बैलानं ग बाई शिवारी केला दंगा**
**धनी गावाला गेला सांगा**

एखादा शेतकरी बैलांची पारख करण्यात एवढा हुशारी मानतो की, मारका बैल देखणा असतो म्हणूनच त्याला खरेदी करून दावणीची शोभा वाढवावयाची! वास्तविक बैल मारका असला म्हणजे फार पंचाईत होते. खुद्द धन्याचीच तो केव्हा आतडी बाहेर काढील याचा नेम नसतो! तरी पण न भिता अशा बैलाचा धनी होण्याचा त्याचा अभिमान मोठा आगळा असतो! अशाच एका धन्याची व त्याच्या हौसेची माहिती या गीतांनी सांगितली आहे.

साऱ्या गावाला भीती वाटणारा बैल तुला वश झालेला असला, तरी त्याला दावे लावून आवरण्याचा इशारा इथे देण्यात आलेला आहे. त्याचप्रमाणे काळी कंडं (दावी), चाळ आणि साखळ्यांनी नटवलेल्या बैलांच्या चेंडू व चिताऱ्या या नावांचेही इथे कौतुक केलेले आहे.

बैल कितीही मारका असला तरी सहवासाने तो धन्याचा लाडका होतो. तो म्हणेल ते तो ऐकतो. पण त्याच्या अपरोक्ष मात्र कुणाचीही मात्रा त्याच्याजवळ चालत नाही! या गीताने अशाच एका प्रसंगाचे वर्णन केले आहे. शेतामध्ये धुमाकूळ घातलेल्या बैलाला आवरायला कुणी इथे नाही. त्याचा धनी गावाला गेला आहे. तेव्हा त्याच्या वाटेला कुणी जाऊ नये, असा इशारा या ठिकाणी दिलेला असून त्याचा आविष्कारही चटकदार झालेला आहे.

**ज्येष्ठ ग महिन्यात ईज झालीया कावयीरी**
**बंदु राजाच्या हातात कुरी झालीया नवयीरी**

ज्येष्ठातील पाऊस सुरू झाला आणि पेरणीला योग्य एवढी जमिनीला घात आली, म्हणजे मग खरिपाच्या पिकांची पेरणी सुरू होते. आभाळात वीज कावरीबावरी होऊन नंगानाच करीत आहे. अशा वेळी कुरी (पाभर) भावाच्या हातात नवरी होऊन उभी असल्याचा हा मनोहर देखावा आहे. सामान्य स्त्रीच्या कल्पनेचा हा चित्तवेधक विलास विचारी मनाला भुरळ पाडणारा आहे.

**वळवाचा पाऊस ग फळी धरूनी उठयीला**
**ताइता बंदु राजा बाळ कुनब्याचा नटयीला**
**वळवाच्या पावसाचं बाई झाल्याची आगार**
**बाळराजाच्या शेतामंदी सोडी पान्याचं सागर**
**वळवाच्या पावसाचं पाणी अंगनी साठलं**
**कुरी धराया उठलं बाळ कुनब्याचं नटलं**

वळवाच्या पावसाचे हे वर्णन आहे. आभाळात चिक्कार ढग जमा झाले असून आता आपल्या बाळाच्या शेतात पाण्याचा सागर निर्माण करू देत, अशी भोळ्या भावड्या आईने व्यक्त केलेली ही इच्छा आहे. यावेळी ती आणखी म्हणते आहे की, अंगणात वळवाचा पाऊस आल्याने पेरणीसाठी जायला म्हणून आनंदाने माझा शेतकऱ्याचा बाळ उठला आहे व त्याने हातात कुरी घेतली आहे.

शेतकरी आईने आपल्या परीने केलेले हे पावसाचे आणि आपल्या मुलाचे वर्णन मोठे आकर्षक झाले आहे.

**शेताला गेली कुरी आडवी लागली माजी निरी**
**ताईता बंदू माज्या तुमची पिकू द्या शेतसरी**
**शेताला गेली कुरी ताशी लावूनी उबी केली**
**लाडक्या बाळायांनी बैलबाबांला हाक दिली**
**शेताला गेली कुरी बैलाला म्हनी बाबा**
**नटव्या बंदुजीच्या पैल्या तासाला देव उबा**

**शेताला गेली कुरी शेत काजबीळाची वडी**
**माज्या ग बाळायाची बारा बैलांची हाई जोडी**
**शेताला गेली कुरी बी नेलंया उडीदाचं**
**माजा ग बाळराज पेरं पेरीतो मिरगाचं**

मृग नक्षत्रामधील पेरणीचा थाट या गीतांनी चित्रित केलेला आहे. सुरुवातीला इथे माहेरच्या कुरीला–भावाला–सामोरी येऊन त्यास भरपूर पीकपाणी लाभू दे असा आशीर्वाद देणारी बहीण आलेली आहे. सासरी गेल्यानंतरही माहेरचे भले व्हावे म्हणून धडपडणाऱ्या बहिणीच्या मनाचा हा मंगल आविष्कार आहे!

पेरणी करीत असताना मध्येच जर थांबावे लागले तर त्या थांबण्यास कुरी 'तासाला' उभी केली असे म्हणतात. या गीतामध्ये एक वेळ निमित्ताने व एक वेळ देवाचा साक्षात्कार घडल्याने कुरी उभी राहिल्याचा उल्लेख आलेला आहे. कदाचित अशा वेळी शेतकऱ्यांना बैलामध्येही देवाचे दर्शन घडत असावे व त्या अनुषंगाने या गीताची रचनाही झाली असावी!

या गीतामध्ये शेताला काजळाच्या वडीची उपमा दिलेली आहे! काळ्याशार आणि मऊ शेताबद्दलचा हा अभिमान असून बारा बैलांनी त्याची मशागत होत असल्याचेही इथे सांगितलेले आहे.

पेरणीला जाते वेळी कशाचे बी नेले आणि पेरणी केव्हा झाली याचाही या गीतामध्ये उल्लेख आला असून मृगामधील पेरणीचा हा हंगाम असल्याचे सांगितले आहे.

**शेताला गेली कुरी आडवा आलाया मांग**
**सावळ्या बंदुराजा त्येला हरीचा दे मान**

या गीताने एका फार मोठ्या सामाजिक समजुतीचा उल्लेख केलेला आहे. पेरणीला जात असता वाटेमध्ये जर मांग जातीचा मनुष्य आला तर फार शुभ मानतात. एवढेच नव्हे तर या गीतामध्ये त्याही पलीकडे जाऊन असे म्हटले आहे की, त्या माणसाला देवाप्रमाणे मान द्यावा!

आजच्या काळामध्ये अस्पृश्य जमातीला 'हरिजन' म्हणून जे संबोधण्यात येते त्याचाच हा जुन्या काळचा अवशेष असावा!

**शिवंच्या शेतामंदी उभं राहिलं बापल्याक**
**बंदु हावशा बोलत्यात काय पेरनी झाली झाक**
**शिवंच्या शेतामंदी दिवटचा बायाचं हिल्लायाळ**
**बंदुराजाच्या माज्या हाई मळचात गुरायाळ**
**नागिनी पद्‌मीनी वाट निराळी पुसयीर**
**ताईता बंदुजीला शेती झालाया उशीयीर**
**बैल सरज्या राजा टाकी डिरकी शेतामंदी**
**माजा बाळराजा हाई सावध छपरामंदी**

इथे बापलेकांनी कष्ट घेऊन केलेली पेरणी फार सुंदर झाल्याची खूण म्हणून फोफावून वर आलेल्या पिकात ते दोघे उभे असल्याची माहिती आलेली आहे. शिवाय ते उभे असलेले शेत हे शिवेवरील असून त्याच शेताच्या एका भागात लावलेल्या अनेक दिवटचांच्या उजेडावरून त्या ठिकाणी गुऱ्हाळ असल्याचे लक्षात येते.

शेतातील बैल डरकाळचा फोडीत असलेला बघून इथे त्या शेतकऱ्याची आई बैलांना सांगते आहे की, माझा बाळ छपरामध्ये झोपला असला तरी त्याची झोप सावध आहे.

या गीतामध्ये एक विशेष गोष्ट आली आहे ती अशी की, एक बहीण शेतावरून उशिरा येणारा भाऊ सुखरूप यावा आणि त्याला काही इजा वा दुखापत होऊ नये म्हणून सापांना (नागिणी पद्‌मिनींना) प्रेमाचा इशारा देते आहे! तिचे सापांना व नागांना म्हणणे असे की, त्यांनी भावाची वाट लक्षात घेऊन आपली वाट वेगळी धरावी! याच प्रकारची आणखी एक ओवी अशी सापडते :

**नागिनी पद्मीनी नगं पडूसा वाटंतिटं**
**सावळचा बंधुजोची ऱ्हाई सक्याची चाल नीट**

इथेही भावार्थ तोच आहे. पण बोलण्याची तऱ्हा निराळी आहे, इतकेच काय ते!

**दोन बैल कुरीयीला खोंडं जुपली कुळवाला**
**नटव्या बंदु माजा कुनबी गावात वळकला**

बारा बैलांचा कुनबी बाई मोठा त्यो भेडंदार
माज्या ग बाळायाचा बाई रेशमी पाडसार
बारा बैलांचा नांगूर कुंद्याच्या ग पडीवरी
पिता माज्या दौलताचा बारा म्हईनं घरचा गडी
बारा बैलांचा कुनबी बाई दिसतो येडसारू
लाडके भैनाबाई घरी रेशमी पाडसारू
बारा बैलांचा कुनबी बाई गावात मातला
सोन्याचा फाळ सये नांगरी घातला
बारा बैलांचा कुनबी दिसतू ग मालबळी (बळीराजा)
माज्या ग बाळायाची फास सोन्याची जानवळी
बारा बैलांचा नांगरू त्यात आगल्या हाई शाना
घेतो बिगाचा कडूकोना

बारा बैलांची दावण दारात असलेल्या शेतकऱ्याच्या कामगिरीचे हे वर्णन आहे. दिसायला वेडसर आणि भिडस्त म्हणून अशा शेतकऱ्याचा नावलौकिक असला तरी इथे त्याची कामगिरी औताच्या रेशमी दोऱ्या करण्याएवढी मोठी दाखविलेली आहे. त्याचप्रमाणे त्याने सोन्याचा फाळ नांगराला लावण्याइतपत धनसंपत्ती कमावली असेही इथे आवर्जून सांगितलेले आहे. तथापि या सर्वांला कारण म्हणून शेवटून दुसऱ्या जोडीच्या शिवाळावर बसून नांगर हाकणाऱ्या आगल्याला गौरविला आहे हे विशेष होय! शेतकऱ्याच्या घरचे आणि त्याच्या कर्तबगारीचे हे वैभव मोठे अभिनव तसेच आकर्षकही आहे.

पीकलं पीकपाणी राशी लागल्या वावयीडी
पित्या माज्या दौलताचं कुनी कळवीलं चावयीडी
पीकलं पीकपाणी गाड्या येत्यात्या घुम्मयीत
सावळ्या बंधुजीची बापलेकांची उम्मयीत
गाड्या बी मागं गाड्या बाई आल्यात्या अंगनी
पिता माजा दवलत घेतो पेवाच्या बांधणी
आकाड सरावनी कुनी वावडी लावीयीली
पित्या माज्या दौलतानं जुन्या जुंदळ्या धार दिली

गहू हरबऱ्याच्या गाड्या बाई येशीत थटल्या
सावळ्या बंधुजीनं दंडभुजांनी रेटील्या
वाटंवरली ग हीर चाकं करीती भिरीभिरी
नटवा माझा बंदु मनमोहन मोटंवरी
बारा बैत्यांची तुज्या बाई धाववैनं वाटू
लाडक्या बाळराजा मोटकऱ्याला हुती दिष्टू
मोट नि मोटकरी बंधु पानक्या बोलयीना
लाडके भैनाबाई पाणी जमीनी तोलयीना
जुंदळ्याच्या गाड्या बाई येऊ द्या घराकडं
घरच्या पंडितांची वड त्येची ग पेवाकडं
दैवाच्या माणसा तुजं दैव शेतामंदी
बंधुजीच्या माज्या धनरेख हातामंदी
पिकलं म्हणूनी जन बोलीती येशीमंदी
घरच्या पंडिताचा तिवडा बुडाला राशीमंदी
पिकलं म्हणूनी जन बोलीता राहीना
घरच्या पंडिताचा गल्ला हंबारी माईना
शेतीच्या मावल्या कुनी पुजील्या थंडवानी
सावळ्या बंदुजीची सीमा सांडली जुंदळ्यांनी

सुगीनंतर भरपूर पीकपाणी आलेल्या घरचे हे वर्णन आहे. कष्टाळू माणसांच्या कामाला मिळालेले फळ या गीतांनी मोठ्या हृदयंगम रीतीने चित्रित केलेले आहे.

नवीन आलेले धान्य घेऊन येणाऱ्या गाड्या बापलेकांची उमेद दाखवीत आहेत. मळणीसाठी रोवलेल्या खळ्यामधील खांब (तिवडा) बुडून जाईपर्यंत अगर वावडी ओलांडून जाईल एवढी रास उभी राहील इतके धान्य आले असता, चावडीवर ती बातमी जाते आहे की, अंगणातील धान्याची पोती पेवात ओतली जात आहेत, दंडाचा आधार देऊन पोती उतरली जात आहेत, आलेला पैसा अंबारीतही मावेनासा झाला आहे! म्हणजे धान्य ठेवण्यासाठी भिंतीत केलेली जागाही पैशाला अपुरी होत आहे, अशी सविस्तर माहिती नव्याने आलेल्या पिकाबाबत इथे आली आहे. त्याचप्रमाणे एवढे भरपूर धान्य आले, तेव्हा

शेतीच्या देवीची पूजा एवढी मन लावून कोणी केली असावी, याचा समाधानाने इथे विचार झालेला आहे.

आषाढ आणि श्रावण हे पावसाचे महिने. परंतु या दिवसांतही पाऊस नसे तेव्हा वडील जुने जोंधळे वाढवीत आहे. यावरून असे लक्षात येते की, गेल सालचे धान्य वर्षभर पुरूनही उरेल एवढे भरपूर प्रमाणात घरी ठेवण्या चाल जुन्या काळी सर्वत्र होती.

या गीतामध्ये मोटेचा मोठा सुंदर उल्लेख आला आहे. हे सगळे अम पीकपाणी घरी यायला विहिरीचाही उपयोग फार झाला, असे नकळत इ सुचविलेले दिसते. जमिनीला झेपेनासे व्हावे एवढे पाणी मोटेने काढणाऱ्या भावा धावेवर असलेल्या रस्त्याने जाणाऱ्यायेणाऱ्या बैत्याबलुत्यांची दृष्ट लागेल, अ भीती या गीतात व्यक्त झाली आहे ! भावाच्या अबोल स्वभावाचाही इथे उल्ले आला असून, त्याच्या अविस्मरणीय कामाची पारख त्याला मनमोहन (कृष्ण म्हणून केलेली दिसते !

नव्या वर्षी आलेल्या धान्याची साध्याभोळ्या शेतकरी बाईने सांगितले ही माहिती विशेष उल्लेखनीय असून तिच्या वर्णनशैलीचे व कल्पनाशक्ती कौतुक करावे तेवढे थोडेच आहे.

**जेवनाची पाटी धयादुधाची लोटकी**
**सून बयाची धाकटी**
**जेवनाची पाटी भावज गुजरी आला घाम**
**बंधु शिवंची शेतं लांब**
**जेवनाची पाटी बाई उतरीते मदल्या बांदा**
**हाक मारीते गोऱ्या चांदा**
**जेवनाची पाटी सारी नदार मळ्याकडं**
**धनी लाडका बैलापुढं**
**जेवनाची पाटी डुईला आला कडू**
**येळ टळली औत सोडू**

शेतावर जाणाऱ्या घरच्या माणसांना दुपारचे जेवण बायका शेता घेऊन जात असतात. त्या प्रसंगाचे हे वर्णन आहे. या गीतामध्ये डोक्या

कढ येईपर्यंत शेत लांब असल्याची माहिती आली असून एवढ्या लांब जाताना इतर पदार्थांच्या बरोबर दही आणि दूध घेतलेली लोटकी (मातीची भांडी) भरून नेल्याचेही इथे सांगितलेले आहे. त्याचप्रमाणे त्याचे जेवण घेऊन मळ्याकडे येणाऱ्या कारभारणीला वेळ टळून गेल्याने आपल्या नवऱ्याने आता औत सोडावे असे वाटत असल्याचीही माहिती इथे आलेली आहे.

**पाटंच्या पाऱ्यामंदी हाक मारीतो पैरकरी**
**लाडक्या बाळीशाची ईरसरीला बैलं घरी**

या ओवीमध्ये सहकार्याने शेती करण्याच्या पद्धतीस 'पैरा' या नावाने संबोधिले असून त्या पद्धतीला पाठिंबा दिलेला आहे. एकमेकांच्या मदतीने एकमेकांचे शेतीचे काम करण्याने एक प्रकारची ईर्षा निर्माण होत असल्याचे इथे सूचित झालेले आहे. पहाटेच्या वेळी पैरेकरी आपल्या बाळाला हाक देत असून त्याला आपल्या घरच्या ईर्षेबाज बैलांच्या जिवावर तो आनंदाने होकार देत असल्याचा हा चित्तवेधक प्रसंग आहे. एकमेकांवर ईर्षा करणारे बैल आणि त्यांचा धनी घरी असणे ही शेतकऱ्याच्या भाग्याची गोष्ट मानली जाते.

**बारा बैलांचा नांगरू माजा आगल्या रुसला**
**झाला न्ह्यारीला उशीरू बैल सोडूनी बसला**

न्याहारीसाठी वेळेवर भाकर न मिळाल्याकारणाने नांगर धरणारा मुलगा रुसला असून त्याने नांगराचे बैल सोडून दिले आहेत असा हा मोठा गमतीदार प्रसंग आहे. या ओवीत आलेल्या 'नांगरू' व 'उशीरू' या शब्दांची ठेवण ज्ञानदेवकालीन भाषेची असल्यामुळे तिचे जुनेपणही ठळकपणे लक्षात भरते.

**शिवंच्या शेतामंदी आकड्या बायांनी केली मात**
**बोलती भाऊ भाऊ घालू बुचाड लवनात**

सुगीसराई संपल्यानंतर मोठ्या आनंदाने भाऊ भाऊ गोष्टी करीत बसले आहेत व कणसांच्या भाराने वाकलेल्या ताटांची बुचाडे लवणात रचण्याची गरज असल्याची हकिगत ही ओवी देते आहे.

**सोन्याची अंगठी बाई कशानं झिजली**
**पित्या दौलतानं रास गव्हाची मोजीली**

नव्या वर्षी आलेले धान्य मोजताना वडिलांची सोन्याची अंगठी झिजून गे आहे असे अभिमानाने सांगताना वडिलांच्या घरची झालेली भरभराटही मोठ्या खुबीने वर्णन केलेली आहे.

शेतकरी जीवनातील सुखदु:खाच्या गोष्टी करणाऱ्या अशा किती त आणखी ओव्या सापडतात. परंतु जेवढ्या मला ठळक वाटल्या तेवढ्यांची मी इथे नोंद केलेली आहे. पण तेवढ्यावरूनदेखील शेतकरी जीवनाचा दिमा खात्रीने लक्षात येईल एवढ्या ह्या ओव्या सुंदर आहेत.

या ओवीगीतांप्रमाणेच शेतीसंबंधात आणखी काही लोकगीतेही आहेत ती अशी

**पाणी जाऊं द्या जाऊं द्या**
**पलाणी (उंच) पाटाव**
**तिथं लिंबाचा लिंबाचा**
**हाई साटाव**
**कोतमिर म्हणीती म्हणीती**
**माजा सुवास देखा वो**
**मेथी म्हणीती म्हणीती**
**पैशाला पेंडी बीका हो**
**कारलं म्हणीतं म्हणीतं**
**उघडूनी बघू नका वो**
**वांगं म्हणीतं म्हणीतं**
**मला फोडणी टाका वो**
**लसूण म्हणीतो म्हणीतो**
**माजा सुवास देखा वो**
**कांदा म्हणीतो म्हणीतो**
**सभेला मांडू नका वो**
**मिरची म्हणीती म्हणीती**
**माजा तिखट माथा वो**

या गीतात पडणारा पाऊस आपल्या शेतात जावा व त्यामुळे तेथे भरपूर भाजीपाला पिकावा असे म्हटले आहे. खेरीज निरनिराळ्या प्रकारच्या भाजीपाल्यांची त्यांच्या वैशिष्टयासह इथे सांगितलेली ओळखदेखील मोठी सुंदर आहे. प्रत्येक भाजी आपली स्वतःची बोलणी इथे करीत असल्याने ह्या गीताला फारच चांगला उठाव आलेला आहे.

**भानू चल रे चल रे**
**सारंगी बनात**
**तिथं उतरीला उतरीला**
**जेजुरीचा वाणी**
**त्यानं खंडील्या खंडील्या**
**तांदुळाच्या गोणी . . .**

हे गीत सर्व प्रकारच्या धान्यांची नोंद त्यामध्ये होईपर्यंत लांबते. सारंगीच्या बनात जेजुरीच्या वाण्याने खंडीने धान्य पिकविण्याचा केलेला पराक्रम इथे अभिमानाने सांगितलेला आहे. अशा गीतांमुळे आपल्या शेतात भरपूर धान्य पिकविण्याबाबत शेतकऱ्यांनी एकमेकांना एक प्रकारे दाखला देऊन सूचनाच केली आहे असे म्हणावयास हरकत नाही. खंड्यांनी आपले जाणारे धान्य आणि गोण्यांनी त्यांची होणारी जपणूक ही या गीतातील वैभवाची खूण जुन्या काळच्या आबादीआबादीची साक्ष देते.

शेतावरील धान्य तयार झाले म्हणजे काही काही भागांतून ते धान्य काढताना सामुदायिक रीत्या **भलरी** गीत गाण्याची पद्धत आढळून येते.

ही भलरी गाताना शेतकरी मंडळी मोठ्या तालसुरात नाच गाणे करीत असतात. त्यामुळे त्यांचे काम तर झपाट्याने होतेच होते परंतु त्यांच्या नाचण्या-गाण्याने शेतालादेखील एक प्रकारची सुंदर कळा येते.

भलरी गीते ही प्रामुख्याने पुरुष मंडळी गात असतात. ह्या गीतांचे विषय अनेक. सुरावटी अनेक. आणि त्यांमधून प्रकट होणारा भावही बघून घ्यावा असाच थाटाचा एकेक.

**बाभळ बाईचा, बाईचा हिरवा पाला**
**कोण्या देशीचा, देशीचा जोगी आला**

त्याची किंगरी, किंगरी नानापरी
लेक जायाची, जायाची कोण्या घरी
लेक जायाची, जायाची बामण घरी
बामण घरी नको ग माय
सडा टाकिता पराण जाय

हे लोकगीत या ध्रुवपदाने आणखी पुढे सरकते ते असे:

मारवाड्या घरी नको ग माय
बुरखा घेता पराण जाय...
गुजरा घरी नको ग माय
उलट्या साडीनं पराण जाय...
तेल्या घरी नको ग माय
घाणा हाकिता पराण जाय...
तांबोळ्या घरी नको ग माय
पानं मोजिता पराण जाय...
लोहारा घरी नको ग माय
भाता फुंकीता पराण जाय...
घिसाड्या घरी नको ग माय
घण मारीता पराण जाय...
साळ्या घरी नको ग माय
लुगडी विणीता पराण जाय...
माळ्या घरी नको ग माय
फुलं वेचिता पराण जाय...
कुंभारा घरी नको ग माय
मडकी घडिता पराण जाय...
सुतारा घरी नको ग माय
लाकडं तासता पराण जाय...
धनगरा घरी नको ग माय
मेंढ्या वळविता पराण जाय...

चांभारा घरी नको ग माय
मोटा शिवीता पराण जाय...
वडारा घरी नको ग माय
दगड फोडीता पराण जाय...
कुणब्या घरी नको ग माय
मळी खुरपिता पराण जाय...

नगर भागात जोंधळा काढण्याच्या वेळी मिळालेली ही भलरी आहे. या गीतावरून जुन्या काळी मुलगी सर्वसामान्य अशा कोणाच्याही घरी दिली तरी तिला त्या त्या जातीचे ठराविक उद्योग करावे लागत असत असे लक्षात येते. खेरीज मुलीला काम करावे लागणार नाही असे सुखवस्तु घर मिळावे असाही एक भाव येथे ध्वनित केला गेला आहे.

लाल चोळी लाल
कुसुंबी ग लाल
तुझ्या नथीला देतो ढाळ
सजणे नाकामदी संबाळ

अशा ध्रुवपदाने चालणारी व पुणे भागात लोकप्रिय झालेली भलरी सर्व प्रकारचे दागिने जेथे जेथे घालावयाचे त्या त्या शरीराच्या भागाचा उल्लेख करीत लांबते. या गीतात दागिन्यांमुळे प्रेयसीला लाभणाऱ्या सौंदर्याची माहिती आलेली आहे.

सुटलाय वारा
लावलाय फरारा
ह्यो वारू गेलाय
कैलासी बंदरा
नारी कैलासी बंदरा
लागोनी निद्रा
तू माझी जाई ग
मी तुझा मोगरा

ही भलरी शृंगार रसाचा आविष्कार करणारी आहे. जुन्या काळच्या कोकणपट्टीवरील दर्यागीतासारखा या गीताचा थाट आहे. या ठिकाणी जाई व

मोगऱ्याची प्रियकर व प्रेयसींना दिली गेलेली उपमा मोठी सुंदर असून हे गीत गाणारांच्या व रचणारांच्याही मनाच्या सुदृढतेची कल्पना देणारे आहे.

**भलरी भलरी**
**भलरी म्हण ग मैना**
**मला भलरी म्हणता येईना**
**पाण्याला जा रे राघू**
**मला घागर आणता येईना**
**मोत्या पवळ्यांचा मेवा**
**हौशा माझ्या ग जावा**
**राजा भलरी भलरी**
**भलरी गाऊ किती**
**मोत्या पवळ्यांची वटी**
**माझ्या पेरीली शेती**
**राजा भलरी भलरी**
**भलरी गाऊ किती**

मावळ प्रांतातील शेतीवाडीतून स्त्रिया म्हणत असलेली ही भलरी आहे. या गीतात मोत्यापोवळ्यांची होणारी पेरणी सामान्य मंडळींच्या कल्पनावैभवाची साक्ष देणारी आहे.

निरनिराळ्या भागांत गायिली जाणारी अशी अनेक भलरी गीते सापडतात. ख्यालीखुशालीने मनात येणारा हरेक प्रकारचा भाव या गीतांनी मोकळ्या मनाने खुलविलेला आहे. त्यामुळे श्रम हलके होण्यासाठी संगीताचा उपयोग होतो असे जे म्हटले जाते त्याची या ठिकाणी प्रचिती आल्याविना रहात नाही. म्हणूनच शेतीच्या वैभवात या गीतांनी मोठे हृदयंगम स्थान निर्माण करून ठेविले आहे.

भलरी गीतांप्रमाणेच शेतीच्या परिसरात गुरे राखणाऱ्या गुराख्यांकडून म्हटली जाणारी काही लोकगीते आहेत. ह्या गीतांना गुराख्यांची गीते असे म्हणतात.

**टिपक्या दांड्या नमनम करे**
**डाव्या हाती रंगन भरे**

जेवना हात मा पिप्पय पान
गाई कोन चारे सीताराम
सीतारामाच्या कपिल्या गाई
हिरवा डोंगर चरून जाई
चरता चरता पडा पवा
पवानी बांधी गन झोपडी
गन झोपडी म्हानं रावा
रावानी मारी चिरकांडी
तठे मनी गाय एखली
गायला झाया हांड्याकोंड्या
त्याले बांधा लाले गोंडा
लाल गोंडानी सावली
दही दुधाची मावली
आरे तुना ढोरक्या मोठा
आरे तुना वाडाभरी दाटी
आरे तुना हातमा काठी
आरे लय खोबरानी वाटी

खानदेशातील गुराख्यांचे हे लोकगीत आहे. ह्या गीताची भाषा अहिराणी असून ह्या गीतातील मनोभाव भगवान श्रीकृष्णाच्या गोकुळातील गाईंची आठवण करून देणारा आहे. हे गीत गाताना गुराखी मोठ्या दिमाखाने नाचतात व आपल्या घरच्या गाईवासरांचे वैभव इतरांचे पुढे या परीने ठेवतात.

चारीदा डोंगूर गवळ्यांनी घेतीला
गवळ्यांनी घेतीला गाईच्या चाऱ्यासाठी
घाटाच्या तोंडाले वाऱ्याची वाधूळ
तेही वाधूळीनं पाचोळा गोळा क्येला
आवतकऱ्या दादा नको मारू बैलाला
नको मारू बैलाला पाठीच्या भावाला

**तोडीली कुंभई बांधीली मुंबई**
**कारवीच्या खाली धोंडा तडाडीला**
**अशी भावजय खोटी पायानं पिढा लोटीला**
**मायेची आसनी पाठीचो भयनी**
**मायेला मानू नाही देली हे परघरी**
**देली हे परघरी कामाच्या कसाल्यात . . .**

पुण्या-मुंबईच्या मधला घाटमाथा उतरून खाली गेल्यावर ठाकरांची गीते कुठे कुठे ऐकू येतात. त्यांपैकीच हे एक लोकगीत आहे. गाईचे कळप बाळगताना घडणारी गोष्ट ह्या गीतात सांगितलेली आहे. हे ठाकूर लोक उत्तर कोकणात रहाणारे म्हणून त्यांच्या ह्या गीतात मुंबई बांधण्याची भाषा आलेली आहे! शिवाय या गीतात अनेक विषयांचाही उल्लेख आला असून मुख्य गोष्ट चारीदा डोंगर घेतलेल्या गवळ्याच्या हकिगतीने नटलेली आहे.





# देवादिकांची गाणी

रोजच्या धकाधकीच्या मामल्यामधून थोडी सोडवणूक मिळावी, काबाडकष्टांतून फावला वेळ गवसावा, काळजीमधून मुक्तता व्हावी, केल्या कर्मातून चांगले निघावे, मुलेबाळे सुखात रहावीत, आल्या संकटांमधून सहीसलामत सुटण्याचा मार्ग सापडावा, घरी आबादीआबाद नांदावी, पुण्य पदरात पडावे आणि सर्व प्रकारची शांती मनाला लाभावी म्हणून माणूस देवाची पूजा करीत असतो. रोजच्या देवपूजेमुळे जणू आपल्या वऱ्यावाइटाचा हवाला आपण देवावर सोडून मोकळे होतो हीच भावना ! विशेषत: सर्वसामान्य स्त्रियांची अशी श्रद्धा असते की, आपल्या सगळ्या कर्तबगारीचा आणि खुद्द आयुष्याचाही धनी देवच आहे ! त्यामुळे देवादिकांची कर्तबगारी वर्णन करणारी पोथीपुराणे ऐकण्याकडे त्यांच्या मनाचा विशेष कल झुकलेला आढळून येतो. काही समजो अगर न समजो, ऐकल्या गोष्टीमुळे आपले चांगले होणार ही श्रद्धा त्यांना चिकटून राहिलेली असते. अशा वेळी लक्षात राहिले असेल ते सारे आठवणीत जमा करून, भाविक-तेने मनात घोळवावयाचे व त्याचा सुचेल तसा आविष्कार करावयाचा, अशा थाटाने त्या देवादिकांची गाणी गात असतात. मग त्यात अमुक एकच देव येईल असे नाही, तर ओळखीच्या साऱ्या देवांची मोजदाद एकत्र झालेली दिसेल !

पहिली माझी ओवी पहिला माझा नेम
तुळशी जवळी राम पोथी वाची
दुसरी माझी ओवी दुधाची भावना
लक्ष्मीनारायणा विनंती माझी
तिसरी माझी ओवी तिरकुटाच्या परी
ब्रह्मा विष्णूवरी बेल पत्री
चवथी माझी ओवी चवथीच्या चांदा
मोतीयाच्या भांगा अंबाबाई
पाचवी माझी ओवी पाची पांडवासी
पूजा आरंभीसी विठोबाची

इथे या पाच ओव्यांमध्ये निरनिराळ्या देवांच्या जोडीला पूजेच्या साहित्याची जमवाजमव झालेली असून शेवटी विठोबाच्या पूजेचा आरंभ दर्शविलेला आहे.

देवाच्या देऊळात दिवा जळतो लोनीयाचा
आत संदूक सोनीयाचा
देवाच्या देऊळात फुलांचं सारवण
रोज हरीचं कीर्तन
देवाच्या देऊळात देव नकशीचा उभा
रंगाची बघा शोभा
देवाच्या देऊळात गोड साकरची पुडी
जळती कापूराची वडी
देवाच्या देऊळात रोज चडते पायरी
औक्ष मागीते म्हायारी

देवाच्या दारीची पायरी चढायची ती ही सारी भावना उराशी बाळगूनच चढायची. त्याकारणाने त्या भावनेला व पूजेला जाणाऱ्या स्त्रीला एक प्रकारची आगळी कळा येते. एवढेच नाही तर मानवी मन पावित्र्याची बैठक घेऊनच जीवनाकडे पाहू इच्छिते!

पैली माजी ववी सुद्ध होऊ माजं काम
रोहिणीच्या पोटी आल्याती बळीराम

दुसरी माजी ववी खीरसागर जगूजेठी
देव किष्ण आलं देवकीच्या पोटी
तिसरी माजी ववी द्वारकेच्या काना
आता सोडवीला देवकीचा बंदीखाना
चवथी माझी ववी चारी चौक नमीलं
आता गोकुळात बहु आनंद मांडीलं
पाचवी माझी ववी देवा तुला दरशान
आता उभारल्या गुड्या पताका तोरनं
साव्वी माजी ववी गाते पाकळुका
ववीला मी गाते पंढरीचा पर्णसका
सातवी माझी ववी सातवा अवतार
तुकाराम बोलं न्हाई फिरून संसार
आठवी माजी ववी रामावरी गाईली
आता गोकुळात झाली आनंदाची टाळी
नव्वी माझी ववी गाईली रघुनाथा
विठ्ठलाची पूजा आरंबात आता
धाव्वी माझी ववी धाव्वा अवतार
घोड्यावरी स्वार किष्ण होणार
आकरावी माझी ववी आकरा खिमनी हनुमंत
सोन्याची पालकी त्यात जानकी रघुनाथ
बारावी माजी ववी हरी गाईला पुरता
आंबारीचा हत्ती चंद्रभागेवरता

ज्या परीने ज्या देवाचा महिमा गाता येईल व गावासा वाटेल त्या परीने तो इथे गायला गेलेला आहे. प्रत्येकाचे वेगळेपण दाखविण्याचा इथे प्रयत्न झालेला असून तो सामान्य स्त्रियांच्या दृष्टीने उल्लेखनीय आहे असे म्हणता येईल. परंतु या ओव्यांचा काही भाग सोडला तर कल्पनाशक्तीचे वैभव इथे फारसे दिसत नाही. या ओव्यांमध्ये पंढरीच्या विठोबाचे गुणगान अधिक झालेले असून इथे विठोबाचा उल्लेख वारंवार आलेला आहे.

पहिली ग माझी ओवी तेत्तीस कोटी देवा
सावळ्या बाळराजा विटेवरल्या सदाशीवा
दुसरी ग माझी ओवी माता रुक्मिणीच्या चुड्या
जन्मला किष्ण देव तुटल्या बंद-बेड्या
तिसरी माझी ओवी त्रिभुवनी करी राज्य
सावळा पांडुरंग करी कामकाज
चवथी माझी ओवी चारी चौक भरूनी
जन्मले किष्ण देव बहु आनंद करूनी
पाचवी माझी ओवी पाची पांडवांला
गोकुळीच्या किष्णाला द्रौपदीच्या बंधवाला
सहावी माझी ओवी मंडप देतो शोभा
सावळा पांडुरंग हरीकीर्तनाला उभा
सातवी माझी ओवी रुक्मिणी सत्यभामा
हरीच्या रथामंदी सोळासत्र नारी जमा
आठवी माझी ओवी करीते मी लिंबलोण
सावळा पांडुरंग गादी बसले भगवान
नववी माझी ओवी पंढरी ग पाठवा
लाडके भैनाबाई विठू निजला उठवा
दहावी माझी ओवी कोंबडा भांग देई
सावळा पांडुरंग हरी चालला आंघोळी

पंढरीचा विठोबा आणि गोकूळचा कृष्ण या दोघांच्या गुणगानाचा मोठा छानदार असा हा आविष्कार आहे. या ठिकाणी देवादिकांना मानवी रूप देऊन आपल्या मनातील कल्पनांना मूर्त स्वरूप प्राप्त करून देण्याचा प्रयत्न यशस्वी रीत्या केला गेलेला आहे. विठ्ठलाने हरिकीर्तनाला उभे रहावयाचे व आंघोळीला जावयाचे या कल्पना वरील प्रयत्नाच्या निदर्शक म्हणून पहाता येतील.

सर्व प्रकारच्या देवादिकांचे गुणगान गावयाच्या वरील प्रकारांचा विचार करता असे प्रामुख्याने दिसून येते की, भगवान श्रीकृष्ण आणि पंढरीचा विठ्ठल यांच्यावरच इथे अधिक भर दिलेला असून इतर देवांचा अनुषंगाने उल्लेख आलेला

आहे. पूर्वीच्या सामान्य स्त्रिया ह्या साक्षर नसल्याने व त्यामुळे धार्मिक ग्रंथांचे वाचन त्या करू शकत नसल्याने असे होणे शक्य आहे. एरवी कृष्ण आणि विठ्ठल यांच्यावरील निस्सीम भक्तीच्या जोडीला इतरांच्याकडे एवढे कमी लक्ष गेले नसते.

## कुलदैवत

काही घराण्यांमध्ये कुलदैवत म्हणून एक खास देव मानण्यात येतो. आणि जत्रेच्या निमित्ताने त्याची महापूजाही करण्यात येते. अशा देवाला बायका नवसही करीत असतात व तो फेडण्यासाठी प्राण पणाला लावून त्यांची धडपड चाललेली असते. त्यामागचा हेतू एवढाच की, ही कुलदेवता आपल्या घराण्यावर कायमची प्रसन्न व्हावी व आपले भले व्हावे.

**शिंग वाजतं शिंगनापुरी कर्ना वाजतो कोलापुरी**
**देवा माज्या त्या ज्योतिबाचा होतो उच्चार रत्नांगिरी**
**चैताच्या म्हईन्यामंदी देव ज्योतिबा उबा -हातो**
**सावळ्या बंदुजीची भोळ्या भक्ताची वाट पातो**
**देवा ज्योतिबाच्या वाटं कोन नकीच्या धोतराचा**
**हावशा माजा कांत सका वावर धोतराचा**
**चैताच्या महिन्यात फुलल्या चारी वाटा**
**ज्योतिबा माजा देव रत्नांगिरीचा राजा मोठा**
**ज्योतिबाची वाट चढता दिसं वन**
**ज्योतिबा माज्या देवा कंदी देशील दर्शन**
**जिवाला माज्या जड मला कशाला वैदवानी**
**देवा माज्या ज्योतीबाच्या त्येच्या न्हानीचं पाजा पानी**
**जिवाला माज्या जड मला कशाला म्हालदोरी**
**नाईकबा माजा देव साडुवैद माज्या घरी**
**दिवस उगवला दिवसापशी माजं काई**
**ज्योतिबा माजा देव येन्याची ग वाट हाई**

कोल्हापूरपासून बारा मैलांवर असलेल्या रत्नागिरी डोंगरावरील **ज्योतिबा** नावाच्या कुलदेवतेसंबंधीच्या या ओव्या आहेत. महाराष्ट्रातील पुष्कळ

घराण्यांची ज्योतिबा ही एक कुलदेवता आहे. या देवतेवर या भक्तमंडळींची विलक्षण श्रद्धा आहे. केलेला नवस फेडला नाही तर ही देवता किती कोपते याची कल्पना या सामान्य मंडळींनी 'सोन्याचं जानवं' या नावाच्या लोककथेत दिलेली आहे. एक बाई दळणकांडण करीत असते. त्यावरच आपले रोजचे जीवन भागवते. या कथेत घरी मूलबाळ नसल्याने ती ज्योतिबाला सोन्याचं जानवं घालीन असा नवस करते. पण तिला दिवस गेल्यावर ती देवाला विसरते. त्याचा परिणाम फार वाईट होतो. तिला मूल होते ते डुकराच्या पिलासारखे! पुढे ही डुकरासारखी दिसणारी मुलगी राजाची सून होते. मग राजा हा नवस फेडतो व त्या मुलीचे सुंदर राजकन्येत रूपांतर होते. अशी अगदी थोडक्यात ही कथा आहे.

या ओव्यांनी ज्योतिबाचा महिमा गायिलेला आहे. चैत्र महिन्यात या डोंगराच्या, चारी वाटा फुलून जातात, ही कल्पना इथे देऊन यावेळी यात्रा फार मोठी भरते, असे सामान्य स्त्रियांनी मोठ्या खुबीने सूचित केले आहे. त्याचप्रमाणे हा ज्योतिबाचा डोंगर एवढा उंच आहे की, चढण संपता संपत नाही व भोवताली रानावनांची गर्दी दिसते! त्यामुळे देवाचे दर्शन कधी होणार म्हणून भक्तमंडळींना चिंता पडते, अशी इथे सांगितली गेलेली कल्पना निसर्ग-वर्णनाचा एक नमुना म्हणून पहाण्याजोगी आहे.

उगवत्या नारायणाला नमस्कार न करता ज्योतिबा घरी येईल म्हणून वाट पहावयाची आणि औषधापेक्षाही त्याच्या दर्शनानेच अधिक गुण यावयाचा, अशी इथे प्रकट झालेली दृढ श्रद्धा भाविक मनाची निदर्शक म्हणून अभ्यासण्यासारखी आहे. ज्याला इंग्रजीमध्ये 'वुईल पॉवर' म्हणतात व 'विश्वास असेल तर यश मिळू शकेल' अशी एक मराठीत सामान्य झालेली दृढ कल्पना आहे, तिचा इथे सुरेख वापर झालेला आहे. उत्तर सातारा जिल्ह्यातील पाटण तालुक्यातील **नाईकबा** ह्या कुलदेवतेचाही उल्लेख इथे असाच आलेला आहे.

**शिराळ गावामंदी गल्ल्या हाईत्या दाटणीच्या**
**देवा माज्या नाथाजीला दिंड्या येत्यात्या पैठणीच्या**
**आठा दिसांच्या ऐतवारी नाथ म्हाराज घोड्यावरी**
**हाती दवत लेखयीनी लिवी चिंचंच्या झाडावरी**

शिराळ एवढं गाव गाव म्हमई बरोबरी
देवा माज्या नाथाजीचं भगवं निशान चिचंवरी
माज्या ग अंगनात बच्चा नागाची लोळयीनी
नाथ देव महाराज गेला गारुडी खेळुयीनी
चला ग सया पाहू नाथ बाबाची एवढी हवा
टाकी नदार खेड्यावरी तिथं पाण्याचा जळं दिवा
चल ग सया पाहू नाथ बाबाची बागशाई
चिचंच्या झाडावरी सैन निगाली काशीबाई
पाटानं जातं पाणी वर अबीराची शाई
देवा माज्या नाथाजीला कानफाटयाला रानी न्हाई
कापूर वड्यायाचं पाणी दिसतं ताकावानी
देवा गोरखनाथायांनी जटा धुतील्या गोसाव्यांनी

सांगली जिल्ह्यामधील वाळवे तालुक्यातील शिराळा गावच्या सीमेवर असलेल्या **गोरखनाथाची** ही हकिगत आहे.

वास्तविक शिराळा गाव फारसा मोठा नाही. परंतु इथे मुंबईच्या बरोबरीला त्यास बसविले आहे! आपल्या गावच्या अभिमानाची द्योतक म्हणून सामान्य मनाला वाटणारी ही बरोबरी लक्षात ठेवण्यासारखी आहे. नाथाच्या यात्रेसाठी या गावी पैठणसारख्या दूरच्या गावाहून दिंड्या येत असतात हे सांगताना नाथाची थोरवी किती आहे, हे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. नाथाच्या दारात इथे फारच मोठी—शेकडो वर्षांची जुनी—अशी चिंचेची झाडे आहेत. या झाडांच्या फळांचा आकारही झाडाला शोभेल असाच मोठा आहे! त्या चिंचेवर (फळावर) काशीचे चित्र उमटल्याची अद्भुतरम्य हकिगत इथे आली आहे! शिराळ्यास नागपंचमीचा उत्सव मोठा असतो. त्यामुळे नाथालाही इथे गारुडी करून टाकले आहे! नाथाच्या जटा धुण्यामुळे मोरणा नदीच्या पाण्याचा रंग बदलला आणि अबिराच्या शाईने नाथाने लेखन केले, असा चमत्कारही इथे मोठ्या अभिमानाने सांगितलेला आहे. कानफाट्या नाथाचे भगवे निशाणही या ठिकाणी उल्लेखिले गेले असून तिथे सतत जळणाऱ्या पाण्याच्या दिव्याचा विलोभनीय असा अद्भुत चमत्कारदेखील आवर्जून वर्णिलेला आहे!

चैताच्या म्हईन्यात हवा पेटंच्या कावडीची
गिरजा एवडी नार संबू देवाच्या आवडीची
तेल्या भुत्याची कावड मुंगी घाटाला थटली
संबू देवाची गिरजाबाई कुंकू लेताना उटली
पाटानं जातं पानी शिगणापुरीच्या मळचाला
चैताच्या महिन्यात दौना आलाया भराला
दोघांचा भाऊपना संबू देवानं चालवीला
सांडनीवरी स्वार दौना रातीत पाठवीला
वरी संबूचं शिकायार खाली बळीचं देवाळ
सईला किती सांगू गिरजा म्हायार जवळ
संबू देवाला रात झाली नात्यापुत्याच्या बाजारात
गिरजा नार वाट बघी कमानी दरवाज्यात
सोंगट्याचं डाव आल्याती आट नऊ
म्हादेव सांगीतो नको गिरजा रडी घेऊ
रुसला संबूदेव डोंगरी घाली धूनी
गिरजा बोलं देवा तुमा वाचूनी न्हाई कोनी
रुसला संबू देव डोंगरी घाली धूप
गिरजा नार शानी घेती भिल्लीनीचं रूप

शिंगणापूरच्या **शंभु महादेवा**संबंधीच्या या ओव्या आहेत. शिंगणापूरच्या यात्रेच्या वेळची हकिगत इथे आली आहे. देवाकडे येणारी तेल्याभुत्याची (एका भक्ताची) कावड डोंगरालगतच्या मुंगी घाटाजवळ अडकलेली पहाताच, भक्तांच्या मार्गात आलेला अडथळा नाहीसा करण्यासाठी गिरजाबाई कुंकू लावतानादेखील उठते, अशी या गीताने दिलेली माहिती देव आणि भक्त यांच्यामधील निष्काम प्रेमाची निदर्शक आहे. एका गावच्या देवाकडून दुसऱ्या गावच्या देवाला भेट म्हणून उंटावरून पाठविलेल्या दवण्याची (सुवासिक वनस्पती) इथे सांगितलेली माहिती चित्ताकर्षक आहे. सांगावा येता क्षणीच रातोरात पोचत्या केलेल्या दवण्याची ही माहिती जुन्या काळच्या वाहनांची व दळणवळणाच्या साधनांचीही निदर्शक ठरते.

शंभूच्या देवळाच्या शिखराजवळच गिरजाचे माहेर आहे, असे सांगताना मुलीबाळी नजरेखालच्या टप्प्यात देण्याची जुनी चालही या गीताने ओळखीची करून दिली आहे! शिवाय देवादिकांतही रुसणे फुगणे असू शकते याची चुणूक इथे आढळून येते!

**सकाळी उठूनी घराबाहेर माझं जाणं**
**प्रभूदर्शन मला घेणं**
**बस्तीच्या दरबारात उभी राहिली एका कोनी**
**देवा उघड नेत्रं दोनी**
**सकाळी उठूनी देवा अरहंत माझ्या मुखी**
**राख माझं सर्व सुखी**

सांगलीकडील जैन मंडळींच्या मुखी असलेल्या या ओव्या आहेत. जैनांमध्ये **बस्तीला** (देवळामध्ये) रोज सकाळी स्नान करून सोवळ्याने नियमितपणे जाण्याची पद्धत आहे, त्याची माहिती इथे सुरुवातीलाच आली आहे. बस्तीला जाऊन एका कोपऱ्यात उभे रहावयाचे आणि पूज्य देवतेला (अर्हत्) नेत्र उघडून आशीर्वाद मागावयाचा अशी जी रूढी आहे, तीही इथे सांगण्यात आली आहे. त्याचप्रमाणे उठल्याबरोबर दररोज देवाचे नाव प्रथम घ्यावयाचे म्हणजे मनाची शांती होते अशी जी समजूत आहे, तिचाही इथे उल्लेख आलेला आहे. अतिशय भाविक मनाने व दृढ श्रद्धेने देवाचा विचार करणाऱ्या सामान्य मनाचेच हे दिग्दर्शन होय.

**कोलापूर करवीर क्षेत्री**
**गेले मी अवचितच बाई**
**पाहिली चतुर्भुज मूर्ती**
**साक्षातच भेटे अंबाबाई**
**देऊळाची अघटित रचना**
**अवलोकन केले नयना**
**पाहुनिया चकीतच झाले बाई**
**अंबाबाई मन माझे चोरुनी घेई**
**नेसली पैठणी पिवळी**
**भरजरीची घालुनी चोळी**

नाकीचा निर्मळ मोती
मळवट भाळी रेखिती
महाळुंग उजव्या हाती
शिवलिंग मस्तकावरती
सूर्य किरणे मुखावरी येती
अंबामातेची शोभा लई दिसती
गाभारे अगणीत पाहता
खांबाची संख्या येत नाही करता
वक्रतुंड गणनायक हा
आंबेला सन्मुख पाही
आंबेच्या सन्निध राही
ठायी ठायी पुराणे वसती
किती कथा कीर्तने श्रवती
दर्शनासी भक्तगण येती
अंबिकेच्या चरणी लोळती

**कोल्हापूरच्या अंबाबाईचे** व तेथील देवळाचे वर्णन करणारे हे गीत आहे. या गीतामुळे अंबामातेचे साक्षात दर्शन घडल्याचा लाभ ते गाणारास होतो म्हणतात! त्याकारणानेच भाविक स्त्रियांच्या ओठी हे गीत अमृतासमान असते!

आपल्या सभोवतीच्या समाजामध्ये सर्वमान्य झालेल्या इतर प्रमुख देवतांची गाणी यापुढे स्वतंत्रपणे आणि विस्ताराने दिलेली आहेत. इथे आलेली ही या प्रकारची गाणी मात्र अतिशय मर्यादित क्षेत्रातील व ठराविक कुलदैवतांचीच अशी ठरतील.

या प्रकरणाचे सुरुवातीस दिलेल्या सर्व देवांच्यावरील एकत्र झालेल्या ओव्या हिंदु समाजामध्ये बहुतेक सर्वांच्याच मुखी असलेल्या आढळतात. एकंदरीने देवा-बद्दलची श्रद्धा व पूज्य भावना सर्व समाजांमध्ये थोड्याबहुत फरकाने सारखीच वावरत असलेली यावरून आढळून येते. परंतु फरक दिसतो तो आराध्यदेवते-मध्ये आणि तिच्या निमित्ताने निर्माण झालेल्या संस्कृतीच्या संवर्धनामध्ये, इतकेच काय ते!

## उगवला नारायण

दररोज सकाळी उठल्याबरोबर पहिल्यांदा देवाचे नाव घ्यावे आणि नंतर देवदर्शनालाही जावे, म्हणजे आपला दिवस चांगला जातो, अशी सर्वसामान्य मनाची एक भोळी श्रद्धा आहे. त्यामुळे इतर देवादिकांच्या जोडीलाच उगवत्या सूर्यनारायणाचीही मनोभावे पूजा करण्यात माणसांना आनंद वाटतो. उभ्या दुनियेला नवचैतन्य प्राप्त करून देणारा सूर्य म्हणजे एक मोठी देवता आहे. तिची पूजा ही स्वाभाविकपणेच झाली पाहिजे, म्हणून माणसे सूर्योदय होत असताना असतील तेथून सूर्याकडे तोंड करीत उभी रहातात आणि हात जोडून त्यास नमस्कार करतात. अशा वेळी नदीमध्ये स्नान करीत असताना अगर इतरत्र सोय असेल तिथे स्नान करीत असताना, ओलेत्याने सूर्याला नमस्कार केलेला अधिक चांगला, अशी आपली एक भाविक मनाची समजूत आहे.

सूर्याला नमस्कार करताना बायकामंडळी म्हणत असतात की, 'देवा, भगवाना, चांगलं कर रं ऽऽ बाबा!' म्हणजे सूर्याजवळ या परीने त्या स्वत:ला हव्या असलेल्या आपल्या भलेपणाची मागणी करीत असतात.

**उगवत्या नारायणा आदी उगव माज्या दारी**
**माज्या त्या बाळासंगं दुधा तुपाची कर न्ह्यारी**

उगवत्या सूर्याला उद्देशून म्हणावयाच्या ओव्या या पद्धतीने सुरू होतात. प्रत्यक्ष सूर्यदेवाला अगोदर आपल्या दारी यावयाची विनंती करावयाची आणि आपल्या बाळाबरोबर दुधातुपाची न्याहारी कर म्हणावयाचे, म्हणजे मोठी अद्‌भुतरम्य कल्पना आहे! त्याचप्रमाणे हे कल्पनासौंदर्यदेखील मोठे विलोभनीय आहे.

या ओवीत आलेला दुधातुपाचा उल्लेख जुन्या काळी घरात असलेल्या भरपूर दूधदुभत्याची कल्पना देत आहे.

**उगवला नारायण येऊन बसला आदमासी**
**बगतो ग हाल हवा दुनिया आवरती कशी**

या गीतात सूर्यदेव कुठे तरी एका विशिष्ट ठिकाणी येऊन बसतो; आणि दुनियेचा प्रत्रास आटोक्यात कसा येईल अगर धरणीवर सर्वत्र समाधान कसे

पसरता येईल, याचा विचार करीत असतो, अशी कल्पना व्यक्त झाली आहे. मानवाने आपल्या संसाराचा विचार करावा त्याप्रमाणे सूर्यही दुनियेच्या संसाराचा विचार करीत असल्याची ही कल्पना अभिनव आहे.

**उगवला सूर्व्यादेव लाल आगीचा भडका**
**मावळाय गेला चंद्र आईचा लाडका**

या ओवीने सूर्योदय होते वेळी उगवतीची दिशा लालसर झाली असून आईचा लाडका चंद्र मावळायला गेल्याची माहिती सांगितली आहे. चंद्र आईचा लाडका कसा झाला याबाबत प्रसिद्ध असलेली लोककथा लक्षात घेऊन हा उल्लेख आलेला असावा. या लोककथेमध्ये अशी हकिगत आलेली आहे की, एक म्हातारी बाई असते. तिला चार मुले असतात. त्यांची नावे चंद्र, सूर्य, अग्नी आणि वायू. तर ह्या मुलांना एक धनिक माणूस जेवायला बोलावतो. अशा वेळी ही म्हातारी शहाण्यासारखं वागा असं सांगून त्यांना जेवायला जा म्हणते. पण एक अट घालते की, येताना आपल्यासाठी थोडी मिठाई आणा. मात्र एकटच्या चंद्राखेरीज ते काम कुणी करीत नाही. ही नाही ती कारणे पुढे करीत इतर मुले मिठाई आणली नसल्याचे सांगतात. पण चंद्र मिठाई आणून देतो. त्यामुळे म्हातारी त्याच्यावर प्रसन्न होऊन 'दुनियेचा तू आवडता होशील' असा मंगल आशीर्वाद देते. तेव्हापासून चंद्र सर्वांचा आवडता आणि आईचा लाडका होतो, अशी थोडक्यात ही कथा आहे.

**उगवला नारायण लाल शेंदराच्या फोडी**
**लाडक्या बाळराजा औक मागीते बाडीदिडी**
**उगवला नारायण आता काय मागू त्येला**
**सावळे भैनाबाई औक मागीते कुंकवाला**
**उगवला नारायण धनसंपता मला थोडी**
**मागनं मागीते मी पोटी पुत्रांची ग जोडी**

सूर्यदेवाजवळ केलेल्या मागणीची माहिती या गीतांनी दिलेली आहे. आपल्या बाळाला व पतीला उदंड आयुष्य इथे मागितलेले असून पोटी पुत्रांच्या जोडीचीही अपेक्षा केली आहे. उगवत्या दिशेची इथे लाल शेंदराच्या फोडीशी केलेली तुलना आणि घरी धनसंपत्ती थोडीफार आहे तेव्हा तिला धनी म्हणून पुत्र मागून

घ्यावयाचा, अशी इथे आलेली माहिती सामान्य मनाच्या कल्पकतेची चुणूक दाखवीत आहे.

**उगवला नारायण उगवताना संध्या करी**
**चौ रत्नांचं जानवं पतिराजाच्या भुजेवरी**
**उगवला नारायण उगवताना पाणी पडं**
**माज्या ग बाळीच्या बाई गंदाला तेज चडं**
**उगवला नारायण आदी आला माज्या दारी**
**धईभाताची ग न्ह्यारी मग पिरतीमी धुंडी सारी**
**उगवला नारायण केळीच्या कोक्यातून**
**धुंडीत बाळराज बाई फिरतो मळ्यातून**
**उगवला नारायण माज्या अंगनी प्रकाशला**
**हळदी कुंकवाचा वटा शालूचा माखला**
**उगवला नारायण किरनं टाकितो झपाझपा**
**माजी ग बाळाबाई सई चांदनी लोटी सोपा**

सूर्योदय झाल्यानंतर होणारे नैसर्गिक स्थित्यंतर या गीतांनी दर्शविलेले असून ते मोठे चित्ताकर्षकही झाले आहे.

सूर्यदेव उगवला त्यावेळी रत्नजडित जानवं घातलेला पतिराज संध्या–पूजा–करीत आहे, उगवतीकडे पाण्याचा धबधबा असल्याने त्या पाण्याप्रमाणे मुलीच्या कुंकवाला तेज चढते आहे, माझ्या घरी येऊन तो दहिभाताची न्याहारी करून मग सगळ्या दुनियेवर जातो आहे, केळीच्या कोक्यातून डोकावत तो माझ्या बाळाला मळ्यामध्ये शोधीत आहे, हळदीकुंकवाने आपला शेला माखला असून त्याचे तेज त्याच्या प्रकाशात चमकते आहे, त्याच्या कोवळ्या उन्हात मुलगी सोपा झाडून काढीत आहे, असे विविध प्रकारचे स्थित्यंतर इथे प्रकट झाले असून, ते नित्य व्यवहाराशी निगडित असे दाखविल्याने हृदयंगम झाले आहे. केळीच्या कोक्यातून डोकावीत सूर्यकिरणांनी मुलाला शोधावयाचे अशी इथे आलेली कल्पना विशेष चित्ताकर्षक झालेली आहे. कल्पनावैभवाचा एक सुंदर नमुना या दृष्टीनेही ही गीते उल्लेखनीय ठरतील.

उगवला नारायण लाल शेंदराच्या खापा
फुले अंगणात चाफा
उगवला नारायण चढे झाडाझुडावरी
तेज पडे चुड्यावरी
उगवला नारायण अगीनीचा ग पुडका
आत मोत्यांच्या सडका
उगवला नारायण आला पहाड फोडून
दिले सुरुंग लावून
उगवला नारायण सारी उजळे दुनीया
किती लावाव्या समया
उगवला नारायण पसरलं पिवळं ऊन
बाई हासलं हिरवं रान
उगवला नारायण पिवळी तिरीप चांगली
रान मखमली येंगली

सूर्योदयानंतर निसर्गाने दाखविलेली आपली हालचाल या गीतांनी सांगितलेली आहे आणि ती सांगताना प्रत्येक वेळी एखाद्या कृतीशी तुलना करीत निसर्गाचे नित्य नवे असे सौंदर्यदर्शन घडविलेले आहे. उपमादृष्टान्तांचा एक सुंदर नमुना म्हणून या ओव्यांचा अभ्यास करता येईल.

शेंदराच्या लाल फोडीप्रमाणे दिसणारा सूर्य बघून अंगणातील चाफा इथे फुलला आहे, झाडावरील सूर्याचे तेज हातातील सौभाग्याच्या चुड्यावर चढले आहे, अग्नीच्या पुड्याप्रमाणे दिसणाऱ्या सूर्याच्या आत मोत्यांच्या सडका पसरल्या आहेत (तेजस्वी किरणांचे झोत दिसत आहेत), पहाड फोडून तो वर आल्याने सुरुंग उडावा त्याप्रमाणे सर्वत्र लाल धूळ आभाळात उडाली आहे, त्याच्या तेजाने उजळलेली दुनिया लाखो समयांच्या प्रकाशाला लाजवीत आहे, पिवळ्या उन्हाच्या तिरपीने मखमली शेतं चढून गेली असून हिरवे रानही आनंदले आहे, अशी ही विविध तऱ्हांनी नटलेली हकिगत आहे. निसर्गवर्णनाचा एक उत्तम नमुना म्हणून या गीतांची थोरवी गाता यावी, एवढी ती अंतरंगाने वजनदार झालेली आहेत.

उगवला नारायण भाज्या पिवळ्या झाल्या किती
ताईता बंदुजीला औक मागाया उभी ऱ्हाती
उगवला नारायण उगवताना ग कवळा
चाफ्याच्या फुलावर नाग डुलतो पिवळा
उगवला नारायण केळीच्या कंबळात
मावळाया गेला नारळी सुंदरीत
मावळाया गेला कोकनीचा राजा
आडवी ग आली बहीन कंबळजा

या ओव्यांनी उगवत्या व मावळत्या सूर्याची माहिती दिलेली आहे. सकाळी केळीच्या बागेतून (कमळासारख्या केळफुलातून) सूर्यदेव वर येतो आणि सायंकाळी नारळीच्या झावळीत जाऊन मावळतो अशी ही कल्पना आहे. पश्चिमेकडे सूर्य मावळतो तेव्हा तो कोकणात जाऊन गुप्त होतो आणि त्याला त्याची बहीण कमळजा आडवी येते, म्हणजे मावळतानाही त्याच्याभोवती कमळासारखे तेज फाकते असे इथे वर्णन आलेले आहे.

अगदी भोळ्याभावड्या आणि सर्वसामान्य स्त्रीमनाने सूर्यदेवाचे हे केलेले वर्णन अतिशय मनोवेधक आणि सुशिक्षितांच्या कल्पनेलाही वेडे करणारे झालेले आहे. त्यामुळे जाणत्या मनाला याविषयी विचार करताना प्रत्यक्ष सूर्याच्या तेजाशी या विलोभनीय सौंदर्याची तुलना करावयाचा मोह व्हावा एवढ्या या ओव्या हृदयंगम झालेल्या आहेत.

सामान्य स्त्रीमनाने केलेले निसर्गाचे वर्णन म्हणून या गीतांची थोरवी फार मोठी ठरेल.

## तुळस

आपल्याला चांगला नवरा मिळावा, आपले सौभाग्य अखंडपणे टिकावे, आपल्या मुलाबाळांचे आयुष्य उदंड व्हावे, आपले घर खातेपिते असावे, घरात लक्ष्मी नांदावी आणि एकट्या तुळशीला केलेला नमस्कार चुकल्या देवांना पोचावा, या भोळ्या भावनेने बायका तुळशीची पूजा नित्यनियमाने करीत असतात.

रोज सकाळी उठावे, अंगण झाडून काढावे, सडा शिंपावा, रांगोळी घालावी आणि स्नान करून तुळशीला पाणी घालीत तिची पूजा करावी, असा बहुतेक प्रत्येक स्त्रीचा रोजचा अगदी ठरलेला कार्यक्रम असतो. त्यात खंड म्हणून सहसा नाही! तुळशीची ओलेती मंजिरी डोळ्याला लावायची आणि तिच्या पानावरून खाली ओघळणारे पाणी प्यावयाचे, या शुभ गोष्टी मानून बायका आवर्जून त्यांचा वापर करीत असतात.

एखादी मुलगी तुळशीला पाणी घालायला लागली म्हणजे मग वडीलधारी बाई गमतीने पुटपुटते, 'मेला कुठं बसलाय कुणाला माहीत? चांगल्या पायानं येऊ दे मजी बास!' म्हणजे जणू उत्तम नवरा मिळवावा एवढाच या तुळशी-पूजेमागचा त्या मुलीचा हेतू असतो!

संत बहिणाबाईने या तुळशीमाहात्म्याची थोरवी अशी गायिली आहे :

**जेथ आहे तुलसीचे पान**
**तेथ वसे नारायण**

म्हणजे तिच्यासारख्या विचारी बाईलादेखील तुळशीचे पान आहे तिथे नारायणाचे, परमेश्वराचे, अस्तित्व असल्याची जाणीव झाली! तेव्हा सामान्य बाईला तसे वाटले तर नवल नाही!

तुळशीची रोजची पूजा करताना खेडोपाडीच्या बायका मोठ्या भक्ति-भावाने म्हणतात :

**'गेलीवती तुळशीपशी, तितं हुता ऋषीकेशी, आनीक माजा नमस्कार पोचूदे देवा पांडुरंगाशी.'**

इथे तुळशीच्या ठिकाणी भगवान श्रीकृष्णाचे वास्तव्य या बायकांना आढळले आणि म्हणून त्यांनी कृष्णाचाच नवा अवतार घेतलेल्या विठ्ठलाला त्याच्याकरवी नमस्कार धाडण्याचे धाडस केले आहे.

**'कुंकूवान, कुंकूपान, कुंकवाचं नेसनं. अर्धांगी बसनं. सून स्वभावती, लेक कमलावती, माजा नमस्कार ईश्वरपार्वती.'**

या ठिकाणी सुनालेकींच्या चांगुलपणाबरोबरच सौभाग्याच्या लेण्याचा—कुंकवाचा—अभिमानाने उल्लेख आला असून, अशा वैभवामध्ये असलेल्या माझा नमस्कार शंकरपार्वतीला असू दे असा विश्वास व्यक्त केलेला आहे. भोळ्या

मनाने प्रकट केलेला हा विश्वास जुन्या काळातील सुखी एकत्र कुटुंबाचा आणि पातिव्रत्याचा अभिमान बाळगणाऱ्या स्त्रीचा आदर्श म्हणून पहाण्यासारखा आहे.

**'तुळशी ग बाळं, तुजं अमृताचं जाळं, रामानं आनली, लक्ष्मनानं लावली, सीताबाईनं जोपा केली, सोन्याचा करंड, रुप्याचं झाकण आनीक माजी सेवा तुला केली कृष्णार्पण.'**

या पूजेमध्ये तुळशीची आत्मकथा व तिच्याबद्दलचा भोळा भाव प्रकट झालेला आहे. पतिव्रता सीतामाईच्या रामाने तुळशीला आणली, लक्ष्मणाने लावली व सीतेने तिला वाढविली एवढी तिची थोरवी आणि पावित्र्य आहे, अशी इथे आलेली कल्पना तुळशीचे माहात्म्य केवढे मोठे आहे ते सांगते आहे. तुळस म्हणजे जणू अमृताचे जाळे ही इथे सांगितलेली भावना मोठी हृद्य आहे. अमृत म्हणजे मेलेल्याला जिवंत करणारी पवित्र वस्तू. त्याचे वास्तव्य तुळशीच्या ठिकाणी म्हणजे तीही परम पवित्रच म्हणावयाची!

सोन्याच्या करंड्याची या गीतात आलेली माहिती वैभवावरोबरच सौभाग्याचाही उल्लेख करीत आहे. त्याचप्रमाणे या ठिकाणी शेवटी आपली सेवा कृष्णाला, भगवान नारायणाला, अर्पण केली असे जे म्हटले आहे त्यावरूनही तुळशीचे माहात्म्य अधिक गौरविले गेले आहे.

**तुळशी बाईला कोन न्हाई नातं गोतं**
**काळ्या मातीवर हिची उगवली रोपं**
**तुळशी ग बाई नको हिंडू रानीवनी**
**पैस ग माजा वाडा जागा देते ब्रींदावनी**

तुळशीला कोणी नात्यागोत्याचे नसल्याकारणाने तिने रानीवनी न फिरता आणि वाटेल तिथे पाय रोवून न बसता माझ्या ऐसपैस अशा मोठ्या वाड्यातील वृंदावनात तिने रहावे, अशी विनंती या गीतात तुळशीला केली गेली आहे.

तुळशीला आपल्या घरच्या वृंदावनात रहाण्याची केलेली इथली विनंती फारच चित्तवेधक तशीच आपुलकीचीही आहे.

तुळशीचे झाड हे काळ्या मातीत कुठेही उगवते अशी त्याची असलेली ख्यातीदेखील इथे प्रकट झाली आहे.

तुळशीची सेवा कोण करितो जनात
पुत्र मागीतो मनात
तुळशीची सेवा कोन करीतो दुपारी
सका पुत्राचा भिकारी

या ओव्यांमध्ये 'मला पुत्र होऊ दे' म्हणून तुळशीकडे मागणी करून तिची पूजा करणाऱ्या पुरुषभक्ताची इच्छा व्यक्त झाली आहे. वायकामंडळी तुळशीची पूजा नेहमी सकाळी करीत असतात, परंतु पुरुषांनी दुपारच्या वेळी ती केल्याने इथे निराळा भाव प्रकट झालेला आहे!

सकाळी उठूनी तोंड पाहिलं एकीचं
दारी वृंदावन झाड तुळशी सखीचं

सकाळच्या प्रहरी उठल्याबरोबर दारी असलेल्या वृंदावनातील तुळशीबाईचे दर्शन प्रथम घडले असल्याची हकिगत ही ओवी सांगते आहे. तुळशीला इथे मैत्रीण म्हटले असून वायका खरोखरच अतिशय गोडीगुलाबीने व जिव्हाळ्याने तिच्याशी वागताना दिसून येतात. सकाळी ज्याचे तोंड पहावयाचे त्याच्या दर्शनाप्रमाणे दिवस जातो, अशी आपली एक भोळी समजूत आहे. त्यामुळे चांगले माणूसच आपल्याला प्रथम भेटावे म्हणून माणसाची मोठी धडपड चाललेली असते. म्हणून सर्वांत प्रथम तुळशीचे दर्शन घडल्याने आनंद झाल्याची गोष्ट इथे सूचित केली गेली आहे.

तुळशीला घाली पाणी हात पुरंना नेणतीचा
लाडकी मैना बाई जोडा मागती प्रीतीचा
तुळशीला घाली पाणी तुळशीची झाली तुळी
आक्का सावळ्या बाळाची पतिव्रताची बांदा माळी
तुळशीला घाली पाणी ह्या ग तुळशीला आलं गोंडं
लाडक्या भैनाईला पतिव्रताला राज दंडं
तुळशीला घाली पाणी तुळस वाड्याच्यावर गेली
माज्या ग लाडकीनं पतिवरतानं जोपा केली
तुळशीला घाली पाणी तिथं सोन्याचो चंबू झारी
आंगुळीला गेले देव मारुती बरमचारी

**तुळशीला घाली पाणी — हात पुरंना ब्रिंदावनी**
**ताईता बंधुराया — बांध पायरी सरावनी**
**तुळशीला घाली पाणी — तुळस झालीया झपायीळ**
**माजा ग बाळराज — पाणी घालितो गोपाईळ**
**तुळशीला घाली पाणी — बाई तुळशी खाली झरा**
**बया माझ्या मालणीचा — पतिवरताचा नेम खरा**

तुळशीला पाणी घातले असताना कोणाचे भाग्य कसे उजळते याची मोठी सुंदर हकिगत या गीतात आलेली आहे.

तुळशीला पाणी घालायला लहानग्या बाळीचा हात पुरेना तेव्हा देवाने मनात राग न धरता तिला चांगला नवरा मिळवून द्यावा, अशी इथे केलेली सूचना मोठी चित्तवेधक आहे. त्याचप्रमाणे हा हात तेथवर जावा म्हणून भावाला श्रावणात तुळशीवृंदावनाला पायऱ्या बांधायला केलेली विनंतीदेखील विशेष आपुलकीची व भक्तिभावाने प्रेरित झालेली आहे.

तुळशीच्या झाडाखाली पाण्याचा झरा निर्माण होण्याचे कारण म्हणून आईने नित्यनियमाने तुळशीला पाणी घालून पातिव्रत्याची केलेली जोपासना सांगताना इथे व्यक्त झालेली कल्पना हृदयंगम आहे. त्याचबरोबर तुळशीला पाणी घातल्याकारणाने पतिव्रतेला शोभा येणे व तिच्यावर खूष होऊन तुळस वाढीला लागणे अशी इथे सांगितलेली श्रद्धाळू गोष्टही विशेष अभिनव आहे.

रोज पाणी घालून तुळशीचे खोड तुळीसारखे व्हावयाचे व त्यामुळे वहिणीचे घरावर माळी (माडी) बांधावयाची सूचना पुढे यावयाची, अशी या गीतात आलेली माहितीही मोठी गमतीची आहे.

मारुतीसारख्या ब्रह्मचाऱ्यानेदेखील सोन्याची चंबूझारी घेऊन तुळशीला पाणी घातले, अशी माहिती देताना इथे निष्काम भक्तीने वाढणारे तुळशीमाहात्म्य सांगितलेले आहे. त्याचप्रमाणे मुलाने पाणी घातले तरीही तुळस झपाट्याने वाढल्याचे सांगताना, तुळशीपूजा ही स्त्रियांच्याप्रमाणेच पुरुषांनाही प्रिय असल्याची खूणगाठ उकलून दाखविलेली आहे.

**तुळशी बाईची ग — कुनी मस्करी सये केली**
**देवा माज्या गोविंदानं — तिची मंजूळा हालविली**

तुळशीची मंजिरी हालली तेव्हा गोविंदाने (कृष्णाने) तिची थट्टामस्करी केली असली पाहिजे, असा तुळशीबद्दलचा विनोदी उल्लेख इथे आलेला आहे. देवादिकांना मानवी रूप देऊन आपल्या मनातील भाव त्यांच्या खाजगी संबंधातही मिसळून ते व्यक्त करण्याचा हा प्रकार लोकगीतांत वारंवार आलेला दिसून येतो.

तो ग माजी ग ओवी पहिली बाई मी तुळशीला घाली ओटा
त्या ग तुळशीचं नाव घेता बाई पाप पळालं चारी वाटा
तो ग माजी ग ओवी दुसरी बाई मी तुळशीला घाली आळं
त्या ग तुळशीचं नाव घेता बाई पाप पळालं रानोमाळ
तो ग माजी ग ओवी तिसरी बाई मी तुळशीचं लावी रोप
त्या ग तुळशीचं नाव घेता बाई पाप पळालं आपोआप
तो ग माजी ग ओवी चवथी बाई मी तुळशीला घाली पाणी
त्या ग तुळशीचं नाव घेता बाई झाली पातकाची धुनी
तो ग माजी ग ओवी पाचवी बाई मी तुळशीला लावी कुंकू
त्या ग तुळशीचं नाव घेता बाई वैकुंठीचा आला नायकू
तो ग माजी ग ओवी सहावी बाई मी तुळशीला लावी बुक्का
सावलीत ग तिच्या बाई झोप घेतो ग माझा तुका
तो ग माजी ग ओवी सातवी नित तुळशीला दावी बोणं
त्या ग तुळशीचं नाव घेता बाई धनदौलतीला काय उणं

तुळशीमाई एवढी पवित्र की, तिचे नाव घेता क्षणी पापाचा नायनाट होतो आणि माणूस पुण्यशील होतो अशी चित्तवेधक माहिती या गीतांनी दिलेली आहे. हा विशेष श्रद्धेचा भाग आहे. त्या श्रद्धेमुळे निर्माण झालेल्या निष्ठेचे हे फळ आहे.

तुळशीचे रोप लावणे, तिला आळे तयार करणे, तिचा ओटा बांधणे इत्यादी या क्रिया करीत असताना पापाची हकालपट्टी कशी होते हे त्या त्या क्रियेनुसार वेग दाखवीत आविष्कृत होत गेल्याने ही श्रद्धा इथे हृदयस्पर्शी झालेली आहे. प्रत्यक्ष तुळस ही माणसाच्या पापाची धनीण होते अशी इथे आलेली भावना या श्रद्धेवर चढलेला यशस्वी कळस होय!

कुंकू लावल्याने तुळशीबाईमध्ये वैकुंठीच्या नायकाचे स्वरूप दिसू लागते अशी या गीतात आलेली कल्पना विशेष अद्‌भुत चमत्कार दाखविणारी पण हृद्य झाली आहे.

तुळशीला बुक्का लावल्यामुळे तिच्या ठायी तुकोबाराय झोप घेत असल्याची इथे सांगितलेली कल्पना माणसांच्या मनात तुळशीमाहात्म्याची भव्यता आणखी निर्माण करीत आहे.

तुळशीला नैवेद्य (बोणे) दिल्याकारणाने घरात धनसंपत्तीला काहीही उणे पडत नाही असा इथे व्यक्त झालेला मनाचा मोठेपणा भोळ्याभाबड्या भक्तीचा द्योतक आहे.

ओळीने सात ओव्या गात तुळशीची केलेली ही भावनात्मक पूजा मोठी हृदयंगम तर आहेच, पण प्रामाणिकपणाने देवाजवळ व्यक्त झालेली खाजगी भावना किती उच्च कोटीची असू शकते याची निदर्शक म्हणूनही पहाण्यासारखी आहे.

**पहिली माझी ओवी रामाला गाईली**
**विष्णूच्या पदावरी लक्ष तुळस वाहिली**
**पहिली माझी ओवी पहिला माझा नेम**
**पोथी वाचीतो सखा तुळशीखाली राम**
**तुळशीला घाली पाणी मागं फिरून मारुतीला**
**सावळ्या बाळराजा दुरडी बेलाची म्हादेवाला**
**सकाळच्या पारी दार उघडीते नीट**
**तुळशीकडेनं माजी वाट राम वाचीतो हरीपाठ**

तुळशीच्या पूजेमुळे इतर देवादिकांच्या सहवासात तिचे असलेले स्थान भोळ्या मनाला कसे दिसू शकते, याचा या गीतांनी एक आदर्श नमुना दाखविलेला आहे. त्याचबरोबर तिला बरोवर घेऊन इतर देवांचीही पूजा करणे कसे शक्य होते अगर ती कशी केली जाते, हेही यावरून दिसून येते.

**जे जे घालू तुळशी वटा**
**इघ्न पळे बारा वाटा**
**तुळस वंदावी मावली**
**संतांची सावली**

जे जे घालू तुळशी आळं
पातकाचं व्हईल काळं
तुळस वंदावी मावली
संतांची सावली
जे जे घालू तुळशी माती
इष्न पळे हातोहाती
तुळस वंदावी मावली
संतांची सावली
जे जे घालू तुळशी पाणी
इष्न पळे रानीवनी
तुळस वंदावी मावली
संतांची सावली
जे जे लावू तुळशी कुंकू
पूजा करून गेली सखू
तुळस वंदावी मावली
संतांची सावली
जे जे लावू तुळशी बुक्का
कैलासाला गेला तुका
तुळस वंदावी मावली
संतांची सावली
जे जे लावू तुळशी दिवा
उजेड पडे सगळीक देवा
तुळस वंदावी मावली
संतांची सावली
जे जे लावू तुळशी बोनं
पंढरीशी झालं जाणं
तुळस वंदावी मावली
संतांची सावली

जे जे घालू तुळशी फेऱ्या
झाल्या पंढरीच्या वाऱ्या
तुळस वंदावी मावली
संतांची सावली
तुळशीला आल्या शेंगा
मळा घालू पांडुरंगा
तुळस वंदावी मावली
संतांची सावली

पंढरीच्या वारीला जाताना पालखीबरोबर प्रवासात आपल्या डोईवर तुळस घेऊन जाणारी वारकरी स्त्री या पद्धतीने तुळशीचे वैभव गात पांडुरंगाच्या भेटीची जेव्हा अपेक्षा करते तेव्हा तिच्या बुद्धीची तारीफ करावी तेवढी थोडीच होते. कारण तिने तुळशीच्या या परीच्या पावित्र्याच्या गोष्टी सांगाव्यात तरी किती आणि संतांची सावली व देवादिकांची माउली झालेली तुळस डोईवर बाळगावी तरी कुठवर याचा भ्रम तिच्याकडे बघणाराला होतो. एवढेच नाही तर प्रत्यक्ष पांडुरंगाचे दर्शन झाल्याचा भास व्हावा एवढा सुंदर देखावा या तुळशीमाहात्म्याने त्याच्या नजरेत खेळू लागतो ! आणि मग त्याची इच्छा असो की नसो, आपोआप त्याचे हात विनम्र भावाने त्या तुळशीपुढे जोडले जातात.

ये ग तुलसी सकूबाई
का ग एकली वनामंदी
ये ग आपुल्या घरकुलात
ये ग आपुल्या गोकुलात
जागा देईन मांगलेदारी
तुला बांदिली गऊंडयांनी
पानी घालुनी वाडविली
ये ग तांब्याच्या कलशीनं
पानी घालुनी वाढवीन
ये ग पाटंच्या पान्यामंदी
ये ग कोंबडयाच्या बाकामंदी

उठा सयानू दलनाला
जातं मांडू ग अंगनात
बसा सयानू दलनाला
माजं दलान सव्वा खंडी
सव्वा खंडीला दिली मांडी
माज्या मांडीला आला कडू
उठा सयानू दलनाला
पीठं भरा ग जात्यायाची
पीठं भरा ग राजन्यात (बुटीत)
तवा ठेवा ग चुलीवरी
पीठ घे ग तू काटवटीत
चला सयानू शेतामंदी
बैल जुपीले शेतामंदी
शेतामंदी ग चिखल पाडली
रोप उपटाया चला सयानू
रोप उपटून झाली नऊ
रोप लावाया चला ग
बैल जुपीले शेतामंदी
उठा सयानू भात लावू
चला जेवनाची पाटी घेऊ
नंदीयोला ग पानी आलं
तुळस मंदिरी कशी डोलं

रत्नागिरीकडील असूद गावच्या आनंदी नावाच्या एका बाईने दिलेल्या ह्या गीतात तुळशीची केलेली मैत्री मोठी अपूर्वाईची आहे. आपल्या घरी तिला बोलावून तिच्या वनातील एकलेपणाला बाजूला सारीत ही स्त्री इथे तिच्या-जवळ गुजगोष्टी करते आहे. पहाटेच्या वेळी तिला कोंबडयाच्या आरवण्यातून बोलावते आहे! तसेच दिवसभरची आपली कहाणी तिला ऐकवीत असतानाच तिचे मंदिरातील डोलणे तिला संतोष देत असल्याचे म्हणते आहे. पावसाचे दिवस,

कोकणातील वातावरण, भातशेती, ह्या चांगल्या रेखीव पार्श्वभूमीवर रंगणारी या गीतातील तुळशीची सोबत कोणालाही हेवा वाटेल इतकी छानदार रीतीने इथे प्रकट झालेली आहे.

लोकगीतांचे माध्यम स्वीकारीत आमच्या खेडूत स्त्रियांनी तुळशीची पूजा या प्रकारे आज कितीक वर्षे केलेली आहे. या पूजेचे असेच आणखीही काही प्रकार असू शकतील. पण सर्व प्रकार अशाच श्रद्धेने नटलेले आणि भोळ्या भावनेनेच माखलेले असणार.

एकाच ठिकाणी सर्व देवादिकांचे दर्शन घडविणाऱ्या तुळशीदेवीची ही दुनिया आणि कर्तबगारी सामान्य मनाला विलक्षण भुरळ पाडणारी आहे. त्याचप्रमाणे मानसशास्त्राच्या दृष्टीने सुशिक्षित विचारी मनालाही अभ्यासपूर्वक विचार करायला लावणारी आहे.

## कृष्णा-कोयना

जुन्या महाबळेश्वरामध्ये उगम पावून सातारा, कोल्हापूर, बेळगाव, इत्यादी जिल्ह्यांना पावन करीत मच्छलीपट्टणजवळ जाऊन समुद्राला मिळालेली कृष्णा नदी म्हणजे भाविक हिंदुमनाची एक आवडती देवता आहे. भारतामध्ये गंगा नदीला जेवढे महत्त्व तेवढेच दक्षिण महाराष्ट्राला कृष्णेचे वेड आहे. एखाद्या देवतेप्रमाणे मराठी मन कृष्णेची भक्तिभावाने पूजा करीत असते. तिच्या सान्निध्यामध्ये सर्व देवतांना प्रसन्न करून घेता यावे, तिच्या स्नानाने स्वतःचा देह पावन करून सोडावा, तिच्या सहवासात शेतसराई भरघोस पीक देणारी व्हावी आणि तिला नारळ अर्पण केला असताना सर्व चांगले तेवढे आपणाकडे यावे, या भावनेने प्रेरित होऊनच मराठी मन कृष्णेची पूजा करीत असते.

आमच्या सामान्य स्त्रियांनी ह्या कृष्णेची व साताऱ्यातील कराडगावाजवळ तिला येऊन मिळणाऱ्या कोयनेची कल्पना आपल्या ओव्यांमधून अशी रंगविलेली आहे :

**भरली किष्णा कोयना कोयना हातोडी खडा फोडी**
**बंदु दंडानं पानी तोडी**

भरली किष्णा कोयना बेटं मुजली कंजाळाची
धाव पडली सांगाड्याची
भरली किष्णा कोयना किष्णा आलीया वाईदेशी
कोयना आलीया कोकनाशी
भरली किष्णा कोयना दोगींच्या झाल्या भेटी
सैदापूराच्या पैलतटी
भरली किष्णा कोयना पाणी चडलं गुमानीत
बुडली शिकरं तासात

कृष्णा आणि कोयना या दोन्ही नद्यांच्या प्रवासातील मुलुखाची आणि त्यांना आलेल्या महापुराची माहिती इथे आलेली आहे.

कोयनैचे पाणी दोन्ही बाजूंचा कडा फोडीत चढले असताना भाऊ पोहायला निघाला आहे, कृष्णा-कोयनेच्या पुराने भोवतालची झाडेझुडे आणि वनस्पती बुडून गेल्या आहेत, अशा वेळी सांगाड्यांनी आपल्या भोपळ्यांच्या सांगडी नदीत टाकल्या आहेत. दोघींचेही पाणी भरमसाट चढून काठावरील किंवा पात्रांमधील देवळांची शिखरे त्यांच्या तासात म्हणजे पात्रात बुडाली आहेत आणि दोघींची भेट सैदापुराजवळ घडली आहे, अशी ही एक अपूर्वाईची कथा आहे.

नदीला पूर आला असताना आणि बेफाम वेगाने धावणारे तिचे पाणी नजरेत भरले असताना सुचलेले हे विचार आहेत. या विचारसौंदर्याला कल्पनेची फार मोठी भरारी लाभलेली नसली तरी कविमनातील प्रामाणिकपणा मात्र येथे भरपूर दिसून येतो.

किष्णाबाई बोलं कोयना अवकाळ तुजं पाणी
दोघी जाऊया शांतवानी
कोयनाबाई बोलं किष्णा नळात का ग गेली
इंग्रज सायेबांनी बळजबर त्येनी केली
किष्णाबाई बोलं नको इंग्रजा बांधू पूल
खेड्याचा न्हानावाला जोड्यासकट पाय दील
किष्णाबाई बोलं कोयना तपाची झाली राक
इंग्रज सरकारानी मला नळात नेली पाक

कृष्णा आणि कोयना या दोघीजणी एकमेकींशी इथे हितगुज करीत आहेत. कोयनेचे पाणी अवखळ म्हणून संगमानंतर एकत्र वहायचे तर शांतपणे जाऊया असे कृष्णा तिला सांगते आहे आणि मग ते तिने जणू मान्य केले असे गृहीत धरूनच कोयना कृष्णेला विचारते आहे की, तुला इंग्रजांनी वळजवरी करून नळात का बरे नेली ? त्यामुळे कृष्णाही तिला सांगते आहे की, माझ्या तपाची राखरांगोळी करून मला नळामध्ये नेली आणि जणू लोक माझ्या पायाशी यायचे ती मीच त्यांच्या पायाशी गेले! अलीकडच्या या नव्या सुधारणेमुळे लोकांची सोय झाली, तरी प्रत्यक्ष नदीला काय वाटत असेल याची स्त्रियांनी केलेली ही कल्पना खरोखरच लक्षात घेण्याजोगी आहे!

या गीतामध्येच कृष्णेने इंग्रजाला पूल बांधताना नकार दर्शवून दिलेला इशारा मोठा मजेशीर आहे! ती म्हणते की, माझ्या डोक्यावर जर पूल बांधला जाईल, तर खेडचातून येणारा माणूस मला बघून मान द्यावा म्हणून पायातील जोडा काढीत असे, तो आता माझ्या डोक्यावर त्याच्यासह पाय देऊन खुशाल पुढे जाईल!

स्वत:च्याजवळ असलेल्या भाविक श्रद्धेला बळी पडून व्यक्त झालेली ही भावना मोठी अभिनव तशीच जुनी चालरीतही दर्शविणारी आहे. वास्तविक पादत्राण पाण्याचा स्पर्श झाल्याने भिजून खराब होईल हे एक आणि दुसरे म्हणजे सहजगतीने नदीतून चालता यावे म्हणून ते काढून घ्यावयाचे असते. पण श्रद्धाळू मनाला ही भाविकता अधिक पटली आणि तिचा असा हा मनोहर आविष्कार झाला!

कृष्णा-कोयनेवर रचलेल्या आणखी अशाच पुष्कळ ओव्या असतील. परंतु मला जेवढ्या गवसल्या त्यांचे रंगरूप हे असे आहे.

## एकादशी

आपले आणि आपल्या मुलाबाळांचे भले व्हावे, म्हणून खेडोपाडीच्या असंख्य स्त्रिया उपासतापास करीत असतात. त्यामुळे आपल्या इच्छित कार्यास चांगली फलप्राप्ती होते अशी त्यांची समजूत असल्याकारणाने, हे उपवास त्या मन लावून आणि भोळ्या श्रद्धेने करीत असतात. एवढेच नव्हे तर त्या आनंदात

इतर कशाचेही भान राहू शकत नाही एवढा छंद एखाद्या उपवासाच्याएकी त्यांना लागलेला दिसून येतो! दर पंधरवड्याला येणाऱ्या एकादशीचे माहात्म्य तर विशेषच असते. हा उपवास बहुतेक सर्व भाविक स्त्रिया करताना दिसून येतात.

**शेजी विचारीती सडा पोतीरा आज कायी**
**आली एकादशी बाई**

एकादशी करावयाची म्हणजे स्वतः डोक्यावरून स्नान करावयाचे आणि घरदार किंवा विशेषतः सैंपाकघर सारवून काढावयाचे. सर्वत्र स्वच्छता राखल्याने मनही प्रसन्न रहाते हा त्या मागचा हेतू आहे. त्यामुळे असे सारवण निघाले म्हणजे साहजिकच एखादीला 'आज काय बेत ग?' असे शेजारीण विचारीत असते आणि तिला 'आज एकादशी नाही का?' असे उत्तरही मिळते. त्याच भावनेचा या ओवीमध्ये आविष्कार झालेला आहे.

या ओवीवरून आणखी एक गोष्ट लक्षात येते ती अशी की, जुन्या काळी असे सारवणसुरवण अशा उपवासाच्या निमित्तानेच तेवढे होत असावे! एरवी ते जर नित्यातले असते तर असा प्रश्न विचारावयाचे कारणच उरले नसते.

**एकादशी बाई का ग दारात तू उभी**
**केळीच्या पानावरी चल बारस सोडू दोघी**
**एकादशी बाई सांग माझ्या कानामंदी**
**बारस सोडायाला जाऊ तुळशीबनामंदी**
**एकादशी बाई तुजं कुठवर ग जानं**
**तुळशीबनी आमचं ठाणं घरी सांजला आमा न्हानं**

उपवास सोडावयास चांगले अन्नपात्र म्हणून केळीच्या पानाची निवड केली जाते. हेतू एवढाच की, एक तर ते स्वच्छ असते आणि अन्नाचा लवलेशही यापूर्वी त्यास लागलेला नसतो. तेव्हा या केळीच्या पानाचा उल्लेख इथे त्या दृष्टीने आलेला असावा.

खुद्द एकादशीलाच 'तू दारात उभी का? अशी आत येऊन माझ्या-बरोबर उपवास सोड', अशी मोठी अद्‌भुतरम्य विनंती इथे केली गेली आहे!

हा उपवास (बारस) सोडावयाचा तर तुळशीच्या बनामध्ये जाऊया अशी कानगोष्ट या गीतात एकादशीशी केलेली असून आमचे रहाणे दिवसा तुळशी-बनात परंतु रात्री मात्र घरी असा इशाराही तिला दिलेला आहे! कारण बारस सोडायला म्हणून जे जावयाचे ते वेळेला घरी येण्याच्या टप्प्यात असावे हा हेतू तिला जरूर कळावा, ही त्या इशाऱ्यामागची कल्पना आहे! एकादशीशी केलेली ही कानगोष्ट अतिशय परिणामकारक उतरली असून, तिच्यामागे असलेली प्रामाणिक पण सत्य गोष्टही आकर्षक झाली आहे. कोणत्याही कामासाठी घराबाहेर पडणाऱ्या स्त्रियांनी वेळीच घरी परतावे अशी इथे न कळत सूचित केली गेलेली भावना सत्य परिस्थितीला धरून अशीच आहे. पण ती प्रत्यक्ष सरळ सरळ बोलून न दाखविता या रीतीने सांगितली गेली आहे इतकेच!

**एकादशी बाई दुवादशीला करते वांगं**
**बारस सोडायाला देव आल्याती पांडुरंग**
**एकादशी बाई दुवादशीला करते भात**
**बारस सोडायाला देव आल्याती एकनाथ**

एकादशी सोडावयाची म्हणजे व्यवस्थित सैंपाक करून मग जेवण्याची प्रथा आहे. आदल्या दिवशी उपवास घडल्याने भूक लागलेली असते आणि गोडधड अन्न ग्रहण करून पोट भरावे ही त्यामागची भावना असते. कुणी कुणी फक्त पाण्यावर राहूनही एकादशी करतात! त्यांना अशा जेवणाची आवश्यकता असते आणि केवळ फराळ करून दिवस काढल्याने कुणाची भूकही भागलेली नसल्याने त्यांना पण चवीचे जेवण हवे असते. तेव्हा वांगे आणि भात केला असून जेवायला पांडुरंग आणि एकनाथ आल्याची माहिती या जेवणाच्या निमित्ताने येथे आलेली आहे. वास्तविक वांगे अगर भात या जिनसा आजकालच्या रोजच्या जेवणातील आहेत. परंतु ज्याअर्थी त्यांचा इथे मुद्दाम उल्लेख आला आहे, त्याअर्थी पूर्वीच्या काळी सणावारीच त्यांचा वापर होत असावा, असे दिसून येते.

**एकादशी बाई नाव तुजं कवयीळं**
**लगूड बंदापाशी रामसीतेचं देवूयीळ**

एकादशी हे नाव कोवळ्या मुलीसारखे नाजूक असून तिच्या निमित्ताने ठराविक ठिकाणी असलेल्या रामसीतेचे दर्शन घ्यावे लागत असल्याचे हे गीत

सांगते आहे. या ओवीत सांगली जिल्ह्यामधील अष्टे (ता. वाळवे) येथील लगूडबंदाच्या विहिरीजवळील देवळाचा उल्लेख आलेला आहे. परंतु इतरत्र त्या त्या गावाप्रमाणे हे स्थान बदलते रहाते. तथापि ओवीचा इतर भाग मात्र असाच कायम असतो.

या गीतात एकादशीला कोवळी म्हटले आहे त्याचे कारण माझ्या कल्पने-प्रमाणे तिच्याबद्दल वाटणारा जिव्हाळा असला पाहिजे. एरवी या विशेषणाची आवश्यकता भासली नसती.

**एकादशी बाई आहे निर्मळ तुझा धंदा**
**संत लागले तुझ्या छंदा**

ज्याअर्थी संत मंडळी—वारकरी मंडळी—एकादशी करीत असतात, त्याअर्थी तिची योग्यता मोठी असून तिचा हा व्यवसायही निर्मळ आहे, असे एकादशी माहात्म्य ही ओवी दर्शवीत आहे. एकादशीचा हा व्यवसाय म्हणजे तिच्या निमित्ताने घरीदारी व अंतःकरणात होणारी स्वच्छता.

उपासातापासावरील अशी पुष्कळ गीते मराठीत सापडतील. त्याचप्रमाणे श्रावणात सांगण्यात येणाऱ्या व्रतवैकल्यावरील कहाण्याही मराठीमध्ये आहेत. परंतु केवळ वानवळा म्हणूनच मी हे एकादशी माहात्म्य इथे सांगितले आहे.

## लक्ष्मी आई

लक्ष्मी ही संपत्तीची देवता म्हणून सर्वत्र मानण्यात येते. या देवतेने आपल्या-वर प्रसन्न व्हावे आणि आपले घर खाते पिते होऊन सुखाने नांदावे, म्हणून शेतकरी मंडळी शेतावर या देवतेची पूजा करीत असतात. नवीन पीक तरारून वर आले म्हणजे प्रामुख्याने ही पूजा केली जाते. त्याचप्रमाणे खळ्यावर मळणी सुरू झाली म्हणजे धान्याच्या राशीचीही अशी पूजा करण्यात येते. ह्या पूजेसाठी हळदकुंकू, फूल, गंध, उदबत्ती, नैवेद्य वगैरे साहित्य गोळा करतात.

**लक्ष्मी आई आली तू ग आल्याली जाऊ नको**
**माझ्या ग बाळाचा धरला पालव सोडू नको**
**लक्ष्मी आई आली आली बैलाच्या ग नकी**
**माजा ग बाळराज धड्यानं सोनं जोकी**

या ओव्यांनी लक्ष्मी आईच्या आगमनाची व तिला केलेल्या प्रेमळ विनंतीची माहिती दिली आहे. माझ्या बाळाचा धरलेला पालव सोडू नकोस, चालू काळात बसलेली शेताची घडी न विसकटता उलट ती वाढीला लाव, अशी विनंती येथे करण्यात आली असून, ती पाळली जाईल अशी मनात निर्माण झालेली आशा फुलावी म्हणून बैलाच्या पायांच्या नखात तिचे वास्तव्य आहे, तेव्हा त्या हिंमतीवर माझा बाळ भरपूर संपत्ती मिळवील, असेही मनमोकळेपणाने या गीताने सांगितले आहे!

बैलाच्या शक्तीवर आणि मदतीवर शेती अवलंबून असल्याने, ती भावना लक्षात घेऊनच झालेला हा आविष्कार मोठा आकर्षक आहे. साध्या भोळ्या मनाने दिलेला हा एक विलोभनीय कौल आहे.

**लक्ष्मी आई आली आली शेता नि शिवारात**
**सावळ्या बाळराजा पाणी तुझ्या की घागरीत**
**लक्ष्मी आई आली आली शेताच्या बांधासडी**
**माझा ग बाळराज हाती गोफण पाया पडी**

लक्ष्मीचे आगमन कुठे आणि कसे झाले त्याची मनोहर हकिगत इथे आलेली आहे. मुलाच्या घागरीत पाणी आहे त्याअर्थी लक्ष्मीचे आगमन शेतामध्ये झाले आहे आणि हातात गोफण घेऊन पाखरे हाकायला बाळ निघाला असता पाया पडतो आहे, तेव्हा ती बांधावर येऊन उभी राहिली आहे, अशी या ठिकाणी केली गेलेली कल्पना सामान्य मनाच्या कल्पनाशक्तीचा दाखला देत आहे.

**लक्ष्मी आई आली धर माझ्या तू पदराला**
**नेणंती माझी बाळं धनी दावून देतो तुला**
**लक्ष्मी आई आली धर माझ्या त्या हातायाला**
**पित्या माझ्या दौलताच्या दोघी जाऊया शेतायाला**

आपल्या मनाने लक्ष्मी आली असता तिला केलेली विनंती या पद्धतीने प्रकट झालेली आहे. ही लक्ष्मी आपल्या मुलीला चांगला नवरा बघून देईल आणि तिच्याबरोबर आपण आपल्या वडिलांच्या शेतावर जाऊन वडिलांचे घर समृद्ध करू, अशी या गीतात व्यक्त झालेली कल्पना सामान्य मनाच्या हौशी स्वभावाची

साक्ष देत आहे. संपत्ती भरपूर का हवी त्यासाठी दाखविलेली कारणे नित्य व्यवहारातील असल्याने बायकांना त्यांची गोडी अधिक. मुलीला चांगले स्थळ मिळवायचे म्हणजे आपल्या हौसेला मोल नसावे ही एक भावना आणि माहेरीही आपली हौस भरपूर भागावी ही दुसरी भावना, लक्ष्मीच्या व्यावहारिक किंवा खर्चिक स्वभावाची कल्पना देत आहे.

**लक्ष्मी आई आली उभी राहिली मधल्या बांधा**
**जडावा माझा बंदु कुरी रेटीतो गोरा चांद**
**लक्ष्मी आई आली हाती तांब्या तो अमृताचा**
**जडाव्या बंधुजीचा वाडा विचारी समृताचा**
**लक्ष्मी आई आली धरी हाताची करंगळी**
**पित्या माज्या दौलताची चल दावीते सोपामाळी**
**लक्ष्मी आई आली आली सोन्याच्या पावलांनी**
**कनगी पेवाला लागुयीनी जाते चढती डवलानी**

या गीतामध्ये लक्ष्मी आईच्या आगमनाची लागलेली चाहूल, तिने बरोबर आणलेली देणगी आणि तिने विचारले म्हणून तिला सांगितलेला वडिलांच्या घरचा पत्ता एवढी माहिती आलेली आहे. ही सगळीच कल्पना इतकी आनंद निर्माण करणारी आहे की, पहिल्या ओवीला यमकाची नीट जुळणी झाली नाही तरीही त्या ओवीतील भावना कुठे खटकली नाही.

शेतातील मधल्या बांधावर लक्ष्मी येऊन उभी रहाते आणि बरोबर आणलेले अमृत द्यावे म्हणून आपल्या अगोदरच सामर्थ्यवान व धनदौलत असलेल्या, वडिलांच्या घरचा पत्ता कुरी चालवीत असलेल्या भावाला विचारते आहे, अशी इथे सांगितलेली कल्पना मोठी अद्‌भुतरम्य आहे! त्याचप्रमाणे तिने आपल्या हाताच्या करांगुलीला धरून विचारपूस केल्यामुळे आपण मोठ्या खुषीने वडिलांचे घर तुला दाखविते म्हणून 'चल' म्हटले अशीही या ठिकाणी आलेली कल्पना विशेष हृद्य आहे!

माणसाच्या मनावर अद्‌भुतरम्य गोष्टींचा असलेला पगडा आणि अद्‌भुत चमत्काराविषयी असलेली गोडी इथे या प्रकारे प्रकट झालेली असल्याने, ती ऐकताच शेतीशी तिळमात्र संबंध नसलेली माणसेही वेडी होऊन जातात!

**लक्ष्मी ग आई चल शीवेच्या शेता जाऊ**
**चल धावेव हुबा न्हाऊ**
**लक्ष्मी ग आई चारी कोपरं आमी पाहू**
**हिरी बारवी पाणी पिऊ**
**लक्ष्मी ग आई चल आमुच्या शेतायाला**
**दुवा पित्याला दियाला**

या गीतांनी वडिलांच्या घरचे वैभव लक्ष्मीला दाखवून वडिलांना तिचा आशीर्वाद मिळविण्याचे भाग्य व्यक्त केले आहे. माहेरच्या संपत्तीबद्दलचा हा अभिमान या रीतीने इथे प्रकट झालेला आहे. बायकांना मुळातच माहेराबद्दल अपार प्रेम असते. तशात असे काही बोलून दाखवावयाचा योग आला म्हणजे त्यांच्या या भावनेला आणखीनच उधाण येते! त्या दृष्टीने या ओव्या जरूर पहाण्यासारख्या आहेत.

**लक्ष्मी आई आली तांब्यानं ताक पेली**
**बंदुरायाला माज्या गवळ्याला हाक दिली**
**लक्ष्मी आई आली मोत्यापवळ्यांनी वटी भरा**
**झाल्या तिन्ही सांजा दिव्याची वात करा**
**लक्ष्मी आई आली आली पांगळ्या पायाची**
**बंदूला करती बोली न्हाई परत जायाची**

घरी आलेल्या लक्ष्मीचे स्वागत कसे झाले आणि त्यामुळे याच लक्ष्मीला परत जायचा मोह कसा झाला नाही याची मजेदार हकिगत इथे आलेली आहे!

लक्ष्मीची ओटी मोत्यापोवळ्यांनी भरली, त्यामुळे ती खूष झाली आणि तिला भरपूर ताक प्यायला मिळाल्याने ती संतुष्ट झाली, अशी ही सुंदर कल्पना आहे. या माहितीवरून लक्ष्मीचे स्वागत जुन्या रीतिरिवाजाप्रमाणे कसे झाले हे तर दिसतेच, परंतु त्या वेळची मोत्यापोवळ्यांनी ओटी भरायची म्हणजे स्वस्ताई किती असे हेही यावरून लक्षात येते. ओटी भरावयाची म्हणजे सौभाग्याचे लक्षण आणि ताक द्यावयाचे म्हणजे अमृत प्यायला द्यावयाचे आणि तेही तांब्या भरून! तेव्हा हेही मोठ्या भाग्याचेच लक्षण होय! 'तक्रं शक्रस्य दुर्लभम्' म्हणजे ताक हे इंद्रालाही मिळायला कठीण असते, अशी ताकाची महती गायिलेली आहे.

लक्ष्मी आईला इथे पांगळ्या पायाची म्हटले आहे! याचा अर्थ एवढाच घ्यावयाचा की, तिचा पाय आता आल्या घरीच रुतून बसावा, एवढी ती खूष झालेली आहे! तिने परत न जाण्याबद्दल इथे भावाजवळ दिलेली या प्रकारची ही कबुलीदेखील मोठी हृद्य आहे.

तिन्हीसांज झाली आहे तेव्हा दिवा लावण्याविषयी या गीतात केलेली सूचनाही लक्ष्मीच्या स्वागताला शोभेल अशीच आहे.

**लक्ष्मी आई आली आली उठत बसयीत**
**माज्या ग हावशाचा वाडा गवळ्याचा पुसयीत**
**अस्तुरी पुरुषाचा दोनीचा नित्य दावा**
**लक्ष्मी आई बोलं मी उगीच आली देवा**
**अस्तुरी पुरुषाचं दोनीचं एक चित्त**
**लक्ष्मी आई बोलं मी आल्यानं न्हाई होत**

या गीतामध्ये आळशी अगर व्यसनी पुरुषाच्या घरी यायला लक्ष्मीने घेतलेले आढेवेढे आणि अशा घरी आल्याबद्दल तिला होणारा पश्चात्ताप बोलून दाखविलेला आहे.

चैनी अगर व्यसनी माणसाच्या घरी लक्ष्मी रहात नाही, असे जे व्यावहारिक जीवनात दिसून येते, त्याची प्रचिती इथे या रीतीने येते आहे! ज्या घरात नवरा बायको गुण्यागोविंदाने नांदतात तिथेच लक्ष्मीला रहायला आवडते, ही कल्पनाही इथे सूचित करण्यात आलेली आहे.

लक्ष्मी आईचे प्रतीक म्हणून कुठे कुठे शेतामध्ये एखाद्या दगडावर शेंदूर फासून त्याची पूजा करण्यात येते. अशा वेळीही यानिमित्ताने बायका पुढील ओव्या गातात:

**ईश्वबीराच्या पिंडी बेल वाहिला शिळाताजा**
**ताईता बंदू माजा पुत्र मागून आला राजा**
**ईश्वबीराच्या पिंडी सासू मालन माजी गेली**
**हळदीकुंकवाची रास खंडूनी मला दिली**
**ईश्वबीराच्या पिंडी बाई म्यां वाहिलं पिवळं सातू**
**बाळाईचं माज्या बाळ हौसंसारकं माजं नातू**

या ठिकाणी धनदौलतीबरोबरंच लक्ष्मी आईजवळ मुलावाळांची, नातवांची सुखसमृद्धीची आणि सौभाग्याच्या लेण्यांची मागणी केली असून ती स्त्रीस्वभावाला धरूनही आहे.

माझ्या ओळखीची लक्ष्मी आईची पूजा ही अशी आहे. तिची आणखी काही रूपेही असू शकतील. परंतु या पूजेमागची भावना मात्र अशीच असल्याकारणाने एवढ्यावरूनही तिच्या थोरवीची सहज कल्पना येईल.

## श्रीकृष्णाची गाणी

द्वारकेच्या श्रीकृष्णाने बाळपणी गौळणींशी केलेल्या बाळलीला आणि राधेशी केलेल्या रासक्रीडा म्हणजे सामान्य मनाचा मोठा आवडीचा विषय आहे. भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितलेली गीता आणि त्यानिमित्ताने जगापुढे ठेवलेले तत्त्वज्ञान सामान्य मराठी मनाला नीट आकलन होत नाही. परंतु महाभारतातील विविध कथा, श्रीकृष्णाबद्दलची जुनी गाणी आणि राधाकृष्णावर आधारलेल्या कपोलकल्पित हकिगती ऐकून, त्यांना कृष्णाचा महिमा मोठा वाटतो. ह्या कृष्णानेच जणू उभ्या दुनियेचा उद्धार केला आहे अशी सर्वांची भावना.

यशोदेचा कृष्ण म्हणजे देवाचे बाळरूप. त्याचे कौतुक गावयाचे म्हणजे मनाला शांती मिळवायची. अगदी बालवयात कंसाला कृष्णाने मारले, गौळणींना सळो की पळो करून सोडले, यशोदेने खांबाला बांधला असता विश्वदर्शन घडविले इत्यादी चमत्कार भाविक मनाला भुरळ पाडून सोडतात! त्यामुळे चिमुकल्या कृष्णाची ओढ ह्या मनाला एवढी लागते की, त्यापुढे जीवनातील सर्व सुख फिके पडावे!

भगवान श्रीकृष्णाच्या बाळलीलांवर आधारलेल्या कथा ऐकून स्त्रियांच्या मनाला एवढी भुरळ पडलेली असते की, आपले मूलच कृष्णाच्या जागी बसवून त्या बाळलीलांचे कौतुक गाताना त्यांना अवर्णनीय आनंद होतो. त्यामुळे कृष्णाची गाणी वहुतेकींच्या तोंडी असलेली सर्वत्र दिसून येतात आणि विशेष म्हणजे कृष्णाष्टमीच्या वेळीच त्यांचे गायन होते असे नसून फावल्या वेळीही ती त्यांच्या ओठांवर घोळत असतात. अशा वेळी ही गाणी गाणाऱ्या बाईच्या मनात एकच भावना तीव्रतेने वावरत असते की, आपल्या आयुष्याचे बरेवाईट पहाणारा हा एकच देव आहे! त्यामुळे ही भावना आविष्कृत होते वेळी तिला एक

प्रकारचा विलक्षण जिव्हाळा प्राप्त होतो. ती मोठ्या भक्तिभावाने फुलून मोहरलेली असते. कौतुकाने तिचे सर्वांग भारावलेले असते :

सूर्व्या आगाशी येतो गंगनी बाई उठूनी जेवू मागीतो चक्रपाणी
त्याची बोलती अशी जिगूनी (आई)
आदी पाण्यावनं येऊ दे काना मग मी वाडीन तुला साजना
आदी पाण्याला नको जाऊ आई मज भुकेची मोठी घाई
किष्ण जेवाया झाली घाई अजून येळ झाली न्हाई
हाती धरूनी गोकुळचा हरी दूर देई (मारणे) गालावरी
रागं बोलली चक्रपाणी गेला भाईरी हरी रुसूनी
अग सयांनू कमळावरी हरी माझा अवकाळ भारी
नंद धुंडिल्या चारी वाटा गेला गवळ्याच्या पेठा
नंद धुंडिले यमुना तीरी गवळ्याच्या आला घरी
दारी उभी राधा सुंदरी कडीवरी घेऊन आली भाईरी
आली अंगनी यशवदा नारी संबाळा आईजी आपुला हरी
खेळतो बाळ माज्या घरी
माता करीती लिंबलोन भुक्यालं म्हनती माजं तानं
दळव्या याळूची घे खवा बर्फी सुंदर देते बेदाना खरकी
पेढे साखर फेण्या रेवड्या देते बत्तासू केळं
नारिंग देते काना घे जांभूळ
रामफळ पेरू देते घे सिताफळ
मग मी देते पुंड्या ऊस, जेव तू बाळ
खिरी वेळिल्या भोपरकाळी दूधसाकरी
मग मी देते पुरणपोळी वरती सांजूरी
देते मी राजा दहीभात जेव तू निचिंत
माता कडविलं साजूक लोणी वाटी भरूनी
दारी किष्णाची बाळगोपाळ आली इडं घेऊनी

हे गाणे 'कृष्णाची न्याहारी' या नावाने लोकप्रिय आहे. सकाळच्या प्रहरी उठल्यावरोबर कृष्णाने न्याहारीचा तगादा केला. परंतु 'अजून वेळ झाली नाही,

उगाच घाई नको करू' म्हणून यशोदा त्याला रागावते व मारते. त्यामुळे कृष्ण रुसून निघून जातो. यशोदा चिंतागत होते. नंद गावभर शोधायला जातो. शेवटी राधेच्या घरी कृष्ण सापडताच यशोदेला आनंद होतो. आणि मग तो नाना प्रकारे त्याला खाऊ घालते, भुकेल्या बाळाची भूक शांत करते, अशी कल्पना इथे आलेली आहे. शेवटी कृष्णाचे खाणे संपते न संपते तोच त्याचे मित्रमंडळ खेळायला जाण्यासाठी गोळा झाल्याची माहिती या गीतात आली आहे. त्यामुळे सामान्य स्त्रीला 'आई'च्या भूमिकेमधून या सगळ्या भावनेचे विशेष कौतुक वाटते.

हेच गाणे कुठे कुठे पुढीलप्रमाणेही ऐकायला सापडते :

**सूर्व्या उगवुनी आला गंगनी किष्ण उठला बोले लहाटकरी**
**किष्ण मागीतो आईला न्याहारी आईनं दिली गालावरी**
**जिवू वाडीले नाई त्येला**
**किष्ण सांगीतो नंदाला**
**किष्ण रुसनी निगून गेला**
**नंदा धुंडील्या चारी वाटा गवळ्याच्या पेठा**
**किष्ण राधेच्या शेजेवर करी क्रीडेचा भार**
**किष्ण राधेच्या कडेवर आली सकी बाहेर**
**संबाळ आई आपला हरी खेळत बसला माज्या घरी**
**माता आळिंकी चारी भुजा आज भुकेला माजा राजा**
**आनून देते मी पुंडचा ऊस निचिंत जेव तू राजस**
**आनून देते मी धईभात सावळ्या बाळा जेव निचींत**
**खारीक खोबरे देते काना आनीक घे वरती बेदाना**
**भात वाडीते विस्तारी**
**लिंबाची घे कोशिंबिरी**
**देते रेवडचा साबन्या लाडू**
**साऱ्या परकरांनी हरी धाला इडा घेऊन खेळाया गेला**

या गाण्यामध्ये आई त्याला रोजच्या जेवणातील साध्या गोष्टी वाढीत असून तो दिसताच त्याला प्रेमाने कवटाळून धरते आहे. एरवी मागच्या गाण्यापेक्षा इथे काही फारसा फरक नाही.

| | |
|---|---|
| पंडी भिवरी पारी काशीला | आग लागू त्या गईला |
| द्वाड सव लागली तिला | जाती कुनब्याच्या शेताला |
| जुंधळा खावूनि बुडविला | तिकून कुनबी धावत आला |
| हाती भेंडाजी त्येनं घेतीला | पळता पायात काटा मोडिला |
| कुनबी माजा हा सुटला | गाया टाकुनी घरला आला |
| किष्ण बाळ बोले येशवदीला | आई मी गोष्ट सांगतो तुला |
| न्हाई जायाचा मी रानाला | गाया ऐकनात्या मला |
| सारंगी धुतळी पानी पिईना | साळी बाळी का चरंना |
| राही गुरात का मिसळना | मधुरीची चीळ का फुटंना |
| नागीवाल्याला का ऐकना | तिला घालू द्या लोडयीना |
| रुपी बिगी बिगी का चालना | आगाडीची शिकार आटपना |
| किष्ण बाळ बोले येशवदीला | आई मी गोष्ट सांगतो तुला |
| न्हाई मी जायाचा रानाला | गाया ऐकनात्या ग मला |
| काळी मैतापी गई धाकटी | खाईना झाली करडी काटी |
| वाडी मालन दुहीची जुटी | सुभद्रीला चौकार पिटी |
| धरी हरनीच्या शेपटी | धनी हिचा जगू जेटी |
| हाती सुवरनाची काठी | त्यानं आनला यमुना तटी |
| घुंबर घाली वाळवंटी | किष्ण बाळ बोले येशवदीला |
| न्हाई मी जायाचा रानाला | गाया ऐकनात्या मला |
| सुलतान गई बलीरामाची | तानी वासरं पाजीती |
| हिरकनी मकमल डरकीती | गुलाल पतींगी उदळिती |
| पंडी अंगाव धावून येती | मंगळी पान्यात बसून न्हाती |
| किष्ण बाळ बोले येशवदीला | आई मी गोष्ट सांगतो तुला |
| न्हाई मी जायाचा रानाला | गाया ऐकनात्या मला |
| संबळ ग आपली तू गुरं | असे बोलले सारंगधर |
| हात ठेवलाय कानावर | काडली मोत्याची अक्षरं |
| गाई वळू मी कुठंवर | आली भवानी मोटंवर |
| दिली लाथ गुडघ्यावर | जगी सुईरी रानावर |

रानी गिरजी ठेक्यावर संबळ ग तू आपली वासरं
किष्ण बाळ बोले येश्वदीला आई मी गोष्ट सांगतो तुला
मी न्हाई जायाचा रानाला गाया ऐकनात्या मला

या गाण्यात कृष्णाने राखलेल्या अनेक गाईंची नावे मोठ्या सुंदर रीतीने गोविली गेली आहेत. कृष्ण हा गुराखी होता आणि रोज गुरे घेऊन तो रानात जात असे, अशी जी हकिगत कृष्णचरित्रामध्ये सांगितली जाते, तिचाच हा एक आविष्कार आहे. सवंगड्यांबरोबर भरपूर खेळायला मिळावे म्हणून गाई घेऊन शेतावर न जाण्याची कारवाई करीत कृष्णाने सांगितलेली ही कारणे मोठी मजेदार तशीच ऐकणाराला त्याचेविषयी कौतुक वाटायला लावणारी आहेत. तसेच गाईंचा एकेक कळप पुढे करून 'आई, तू माझी गोष्ट ऐक' असे दर वेळी म्हणत कृष्णाने आईच्या मनावर आपली कारणे ठसविण्याचा केलेला हा प्रयत्नही मोठा विलोभनीय आहे. एवढेच नव्हे तर आपल्या बाळलीलांनी जगाला वेड लावणाऱ्या भगवान श्रीकृष्णाबद्दल मनात आधीच वसत असलेला आदर त्यावर कौतुकाचा मुलामा चढवीत तो वाढीला लावणारा-देखील झाला आहे!

पैलीच गवळन ग पैलीच गवळन ग
पैलीच गवळन सारवीत हुती चूल ह्या किष्णानं मागितलं फूल
आता मारील ग आता मारील ग
आता मारील ग सासूबाई ह्या किष्णाला करू गत काई
ह्या किष्णानं अनवळ केली दह्यामंदी माती कालीवली
दुसरीच गवळन ग दुसरीच गवळन ग
दुसरीच गवळन टाकीत हुती सडा ह्या किष्णानं मागितला जोडा
आता मारील ग सासूबाई ह्या किष्णाला करू गत काई
ह्या किष्णानं अनवळ केली दह्यामंदी माती कालीवली
तिसरीच गवळन ग तिसरीच गवळन ग
तिसरीच गवळन घाशीत हुती ताट ह्या किष्णानं मागीतला पाट
आता मारील ग सासूबाई ह्या किष्णाला करू गत काई
ह्या किष्णानं अनवळ केली दह्यामंदी माती कालीवली

| | |
|---|---|
| **चौथीच गवळन ग** | **चौथीच गवळन ग** |
| **चौथीच गवळन घाशीत हुती गडू** | **ह्या किष्णानं मागीतला लाडू** |
| **आता मारील ग सासूबाई** | **ह्या किष्णाला करू गत काई** |
| **ह्या किष्णानं अनवळ केली** | **दह्यामंदी माती कालीवली** |
| **पाचवीच गवळन ग** | **पाचवीच गवळन ग** |
| **पाचवीच गवळन रवीत हुती शेगडी** | **ह्या किष्णानं मागीतली पगडी** |
| **आता मारील ग सासूबाई** | **ह्या किष्णाला करू गत काई** |
| **ह्या किष्णानं अनवळ केली** | **दह्यामंदी माती कालीवली** |

या पद्धतीने हे गाणे निदान नऊ गौळणी भेटेपर्यंत तरी चालते. यापुढे सहावी गौळण शेण काढीत होती आणि कृष्ण तिच्याजवळ पान मागत होता, सातवी गौळण पाणी आणीत होती आणि कृष्ण तिची वेणी ओढीत होता, आठवी गौळण न्हाणीमध्ये न्हात होती आणि कृष्ण पाणी लवंडत होता, नववी गौळण तवा घाशीत होती आणि कृष्ण पोवा मागत होता, अशी हकिगत आलेली आहे.

या गाण्यामध्ये गोकुळातील गौळणींशी कृष्णाने चालविलेल्या खोड्यांचे वर्णन आलेले आहे. त्या खोड्या सांगत असतानाच त्या पुरविल्या तर सासू मार देईल आणि न पुरविल्या तर कृष्ण दह्यामध्ये माती कालवून मोकळा होतो आहे, अशा पेचात सापडलेल्या गौळणींची हकिगतही इथे आलेली आहे. त्यामुळे प्रत्येक गौळणीशी होणारी खोडी संपताच गाण्यात आलेली पुनरावृत्ती त्रासदायक न वाटता उलट मनोरंजक वाटते आणि मग ऐकणाराच्या तोंडून 'काय बाई ह्या कृष्णाला म्हणावं तरी?' असा उद्‍गार न कळत बाहेर पडतो. शिवाय गोकूळच्या या कृष्णाच्या बाळलीलांचे कौतुक वाटून हसायलाही आल्याखेरीज रहात नाही. याच प्रकारचे आणखी एक गाणे सापडते ते असे आहे:

| | |
|---|---|
| **पैलीच गवळन ग** | **पैलीच गवळन, रंगच लाल** |
| **पाहुनि झाली दंग** | **माज्या कुंकवाचा रंग** |
| **आरशातलं भिंग** | **फुगडी खेळू किष्णासंगं** |
| **जोडव्याचे ठसे** | **किष्ण कमळाखाली बसे** |

दुसरीच गवळन ग — दुसरीच गवळन, रंगच पिवळा
पाहुनि झाली दंग — माज्या हळदीचा रंग
आरशातलं भिंग — फुगडी खेळू किष्णासंगं
जोडव्याचे ठसे — किष्ण कमळाखाली बसे
तिसरीच गवळन ग — तिसरीच गवळन, रंगच काळा
पाहुनि झाली दंग — माज्या अबीराचा रंग
आरशातलं भिंग — फुगडी खेळू किष्णासंगं
जोडव्याचे ठसे — किष्ण कमळाखाली बसे

या गाण्यामध्ये कपाळावर हळदकुंकू आणि अबीरबुक्का लावलेला असताना त्या त्या रंगाशी जुळणाऱ्या रंगांच्या गौळणी कृष्णाबरोबर फुगडी खेळत आहेत. त्याचबरोवर त्यांच्या पायांतील खेळताना उठणारा जोडव्यांचा ठसा कमळासारखा उमटल्याने त्या कमळावर कृष्ण दमून बसत असल्याची सूचक नोंदही इथे आली आहे. म्हणजे कृष्ण आणि गौळणी यांच्या रास नाचाची मनोहर हकिगत या गाण्याने सांगितली आहे. हेच गाणे आणखी हव्या असतील तेवढचा गौळणी आणि रंग गोळा करून याच पद्धतीने कुठे कुठे म्हटले जाते. परंतु वर दिले आहे एवढेच हे गाणे सर्वत्र अधिक रूढ असल्याचे आढळून येते.

पहिलीच गवळन ग काय बोलली
बाई मी काढीत होते दूध — मुरली ऐकून झाले धुंद
रुसीकेसी का मुरली वाजवीसी — नंदापाशी का वेणू जाब देशी
दुसरीच गवळन ग काय बोलली
बाई मी विरजीत हुते साई धई — मुरली ऐकून झाली सई
रुसीकेसी का मुरली वाजवीसी — नंदापाशी का वेणू जाब देशी
तिसरीच गवळन ग काय बोलली
बाई मी घुसळीत हुते ताक — मुरली ऐकून भुलले पाक
रुसीकेसी का मुरली वाजवीसी — नंदापाशी का वेणू जाब देशी
चवथीच गवळन ग काय बोलली
बाई मी काढीत हुते लोणी — मुरली ऐकून झाले शानी
रुसीकेसी का मुरली वाजवीसी — नंदापाशी का वेणू जाब देशी

**पाचवीच गवळन ग काय बोलली**
**बाई मी कढवीत हुते तूप मुरली ऐकून झाले चूप**
**रुसीकेसी का मुरली वाजवीसी नंदापाशी का वेणू जाब देशी**

ह्या गाण्यामध्ये कृष्णाची मुरली ऐकून गवळचाचा धंदा करणाऱ्या पाच गौळणींची उडालेली धांदल वर्णन केलेली आहे. या व्यवसायात येणाऱ्या सर्व गोष्टींचा इथे मोठचा सुंदर रीतीने उल्लेख आला असून, त्याप्रमाणे गौळणींवर झालेला परिणामही आकर्षक रीतीने सांगितलेला आहे. तसेच शेवटी 'हा कृष्णच का मुरली वाजवून नंदाला आपल्या ठावठिकाणाचा जाब देत आहे?' अशी दर वेळी व्यक्त केलेली शंकाही मोठी हृदयंगम आहे.

**बाई मी झाडीत हुते अंगन किष्ण मागीत हुता कंगन**
**कुणी धावा ग धावा किष्ण मंदिरी वाजवितो पावा**
**बाई मी टाकीत हुते सडा किष्ण मागीत हुता वडा**
**कुणी धावा ग धावा किष्ण मंदिरी वाजवितो पावा**
**बाई मी घालीत हुते वेनी किष्ण मागीत हुता फनी**
**कुणी धावा ग धावा किष्ण मंदिरी वाजवितो पावा**
**बाई मी वेचीत हुते फूल किष्ण मागीत हुता गूळ**
**कुणी धावा ग धावा किष्ण मंदिरी वाजवितो पावा**
**बाई मी घालीत हुते चोळी किष्ण मागीत हुता पोळी**
**कुणी धावा ग धावा किष्ण मंदिरी वाजवितो पावा**

या गाण्यामध्ये आपल्या रोजच्या जीवनातील सरावाच्या घरगुती गोष्टी करीत असताना कृष्णाने आणलेला अडथळा गौळण सांगते आहे. प्रत्येक वेळी कृष्णाने काही नवीनच मागितल्याने घरच्या सासुरवासाला भिऊन ही गौळण कुणाला तरी धावून येऊन आपल्याला या अडचणीतून सोडविण्याची विनंती करीत आहे; आणि असा हा खोडचा करणारा कृष्ण देवळामध्ये पावा वाजवीत असल्याचे सुचविते आहे. कृष्णाची ही बाळलीला मोठी छानदार आहे.

**राधे कृष्णाला कडेवर घे ग**
**कडेवर घेती घरात नेती**

**परोपरीचा मेवा देती**
**तरी पण बाळ बघेना मेव्याकडं ग**
**मला वाघ दे धरूनी ग**
**त्येचा घोडा दे करूनी ग**
**मला साप दे धरूनी ग**
**त्याचा चाबूक दे करूनी ग**
**मला घार दे धरूनी ग**
**तिची वावडी दे करूनी ग**
**मला चांदणी दे धरूनी ग**
**तिची लाही दे करूनी ग**

या गाण्यामध्ये आपल्या मुखामध्ये विश्वाचे दर्शन घडविणाऱ्या कृष्णाने राधेने दिलेला खाऊ डावलून जी छानदार मागणी केली तिचे वर्णन आलेले आहे. लहानग्या कृष्णाने राधेजवळ वाघाचा घोडा, सापाचा चाबूक, घारीची वावडी आणि चांदणीची लाही करून दे म्हणावयाचे, म्हणजे सगळाच मोठा अद्‌भुत चमत्कार आहे. त्यामुळे अद्‌भुतरम्यतेची मनावर पकड असलेल्या मानवी मनाला ह्या गाण्याची गोडी अधिक वाटते. त्याचबरोबर जाणत्या मनाला इथे व्यक्त झालेल्या कल्पकतेतील नावीन्य जाणवून अचंबाही वाटतो !

**यशोदा म्हणे श्रीहरी, नको जाऊ तू भाईरी**
**गौळणी कुभांडच्या करी, घेती तुफान तुझ्यावरी**
**रात्री आला म्हणती हरी, नको जाऊ तू भाईरी**
**तुला देते मी धईदूध साई, किष्ण बाळा तू बसून खाई**
**नको करू तू कुणाची चोरी, नको जाऊ तू भाईरी**
**तुला मी देते विटी दांडू, आणीक आणते मोत्यांचा चेंडू**
**डाव मांडावा यमुनातीरी, नको जाऊ तू भाईरी**

या लहानशा गीतामध्ये यशोदेने कृष्णाची नाना परीने समजूत घातल्याची माहिती आली आहे. कृष्णाच्या बाळलीलांमुळे गौळणी नाना तऱ्हेची कुभांडे रचून तक्रारी आणतात, तेव्हा तसे होऊ नये म्हणून यशोदा त्याला कुठे बाहेर न जाण्याची इथे ताकीद करीत आहे. त्याला लागणारे सर्व प्रकारचे खाणे आणि

खेळायची साधने आणून द्यावयाचे वचन देऊन, ती शेवटी त्याला मुलांच्या संगतीत यमुनेच्या तीरी मोत्यांचा चेंडू घेऊन डाव मांडण्यास सुचवीत असून, कुठेही बाहेर न जाण्याची आज्ञा करीत आहे. ह्या गाण्यामधील आईने मुलाची घातलेली समजूत सामान्य मनाला समाधान देणारी व चटका लावणारी असून आपल्याच मुलाप्रमाणे 'हे पण आहे हं!' अशी समजूत करून घेतल्याने होणारा विलोभनीय आनंदही मिळवून देणारी आहे.

**धईदूध लोणी खाती चोरुनी शिक्यावरच्या दुडचा फोडुनी**
**वाकडं दावीतो बाई मजला मग मी बांदिते त्येला खांबाला**
**येशवदा हाक मारी राधेला ने बाई कान्हा खेळायाला**
**राधानं किष्णाचा भाव पाहिला उचलुनी कडीवरी घेतिला**
**तिनी वो आपुल्या मंदिरी नेला कोडकवतुकी टांगी डोलेरा**
**नीज नीज म्हणती सारंगधरा मुखावरती घेऊनी शेला**
**झोपी गेला चक्रपाणी कात सुपारी पानजंजरी**
**इडा करूनी घाली मुखात पान जंजरी तबकात**
**उदास झाली राधा कामीन हरीची न् राधाची नव्हती शीन**
**कुनाशी कळे चांगुलपन चार पाराच्या अमलामंदी**
**स्वारी आली तिच्या पतीची जाळी गुंफूनी दिली रत्नांची**
**राधा न् किष्ण पलंगावरी दारी भ्रतार हाका मारी**
**कवाड उघड ग झडकरी राधा झाली कावरीबावरी**
**थोराचं न्हान किष्णा व्हावं रांगत रांगत भायेरी यावं**
**थोराचं न्हान कोन ग झालं थोराचं न्हान किष्ण झालं**
**रांगत रांगत भायेरी आलं राधाला चंद्रबळ आलं**
**पती पुसती अग अग रानी बाळ कुनाचं आलं अंगनी**
**येशवदीचा वो चक्रपानी आला खेळाया आपुल्या अंगनी**

या गीतात राधा आणि कृष्ण यांच्यामधील स्नेहाची हकिगत आली आहे. कृष्ण हा दही, दूध आणि लोणी चोरून खातो व त्यासाठी शिक्यावरील हंड्या फोडून टाकतो म्हणून यशोदा कृष्णाला रागावते. पण त्यामुळे गप्प न बसता कृष्ण तिला वेडावणे दाखवतो, म्हणून ती राधेला त्याला घेऊन जा म्हणते; आणि

आपणाकडे यावयास कृष्ण उत्सुक आहे हे बघून तीही त्याला घेऊन जाते. आपल्या घरी त्याचे लाड पुरविते आणि ती त्याला निजवते. परंतु त्यावेळी कृष्ण वयाने लहान असल्याचे शल्य बोचून ती अस्वस्थ होते. तरी पण घरच्या पानाच्या तवकामधील विडा करून ती कृष्णाला देते आणि उदास होऊन विचार करते. एवढ्यात मध्यरात्रीला तिचा नवरा येतो. तो बाहेरून हाका मारतो. राधा घाबरून जाते.

त्यामुळे आपल्या शेजेवरील कृष्णाला हलवून उठवीत ती 'लहान होऊन रांगत बाहेर ये आणि नवऱ्याच्या रागातून मला सोडव' असे म्हणते. आणि मग कृष्णही त्याप्रमाणे करतो. तरीही रांगते बाळ बघून राधेचा नवरा चौकशी करतोच. शेवटी यशोदेचे बाळ आपल्याकडे खेळावयास आले आहे असे सांगून ती वेळ मारून नेते, अशी कथा इथे आलेली आहे. राधाकृष्णांबद्दल कुतूहल असलेल्या मनाला या ठिकाणी त्यांच्यामधील नात्याचा स्पष्टपणे उलगडा करून सांगितल्याचे दिसून येते. त्याचबरोबर या दोघांमधील शुद्ध प्रेमाचाही मुद्दाम या रीतीने इथे उल्लेख केला असणे शक्य आहे!

**यंगी यमुनेचा घाट**
**शिरी पाणियाचा माठ**
**राधे तुझा रंगपाणी**
**कृष्णा तरी झाला दंग**
**पायी पैंजण तोडंवाळं**
**बिरुद्याचा घंग्राघोळ**
**राधे तुझा रंगपाणी**
**कृष्णा तरी झाला दंग**
**गळ्या पुतळ्याची माळ**
**ठुशीवरनं देती ढाळ**
**राधे तुझा रंगपाणी**
**कृष्णा तरी झाला दंग**
**नाकी सरज्याची नथ**
**चमकी वर मारी झ्याक**

**राधे तुझा रंगपाणी**
**कृष्णा तरी झाला दंग**

या गीतात राधेने अंगावर घातलेल्या अलंकारांचा साजशृंगार बघून वेडचा झालेल्या श्रीकृष्णाची हकिगत आलेली आहे. श्रीकृष्णाला बघून अगर त्याची मुरली ऐकून राधा किंवा इतर गौळणी नेहमीच वेडचा झाल्याची हकिगत सांगणारी लोकगीते अनेक आहेत. परंतु हे गीत त्यापेक्षा अगदी वेगळे म्हणून लक्षात घेण्याजोगे आहे. डोईवर पाण्याचा माठ घेऊन राधा गौळण यमुनेच्या घाटाची पायरी चढत असताना कृष्णदेव इथे तिच्या दर्शनाने वेडावलेला आहे !

**कोरा कागद काजळाची केली शाई**
**पत्रिका पाठविती हरीला रखुमाई**
**सप्तश्लोकी पत्रिका दिली सुदेवाच्या हाती**
**उद्याचं लगीन देवा यावं रातोराती**
**शिशुपाळ नवरा भीमकीच्या नाही मना**
**पत्रिका धाडीली द्वारकीच्या नारायणा**
**शिशुपाळ नवरा भीमकी नवरी**
**पत्रिका धाडीली द्वारकीच्या श्रीहरी**
**भीमकी नवरी ग अंबिकेच्या देऊळा**
**द्वारकेच्या वाटे रथ देखिला पिवळा**
**गोकुळी मदुयीरी हिरव्या पेरूचा पिवळा वान**
**चंद्रावळीच्या रूपासाठी किष्ण झाल्याती बागवान**
**गोकुळी मदुयीरी येळू रवीला वारंघटी**
**चंद्रावळीच्या रूपासाठी किष्ण झाल्याती कोलायटी**
**दुधातुपानं भरला हरा आता गवळनी कशी जाशी**
**गोकुळी खेळे किष्ण भरल्या मदुरेच्या येशी**
**दुधातुपानं भरला हरा गेली गवळन नटयीत**
**गोकुळी खेळे किष्ण झेंडा रवीला वाटयीत**

रुक्मिणीने स्वत: पत्र धाडून कृष्णाला विवाहासाठी दिलेले निमंत्रण, काजळाची शाई करून लिहिलेला मजकूर, शिशुपाळाचा केलेला अव्हेर, द्वारकेच्या श्रीहरीची

पाहिलेली वाट, अंबिकेच्या देवळामधून त्याचा दिसणारा पिवळा रथ इत्यादी कल्पनांनी नटलेल्या रुक्मिणीस्वयंवराने या ओव्यांचा निम्मा भाग इथे मोठ्या सुंदर रीतीने नटलेला आहे. तसेच उत्तरार्धामध्ये गोकूळच्या गौळणींशी कृष्णाची होणारी रासक्रीडा व रुक्मिणीसाठी त्याने केलेला खटाटोपही फार बहारीचा झाला आहे. त्यामुळे सामान्य मनाला या गीतांची विशेष आवड असल्याचे दिसून येते.

**नेत्रीचे अंजन हाताची लेखणी**
**पत्रिका रुक्मिणी लिहीतसे**
**लिहूनी पत्रिका देऊ कोणा हाती**
**यावे रातोराती यादवराया**
**येऊनी उतरावे अंबिकेच्या स्थळी**
**शिणगार पाठवावा रुक्मिणीसी**
**माय म्हणे अंबिके नको जाऊ भिमंके**
**नगरात पारके उतरले**
**नगरीचे पारके आम्हा काय करिती**
**नवस आहे अमुचा अंबिकेसी**
**अंबिकेच्या गळा नवरत्नांच्या माळा**
**वर दे ग सावळा द्वारकेचा**
**कृष्णाजी सारीखे वर दे ग अंबिके**
**मोत्यांचे झुबूके वाहिन तुला**
**वाजंत्री तनमने उडती गगन्ने**
**वर्षती मेघन्ने वसंतेशी**
**गौरीहराजवळी बसली भीमकबाळी**
**उठा उठा वनमाळी स्वागतासी**
**मांडवाची शोभा फाकलीसे प्रभा**
**भिमंकी पद्मनाभा समर्पीली**
**कोटच्यावधि येऊनी देव बसले अंगणी**
**श्रीकृष्ण रुक्मिणी बोहल्यावरी**

नागवेली पान धरूनी मुखात
समस्त पहात दोघांकडे
सुपारीची मूठ धरूनी बळकट
श्रीकृष्ण सोडीत भिमके हाती
कृष्णाच्या बहिणी आल्या तेथ क्षणी
नाव घ्या हो वहिनी भ्रताराचे
हळद घेऊनी हाती लावीली मुखाशी
कुंकू कपाळाशी भिमंकीच्या
जाई तू मोगरा शेवंतीचा चुरा
श्रीकृष्ण नवरा भिमंकीचा
मोत्यांचा जरीतुरा माथ्यावरी खोवी
रुक्मिणी नवरी श्रीकृष्णाची
कृष्णाचे आहेर देखुनी कामिनी
ती दोघं हर्षली मायबाप
माय बाप बंधु बहिण सर्व गोत
घाला दंडवत वरमायेसी
वरमाये चरणी ठेवीयेला माथा
भिमंकी ही आता सांभाळावी
आंदण मागती तस्त तांब्या वजरी
समयांची जोडी आंदण दिली
आंदण मागती पराती घंगाळी
गाई आणि घोडे आंदण दिले
आंदण मागती ऊसमळे पानमळे
आंबराई फुलबागा आंदण दिल्या
आंदण मागती चांदवा पासोडी
भिमंकी ही बालडी आंदण दिली
साडे संपादुनी मालत्यांनी ओटी भरा
भिमंकी ही जाते परघरा

साडे संपादुनी उठली सुंदरी
कंकण बोहल्यावरी सोडीयेले
साडे संपादुनी मालत्यांची वाण
भिमंकी ही झाली शेजारीण
साडे संपादुनी नेत्री आले पाणी
भिमंकी ही जाते आहे तान्ही
पाच वरषांचा प्रति केला पाळ
तुम्हावरी भार जलमाचा
आम्हा घरीचा पाळणा तुम्हा घरी बांधीला
तुम्ही दोघं राज्य करा जन्मभरी

श्रीकृष्णाचे लग्न जमल्यापासून तो सर्व प्रकारच्या सोहोळ्यानिशी ते पार पडेपर्यंतचे वर्णन या गाण्यामध्ये आलेले आहे. जुन्या काळची लग्नपद्धती सगळ्या चालीरीतींसह इथे आलेली असल्यामुळे या घटकेला आपल्या नजरेसमोर सारे घडावे एवढा परिणाम हे गाणे ऐकणाराचे मनावर झाल्याविना रहात नाही. कृष्णासारख्या शूर वीराला आणि देवमाणसाला वरणाऱ्या रुक्मिणीच्या मनाची लग्नाअगोदरची अस्वस्थ स्थिती, प्रत्यक्ष लग्नाचा सोहळा, आंदण मागितलेल्या व दिलेल्या गोष्टींची नोंद, सासरी पाठवावयाची चालरीत इत्यादी इथे सांगितलेल्या सर्व गोष्टी कृष्णचरित्राला विशेष गोडी आणतात. त्यामुळे हे गाणे ठेवणीतील वस्तूंच्याप्रमाणे वायकांना मोठे शेलके व निवडक वाटते.

राधायानं सुंबरान करता कळलं देवाजीला
गैर हुरदी दाटला
नऊ काय म्हईने झाले राधाईला
तिचा भ्रतार गावा गेला
सुख सांगी हृषीकेशी रुक्मिणीशी
येळ संपाधुनी परदेशी
घर मोडकं न्हाई खाया पातर
अंगी न्हाई वस्त्र ल्यायाला
सांगती देवाला

रुक्मिण बोलती देवा
एवडं वचन ऐका
एवडं काम करूनीया
अवो भक्तिनायका
भक्तासाठी, हाती घेऊनी काठी
देव झाला गाईराखा
गोकुळात भुलीवल्या गौळणी
बहु सोंगं ह्योच्या भरली अंगी
किती गुण वर्णु मी तुज कौतुका
देवा त्रिभुवनी नायका
व्हावे तुमी भाविकाचा सका
इतकं उत्तर देवानी ऐकुनी
घातले अलंकार अंगावर
नेसला पिवळा पितांबर
अंगी काय चोळी बुट्टीदार
केस विंचरुनी घातिली वेनी
नंदं गुंपीलं सारं
चारन बोरं, आवळ कोइरं
केकत केवडा, मुद, राकडी माथ्यावर
वर काय जडिताचा घुंगूर
सोबतो किती मनोहर
जसा काय उगवला दिनकर
कानी बाळी बुगडी
दंडी आली मासुळी
ग्येल बाळी, पान बाळी
जडित बाळी, जोड बाळी
कापाला जागा झाली कमी
मनी मंगळसूत्र गळसरी

ठुशी वज्रटीक चिंचपेटी
इतकं लेलाया देव जरी
वर काय घातिली सरी
रत्नजडित जवार
जसा काय उगवला दिनकर
हनुवटी मिच्च्या
पायी पोलार
साकळ्यावरी घातिलं वाळं
दंडामंदी दंडसर
हाती बाजुबंद सुंदर
हातामंदी हातसर
जसा काय उगवला दिनकर
रुक्मिन पाहूनी हसू लागली
नाव काय सांगाल वनमाळी
माजं नाव रंगूबाई
घेतिली घोडी आवडी
देव निगाले वो झडकरी
पूशीतो आळी न् आळी
राधाईची आली झोपडी
राधाईच्या वो अंगनी
उतारले शिरीहरी
काम भाविकाचे करी
लोबाईन लोळे चरनावरी

भगवान श्रीकृष्ण हा भक्तांचा पालनकर्ता म्हणून ह्या गीतात राधेची अडचण त्याने किती अद्‌भुततेने सोडविली व त्यासाठी किती परींचे सोंग घेतले याची हकिगत या गाण्याने दिलेली आहे. त्यामुळे भक्तांचा कैवार घेणारा कृष्णदेव स्त्रियांचा अधिकच आवडता झाला आणि कृष्णाचे जीवन सांगणारी अशी आणखी किती तरी गाणी स्त्रियांनी मोठ्या भक्तिभावाने गायिली. कृष्णाची

आणखी काही गाणी इतरत्रही याच पुस्तकात आढळतील. परंतु कृष्णजन्माच्या निमित्ताने सर्वसामान्य बाईच्या आठवणींत येणारी जी लोकप्रिय गाणी आहेत ती अशी आहेत. त्यांचे गायन फावल्या वेळीही होत असले तरी त्यांची गोडी कायम रहाते. अगोदरच कृष्णाबद्दल मनामध्ये अपार भक्ती असल्याने, ह्या गाण्यांनी निर्माण होणारे रससौंदर्य आणि विचारसौंदर्य सामान्य मनाला आणखीनच भुरळ पाडते. शिवाय गोकुळाच्या कृष्णाच्या नादात स्वत:चेही देहभान हरपून टाकण्याचे सुख अनुभविण्यासाठी समर्थ करते.

भगवान श्रीकृष्णाचे जीवन फार मोठे, त्याची कर्तबगारीही सामान्य मनाच्या आवाक्याबाहेरची. पण सामान्य लोकांच्या मनात त्याचे वास्तव्य कसे आहे, याचा ही गाणी म्हणजे एक सुंदर आदर्श होय.

## राम आणि सीता

मराठी मनाचे एक आवडते आणि आदर्श दैवत म्हणून राम आणि सीता यांचा लौकिक आहे. रामाचे राज्य म्हणजे भारताची आदर्श राज्यव्यवस्था अशी लोकांची कल्पना आहे. त्यामुळे राजा म्हणून त्याचा लौकिक मोठा. त्याने अंगीकारलेले एकपत्नी व्रतही लोकांना विशेष प्रिय. त्यासाठीही त्याची कीर्ती. त्याने वडिलांच्या शब्दासाठी आणि सावत्र आईच्या इच्छेसाठी वनवास पतकरून दाखविलेला त्याग म्हणजे मोठे दिव्य आहे. सामान्य लोकांना या त्यागाची थोरवी फार आहे. रामाने रावणाचा केलेला पराजय सर्वश्रुत असल्याने योद्धा म्हणूनही त्याचे श्रेष्ठत्व समाजाने मान्य केले आहे. या अनेक कारणांमुळे रामाबद्दल लोकांच्या मनात विशेष श्रद्धा निर्माण झाली असून, त्याच्या या मोठेपणाला कारणीभूत झालेल्या सीतेचीही थोरवी त्यांच्या मनाची पकड घेऊन राहिली आहे. सीतेने रामाबरोबर भोगलेला वनवास, लंकेमध्ये सहन केलेला त्रास, केलेले अग्निदिव्य आणि गरोदरपणी एकटीने सोसलेल्या हालअपेष्टा या तिच्या चढत्या श्रेणीमधील त्यागाची किंमत मराठी मनाने पारखली आहे. त्यामुळे समाजाने मोठ्या सहानुभूतीने आजवर तिच्याकडे पाहिले आहे.

'रामायणा'तील रामसीतेची कथा सामान्य स्त्रियांनी वारंवार ऐकलेली असल्याने आपल्या भाषेत ती अमर करून ठेविली आहे.

**सकाळच्या पारी माज्या हातात गंधवाटी**
**रामचंद्र यीयासाठी**
**सकाळच्या पारी काय वाजतं भराभरा**
**राम तुळशीला घाली वारा**
**सकाळच्या पारी लाभ कशाचा झाला मला**
**करंड सोन्याचा गवसला**

रामप्रहराच्या वेळी रोजच्या आयुष्याची मंगल सुरुवात कशी होते, याच्या खुणा या ओव्यांनी मोठ्या भक्तिभावाने सांगितल्या आहेत. तुळशीची पूजा, गंध उगाळणे आणि करंड गवसणे या बायकांच्या दृष्टीने शुभ गोष्टी मानल्या गेल्यामुळे त्यांची इथे मोठ्या सुंदर रीतीने वाच्यता झालेली आहे.

**काळी चंद्रकळा तिच्या पदरी रामसीता**
**माऊली माजी बया नेसली पतिव्रता**
**राम नि सीताबाई दोनी माजी ग साडीचोळी**
**सकाळच्या पारी मी का मोडीते त्येंची घडी**

'काळी चंद्रकळा' म्हणजे जुन्या काळच्या स्त्रियांचे आवडते महावस्त्र, त्या महावस्त्राच्या पदरावर रामसीता विणलेली असून ते वस्त्र आपली पतिव्रता आई नेसली आहे अशी इथे व्यक्त झालेली भावना स्त्रियांच्या ठेवणीतील वस्त्रालंकाराप्रमाणे शेलकी आहे. त्याचप्रमाणे प्रत्यक्ष रामसीता म्हणजेच आपली साडीचोळी असून रोज सकाळी त्याची आपण घडी मोडतो, ही या गीतात प्रकट झालेली भावनाही विशेष चित्ताकर्षक आहे. आपल्या वस्त्रामुळे आणि जणू रामसीतेच्या आशीर्वादामुळे आपणाला खरी शोभा येते, असा या गीतांमधील भावार्थ मोठा सुंदर आहे. कल्पकतेचा एक सुंदर नमुना म्हणून या गीतांकडे अभिमानाने पहावयास हरकत नसावी, एवढे यांचे अंतरंग उत्तम आहे.

**रामवदनी कौसल्या घास घाली**
**दशरथनंदन करि व्रतबंधन लगबग झाली**
**येई भोजना शामसुंदरा, संगे लक्ष्मण सुकुमारा**
**शत्रुघ्ना ये भरत कुमारा, बाळलेणी सर्व ल्याली**
**रामवदनी कौसल्या घास घाली**

पाट रांगोळी, झाली सर्व तयारी
मातृभोजना बसल्या जमूनी नारी
नानाविध शृंगारी नटली पक्वान्ने पात्री भरली
रामवदनी कौसल्या घास घाली
चटण्या कोशिंबिरी लोणचे
उणे त्या स्थळी नाही कोणचे
कामधेनु त्या अंगणी नाचे
ब्रह्मबाळा माय व्याली
रामवदनी कौसल्या घास घाली
प्रेमकवळ घे राम कौसल्येचा
भक्तिग्रास घे बाळ सुमित्रेचा
कैकई म्हणे मम अति आदराचा
भगिनी प्रिया तो वदनी घाली
रामवदनी कौसल्या घास घाली
मामी चुलती आते मावशी देई मान तो
गुरुमातेशी खरा सुदिन तो
गमत मनाशी वर्णना वाणी थकली
रामवदनी कौसल्या घास घाली
बहुदेशाचे नृपवर आले
वामदेव शुक मुनीजन जमले
शुभमंगल मुखी नामा धरिले
पुत्र बाप कंठी माळ घाली
रामवदनी कौसल्या घास घाली
चंद्र गुरुबळ मुहूर्त शोधिला
असती अनुकूल ग्रह रामाला
दशरथराये ग्रहमुख केला
अष्ट वर्गी जेवू घाली
रामवदनी कौसल्या घास घाली

दिधली कितिक दाने ब्राह्मणा
कोण करितो त्याची गणना
गो भू रत्नं परीची नाना
लग्नघटिका भरत आली
रामवदनी कौसल्या घास घाली
सर्व जगाचा राजा भुकेला
कौसल्येच्या अंकी बसला
भरवी माता करि धरी कवेला
ब्राह्मणांनी गर्दी केली
रामवदनी कौसल्या घास घाली
फिटला अंतरपाटचि आता
घे बहुवेषा श्रीरघुनाथा
वाद्या गजर तो गगनी जाता
पुष्पवृष्टी वरुनी केली
रामवदनी कौसल्या घास घाली
मुंजिमेखला कौपीन साजे
कंठी यज्ञोपवित विराजे
दंडकाष्टकार झगझग तेजे
ध्यानी मूर्ति नित्य बसली
रामवदनी कौसल्या घास घाली
ॐभवति भिक्षां देही म्हणतो
घेऊनि झोळी विश्व रक्षितो
ब्रह्मचारि हा व्रत गाजवितो
माय भिक्षा त्वरित घाली
रामवदनी कौसल्या घास घाली
व्रतबंधन महिमा रामाचा
चटकदार बहुत मजेचा
वर्णन करुनी आपुली वाचा

**म्हणते मी शुद्ध केली**
**रामवदनी कौसल्या घास घाली**

प्रभु रामचंद्राच्या मुंजीचे वर्णन करणारे हे गाणे मध्यम व पुढारलेल्या वर्गातील स्त्रियांच्या पदरी आढळते. या वर्गामध्ये मुलांची मुंज साजरी करतात तो सारा सोहळा रामाच्या निमित्ताने इथे जसाच्या तसा सांगण्यात आला आहे. पण जाता जाता इथे रामाच्या घरची हकिगतही थोडक्यात आलेली आहे. या गीताच्या शेवटी म्हटल्याप्रमाणे हे सुंदर वर्णन केल्याने आपली वाचा शुद्ध झाली असे सामान्य स्त्रीस वाटते आहे! 'हे गाणे जुने आहे. राममहिमा फार जुना. आठवतो तेवढा सांगावा.' अशी या गाण्याची कीर्ती एका म्हाताऱ्या बाईने माझ्या कानांवर घालीत हे गाणे जेव्हा मला दिले तेव्हा तिच्या या अभिमानाचा मला थोडा हेवा वाटल्याखेरीज राहिला नाही!

**मोठ्या बायकांनी खेळ मांडिला**
**चौरंग सोन्याचा रामा चौरंग सोन्याचा**
**चौरंग सोन्याचा नि चेंडू झुगारिला मोत्याचा**
**रामा चेंडू झुगारिला मोत्याचा**
**झुगारिला मोत्याचा नि चेंडू आकाशी धावला**
**रामा चेंडू आकाशी धावला**
**तिथं इंद्राला भेटला नि माघारी परतला**
**रामा चेंडू माघारी परतला**
**मागं परतला नि चेंडू धरणीव पडला**
**रामा चेंडू धरणीव पडला**
**तिथं करदळीच्या जाळी नि तिथं होता जंबू माळी**
**रामा तिथं होता जंबू माळी**
**त्यानं लावील्या मखमली**
**रामा लावील्या मखमली**
**मखमलीची फुलं जाऊ दे बायकांच्या देवाला**
**रामा बायकांच्या देवाला**

या गाण्यामध्ये लहानग्या रामाला मखमलीच्या फुलांची एक लहान पण सुंदर अशी परीकथा सांगितलेली आहे. लहान मुलाला खेळवीत असताना मोठ्या बायका चिट्कली गोष्ट सांगून त्या मुलाचे मनोरंजन करीत असतात, त्यांपैकीच हा एक प्रकार आहे. परंतु रामासारख्या मुलाला सामान्य मुलाच्या मानाने इथे थोडे भव्य वातावरण निर्माण करणारी अद्‌भुत कथा सांगितली आहे, एवढाच काय तो फरक. शेवटी मखमलीचे फूल देवाला वहायचे असल्याची या ठिकाणी सूचित झालेली हकिगत मुलाने उगाच फुले तोडून त्यांचा चोळामोळा करू नये, म्हणून केलेली थोडी धमकीवजा कानगोष्टही आहे.

थोरामोठ्यांच्याकडे जुन्या काळी सोने, नाणे व मोती यांची किती स्वस्ताई व खैरात असे याचा हा एक उत्तम दाखला आहे. मुले जुन्या काळी मोत्यांच्या चेंडूने खेळत ही कल्पना आता एखाद्या परीकथेइतकीच अद्‌भुतरम्य वाटते.

**पहिली माझी ववी देवा रामाला गाईली**
**त्याच्या ग पदावरी लक्ष तुळस वाहिली**
**पहिली माझी ववी पैला अभंग मला येतो**
**रामाच्या शिखराला कळस सोन्याचा ढाळ देतो**
**पहिली माझी ववी पहिला माझा नेम**
**तुळशीखाली राम पोथी वाची**

या गीतांनी उठल्याबरोबर दळायला बसताना रामनामाचा केलेला पवित्र उच्चार आणि त्या निमित्ताने होणारी पूजा दर्शविलेली आहे. कोणत्याही कामाला आरंभ करावयाचा म्हणजे रामनामाचा जप करावयाचा या भोळ्या श्रद्धेचा स्त्रीमनातून झालेला हा आविष्कार आहे. या तिन्ही ओव्यांना 'पहिली माझी ओवी' म्हटले तरी तिन्ही प्रकारचे असे वेगवेगळे गुणवर्णन करून, रामाचा महिमा वाढीला लावण्याचा प्रयत्न झालेला आहे.

**राम ग म्हनू राम राम साकबीरचा पेला**
**माज्या ग हुरयीदी त्येनं बंगला बांधीयेला**
**राम ग म्हनू राम राम वलणीचा शेला**
**रामाचं नाव घेता शीण अंतरीचा गेला**

राम ग म्हनू राम राम माजा ग मर्यातारू
रामाचं नाव घेता ध्याई झाली या पवितारु
राम ग म्हनू राम राम कौसल्याबाईचा
रामाचं नाव घेता झाला उद्धार ध्याईचा
राम ग म्हनू राम राम कंठीचं कारयीलं
रामाचं नाव सये मी ग हुरदी साटविलं
राम ग म्हनू राम राम माजा तो गुरुभाऊ
तुळशीच्या वृंदावनी सये वाचूनी मला दावू
राम ग म्हनू राम राम अमृताचा पेला
रामाचं नाव घेता शीण माजा सारा गेला
राम ग म्हनू राम राम आयुद्धीचा राजा
माज्या जिवाला आधार त्येला दंडवत माजा

रामनामाच्या उच्चाराने किती प्रकारचे समाधान मिळते याची माहिती या ओव्यांनी दिलेली आहे. आपल्या माहितीतील चांगल्या गोष्टींची रामाशी तुलना करून त्यामुळे मनाला मिळणारा विसावा व्यक्त करण्याची ही रीत मोठी आगळी आहे. निरनिराळ्या प्रकारच्या भावना बोलून दाखवीत असताना, तुळशी-वृंदावनाच्या तिथे रामाची पोथी (रामायण) वाचून दाखविण्याची इथे केलेली विनंती, सामान्य लोकांच्या मनात रामाबद्दल असलेली विलक्षण ओढ दर्शवीत आहे.

सीता सैंयवर राजा जनकाच्या घरी
पत्रिका धाडिली दूर देशावरी
सीता सैंयवर जनकाचं भाग्य थोर
मोत्याच्या मंडपात आले जावई रघुवीर
सीता सैंयवर राजांची भरली सभा
रामचंद्र राजा ऋषी मंडळीत उभा
सीता सैंयवर राजे बसले थोर थोर
सीताबाई म्हणे नाही दिसले रघुवीर
सुकुमार राम कसा उचलील चापबाण
सीताबाई म्हणे किती अवघड केला पण

सीतास्वयंवराची थोडीफार कल्पना या गीतांमधून आलेली आहे. सर्वांच्या परिचयाचा हा विषय असल्याकारणाने याची विशेष गोडी. त्यामुळे बायका या ओव्या अनेकदा घोळूनघोळून म्हणत असतात. अशा वेळी एक गोष्ट ऐकणाराच्या मनावर असा ठसा निर्माण करू पहाते की, जुन्या काळची ही स्वयंवराची पद्धती आताही या स्त्रियांना पसंत असली पाहिजे! एरवी एवढ्या आवडीने या ओव्या गाण्याची इच्छा त्यांना व्हायचे कारणच काय?

शिंदेशाही तोडे सीताबाईला कवा केलं
लाडके मैनाबाई राम इंदूबीऱ्याला गेलं
शिंदेशाही तोडे सीताबाईच्या हातायात
उजेड पडयीला रामचंद्राच्या रथायात
रामाचे मुद्रखडे सीता घालीती वेनीयीत
सीताचा प्रेमचार राम आनीतो ध्येनायीत
पावसानं फळी बाई मांडिली आटिकीटू
सीताबाईच्या न्हाणीवरी रामचंदर हाणी मोटू
सीताबाईला एवडं डोळं लवअंकुशा बाळा येळं
मिरीयाचं बाई घस राम तोडीतो कवळं
जनकराजा बोलं सीता कुनाला द्यावी
दशरथ याही राम साजती जावई
राम नि लक्ष्मुमन दशरथाची दोनी बाळं
सोन्याच्या मंडपात सीता रामाला घाली माळ
सीताबाई नवरी जनकाला पडलं कोडं
रामाच्या धनुक्षाचं तिनं बसाया केलं घोडं
उगवला नारायण किरणं टाकीतो झाडावर
रामाचा उजेड सीताबाईच्या चुडयावर
रामाला आला घाम सीता पुसती पदरानं
कुनाची झाली दिष्ट रथ गेला बाजारानं

राम आणि सीता यांच्यामधील परस्परांविषयीच्या प्रेमभावनेची कल्पना सांगता येईल तेवढ्या पद्धतीने या गीतांनी सांगितलेली आहे. सीतेसाठी रामाने

काय काय केले आणि रामामुळे सीतेचे वैभव कसे वाढले याची काहीशी कल्पना या हकिगतीवरून येते. रामाला दृष्ट झाली म्हणून सीतेने आपल्या पदराने त्याचा घाम पुसला, ही या ठिकाणी ग्रथित झालेली माहिती म्हणजे सामान्य स्त्रीमनाचा एक चित्ताकर्षक आविष्कार होय.

**उगवला नारायण पिवळी त्याची काया**
**दशरथाच्या पोटी जलमले रामराया**
**आगाशी पाळणा खाली धरतरी मावली**
**नांगराच्या ताशी सीता जनकाला घावली**

राम आणि सीता यांच्या जन्माची व वंशाची हकिगत या गीतांनी दिलेली आहे. राम हा दशरथाचा मुलगा हे सर्वांना माहीत आहे. परंतु सीतेच्या जन्माची ही कथा अद्‌भुतरम्य असल्याने तिची गोडी मात्र अधिक.

**राम नि लक्षुमन राजा दशरथाची मुलं**
**लाडके भैनाबाई सये गुलाबाची फुलं**
**राम नि लक्षुमन डावीकडे सीता शोभे**
**भरल्या सभेमध्ये मारुती दास उभे**
**राम नि लक्षुमन डावीकडे सीता खेळे**
**रामाच्या चरणी मारुती दास लोळे**
**रामाची सीता लक्षुमनाची वहिनी**
**दशरथाची सून ज्येष्ठ नारी ती कामिनी**
**राम नि लक्षुमन दोघे पटाईत वाघ**
**सावळ्या सीतेला रावणाचा हाई डाग**

राम आणि सीता यांचा त्यांच्या कुटुंबियांशी असलेला संबंध इथे सांगितलेला आहे. गुलाबाच्या फुलांशी रामलक्ष्मणांची केलेली तुलना व शेवटी सीतेला रावणामुळे लागलेला कलंक या दोन्ही कल्पना इथे मोठ्या प्रामाणिकपणे व्यक्त झालेल्या आहेत. रामलक्ष्मणांची वाहवा केली आणि सीतेचेही कौतुक केले, तरी रावणामुळे निर्माण झालेला प्रसंग सामान्य मन विसरू शकत नसल्याची ही एक निशाणी होय.

**डेरी दुधानी वाजती नगरी चौघडे गाजती**
**बोलवा ग श्रीरामाला गादीवरी बैसायाला**

राम गादीवर बैसला कैकयीला राग आला
कैकयीला राग आला राम ढकलूनी दिला
राम हुर्दी खुर्दी झाला गेला पित्याच्या महाला
ऐसा आनंद पित्याला आमी जातो वनवासाला
नको ऐसा छंद बाळा नको जाऊ वनवासाला
अर्धी हवेली देतो तुला राम ऐकेनासा झाला
गेला मातेच्या महाला ऐसा आनंद मातेला
राम बोले जननीला आमी जातो वनवासाला
नको ऐसे बोलू बाळा गळीची आण तुला
राम ऐकेनासा झाला गेला बंधूच्या महाला
ऐसा आनंद बंधूला आमी जातो वनवासाला
ऐसा बंधूजी बोलला संगं येतो वनवासाला
राम पुढं लक्षुमन मागं गेले सीतेच्या महाला
ऐसा आनंद सीतेला घाली मिठी रामचरणाला
राम सीतेला बोलतो अग तू सीता ग सुंदरी
आमी जातो वनवासाला सांभाळावं तू जीवाला
सीता रामाला बोलती मी तर येते तुमच्या संगं
नको येऊ आमच्या संगं रानामधी होईल रहाणं
कंदमुळं लागेल खाया पाणी नाही मिळेल प्याया
सीता ऐकेनाशी झाली रामासंगं निघायीली
मुख भरलं तांबोळानं भांग भरला गुलालानं
हात भरलं चुडीयानं पाय भरलं पोलादानं
नेसली वनवासी वस्त्रं तीन मूर्ति रथामंदी
रथ चालं धडाधड जन खळाखळा रडं

रामाच्या राज्यारोहण प्रसंगी घडलेला पेचप्रसंग आणि रामाचे वनवासाला जाणे या दोन प्रमुख गोष्टींची माहिती या गाण्यामध्ये आलेली आहे. फेरासाठी म्हणण्यात येणाऱ्या (खेळांच्या गाण्याविषयीच्या प्रकरणात आलेल्या) गाण्याप्रमाणेच हे गाणे आहे. परंतु याचे अंतरंग विस्ताराने नटले

आहे. राम राज्यावर बसला म्हणून प्रत्येकाला होणाऱ्या आनंदावर रामाच्या वनवासगमनाची हकिगत ऐकून पडलेले विरजण इथे मोठ्या हृदयस्पर्शी भावनेने चित्रित झालेले आहे. प्रत्येकाने रामाची समजूत घातली परंतु रामाने आपला निश्चय सोडला नाही आणि लक्ष्मण व सीता त्याच्याबरोबर वनवासाला जायला तयार झाली, अशी इथे आलेली हकिगत चटकदार झाली आहे. सीतेने वनवासी स्त्रीला शोभेल अशा प्रकारे स्वत:मध्ये केलेला फरक इथे फारच सुंदर रीतीने सांगितलेला आहे. रथाची चाल आणि लोकांचे रडणे या दोन भिन्न गोष्टींमधून दाखविलेले इथले साम्य तर वहारीचे आहे!

हीच भावना सांगणारे लोकगीत कोठे कोठे पुढीलप्रमाणे सुरुवातीचा भाग असलेले असेही आढळून येते :

**मांडव सोन्याचा घातिला**
**चांदवा मोत्याचा दिला**
**हिरे रत्ने जोडिली त्येला**
**राजे आले पहायाला**
**गादीव बसवा श्रीरामाला**
**कैकईला कुरुंद आला**
**राम ढकलूनी दिला**
**तुमी जावे वनवासाला**
**गादीव बसवा भरताला**
**कोन्या देशी दशरथ राजा**
**त्याच्या घरी फुलांच्या बागा**
**त्याच्या घरी रामलक्षुमन**
**गेले शिकारीला दोघं**
**गावाचा गुराखी खालती**
**तिथं आला जोगी पापी**
**बाळा विचारू लागला**
**सांगा रामाचा वाडा मला**

तिथं वाड्याची खूण
दारी तुळशी वृंदावन
दारी चांदीचं घंगाळ
तोच रामाचा वाडा
जोगी तिथूनी निगाला
गेला रामाच्या वाड्याला
दारी अल्लख गाजविला
सीता विचारू लागला
सीता बोलूजी लागली
घरी आहे मी एकली
घरी नाही घरवाशी
आम्ही आहे सासरवाशी
जोगी सीतेला बोलला
सत्त्व नेईन रामायाचं
सीता तिथूनी उठली
काढलं चवरंगी सूप
काढल्या साळी नि डाळी
जोग्या भीक्षा वाढीयली
जोगी मनात हासला
हात सीतेच्या अंगाला
सीता नार किंकाळली
जोग्या हाती लागीयीली

राम आणि लक्ष्मण हे सीतेच्या छंदासाठीच हरिणाची शिकार करावयास गेले असताना, रावणाने आपले पापी मन बैराग्याच्या रूपाने सीतेपुढे प्रकट केले आणि त्याने तिला युक्तीने पळवून नेले, यासंबंधीची वनवासातील ही हकिगत आहे. भिक्षा वाढ नाही तर रामाचे सत्त्व हिरावून नेईन अशी रावणाने सीतेला धमकी घातल्याने, तिने त्याला अगोदर नकार दिला असताही भिक्षा घातली व त्यामुळे रावणाने तिला पळवून न्यायची संधी साधली, अशी ही कथा या गाण्याने दिली आहे.

अड्याल केळीचं बन
पल्याड तुळशी वृंदावन
मधी रामाचा वाडा
जोगी पाव्हणा आला
सीता धर्म करावा
न्हाई धर्म करायचा
दारात काठी आपटील
दारात झोळी पाडील
दारात जटा तोडील
सत्त्व रामाचं नेईल
सीता सत्त्वाला भ्याली
चंदनाची शिडी काढली
लावली उप्पर माळीला
काढलं सूपभर मोती
टाकलं जोग्याच्या झोळीत
दशरथ सासरा आला
पारावरनं बोलता झाला
घे ग झारी दे ग पाणी
रामाची तू सीता राणी
चांगू नणंद बोलती झाली
पीना सीताच्या हातचं पाणी
सीता झाली जोग्याची राणी
नका मनात आणू पाप
जोगी आमुचे मायबाप. . .

हे गाणे रावणाने सीताहरण केले तोच प्रसंग सांगणारे आहे. मात्र त्याची लांबी सासू कौसल्या, दीर लक्ष्मण व स्वतः राम येऊन सीतेला तिच्या वधासाठी नेण्यात येईपर्यंत लांबली आहे. रामाचे सत्त्वहरण होऊ नये म्हणून सीतेने स्वतःच्या भावनेचा इथे त्याग केलेला आहे. तसेच नणंदेने ती पापी आहे

म्हणताच असे अभद्र बोलू नका म्हणून ती आवर्जून सुचविते आहे. खेरीज आलेला जोगी हा मायबापासमान असून आपण निष्पाप आहोत असाही इथे तिने केलेला दावा लक्षात घेण्याजोगा आहे.

राम या लक्षुमन दोघं हिंडती रानीवनी
सीता नेलीया रावनानी
राम या लक्षुमन दोघं झाल्याती रानभरी
सीता रावनाच्या घरी
राम या लक्षुमन दोघं झाल्याती चित्तागती
सीता रावनाच्या हाती

रावणाने सीतेचे हरण केल्यानंतर रामाच्या आणि लक्ष्मणाच्या मनाची खुळ्याभैऱ्याप्रमाणे झालेली अवस्था या गीतांनी अतिशय चांगल्या प्रकारे वर्णन केलेली आहे.

रावनानी नेली सीता मागं पुढं पाहूनी
देव मारुती गेलं बैरागी होऊनी
चांदीची लंका सोन्याची इंद्रबाह्या
देव मारुती गेला रावनाची लंका पाह्या
जळती लंका जळतं सोनं नाणं
कुनाचं काय गेलं मस्ती केली रावनानं
जळती लंका जळूनी झाली होळी
सीतेच्या सत्त्वानी त्वांडं वान्यारांची काळी
लंकेचा रावन अभिमानानं तंबतो
रामाच्या सीतेला जिंकीली म्हनीतो
लंकेचा रावन बाई पैला ग भिकारी
रामाची नेली सीता मग पडला विच्यारी
रावनानी नेली सीता मारुती देतो कान
मुद्रुकाची अंगठी मुखीचा राम राम
रावनाच्या मंडपात सीता रामाची डुचीयीत
रामाची मुद्रीयीका टाकी मारुती अवचीत

रावनाच्या मंडपात सीता करीती रोजयीना (धावा)
रामाची मुद्रुका टाकी मारुती सजयीना
अडलंकेचा बाई पडलंकेला ग उभा
देवा रामाची फौज वानरांची बघा बघा

रावणाने सीतेला नेल्यानंतर मारुतीने रामाच्या वतीने केलेली कामगिरी या गीतामध्ये आलेली आहे. त्याचप्रमाणे रावणाच्या लंकेत सीतेची मन:स्थिती कशी होती त्याचीही हकिगत इथे देण्यात आलेली आहे. सीतेच्या सत्त्वामुळे लंका जळाली, पण वानरांची तोंडे फक्त काळी झाली, अशी या गीतामध्ये व्यक्त झालेली कल्पना मोठी अद्‌भुतरम्य आहे. सीतेला जिंकली म्हणून रावणाला वाटणाऱ्या अभिमानाचाही इथे उल्लेख आलेला आहे! तसेच रामाची मुद्रा धारण करणारी अंगठी मारुतीने दिल्याकारणाने सीतेला होणारा आनंदही इथे सूचित झालेला आहे.

मंडोदरी म्हनीयीती सीताबाई तू माजे भैनी
लंकंच्या रावणाचं राज करूया दोगीजनी
सीताबाई म्हनीयीती मंडूदरी तू माजी कशी
रामाच्या राज्यामंदी तुज्यासारक्या माज्या दासी

लंकेमध्ये असलेल्या सीतेने रावणाच्या मंदोदरीस दिलेले बाणेदार उत्तर आणि मंदोदरीने सीतेला केलेली घमेंडखोर मागणी या गीतामध्ये सांगितलेली आहे.

सीता नार ही वनवाशी झाडाझुडाला मारी मिठी
लव अंकुशा बाळा येळं सव्वा म्हईन्याचा गर्भ पोटी
सीताबाई वनवाशी रथ येशीला थटला
सीताबाईला घालवाया राम सभेचा उठला
सीताबाई वनवाशी मागं सयांचा घोळका
सीता सईला सांगीती राम भुकेचा आळका
सीताबाईला वनवास केला हुता ग बाई कवा
माजे तू भैनाबाई राम भरात आला तवा
लक्षुमण दीर सये का ग निगाले वनाला
रेशमाचे गोंडे त्येंच्या धनुक्ष बानाला

लक्षुमण दीरा मला नेतोस कुन्या वना
लक्षुमण बोलयीतो नेतो वहिनी माहेराला
लक्षुमन दीरा तान लागली वनामंदी
तुळशीच्या काडचा पाणी केळीच्या डोळ्यामंदी
सीता सांगे कथा राम सांगून देईना
सीते तुजं दुक माज्या हुरदी माईना
सीतेला सासुरवास बाई कैकयीनं केला
राम सीतेचा जोडा न्हाई तिला बगवला
सीता निगाली वनाला सया गेल्या तीन कोस
फिरा मागारी बयानू शिरी माज्या वनवास
सीता निगाली वनाला संगं वानीनी बामनी
वनाला चालली ग रामचंद्राची कामिनी
सीता निगाली वनाला मागं सयांचा घोळका
फिरा मागारी बयानू देते वटीच्या खारका

लक्ष्मणाला बरोबर देऊन रामाने लोकांच्या समाधानाखातर म्हणून सीतेला वनवासाला धाडले त्या वेळची ही कथा आहे. पूर्वीच्या काळी राजाच्या राणीने लोकांच्या मर्जीनुसार असले पाहिजे अशी प्रथा असे! त्यामुळे अग्निदिव्य झाल्यानंतरही एका परटाने सीतेबाबत रावणाच्या घरच्या वास्तव्याचा उच्चार करून शंका काढल्याने रामाने सीतेला वनवासाला धाडली होती, तीच ही हकिगत आहे.

जरूर ती चालरीत सांभाळून सीतेच्या प्रेमातल्या आयावाया सीतेला निरोप देत तिच्यावरोबर जात असता, सीतेने त्यांना इथे दिलेले उत्तर हृदयस्पर्शी झाले आहे. ओटीच्या खारका परत करावयाच्या, रामाच्या भुकेची काळजी घ्यायला सांगायची आणि मोठ्या कष्टाने पाऊल उचलीत सर्वांना मागे फिरा म्हणून सांगावयाचे, ह्या इथे व्यक्त झालेल्या भावना काळजाचा ठाव घेणाऱ्या आहेत!

लक्ष्मणाने माहेरची वाट म्हणून खोटे सांगून वनाला नेले असता, पाणी मिळेना म्हणून डोळ्यांत आसवे आलेली केळीच्या कोंवासारखी सीता इथे जिव्हाळ्याने रंगविली गेली आहे.

सीता आपली कथा सांगू इच्छीत असता ते ऐकून दुःख होईल म्हणून सांगणारा राम इथे शब्दांकित झालेला आहे. त्यामुळे तो कितीही चांगला असला तरी सीतेवर तो अन्याय करीत असल्याची रुखरूख ही ओवी ऐकणाराच्या व सांगणाराच्याही मनाला लागल्याविना रहात नाही!

येवड्या वनामंदी काय दिसतं लाल लाल
सीताबाई बाळातीन लुगड्याचं दिलं पाल
सीताबाई वनवाशी दगडाची केली उशी
एवड्या वनामंदी झोप सईला आली कशी
एवड्या वनामंदी कोन रडती ऐका ऐका
सीता नारीला समजाया बोरी बाभळी बाईका
एवड्या वनामंदी कोन करीती जुजुजूजू
सीताबाई बोलं लवअंकुशा बाळा नीजू
सीता नार बाळातीन तिनं तणांची केली शेज
सीताबाई बोलं लव अंकुश बाळा नीज
सीता नार ही बाळातीन झाली गोसाव्याच्या मठी
चिंचेचा पाला वाटी लव अंकुशा देती घुटी
एवडा वनवास सीतासारक्या नारीला
बारा दिसांची बाळातीन दोन बाळुली नदीला
सीता नार बाळातीन न्हाई मिळाला कातबोळ
माजे तू भैनाबाई नार पेली चिंच कोळ
नाचन्या कोंडा नको खाऊ सीताबाई
लव अंकुश बाळ उद्या होतील शिपाई
सीता सांगती वनवास राम ऐकून घेईना
भरल्या सभेच्या पानी डोळ्यांत माईना
राम ग म्हनू राम न्हाई सीतंच्या तोलायाचा
हिरकनी सीताबाई राम हलक्या दिलायाचा

लव अंकुशाच्या वेळी वनामध्ये बाळंतीण झालेल्या सीतामाईच्या हाल-अपेष्टांची ही हृदयस्पर्शी नोंद आहे! एवढी रामाची राणी आणि जनकराजाची

लेक पण तिच्या नशिबी हा केवढा वनवास ! लुगडयाचे पाल देऊन बाळंत झालेली, दगडाची उशी केलेली, लव-अंकुशाला तणांची शेज घातलेली, तोंडाने अंगाई गाणारी, चिंचेचा कोळ पिणारी, नदीला धुणं धुणारी, नाचण्याचा कोंडा खाणारी अशी इथे वर्णन केलेली सीता ऐकणाराच्या मनाला चटका लावून सोडते. तिच्या या हालअपेष्टांनी ऐकणाराचे मन भरून येते ! आणि गोसाव्याच्या मठात एकटया असलेल्या या सीतेची बोरीबाभळी ह्या मानवी रूप घेऊन येऊन समजूत घालतात हे ऐकले म्हणजे तर जिवाची विलक्षण उलाघाल होते !

सामान्य स्त्रियांनी वनवासी सीतेची सांगितलेली ही कथा विशेष उल्लेखनीय असून हृदयंगमही झाली आहे.

**वधीली सीता नार साक्षी आणीले तिचे डोळे**
**राम धरनीला लोळे**
**वधीली सीता नार तिचा आनीला हात**
**जेवी कैकई दूधभात**

लक्ष्मणाने सीतेला वनवासात सोडली आणि तिचा मृत्यू झाल्याची खूण म्हणून आणलेल्या या खुणांनी रामाला झालेले दुःख आणि कैकेयीला झालेला आनंद इथे सांगितलेला आहे. परंतु वनवासी सीतेचे दुःख ऐकून पिचून गेलेल्या मनाला या बऱ्यावाइटाची फारशी कदर वाटत नाही, अशी वस्तुस्थिती या ओव्या गाताना दिसून येते !

**वनवासी सीताबाई सांगी जन्माची परवडी**
**लव अंकुशा बाळा येळं न्हवती रानीला शेगडी**
**वनवासी सीताबाई सांगी आपुलं वनवाळं**
**लव अंकुशा बाळा येळं न्हवतं बाळाला काजळ**
**बाणा मागं बाण बाण येत्याती झराझरा**
**लव नि अंकुयीस रामचंद्राचा वंश खरा**
**बाणा मागं बाण बाण सुटले चळक**
**लव अंकुशाची न्हाई रामाला वळक**
**लव अंकुशा ग बाळ सीताबाईचं कैवारी**
**लाडके भैनाबाई बाण सोडीले रामावरी**

**अंकुश रामायाचा लव कुणायाचा सांगू**
**सितेला पोटी घ्याया धरती लागली दुभंगू**

राम आणि सीता यांची पुन्हा भेट झाली त्यावेळी घडलेली हकिगत या गीतांनी दिलेली आहे. वनवासात झालेल्या हालअपेष्टा स्त्रीस्वभावानुसार सीता इथे रामाला सांगते आहे. शेकशेगडी आणि बाळाला काजळ नसल्याची तक्रार ती मांडीत असता, सामान्य स्त्रियांच्या डोळ्यांत पाणी उभे रहाते आणि मनात हलकल्लोळ उडवून सोडते!

लव आणि कुश यांच्या तिरंदाजीमधील कौशल्याने रामाला पटलेली ओळख म्हणजे इथे रंगविलेला एक अभूतपूर्व असा नयनमनोहर प्रसंग आहे. खुद्द रामावरही सीतेचा कैवार घेऊन लवकुशांनी केलेली बाणांची वृष्टी म्हणजे सीतेचा मोठा विजय आहे! आणि असे असूनही कुश रामाचा असला तरी लव कुणाचा सांगू म्हणून तिला कोडे पडले असता, पुन्हा काही दिव्य करायची पाळी तिच्यावर येऊ नये म्हणून ज्या धरणीतून ती वर आली तीच धरणी दुभंगून तिला पोटात घेत असल्याचा अखेरीस सांगितलेला प्रसंगही अवर्णनीय आहे! सामान्य स्त्रीमनातील सीतेबद्दलच्या आदराने इथे आपला परमोच्च बिंदू गाठलेला आहे!

**भाव माझा भोळा भक्ति माझी अशी कशी**
**सावळ्या रामराया कसं माजं चालवीसी**
**भाव माझा भोळा विसावा कुठं घेऊ**
**शिणल्या भागल्याचा सखा नांदतो तिथं जाऊ**
**भाव माझा भोळा भक्ति मजला येईना**
**दीनबंधु राम माजा चालवीता राहीना**

रामाबद्दलचा भोळा भाव इथे प्रकट झालेला आहे. रामायण ऐकून मनाची शांती झालेल्या भोळ्या श्रद्धेची ही प्रामाणिक साक्ष आहे. राम म्हणजे आपला पालनकर्ता आणि विसाव्याचे ठिकाण आहे तेव्हा त्याच्या भेटीला जावे, ही इथे व्यक्त झालेली कल्पना मनोहर आहे.

**अहिल्या झाली शिळा ऋषी गौतमाची कांता**
**तिला उद्धरवी सीता सैयंवराचा दाता**

अहिल्या झाली शिळा    ऋषी गौतमाची भार्या
तिला उद्धरावी    आता तुमी रामराया

अहिल्येचा उद्धार करण्याची विनंती रामाला करून नाशिकला गेल्यानंतर सामान्य बायका सांगू लागतात :

बारा वर्सं झाली    सीताबाईला जायाला
तापले डोंगर    खडे रुतती पायाला
बारा वर्सं झाली    सीताबाईच्या तपाशी
वळखू येईना    लव अंकुश रामाशी

आणि पुन्हा सगळे रामायण त्यांच्यापुढे उभे रहाते !

रामकुंडावरी    हिरवी पालखी कोणाची
आंगूळीला आली    सीता राणी ती रामाची
रामकुंडावरी    हिरवा मंडप जाईचा
आंगूळीपायी आला    पुत्र कौसल्याबाईचा

नाशिकच्या रामकुंडावरील हिरवळ बघून सामान्य बायकांना सुचलेली ही रामसीतेच्या स्नानाची कल्पना मोठी विलोभनीय आहे !

प्रभु रामचंद्राच्या आणि सीतामाईच्या कथा सांगणाऱ्या अशा कितीक गीतांनी मराठी मायबोली नटलेली आहे. तथापि मला गवसला तेवढा हा वानवळा मी इथे दिलेला आहे.

रामाविषयीचा पाळणा प्रस्तुत ग्रंथातील अंगाई गीताच्या स्वतंत्र प्रकरणामध्ये आलेला आहे.

राम ग राम    बाई सुचंना काय काम
रामावरी ग    हाई आमुचं मन
रामावाचुनी घेवना    बाई अन्न मला जरी
राम आमुचा मुरारी    बसा बाई खिनबरी
रामाला आमुच्या शीन फार    दावी वैकुंठीचं द्वार
कर जोडुनी करीतो येडं    रामनामाची आमा लई खोड
करते देहाचा पाट    करते मनाचा थाट
करते जिवाची शेवंती    उभा म्होरं हनुमंत मारुती

**कापूर जळं काकड आरती सीतामाईचा ग सारथी**
**रामाचा ग लई कैवारी आलं विघन निवारी**

शेवटी रामनामाच्या पवित्र उच्चाराने मनाला होणारे समाधान आणि त्या अनुषंगाने सुचलेली पूजेची कल्पना या गाण्यामध्ये सांगण्यात आलेली आहे. काकड आरतीच्या वेळची ही गीत-पूजा मोठी सुंदर आहे.

## मारुती

प्रभु रामचंद्राचा एकनिष्ठ सेवक म्हणून मारुतीची सर्वांना ओळख आहे. स्वत:ची सर्व शक्ती पणाला लावून मारुतीने राम आणि सीता यांची सेवा केली एवढ्या त्याच्या कर्तबगारीवरच सामान्य माणसे बेहद्द खूष आहेत.

मारुतीचे दुसरे नाव हनुमान किंवा हनुमंत असे आहे. या हनुमंताने रामरावण युद्धात रामाची बाजू फारच चांगली सांभाळली असून सीतेची सुटका करण्यास मदत केली आहे. याच हनुमानाची स्वामिभक्तीची खूण म्हणून एक लोककथा सांगतात. सीतेला घेऊन राम भारताला परतल्यानंतर एके दिवशी सकाळी असा प्रसंग निर्माण झाला की, रामाला फार तहान लागली होती. परंतु शिवलिंगाची पूजा केल्याशिवाय पाणी ग्रहण करावयाचे नाही, असा रामाचा नियम असल्या-कारणाने शिवलिंगाचा शोध सुरू झाला. पण शिवलिंग ऐन वेळी कुठे मिळेना. त्यावेळी हनुमान सात वने ओलांडून गेला आणि दोन शिवलिंगे पैदा करून आला. परंतु तो येण्यापूर्वीच सीतेने आपले सत्त्व पणाला लावून मातीचे शिवलिंग तयार केले व त्याची पूजा करून रामाला पाणी ग्रहण करावयास लाविले. हनुमानाला या गोष्टीची कल्पना नव्हती. म्हणून त्याने सीतेने केलेले शिवलिंग उचलून टाकून त्या जागी आपण मिळवून आणलेले शिवलिंग स्थापावयाचा प्रयत्न केला. पण त्याच्या शक्तीने माघार घेतली. कारण ते काही केल्या हालेनाच ! सीतेची थोरवी त्या मातीच्या शिवलिंगाने पारखली होती. म्हणून त्यावेळी हनुमानाने आपल्या शक्तीचा गर्व मनातून बाजूला काढून टाकीत सीतेच्या पायांवर लोळण घेतली, अशी ही कथा थोड्याफार फरकाने सर्वत्र सांगितली जाते.

**आठ दिसांच्या शनीवारी देवा मारुतीला आंगूळ**
**किष्णा सारीतीया घोळ**

दर शनिवारी मारुतीची पूजा करून त्यास स्नान घालण्यात येते व तो प्रसन्न व्हावा म्हणून लोक उपवास करतात त्याची माहिती इथे सांगितलेली आहे. या मारुतीला स्नानासाठी पाणी मिळावे म्हणून कृष्णानदी आपला घोळ (पाण्याचा लोंढा) त्याच्याकडे धाडते, ही या गीतात आलेली कल्पना मोठी हृदयस्पर्शी आहे.

**आता सापडला वल्या धोतराचा पिळा**
**आंगुळीला गेला देव मारुती ग भोळा**
**वल्या धोतराचा पिळा बाई घावला पान्या जाता**
**देव मारुती का ग आंगुळीला गेला होता**

या ओव्यांमध्ये मारुतीच्या आंघोळीची कल्पना ओल्या धोतराच्या पिळचावरून सांगितली गेली असून ओलेत्याने मारुतीची पूजा करणाऱ्या भक्ताचीही माहिती इथे नकळत सूचित केली गेली आहे. कारण भल्या पहाटेच्या वेळी ओल्या कपडचानिशी मारुतीची पूजा करण्याची चाल मराठी मुलखात आहे.

**चौघडा वाजताना सारा डोंगर दणाणला**
**देव मारुती जागा झाला**

पहाटेच्या वेळी होणाऱ्या मारुतीच्या पूजेची हकिगत या ओवीने दिली असून देवाला जाग येईपर्यंत पूर्वी चौघडा वाजविला जात असे, याची खूण इथे डोंगर दणाणल्याच्या निमित्ताने सांगितली गेली आहे! देव जागा व्हावयाचा म्हणजे गावची माणसे जागी होऊन त्याचे दर्शन घ्यावयास यावयाची व काकड आरतीला एकत्र जमा व्हावयाची, असा याचा अर्थ घ्यावयाचा.

**दुपारचा जोगी दूध मागीतो प्यायाला**
**देव मारुती ग आला सतव घ्यायाला**

दुपारच्या वेळी भिक्षेसाठी दारी आलेला जोगी ज्याअर्थी दूध मागतो आहे, त्याअर्थी मारुतीच सत्त्व घेण्यासाठी जोग्याचे रूप घेऊन दारी आला असला पाहिजे, अशी सामान्य मनाने केलेली खात्री इथे व्यक्त झाली आहे. पूर्वीच्या काळी देव सत्त्व घेण्यासाठी असा येत असल्याचा हा दाखला म्हणजे महाभारत-कालीन कथांच्या श्रवणाचा परिणाम असला पाहिजे. ऐकलेल्या कथेतील देव

कोणता का असेना, त्याची जागा आपल्या आवडत्या देवाने भरून काढावी, अशी भोळी श्रद्धा बाळगूनच बायका अशा ओव्या सांगतात!

माता अंजनीच्या पोटी बाळ जन्मले जगूजेठी
गुप्त सोन्याची कासोटी मुखी राम नाम
नको जाऊ मारूती जरा थांब थांब थांब
आमी जातो लंकेच्या तटी सीताबाई माऊलीसाठी
नको जाऊ मारूती जरा थांब थांब थांब
तिथं राक्षसांची दाटी तिथं मशी ध्यान
रावनाची मंडोदरी तिथं गेले बरमचारी
सीता आनली रावनचोरी कुठं ठेविली सांग
नको जाऊ मारूती जरा थांब थांब थांब
सीताबाईला लागली निद्रा जागी करूनी दिली मुद्रा
तिथे आले रघुपति सपनी राम
नको जाऊ मारूती जरा थांब थांब थांब
सीतामाईची आज्ञा घेतो कंदफळे वेचूनि खातो
मुंगी होऊन तिथं रहातो फार लहान
नको जाऊ मारूती जरा थांब थांब थांब
ह्या वनात बहुफळं दिसती तिथं राक्षसांची वस्ती
बाळ अंजनीचा खेळे कुस्ती पुच्छा फिरवी लांब
नको जाऊ मारूती जरा थांब थांब थांब
मारुतीनी राक्षस मारीले रावन राजापाशी सारे नेले
मोठं कठीन काम करी हनूमान
नको जाऊ मारूती जरा थांब थांब थांब
आले मारूती महानंदी तिथं राक्षसांची बंदी
सीता पुष्पाच्या हाराखाली घेई रामनाम
नको जाऊ मारूती जरा थांब थांब थांब

मारुतीच्या जन्माची हकिगत देऊन त्याने लंकेला केलेली कामगिरी इथे वर्णन केलेली आहे. हे गाणे बायका 'मारुतीचे गाणे' या नावानेच ओळखतात.

मारुतीच्या मुखी असलेल्या रामनामाची व त्याच्या जन्मतःच असलेल्या सोन्याच्या लंगोटचाची माहिती इथे सुरुवातीसच मोठ्या अभिमानाने दिलेली आहे. 'गुप्त सोन्याची कासोटी' असा लंगोटचाचा इथे उल्लेख आला आहे!

लंकेमधील हनुमानाची कौशल्यपूर्ण कामगिरी सर्वांच्याच परिचयाची आहे, ती इथे थोडचा विस्ताराने आली आहे असे म्हणता येईल. कारण नेहमीची कथा सांगितली जाते त्यापेक्षा लंकेतील फळांच्या बागेत राक्षसांची वस्ती असतानाही ती मिळावीत म्हणून मारुती त्यांच्याशी कुस्ती खेळतो, सीतामाईच्या आज्ञेने कंदमुळे खातो, सीतेला जागी करून रामाची मुद्रा देतो, मंदोदरीजवळ हा ब्रह्मचारी सीतेची विचारपूस करतो, सीतेवर पुष्पांचा वर्षाव करून तो तिला लपवून ठेवू पहातो इत्यादी प्रकारची इथे आलेली हकिगत वेगळी आणि तपशीलवार आहे.

या गाण्यातील मारुतीला 'जाऊ नको जरा थांब' असा केलेला अडथळा रावणाच्या भव्यतेची व हनुमानाच्या धैर्याची कल्पना देत आहे. वानरांच्या सैन्याच्या बळावर राक्षसांचा निःपात करणे अवघड असल्याची धोक्याची सूचनाच हा अडथळा व्यक्त करीत असावा! तथापि मारुतीने एवढी भरीव आणि कौतुकास्पद कामगिरी केली की, त्याला दृष्ट लागू नये म्हणून प्रत्येक कृतीनंतर त्याला 'आता थोडे थांब' असा इशाराही इथे दिला गेला असावा!

रामसीतेच्या सहवासात मारुतीचा विकास झाल्याने याच ग्रंथातील त्यांच्याविषयीच्या वेगळ्या प्रकरणामध्ये मारुतीची माहिती याखेरीज आणखी निराळी अशी आलेली आहेच.

शक्तीचा एक उपासक या दृष्टीनेही मारुतीचा नावलौकिक असून पहिलवान मंडळी त्या दृष्टीने त्याची आणखी वेगळी अशी उपासना करताना दिसून येतात.

## विठ्ठल रखुमाई

पंढरपूरचा विठोबा म्हणजे महाराष्ट्रातील लोकांचे एक आवडते दैवत आहे. बहुजन समाजाला संस्कृतातील धार्मिक व सामाजिक तत्त्वज्ञान समजावून द्यावे म्हणून मराठीची सेवा ज्ञानदेवांनी केली. त्यासाठी विद्यापीठ म्हणून त्यांनी पंढरपूर निवडले आणि नामदेवासारखा कीर्तनकार हाताशी घेतला.

पंढरपूरच्या विठ्ठलाचे राऊळ त्यावेळी मराठीचे माहेरघर झाले. तेव्हापासून गेली सातशे वर्षे विठ्ठलाचा महिमा अजूनही अखंडपणे टिकून आहे. हजारो वारकरी म्हणूनच दर वर्षी पंढरीला जाऊन येतात. विठ्ठल रखुमाई म्हणजे जणू सर्वांचे मायबाप हीच भावना !

जुन्या काळच्या थोर संतांनी विठ्ठलाचा महिमा आपापल्या परीने गायिलेला आहे. सामान्य स्त्री-मनालाही विठ्ठलाची गोडी आगळी. या स्त्रियांनीदेखील विठ्ठलाचे गुणगान केले आहे. पण संतमंडळींच्यापेक्षा हा भावनाविष्कार वेगळा, मनाचा मोकळा आणि सगळ्यात सगळा असा आहे.

**एवढंसं होतं पंढरपूर**
**विठोबारायाचं नगर**
**रखमाबाईचं सासर**
**अग अग भुलाई माळणी**
**तुला ग राजा बोलावितो**
**तुला ग कंगण्या घडवितो**
**नको मेल्याच्या कंगण्या**
**विकीन सोनियाची भाजी**
**घेईन मोतियाची वेळा**
**माझा माळी तो बरवा**
**दंडी रुमाल हिरवा**
**दंडी रुमाल काय परी**
**हिरा झळकतो तुऱ्यावरी**

पंढरपूरचे आणि तेथील विठोबाला फुले पुरविणाऱ्या माळणीचे स्वभाववर्णन या गाण्यामध्ये आलेले आहे. हे गाणे दिसायला लहानसे आहे. परंतु त्याने एका फार मोठ्या मानवी वृत्तीचा उल्लेख केलेला आहे. स्वाभिमानी माळणीने राजाच्या पैशाला लाथाडून आपल्या पतिनिष्ठेचा व कर्तबगारीचाही उल्लेख करून आपल्या धंद्याशी इथे इमान राखले आहे !

**पैला माजा दंडवत**
**सावळ्या पांडुरंगा**

**हाय इसाव्यापासुनी**
**न्यावं रथात बसवुनी**

दुसरा माजा दंडवत चंद्रभागेच्या अलीकडं
सावळ्या पांडुरंगा मला न्यावं पलीकडं
तिसरा माजा दंडवत चंद्रभागेच्या वाळवंटी
सावळ्या पांडुरंगा झाल्या कुंडलिकाच्या भेटी
चवथा माजा दंडवत नामदेवाच्या पायरी
सावळ्या पांडुरंगा चोखामेळा तो भाईरी
पाचवा माजा दंडवत चढं घाटाच्या पायऱ्या
सावळ्या पांडुरंगा भेट द्यावीस सोयऱ्या
साव्वा माजा दंडवत उभी राहिले बारीला
माज्या ग दर्शनाची चिंता पडली हरीला
सातवा माजा दंडवत उभी राऊळाच्या कोना
मला का भेट द्यावी इटेवरील्या मोहना
आठवा माजा दंडवत उभी राहिले इटेपशी
सावळ्या पांडुरंगा संतासंगती कर गोष्टी
नव्वा माजा दंडवत उभी साकळ दंडापाशी
सावळ्या पांडुरंगा पातकाच्या जळं राशी
धाव्वा माजा दंडवत राऊळात झाली दाटी
सावळ्या पांडुरंगा होती संतांच्या भेटाभेटी
अकरावा माजा दंडवत गरुड खांबाला घाली येडा
सावळ्या पांडुरंगा जनी आलीया वाट सोडा

पंढरीच्या वारीला गेलेल्या भावड्या मनाने विठ्ठलाला दंडवत घालता घालता, पंढरपूर जवळ येईल तशी आपली भावना या ओव्यांच्या निमित्ताने बोलून दाखविलेली आहे. विठोवा आणि आपण अगदी एकजीव झाल्याचे सांगण्याची ही तऱ्हा मोठी देखणी आहे. जनाईला विठोवाने कामाधामात मदत केल्याची कथा ऐकल्याकारणाने विठोवा आपल्यालाही कसा जागोजाग प्रसन्न झाला आहे ते भोळ्या भावानें इथें व्यक्त झालेले आहे. एवढेच नव्हे तर आपल्याला अडथळा होताक्षणीच विठ्ठल चिंताग्रस्त झाल्याचेही आवर्जून सांगितलेले आहे! विठ्ठलाला सोयरा मानून घाटाच्या पायरीवरच भेटीस

यावयाचे निमंत्रण करीत असताना त्याच्या राउळात झालेली हालचाल व्यक्त करते वेळी जनाईच आपल्या रूपाने आली आहे, ही भावना या बायका उरीपोटी बाळगतात! त्यामुळं त्यांनी आपल्या भोवतालच्या गर्दीला वाट सोडायची केलेली विनंती मोठी हृदयस्पर्शी आहे.

| | |
|---|---|
| **पैल्या पंगतीला** | **बाई मी घालीते रांगूयोळी** |
| **इट्टल तुकाराम** | **ह्याव गेल्याती आंगूयोळी** |
| **दुसऱ्या पंगतीला** | **बाई मी टाकीयीते पाट** |
| **इटू देवाच्या जोडीला** | **सादु जेवीले तीनशे साठ** |
| **तिसऱ्या पंगतीला** | **बाई मी टाकीयीते पान** |
| **इटू देवाच्या संगं** | **देव जेवीला सूर्याबान** |
| **चवथ्या पंगतीला** | **बाई मी वाढीते ग भात** |
| **इटू देवाच्या पंगतीला** | **सये जेवीला एकनाथ** |
| **पाचव्या पंगतीला** | **बाई मी वाढीते तूपपोळी** |
| **इटू देवाच्या शेजारी** | **पंढरीचा ग वनमाळी** |
| **सहाव्या पंगतीला** | **मी ग वाढीते शाकभाज्या** |
| **इटू माज्याच्या सोबतीला** | **पाची पांडव धर्मराजा** |
| **सातव्या पंगतीला** | **बाई मी वाढीते दहीभात** |
| **इटू देवाच्या पंगतीला** | **देव जेवीला रघुनाथ** |

देवाला जेवू घालण्याची इच्छा या ओव्यांमधून प्रकट झालेली आहे. सर्वसामान्य मानवांची पंगत एखाद्या घरात उठावी तसा प्रकार इथे झाला आहे. परंतु महत्त्वाच्या देवमाणसांना विठ्ठलाच्या पंगतीचा लाभ झाल्याकारणाने या पंगतीची शोभा आगळी झाली आहे. या ठिकाणी कथा व पोथ्या ऐकून लक्षात राहिलेल्या पांडवांचा, कृष्णाचा आणि संतांचा या पंगतीत समावेश केला असून सूर्यालाही तेथे आणून बसविले आहे!

| | |
|---|---|
| **पहिल्या पंगतीत** | **रुक्मीण वाढत गेली मीठ** |
| | **पायी तोडचाचा थाट** |
| **दुसऱ्या पंगतीत** | **रुक्मीण वाढत गेली खीर** |
| | **गळी शोभतो चंद्रहार** |

तिसऱ्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली गूळ
जरी पातळ पायघोळ
चवथ्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली भात
जेवला पैठणचा एकनाथ
पाचव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली पोळी
आला आरणचा सावतामाळी
सहाव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली वडं
पायी शिंदेशाई तोडं
सातव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली डाळ
गळ्या पुतबीळ्यांची माळ
आठव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली कढी
हाती राजवरखी बांगडी
नवव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली भेंडी
देवा लावावी तुमी तोंडी
दहाव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली धई
जेवली ज्ञानोबा मुक्ताबाई
अकराव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली पिठलं
साधू जेवून तीनशे उठलं
बाराव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली तूप
विठू नारायणाचं रूप
तेराव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली ताक
मानसं जेवली सारी पाक
चवदाव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली सार
गळी नवलाखी हार
पंधराव्या पंगतीत रुक्मीण वाढत गेली पाणी
देवा विठ्ठलाची राणी

या ओव्यांच्या निमित्ताने विठ्ठलाच्या घरी निरनिराळ्या संतांच्या समवेत जेवण घेतल्याचे समाधान वारकरी मनाने अनुभवलेले आहे. विठ्ठलाच्या घरी

जेवण आणि रुक्मिणीने स्वत: पंगतीला वाढणे ही गोष्ट मोठी अद्‌भुतरम्य तर खरीच पण देवाबद्दलचा विशेष जिव्हाळा व्यक्त करणारी झाली आहे. देवाघरचे हे जेवण असले तरी सामान्य माणसाच्या घरातीलच पदार्थ इथे ताटात आल्याने त्यांची चव आणखी अवीट झाली आहे! भपकाच म्हणावयाचा तर तो फक्त रुक्मिणीच्या अंगावरील साडीचा व दागिन्यांचा आला आहे. एरवी इथे सर्व अगदी रोजच्या परिचयाचेच वाटावे, एवढा स्वाभाविक असा हा भावनाविष्कार झालेला आहे. त्यामुळेच सर्वसामान्य स्त्रीला या ओव्या मोठ्या समाधानाने म्हणाव्याशा वाटतात!

**मोत्या पवळ्यांची रांगोळी जडीत पाटावरी**
**त्यावरी बैसावे जेवाया पंढरीराया, यावे लौकरी**
**चहूकडे समया लावोनी उदबत्त्या खोवोनी**
**झाऱ्या पंचपात्र्या भरोनी उटी घ्या हो हरी**
**केशर कस्तुरी कपाळी अक्षदा नीढळी**
**तुरा खोविला मोत्यांचा गळा हार तुळशीचा**
**रूप दिसते अमोलिक रत्नजडित पाट**
**त्यावरी बैसावे जेवाया पंढरीराया, यावे लौकरी**
**शाखा साठोऱ्या रुचकरी बारा कोशिंबिरी**
**आणिक सांबारी गोळ्याची सुंदर शेवग्याची, पाने वाढिली**
**खिरी दुधाच्या आळविल्या पानावरी वाढिल्या**
**श्रीखंड बासुंदी पुरी लोणी पक्वान्ने ऐशी वाढोनी**
**रस आंब्याची शिकरणी दही दूध दोन्ही, पाने वाढिली**
**पोळी पुरणाची पांढरी आणिक गुळवणी**
**घावन घारगे घारीया खाजा करंजीया**
**लाडू बुंदीचे फेणीया धीवर मांडीया, पाने वाढिली**
**भात केशरी मोहन आणिक साखर**
**आंबेमोहोर जिरेसाळ तूप परीमळ**
**वरी वरण निर्मळ, वैरिले वरंगळ, पाने वाढिली**
**आले जेवया रघुपती आनंदले चित्ती**

जेवुनी उठले रघुवीर तांबूळ घेतिले
चरणी लागते विठुराया पंढरीच्या राया, यावे लौकरी

या गाण्यामध्ये सामान्य मनाला सुचेल तेवढे सगळे वैभव आलेले आहे. येथे व्यक्त झालेला हा सगळाच थाट देवाला शोभणारा परंतु सर्वसामान्य मनाला अद्‌भुतरम्य वाटणारा, न पेलणारा असा आहे. त्यामुळे मध्यमवर्गीय महिलांच्या तोंडी हे गाणे जेवढे आढळते, तेवढे शेतकरी वा कामकरी स्त्रीजवळ आढळत नाही. विठ्ठलाच्या वर्णनाबरोबर पक्वान्नांची झालेली श्रीमंती थाटाची आहे. त्यामुळे रत्नजडित रांगोळीचा थाट कल्पनेनेदेखील डोळ्यांसमोर येईल की नाही याची सामान्य मनाला शंका वाटते!

पंढरीला जाते मी संगं न्यावं मावशीला
सोन्याच्या कळशीनं पानी घालीते तुळशीला
पंढरीची ग वाट बाई कशानं झाली वली
सईला किती सांगू ऱ्हाई रुक्मीन पानी न्हाली
पंढरीची ग वाट कुन्या पाण्यानं नांगरली
लाडके भैनाबाई गाडी बुक्क्याची हादरली
पंढरीला जाया माज्या आळीची गेली सारी
माज्या ग राजसाची बाई आटपना तालीवारी
पंढरी पंढरी नऊ लाखाचा कळस
देवा विठ्ठलानी वर लावीली तुळस
पंढरीला जातो जातो म्हणून ऱ्हाऊ नका
देवा माज्या इट्टलाला वाट बगाया लावू नका
पंढरीला जाया मी का विच्यारी सासूबाई
लाडके बाळाबाई पांडुरंगाच्या वारीपाई
पंढरीला जाया घाट चढते दरडीचा
पांडुरंगाच्या माज्या बाई आला सांगावा पिरतीचा
पंढरीची हवा काय सांगू मी वेडीला
चंद्रभागा सोडूयीनी करी आंगूळ वड्याला

काय पुन्य केलं — कुंभाराच्या ग वीटं
विठ्ठलाचे पाय — तुला सापडलं कुठं
विठ्ठलाचे पाय — जसे कोरीव भोपळे
करीत दर्शना — आत सोडून मोकळे
विठ्ठलाचा शेला — कोन्या शिंप्यानं शिवीला
देव पांडुरंग — वर अभंग लिहीला
पंढरी पंढरी — दिसती ग अवचित
सईला किती सांगू — देव बसले नामानीट
भरली चंद्रभागा — पाणी लागलं तटायाला
सावळ्या बाळराजा — उभा इट्टल घाटायाला
पाटच्या पान्यामंदी — कर्णा वाजतो मंजूयीळ
सावळ्या विठूबाला — दह्या दुधाची आंगूयीळ
पाटच्या पान्यामंदी — कर्णा वाजतो सोनीयाचा
माज्या त्या विठूबाला — आला निवद लोनीयाचा
जाईन पंढरीला — उभी राहीन धर्मशाळं
इट्टल देव बोलं — कवा आलीस लेकीबाळ
पंढरपूर बाई — माजं म्हायार साजनी
विठ्ठल शिवी चोळी — हरीनामाची गजनी
पंढरपुरामंदी — बाई कशाचा गलबला
रुक्मिनी घेई चोळी — नामदेव शिंपी आला
पंढरपुरा जावं — संगं न्यावं आईला
गोपाळ पुरामंदी — कडबा सोडावा गईला
जाऊनी पंढरी — महाद्वारी मी चुकली
देवा विठ्ठलाच्या — चंद्रहाराला दिपली
पंढरपूर बाई — दुरून दिसतं लालशार
देवा विठ्ठलाच्या — तुळशीबनाला आला भार
पंढरपुरीचा ग — माळीदादा अव्वल
रुक्मिनीच्या राऊळाला — घाली फुलांची कवलं

पंढरपुरामंदी बाई पैशाला माळा नऊ
हात माजा पुरंना देवा विठ्ठला खाली लवू
जाऊनी पंढरी उभी राहीले धोंड्यावरी
नदर माजी गेली रुक्मिनीच्या गोंड्यावरी
पंढरपुरात ग बुक्का विकीती शेरानं
विठ्ठला शेजारी रुक्मिन बसली भारानं
पंढरीची वाट सई चालाया हालकी
माजे तू राजाई संगं साधूची पालखी
पंढरीला जाती लोकं पैशाच्या ग बळं
माजा नमस्कार काकड आरतीच्या येळं
पंढरी पंढरी विठूरायाची नगरी
रुक्मिनीबाईनं ग भरल्या बुक्क्याच्या घागरी
भरली चंद्रभागा पल्याड कशी जाऊ
रुक्मिनी नवरीनं फुलांची केली नावू
शेरभर सोनं रखमाईच्या ग अंगावरी
असा ढाळ देतो चांद सूरव्या भांगावरी
पंढरीची वाट दिंड्या पताका लोळती
देवा माज्या विठ्ठलाचं साधु रंगान खेळती
पंढरपुरामंदी न्हाई कशाची निवड
देवा विठ्ठलाला चोख्यामेळ्याची आवड
पंढरीची वाट कशानं ग झाली लाल
ज्ञानदेव नामदेव इथं येऊन गेले काल
पंढरपुरामंदी बाई पैशाला माळा वीस
देवा माज्या विठ्ठला हात पुरेना खाली बस
पंढरपुरामंदी विठू देवाची कोणती आळी
लाडके मैनाबाई दारी बुक्क्याची रांगोळी
पंढरपुरामंदी हाईत्या मालनी रमाउमा
देवा माज्या विठ्ठलाला शेवंती फुलांचा पायजमा

पंढरपुरामंदी बडवे करीती मारामारी
देव इठ्ठल बोलयीतो येऊंद्याती माजी सारी

पंढरपुरामंदी याक नवाल यीपीयीलं
विठ्ठल देवानी ग वाघ रथाला जुपीयीलं

पंढरीचा माळ सये हिरवा लुसलुशी
देवा विठ्ठलांनी दारी लावील्या तुळशी

विसाव्या पासुनी बाई पंढरी तीन कोस
देवा माज्या विठ्ठलाचा दिसं सोन्याचा कळस

आठा दिवसाच्या एतवारी विठू यावं माज्या वाड्या
कापराच्या वड्या देवा घालीन पायघड्या

पंढरपुरामंदी माळणी ग निरदोशी
तुळशीच्या माळा गरुड खांबापाशी

एकादशी बाई दुवादशी ग माझे आई
बारस सोडायला हरी अजून आला न्हाई

पंढरीला जाते गरुड खांबाला देते पाठ
लाडके भैनाबाई तिथं गडनी तीनशे साठ

विटेवरी उभा वसुदेवाचा ताना बाळ
सईला किती सांगू हाती चिपळ्या वीणा टाळ

पंढरपुरामंदी कोन सोन्याच्या जोडव्याची
माजी ती रखुमाई राणी माज्या विठ्ठलाची

भरली चंद्रभागा पाणी लागलं वडायला
विठ्ठल रखुमाई जाती नारळ फोडायला

पंढरीचा विठू न्हाई कुनाच्या देव्हायिरी
त्येच्या ग दर्शनाला सारी लुटली जवायीरी

वाखुऱ्या वड्यावरी झालं फुलांचं हातरून
ज्ञानूबा तुकाराम देव गेल्याती उतरून

विठूच्या देवळात वारकऱ्यांची झाली दाटी
तान्या ग राजसाची मानकऱ्याची गेली काठी

विटंवरी उभा
युगं झाल्याती अठ्ठावीस
देवा माज्या विठूबाला
कोन म्हनीना खाली बस

दुकानदारानू
तुमी दुकानं हालवा
देवा विठ्ठलाचा
आला रथाचा हेलवा

पाऊस पडतो
पंढरीच्या माळावरी
ज्ञानोबा नामदेव
माझे भिजले वारकरी

पंढरपुरीच्या
माळिणी उंच काठच्या
देवाच्या पालखीला
फुलांच्या बांधा काठ्या

भरली चंद्रभागा
पाहिले पंढरपूर
पाण्यात राहिले
उभे विठ्ठलाचे घर

भरली चंद्रभागा
पाणी शिरले गावात
हाती घेऊनी कावड
इठू चालला धावत

पंढरपुरामंदी
पाऊस पडतो झिरीमिरी
सावळा बाळराज
माजा भिजला वारकरी

विठ्ठल माजा सका
रुक्मीन माजी माता
येता जाता पाय धुई
चंद्रभागा पतिव्रता

विठ्ठल माजा सका
रुक्मीन माजी माता
शीन माजा गेला
दोगांला वव्या गाता

या ओव्यांनी पंढरपूरचे आणि विठोबाचे मनसोक्त गुणगान केलेले आहे. दळणाऱ्या बाईच्या तोंडून एका दमात एवढ्या ओव्या बाहेर पडू लागल्या, म्हणजे या गीतांना नवख्या असलेल्या माणसांना मोठा अचंबा वाटू लागतो. वाटायला लागते की, एवढी ही प्रचंड कल्पना एका मनाला सुचते तरी कशी?

या गीतांपैकी प्रत्येक ओवी ही निराळी भावना घेऊन आली आहे. तशीच ती वैशिष्टचपूर्णही आहे. गावात पाणी शिरले म्हणून कावड घेऊन विठोबा धावत जातो आहे, विठोबा अठ्ठावीस युगे विटेवर उभा तरी त्याला कुणी खाली बैस म्हणून सुचवीत नाही, तो उभा आहे ती वीट कोणते पुण्य केले म्हणून तिथे आली आहे, विठ्ठलाच्या शेल्यावर अभंग लिहिणारा शिंपी, विठोबाने शिवलेली हरिनामाची गजनी चोळी, पंढरपूरच्या माळ्याने रुक्मिणीच्या घरावर घातलेली

फुलांची कौलं, विठोबाच्या घराची खूण म्हणून त्याच्या दारी दिसणारी बुक्क्या रांगोळी, पैशाला मिळणाऱ्या वीस माळा उंचेल्या विठोबाला घालण्यासा हात पुरेना म्हणून त्याला खाली लवावयाची अगर बसावयाची केलेली सूच इत्यादी किती तरी शेलक्या भावना इथे मोठ्या दिमाखाने व्यक्त झालेल आहेत. ही कल्पनाशक्ती सामान्य मनाच्या मानाने खरोखरच विलोभनीय आ साध्यासुध्या मनाने एवढे चांगले वर्णन करून पंढरीची दुनिया अशी नजरेसमो उभी केली आहे. अतिशय प्रामाणिकपणाने मनात आले ते बोलून दाखविण्याच ही खुबी तिची गोडी विशेष वाढविते. एवढेच नव्हे तर ज्याची पंढरपूरच्य विठोबावर भक्ती जडलेली नाही,त्याचेदेखील मन जिंकण्याची हिंमत या गीतांच्य अंगी बाणलेली आहे! त्यामुळे विठ्ठलरखुमाईला वडील व आई मानून गायिलेल्य या ओव्यांनी सर्व शीण नाहीसा झाला ही या गीतांनी साधलेली अखेरदेखील मोठी आकर्षक वाटते. इथे आलेले खुद्द पंढरपूरचे वर्णनही सुंदर आहे.

**माज्या ग दारामंदी**
**हाई दराक्षाचा येल**
**त्याचं करंडीयानी फूल**
**तोडुनी मोडुनी दिलं**
**ऱ्हाई रुक्मिनीजवळी**
**हितच रात्र झाली**
**विठ्ठल कुठं जी करमीलं**
**हुतो गाईच्या गोठनी**
**हुतो मुंगीच्या पैठणी**
**अबीराचा डाग तुमच्या शेल्याला**
**सांगा आला वो कोठूनी**
**आत्तार माजा त्यो मैतर**
**त्येचा अबीर तोलीला**
**त्येचा दुरुस लागीला**
**हावस मला मोठी**
**बाई पंढरीला जायाची**

बाई राऊळी न्हायाची
हंडी फुटली दह्याची
झुंबड पडती पाह्याची
आपल्या घराला जायाची

ह्या लहानग्या गीताने पंढरीला जाण्याची हौस, आपल्या दारीच्या फुलांची रुक्मिणीला दिलेली भेट, विठ्ठल-रुक्मिणींची संशयास्पद प्रश्नोत्तरे आणि दही-हंडीच्या काल्याची गंमत एवढ्या अनेक गोष्टींची माहिती दिलेली आहे. एखाद्या अद्‌भुत कथेसारखी ह्या गीताची बांधणी आहे आणि अंतरीचा जिव्हाळाही मोठा अपूर्वाईचा आहे. त्याकारणाने हे गाणे फारच चांगले रंगते.

या गीतांची भाषा इतकी सोपी आणि शब्दरचना इतकी शेलकी झालेली आहे की, त्यांनी स्वतःच आपला अर्थ स्वयंपूर्णतेने ऐकणाराला सांगितला आहे! म्हणून अधिक विवेचनाची अगर संदर्भाची त्यास आवश्यकताच भासत नाही!

रुसली रुक्मीन — देवाजवळी बसयीना
गर्दी नारीला सोसयीना
रुसली रुक्मीन — ती का जेवीना दूधपोळी
इटू जनीची शिवी चोळी
रुसली रुक्मीन — का ग जेवीना दूधभात
इटू जनीच्या मंदिरात
रुसली रुक्मीन — बापा घरी सांगं चाडी
मला सवती बांधा माडी
रुसली रुक्मीन — ती ग बसली खिडकीत
विठू पंढरी धुंडीयीत
रुसली रुक्मीन — ती का बसली वाळवंटी
विठू चरणी घाली मिठी
रुसली रुक्मीन — गेली पदम तळ्यायाला
हात विठूचा गळ्यायाला
रुसली रुक्मीन — अवघ्या पंढरीत न्हाई
हिच्या रागाला करू कायी

रुसली रुक्मीन हिचं रुसनं वंगाळ
गार पाण्याची आंगूळ
रुसली रुक्मीन जाऊन बसली डगरीला
हसू आलं नगरीला
रुसली रुक्मीन जाती मंगळवेढ्यायाला
जिन घातीलं घोड्यायाला
रुसली रुक्मीन देवा पिरीत कोणायाची
घरला येती जाती माजी सगळी गुणायाची

या ओव्यांच्या रूपाने विठ्ठलावर रुसलेली रुक्मिणी आपल्या नजरेसमोर उभी करण्याचे काम सामान्य बायकांनी केलेले आहे! रुक्मिणी रुसली म्हणून विठ्ठलाची केवढी धांदल उडाली आणि तिचा रुसवा काढण्यासाठी त्याने काय काय खटपट केली, याचे हे एक मनोहर चित्र आहे. सामान्य लोकांच्या जीवनातील हा प्रसंग देवाच्या घरात निर्माण करून देवाला मानवीरूप देण्याचा केलेला हा प्रयत्न मोठा चित्ताकर्षक आहे. आपली सुखदुःखे देवालाही सुटू नयेत अशी सामान्य मनाला वाटणारी कल्पना इथे या रीतीने शब्दमय झालेली आहे. त्यामुळे या ओव्या गाताना व ऐकताना मोठी बहार उडून जाते!

रुक्मिनी धुनं धुती देव इट्ठल वरी बसं
दोगांच्या पिरतीचं चंद्रभागाला येतं हसं
सोळा सत्रा नारी कवाडाच्या कोनी
इट्ठल देव बोलं रजा दे ग रुक्मीनी
रुक्मीनीची साडीचोळी नऊ लाखाची जरतारी
देवा भिमक्कांनी लेक थोराच्या घरी दिली
गोपाळपुरा जाया तुला रुक्मिनी झालं ऊन
देवा माज्या विठ्ठलांनी बघ लावीली चिंचबनं
रुक्मिनीला मागयीनं काशीखंडाचं आलं देव
कोऱ्या कागदी काळी शाई वर विठ्ठलाचं नाव
पांडुरंग म्हनीयीतो देग रुक्मिनी धोतयीर
दिंडी आली ज्ञानोबाची मी ग जातो सामोयीर

| | |
|---|---|
| विठ्ठल देव बोलं | सोड रुक्मिनी माजी बंडी |
| आल्याती साधुसंत | दिंडी दरवाज्या तोंडी |
| गोरी रुक्मीन | काळ्या विठूबाला दिली |
| मोत्या पवळ्यांची | कुनी जडाजड केली |
| गोरी रुक्मीन | काळासावळा तिचा पती |
| सुरतीचं मोती | कुन्या जवान्यापशी हूती |
| शेर शेर सोन्याच्या ग | रखमाबाईच्या पाटल्या |
| देवा इट्ठलाच्या | किती म्हवरा आटल्या |
| शेर शेर सोन्याच्या ग | रखमाबाईच्या खुट्टावळ्या |
| देव इट्ठल फिरतो | जव्हान्याच्या सान्या आळ्या |
| शेरभर सोन्याचं ग | रखमाबाईचं गोंडं |
| देवा इट्ठलाला माज्या | राज पंढरीचं दंडं |
| रुक्मिनी लेनं लेती | लेती लोन्याचे बाजूबंद |
| देवा माज्या इट्ठलाला | हाय डागीन्याचा छंद |
| रुक्मिनी लेनं लेती | सव्वा तोळ्याची बुगडी |
| देवा माज्या इट्ठलाची | खिडकी राजाची उगडी |
| रुक्मिनी लेनं लेती | साज मागीती डोरल्याचा |
| इट्ठल देव बोलं | मळा पिकूंदे कारल्याचा |
| इट्ठल देव बोलं | चल रुक्मिनी माडीवरी |
| ग्यानूबाचा सोळा | आला पाहूया घडीभरी |
| इट्ठल म्हनीयीतो | का ग रुक्मिनी डोळे लाल |
| गोपाळपुरामंदी | चोळी भिंगाची घेतो चल |

विठ्ठल आणि रुक्मिणी यांच्यामधील समाधानी जीवनाची हकिगत या ओव्यांनी सांगितलेली आहे. त्याचबरोबर भगवान श्रीकृष्णाचा नवा अवतार म्हणजेच विठोबा असल्याचेही इथे मोठ्या सुंदर रीतीने सूचित केलेले आहे!

रुक्मिणीच्या अंगावरील दागिने आणि विठ्ठलाने तिची हौस पुरविताना दिलेले उत्तर, ह्या या ठिकाणी व्यक्त झालेल्या भावना सामान्य स्त्रीच्या मनातील ऐश्वर्यसंपन्न कल्पनेतून उतरलेल्या आहेत.

विठ्ठलाच्या रूपाबद्दल या गीतांनी सांगितलेली कल्पना मोठी सुंदर आ
काळ्या रंगातही किती सौंदर्य सापडते, हे त्याच्या घरच्या धनदौलतीने
दाखविण्याचा प्रयत्न केलेला आहे.

रुक्मिणीने विठ्ठलाला पसंत केल्याची 'कोऱ्या कागदी काळी शाई' व '
विठ्ठलाचं नाव' ही निशाणी इथे मोठ्या खुबीने सांगितली आहे. त्याम
सुशिक्षित मनालाही ही कल्पना वेड लावून सोडणारी आहे असे दिसून येईल!

विठ्ठल आणि रुक्मिणी यांच्यामधील प्रेमभावही इथे मोठ्या छानद
रीतीने व्यक्त झाला असून त्या दोघांमधील प्रेमलीला बघून चंद्रभागेला हसू ये
ही कल्पना तर फारच सुंदर आहे.

आपले प्रिय भक्त घरी येतात तेव्हा त्यांची आपणाला किती आव
आहे, हे दर्शविण्यासाठी विठ्ठलाने इथे केलेली भाषा नितांतरम्य आहे. अंगाव
उपरणे घेऊन ज्ञानोबाला सामोरे जावयाचे आणि दारात उभ्या असलेल
साधुसंतांच्या दिंडीला भेटण्यासाठी अंगातील बंडी काढण्याची विनंती रुक्मिणी
करून पुढे व्हावयाची घाई करावयाची ही ह्या गीतांनी सांगितलेल्या भाव
विठोबाच्या थोरवीबरोबरच सामान्य मनाच्या भव्य व सुसंस्कृत कल्पने
चुणूकही दाखवितात.

**राजा भिमक्काची रुक्मीन किती शानी**
**अंगं पाईला वर पंढरीचा राजा धनी**
**राजा भिमक्काची रुक्मीन उपवर**
**अंगं लिहिली पत्रिका लाविती देशावर**
**राजा भिमक्काच्या नऊजनी कन्या**
**धाकली रुक्मीन दिली पंढरीच्या वान्या**
**रुक्मीन दिली पंढरीच्या गुजऱ्याला**
**नऊ लाख मोती तिच्या पायीच्या जोडव्याला**

इथे रुक्मिणीच्या लग्नाच्या वेळची हकिगत आली असून त्याची अखेर अ
साधलेली आहे :

**पंढरपुरात काय वाजतं गाजतं**
**सोन्याचं बाशिंग लगीन देवाचं लागतं**

म्हणजे जुन्या काळच्या लग्नपद्धतीची हकिगत सांगताना इथे जुन्या काळी मुलीने स्वत: आपला नवरा पसंत करावयाची जी पद्धत होती तिचाच हा आविष्कार आहे. रुक्मिणीने विठ्ठलाला पत्र पाठविले अशी इथे सांगितलेली कल्पना मोठी आकर्षक आहे. तसेच नऊ लाख मोती जोडव्याला लावणाऱ्या रुक्मिणीचे या ठिकाणी सांगितलेले वैभवही आगळे आहे!

| | |
|---|---|
| **रुक्मिनी विचारीती** | **देवा जनीचं काय नातं** |
| **विठ्ठल सांगीयीतो** | **पाखरू वस्तीला आलं हुतं** |
| **पंढरी वसली** | **जागा मैदानी पाहुनी** |
| **साधुसंत येती** | **टाळ मुडदुंग लावूनी** |
| **विठ्ठलाचं राज** | **रुक्मिन सांगीती बापाला** |
| **दीड लाख मोती** | **माज्या झुब्याच्या कापाला** |
| **विठ्ठलाचं राज** | **रुक्मिन सांगीती आईला** |
| **सव्वा लाख मोती** | **माज्या चोळीच्या बाहीला** |
| **विठ्ठलाचं राज** | **रुक्मिन सांगीती भैनीला** |
| **दोन लाख मोती** | **माज्या वेनीच्या गोंड्याला** |
| **विठ्ठलाचं राज** | **रुक्मिन सांगीती भावाला** |
| **सोन्याचा कळस** | **पंढरी गावाला** |
| **नऊ लाख मोती** | **विठूरायाच्या कळसाला** |
| **चडता उतरता** | **गवंडीदादा आळसला** |
| **रुक्मिणी माजे लेकी** | **भिम्मक राजा म्हनी** |
| **अंगं पारकीला तू** | **साऱ्या पिरतीमीचा धनी** |
| **नऊ लाख मोती** | **विठ्ठलाच्या पगडीला** |
| **भिम्मक राजानी** | **समींदर आंदण दिला** |
| **रुक्मिनीला दिली** | **पंढरी पाहुनी** |
| **हळदीकुंकवाला दिली** | **आळंदी लिवूनी** |

विठ्ठल रुक्मिणी यांचा विवाह झाल्यानंतर आपली पंढरी नगरी आणि आपल्या घरचे वैभव कसे आहे याची पारख करून रुक्मिणी या गीतात अभिमानाने बोलते आहे. तिची भाषा ऐकून भीमक राजा तिने स्वत: केलेल्या

पतिदेवाच्या निवडीबद्दल तिचे कौतुक करतो आहे. पण अखेरीस हे वैभव तिला प्राप्त व्हावे म्हणून त्याने तिला समुद्र आंदण देऊन हळदीकुंकवासाठी आळंदी लिहून दिल्याचे हे गीत मोठ्या मार्मिकपणे सांगते आहे. सासरपेक्षा माहेरची थोरवी या गीताच्या अखेरीस मोठ्या सुंदर रीतीने आणि अभिमानाने वर्णन केली आहे. त्यामुळेच या ओव्या सर्व थरांतील स्त्रियांना विशेष आवडतात.

**चंद्रभागाच्या काठावरी — धुनं धुतीया माजी बाई**
**देव विट्ठल बोलतो — जनी माजोला कोन न्हाई**
**आकाड एकादस — बाई विठ्ठल लालायाला**
**जनी लावीती शिडी — वागाटचाच्या येलायाला**
**गाद्यावरी गाद्या — सये झाल्यात्या बक्कळ (पुष्कळ)**
**विठूला आवडली — जनाबाईची वाकळ**
**इट्ठलाच्या पायाला — रुक्मीन लावीती लोणी**
**खरंच सांगा देवा — कोन व्हवी तुमा जनी**
**पंढरी झाली चोरी — कंठीचं गेलं पान**
**रुक्मीन किरकीरी — देवा विठूला माजी आन**
**विठ्ठल देव मोठा — बाहुरथी बाई गडी**
**जनीला दळू लागं — जातं फेराखाली वडी**
**विठ्ठल देव बोलं — जनी माजी सासुरवाशी**
**दळनाची पाटी — जनीच्या उशापाशी**
**विठ्ठल विठ्ठल — हाक मारीते राऊळात**
**सावळा पांडुरंग — उभा जनीच्या मंदिरात**
**विठ्ठल देव बोलं — चल जने धुनं धुवू**
**चंदनाच्या शिळा — धुनं ठेवनीचं काडू**
**पंढरपुरात — जनाईची गेली वाटी**
**देव नामदेव — उभ्या पेटंत दौंडी पिटी**
**जनाईचे मायबाप — देव विठू रुकमीन**
**तुळशी ब्रिंदावनी — वेनी घालीती हातानं**

जनी बसली न्हायाला    पानी न्हाई विसनाला
सावळे भैनाबाई    झरा फुटला पाषानाला
इठू बसला जेवायाला    पोळी ठेवी मांडी आड
सईला सांगू किती    देवा जनीचं लई याड
इठू बसला जेवायाला    पोळी ठेवीली काढूनी
रखमाई बोलं देवा    ठेवलं जनीला वाढूनी

विठ्ठल आणि जनाई यांच्यामधील निर्मळ जिव्हाळ्याने रंगलेली जनाबाईची ावगीते ऐकलेल्या सामान्य स्त्रियांनी आपल्या परीने जनाईची गोष्ट इथे ांगितलेली आहे. जनाई ही सामान्य स्त्री असूनही विठ्ठलाला तिचे वढे वेड का असावे हे रुक्मिणीला समजत नाही. त्यामुळे बेचैन होऊन ी जनीबद्दल विठ्ठलाला विचारते आहे आणि विठ्ठलही तिला इथे उत्तरे तो आहे!

विठ्ठलाच्या गळ्यातील मौल्यवान हारामधील पान चोरीला गेल्याच्या चकतेने रुक्मिणीने जनीवर घेतलेला आळ आणि जनाईची वाटी हरवली व्हा ती सापडावी म्हणून नामदेवाने गावातील पेठेत पिटलेली दवंडी, या थे आलेल्या कल्पना मोठ्या मजेदार आहेत. त्यावरून रुक्मिणीच्या मनात नीबद्दल असलेला मत्सर व नामदेवाच्या मनात जनीबद्दल असलेला आदर गोष्टी व्यक्त होतात.

पैली माजी ववी    जनीच्या अंतरी
भरली पंढरी    पांडुरंगा
दुसरी माजी ववी    जनीचा हुंकार
वाईट शेजार    पांडुरंगा
तिसरी माजी ववी    जिवा ताप लाही
जनी रडे धाई धाई    पांडुरंगा
चवथी माजी ववी    गडबडून ऊठं
सोडीलं वैकुंठ    पांडुरंगा
पाचवी माजी ववी    देव गरुडावर
गळी शोभे हार    पांडुरंगा

| | |
|---|---|
| सहावी माजी ववी | गदाचक्र हाती |
| परकाशल्या मूर्ति | पांडुरंगा |
| सातवी माजी ववी | देव जनीच्या घरी |
| गोपाळपुरी | पांडुरंग |
| आठवी माजी ववी | देव मधीच गेला |
| उठवी जनीला | पांडुरंग |
| नववी माजी ववी | मग जनी ऊठं |
| झाली देव भेट | पांडुरंगा |
| दहावी माजी ववी | गोष्ट करीते जनीशी |
| आळवीते तुजशी | पांडुरंगा |
| अकरावी माजी ववी | हारखली मनी |
| शांत झाली जनी | पांडुरंगा |
| बारावी माजी ववी | हरी गाईला पुरता |
| अंबारीचा हत्ती | चंद्रभागेवरता |

जनाईचे आणि पांडुरंगाचे गुणगान या गीतात मोठ्या भक्तिभावाने गायिलेले आहे.

| | |
|---|---|
| पैली माजी ववी | गाई एका एका |
| ब्रह्मा विष्णु देखा | हारोहारी |
| दुसरी माजी ववी | गाईली विठ्ठला |
| तुळशीच्या माळा | पांडुरंगा |
| तिसरी माजी ववी | त्रिभुवनी नाईका |
| भक्तीच्या पाईका | पांडुरंगा |
| चौथी माजी ववी | गाईन चौ देशाला |
| पुरवावी आशेला | पांडुरंगा |
| पाचवी माजी ववी | पाचा पर्ण ज्योती |
| आता ववाळीला | रुक्मिणीचा पती |
| साव्वी माजी ववी | सा मास लोटीले |
| साक्षात भेटले | पांडुरंग |

सातवी माजी ववी संपत्ति सागरा
राघोबा उदारा भेट देई
आठवी माजी ववी अठ्ठावीस योग
उभा इटेवरी नीट पांडुरंग
नववी माजी ववी नऊ गुणी गाईली
पूजा आरंभिली इठ्ठलाची
दहावी माजी ववी धा झाल्या संप्रूणी
गाती मन्याभावनी इठ्ठलासी
आकरावी माजी ववी आकरा पावलं
मन माजं गुतलं हरीचरणी
बारावी माजी ववी बारा एकादशी
जाये पंढरीशी तुका म्हणे
तेरावी माजी ववी अमृताच्या धारा
गाती मनोहारा विठ्ठलाला

विठ्ठलाचे गुणगान करावयाचे तर त्यामागची मनोभावना कोणती असते याची कल्पना या गीतांनी सांगितलेली आहे. या एकूण तेरा ओव्यांनी वेगवेगळा भाव प्रकट करताना अखेरीस मनोभावनेतील अमृताची धार पांडुरंगावर मोठ्या प्रेमाने शिंपली आहे.

जातीची कळवातीन तिला देवाजीचं याड
विठूबाच्या दारी कानूपातरा तुजं झाड
साधुमंदी साधू नामदेव साधू खरा
विठ्ठलाच्या दारी झाला पायरीचा चिरा
कानूपातराचं झाड सत्यभामानं लावीलं
रुक्मिनीबाईनं ग फूल वेनीला खवीलं
कानूपातराचं झाड सत्यभामा तुज्या दारी
कळ्या पडत्याती रुक्मिनीच्या शेजंवरी
पांडुरंग म्हणे ऐक रुक्मिणी झणत्कार
हाती टाळ वीणा आले आले ज्ञानेश्वर

पोथीला मी जाते तुमी सयांनू जागा धरा
सावळा पांडुरंग उभा चांदणीखाली हिरा

विठ्ठलाच्या देवळामधील संतमंडळींचे स्थान आणि त्यांचेशी घडलेले विठ्ठल-रुक्मिणीचे नाते इथे सांगण्यात आलेले आहे. त्याचप्रमाणे सत्यभामा व रुक्मिणी यांच्यामधील कल्पवृक्षासंबंधीचा उल्लेख कान्होपात्रेच्या झाडाच्या निमित्ताने इथे सूचित झालेला आहे.

सर्वसामान्य स्त्रीला पोथीपुराणाला जाऊन देवादिकांच्या कथा ऐकण्याची जी आवड असते तिचा इथे मोठा सुंदर उल्लेख आलेला आहे.

अगदी सर्वसामान्य स्त्रियांनी विठ्ठलाची, त्याच्या कुटुंबाची आणि त्याच्या भक्तमंडळींची केलेली पारख आणि ठेवलेली आठवण ही अशी आहे. ती साधी भोळी असली तरी प्रामाणिक आहे. घरगुती असली तरी असामान्य आहे. आणि परिचित असली तरीही विलक्षण सुंदर आहे.

## ज्ञानदेव

मराठी भाषेचे श्रेष्ठत्व अभिमानाने सांगणारा थोर कवी या नात्याने मराठी मनाला ज्ञानदेवाची फार चांगली ओळख आहे. बहुजन समाजाला संस्कृतातील ज्ञान सोप्या भाषेत कळावे म्हणून ज्ञानदेवाने ज्ञानेश्वरी लिहिली आहे. गीतेमध्ये सांगितलेले भगवान श्रीकृष्णाचे महान तत्त्वज्ञान ज्ञानदेवाने मराठी मनाला सोपे करून सांगितले आहे. त्यामुळे या ग्रंथाची कितीक पारायणे मोठ्या भक्ति-भावाने आणि आवडीने आजवर झालेली आहेत.

माणुसकीचा महान मंत्र बहुजन समाजाला शिकवावा आणि संस्कृतमधील धार्मिक तत्त्वज्ञान त्यास मराठीतून ऐकवावे, म्हणून ज्ञानदेवांनी पंढरपूरचे विद्यापीठ स्थापन केले. टाळमृदंगाच्या निनादात पंढरीच्या विठोबाचे राऊळ सामान्य मनाला शिक्षण घेण्यासाठी खुले झाले. नामदेवासारख्या कीर्तनकाराने ज्ञानदेवाला सहकार्य दिले. भागवत संप्रदायाची स्थापना झाली. मराठीला आनंदाचे भरते आले. मायबोलीला उत्तम प्रकारची ग्रांथिक वाचा फुटली.

त्यामुळे मराठी मनाला ज्ञानदेवाचे विलक्षण आकर्षण वाटत गेले. सामान्य स्त्रियांनीही याच संदर्भात ज्ञानदेवाचे कार्य आपल्या परीने ओळखीचे करून घेतले.

परंतु ज्ञानदेव हा संसारी पुरुष झाला नसल्याकारणाने स्त्रियांनी ज्या ओव्या रचल्या आणि सांगितल्या त्यामध्ये घरगुती जीवन कुठेच आलेले नाही !

आळंदी सारकं गाव सये असावं रहायाला
इंद्रावनीच्या पान्या जाया खडा रुतंना पायाला
आळंदीचा पार देवा ज्ञानूबाला साजू
त्येच्या आंगुळीला इंद्रावनी डाव्या बाजू
आळंदी वसविली चाकनाच्या वाकनाला
गेनूबा देव उबा सादू जमले कीर्तनाला
आळंदी वसविली एरंड धोतऱ्यांनी
समांध घेतली गेनूबा खेतऱ्यानी
आळंदी वसविली पांडुरंगा मायबापा
कुंडलिकाच्या देवळाला इंद्रायनी देती थापा
सोनीयाचा पिंपळ देवा गेनूबाच्या दारी
भर्ताराच्या शिरावरी आळंदी कर नारी
आळंदी गाव साधुसंतांचं म्हायार
दुरूनी वळकिती इंद्रायनीला न्याहार
इंद्रायनीच्या कडंला सव्वा खंडीचं पुरान
संत बसले जेवाया तुपा भरलं दुरान
दारी सोन्याचा पिंपळ पाठीशी इंद्रायणी
ज्ञानदेव समाधिस्त बैसले तया स्थानी
काय सांगू सये आळंदीची ग रचना
बैसले ज्ञानदेव नामा करीतो कीर्तना
नगर प्रदक्षिणा मी ग घालते नेमानी
समाधि ज्ञानोबाची सये पहाते वातींनी
चला जाऊ आपून आळंदी गावाला
चंदनाची उटी चढे गेनूबा देवाला
आळंदीला जाते उभी राहिले बारीला
देवा माज्या ज्ञानूबाला किती विनवू हरीला

दुपार झाली खरी इंद्रावनीच्या पुलावरी
तुळशीच्या पारावरी कशी चाले ज्ञानेशरी
साधुला साधू पुशी इंद्रावनीला पानी किती
ज्ञानूबा तुकोबाची स्वारी फरशीवैनं जाती
आळंदीचा मठ कुण्या गवंड्यानं बांधिला
ज्ञानेशर मावलीचा वर अभंग मांडिला

ज्ञानदेवांच्या आळंदी गावचे वर्णन या गीतांनी केलेले आहे. सामान्य मनाने पाहिलेली आळंदी कशी आहे म्हणून कोणी विचारले, तर ती 'ही पहा अशी आहे,' असे अभिमानाने सांगता यावे, एवढे हे वर्णन सरस झालेले आहे. कार्तिकीच्या वेळी वारीला म्हणून आळंदीला जाणाऱ्या वारकरणीने त्या गावची अशी शोभा पाहिली आणि ती इतरांना आपखुषीने वर्णन करीत सांगितली, असा हा सुंदर देखावा आहे. या गावचे वर्णन करताना हे गाव रहायला चांगले का, तर पाणी आणायला जाताना पायाला खडे रुतत नाहीत म्हणून, अशी इथे सांगितलेली कल्पना मोठी हृद्य झाली आहे.

या गीतांनी रंगविलेले आळंदीचे इतर चित्रही सगळा देखावा समोर दिसावा एवढे स्वाभाविक झाले आहे.

देव ज्ञानूबा तोंड धुतो इंद्रायनीच्या झऱ्याला
मुक्ताबाई त्येची भैन मोती गुंपीती तुऱ्याला
गेनूबा देव बोलं मला कशाला व्हवी रानी
भैनी मुक्ताबाई आंगुळीला दे ग पाणी
गेनूबा देव बोलं मला कशा व्हवी शेज
भैनी मुक्ताबाई पाठीशी माज्या नीज

ज्ञानदेव आणि मुक्ताबाई या बहीण-भावंडांच्यामधील निरपेक्ष प्रेमाची व जिव्हाळ्याची हकिगत या गीतांमध्ये आलेली आहे.

आळंदीपासूनी देहू जवळ सांगीती
गेनूबा तुकाराम एका तर्फेला नांदती
देहूचा मासा बाई आळंदीला आला कसा
देवा गेनूबाचा सये साधूचा नेम तसा

ज्ञानूबा पालखीत — तुकाराम घोड्यावरी
दोनींची एवढी हुती — भेट वाकुऱ्या वड्यावरी
ज्ञानूबा तुकाराम — आळंदीचे देशमुख
दोगांच्या आंगूळीला — इंद्रायणी समाईक
आळंदीपासूनी — देहू हाई टप्प्याखाली
फुलांच्या पाटीनं — माळीन चालली झोकाखाली
आळंदी करूनी — मला देहूला जायाचं
लाल पिंजरीचं कुंकू — माज्या बाळीला घ्यायाचं
पंढरीच्या वाटं — आडवं वाकूर गाव खेडं
ज्ञानोबा तुकाराम — ततं साधूचा तळ पडं

इथे आळंदी आणि देहू या गावांच्यामधील अंतर आणि नाते, ज्ञानदेव व तुकारामांची मैत्री आणि या दोन्ही गावांना भेट द्यायची आपली उत्सुकता या विविध गोष्टी आलेल्या आहेत. त्याचप्रमाणे ही दोन्हीही गावे जवळजवळ असल्याने माणूस एका गावाहून दुसऱ्या गावाला सहज कसा जाऊ शकतो, याची कल्पना या दोन्ही गावच्या देवांना फुले देणाऱ्या माळणीवरून इथे आलेली आहे.

ज्ञानोबा पालखीत आणि तुकाराम घोड्यावर बसतो, अशी या गीतात आलेली कल्पना दोघांच्या जीवनातील कालमानाची तफावत दर्शवीत आहे! तसेच एके ठिकाणी दोघांच्याही देशमुखीचा आलेला उल्लेख समाजामधील त्यांच्या स्थानाची कल्पना देत आहे.

हावस मला मोठी — आळंदीला ग जायाची
शेंडीचा नारळ — इंद्रावनीला वहायाची
आळंदीच्या माळावरी — कुनी सुपारी फोडली
देवा गेनूबाच्या संगं — बारस हौशानं सोडिली
चल सये लवकर — नको करूस घोटाळा
ज्ञानदेव सांगे अर्थ — ऐके मुक्ताई चित्कळा
चल सये लवकर — उचल पाऊल लगलग
ज्ञानदेव सखा माझा — बाई भेटल जिवलग

पंढरीला गेले बाई — आळंदीला आलं चित्त
देव ग ज्ञानूयीबा — आला मनात अवचित
चंदन मैलागिरी — उगळीता गेले दंड
ज्ञानोबा राया माज्या — सोडा झग्याचे बंद

या ओव्यांनी वारकरणीच्या मनातील आळंदीची हौस सांगितलेली आहे. शेंडीचा नारळ नदीला वहायचा, बारस सोडायची, कीर्तन ऐकायचे, समाधीचे दर्शन घ्यावयाचे, देवाची आठवण यायची, इत्यादी या नित्य व्यवहारातील गोष्टी मनात आल्या तशा इथे सांगितलेल्या आहेत. परंतु ज्ञानदेवाने परमेश्वराच्या दर्शनाचा अर्थ सांगावयाचा आणि स्वतः चित्कळा असलेल्या मुक्तावाईने तो टिपून घ्यावयाचा ही इथे आलेली कल्पना मात्र जुन्या कथा ऐकून निर्माण झालेली आहे. तसेच दंड दुखेपर्यंत गंध उगाळल्याने खुद्द ज्ञानदेवालाच आपल्या झग्याचे बंद सोडायला गीतकाराने केलेली ही विनंती मोठी अपूर्वाईची आहे !

नदीच्या पल्याड ग — एक गुतली म्हातारी
गेनूबा काय देव — अंगं झाला या उतारी
चांगदेव आले — वाघावरी झाले स्वार
गेनूबा रायाची — भिंत चाले भरभर
चांगयाचं पत्र — कोरा कागद केली घडी
देती उत्तर गेनूबा — लाभे मोक्षाची ऐलथडी
इंद्रावनीच्या काठायाला — झाडं तुळशीची हालत्याती
देवबी ग्यानूयीबा — साधु समाधी बोलत्याती

ज्ञानदेवामुळे निर्माण झालेला चमत्कार या गीतांनी सांगितलेला आहे. त्यामुळे अशा अद्‌भुतरम्यतेचा पगडा सामान्य मनावर एवढा विशेष होतो की,

ज्ञानदेव पाहुणे ग — ऐक सखे साजणी
आता घालू नका — फार दुधाला धारवणी

अशा ओव्या गाताना ज्ञानदेव पाहुणे होऊन घरी यावेत अशी प्रबळ इच्छा लोकांच्या मनामध्ये डोकावते आहे !

इंद्रायणीच्या काठावरील झाडे हालतात म्हणजे खुद्द ज्ञानदेवच त्यांच्या रूपाने आपल्याजवळ बोलतात, ही या गीतामध्ये आलेली कल्पना

विशेष अद्‌भुतरम्य असून सामान्यांच्या ठायीचे कल्पनासौंदर्य दर्शविणारीही झाली आहे.

## तुकाराम

संत तुकाराम म्हणजे महाराष्ट्राचे महान कवी. फार मोठे सुधारक. विठोबाचे प्रिय भक्त. बहुजन समाजाने जोपासलेला एक त्यागी पुरुष. महाराष्ट्राचा एक आवडता कलाकार. स्वयंस्फूर्तीने सामान्य मनाचे दिग्दर्शन करणारा एक थोर समाजसेवक. वारकरी संप्रदायाने प्रेमाने मनावर कोरून ठेवलेला एक फार मोठा संत. त्याची थोरवी फार मोठी. कवित्व फार बहारीचे. कीर्ती अतिशय विशाल. पण अगदी सामान्य स्त्रीमनाने फक्त या महापुरुषाच्या सांसारिक जीवनाचीच तेवढी जवळून ओळख करून घेतली आहे! एवढेच नव्हे तर नेमके तेवढेच आवडीने लक्षातही ठेवले आहे ; त्यासंबंधीच्या ओव्या सांगितलेल्या आहेत!

**तुकोबाची स्त्रिया बोले जगापशी**
**गोसावी झाले आमुचे पती**
**दगडाचा टाळ देहाचा मुरदुंग**
**गोंधळ घालीतो हा विठूपशी**
**तुकोबाची स्त्रिया बोले जगापशी**
**गोसावी झाले आमुचे पती**
**फुटका भोपळा तुटक्या तारा**
**तुकाराम जाती पंढरीशी**
**तुकोबाची स्त्रिया बोले जगापशी**
**गोसावी झाले आमुचे पती**
**माळी हाकी मोट लक्ष मोडापशी**
**तसंच लक्ष माजं विठूपशी**
**तुकोबाची स्त्रिया बोले जगापशी**
**गोसावी झाले आमुचे पती**

या गीताने तुकारामाच्या विठ्ठलभक्तीपायी त्याच्या बायकोस आलेला राग व्यक्त केलेला आहे. त्याच्या अभंगलेखनाची व कीर्तनाची थोरवी तिला बिचारीला

उमजली नाही ! तिने संसाराकडे त्याचे दुर्लक्ष होत असल्याची तक्रार मात्र अशी केली आहे ! ! दगडाचा टाळ, देहाचा मृदंग, फुटका भोपळा, तुटकी तार, इत्यादींचा उल्लेख करून ती तुकोबाला चिडून इथे बोलते आहे. एवढेच नव्हे तर माळ्याने मोट हाणावी पण त्याचे लक्ष पिकाच्या मोडाकडेच असावे तसे संसार करीत असूनही मी माझ्या पतीसाठी विठ्ठलाकडेच लक्ष देत आहे, असे ती म्हणते आहे.

अल्याड देहूगाव पल्याड येलवाडी
देवा तुकोबाची मदी गुरूची माडी
देहूचा मंडप कोन्या शिंप्यांनी शिवीला
देवा तुकोबाचा वर अभंग लिवीला
देहूच्या माळावरी सये बोलती भोरड्या
येलवाडीमंदी वया निघाल्या कोरड्या
आळंदीची वाट गेली देहूला कोरडी
इंद्रावनीच्या काठायाला तुका बांधितो झोपडी
इंद्रावनी तुजं पानी येलवाडी तुजं गहू
देव तुकाराम साधुसंताला घाली जेवू
येलवाडी तुजं गहू इंद्रावनी तुजं पानी
देव तुकाराम करी साधुसंताला मेजवानी
देहूच्या माळावरी वीना वाजतो मंजूळ
गाव लोहुगाव तुकारामाचं आजूळ
हातात टाळवीना तुका फिरतो घरोघरी
येड लागलं तुकाला चला म्हणतो बरोबरी
आवडीचा देव तातडीच्या भेटी
ज्ञानूबा तुकाराम त्येच्या चरणी घाली मिठी
बारा भुयांची पालखी वर मोत्यांचा आईना
आले ग्यानूबा तुकाराम दिंडी दारात माईना

या ओव्यांनी तुकारामाच्या देहू गावाची ओळख करून दिलेली आहे. त्याचबरोबर तुकोबाच्या साधुपणाचीही थोरवी गायिली आहे. देहूच्या माळावर भोरड्या नावाचे पक्षी ओरडल्यामुळे तुकोबारायांच्या वह्या नदीमधून वर

कोरड्या आल्याची सूचना मिळाली, ही या ठिकाणी व्यक्त झालेली भावना अभिनव तशीच कल्पनारम्यही आहे. तसेच तुकाराम आणि ज्ञानदेव ह्यांचे नाव वारकरी मंडळींच्या तोंडी एकत्रपणे येत असल्याबद्दलचा शेवटी आलेला उल्लेख वास्तव तसाच स्वाभिमान दर्शविणाराही आहे.

देहूच्या मंडपाला लागणाऱ्या कापडावर तुकारामाचा अभंग विणलेल्या शिंप्याची इथे आवर्जून स्तुती आली असून त्याला भक्तिमार्गाकडे खेचणाऱ्या तुकारामाचे स्वभाववर्णनही मोठ्या सहजतेने परंतु परिणामकारक रीतीने रेखाटले गेले आहे.

**कुंकवाचा करंड तुका ठेवीतो विन्यात**
**सरगी जायाचं न्हवतं जिजाच्या मनात**
**तुकाराम बोले जिजा इमानी तू बैस**
**येड लागलं तुका तुमा घरी दुधाची म्हैस**
**तुकाराम बोले जिजा लाव ग उभं कुंकू**
**मी जातो वैकुंठा मग कळल सर्व सुकू**
**तुकाराम बोले जिजा इमान आलं न्याया**
**येड लागलं तुका तुमा घरी लाडक्या माज्या गाया**
**जिजाबाई बोले येड लागलं तुकाला**
**आपुन जातो वैकुंठी संगं म्हनीतो चला चला**
**तुकाराम बोले जिजा संगती माज्या चल**
**मागं राहिल्यानी तुजं होत्याली फार हाल**

वैकुंठाला निघालेल्या तुकोबाने जिजाईला बरोबर चल म्हणून आग्रह केला असता आणि बरोबर न येण्याने तिचे होणारे हाल सूचित केले असताही जिजाईने त्याला दिलेले उत्तर या ओव्यांनी सांगितलेले आहे. जिजाईने तुकोबांचे ऐकायचे राहिलेच उलट त्याला वेडे ठरवून संसारी बाईला शोभेल अशी घराची ओढ त्याच्यापुढे केली आहे! एवढेच नव्हे तर तो बरोबर चल म्हणतो म्हणून त्याला तिने दोषी ठरविले आहे! तथापि तुकारामाने आपल्या वीण्यामध्ये कुंकवाचा करंडा ठेवून तिची सोबत अनुभविली असल्याची इथे सांगितली गेलेली कल्पना विलक्षण चित्ताकर्षक झाली आहे!

देहूच्या माळाला सांडली कस्तुरी
तुकाराम म्हनीतो घरी राहिली अस्तुरी
इंद्रायनीच्या काठाला बाई हत्तीच्या दिल्या पागा
साधुसंत सांगीती तुका वैकुंठी गेला बघा
देहूच्या माळावरी उधळती बुक्का जाई
गईप झाला तुका जिजा भवताली पाही
देहूच्या माळावरी धूर कशायाचा झाला
तुका गेला वैकुंठासी जिजा सईपाक केला
देहूचा मंडप दुरून दिसतो काळानिळा
तुका गेला वैकुंठासी वर उपवल्या माळा
वाजंत्री वाजवीतो देहू गावचा दरडी
तुका गेला वैकुंठाला वही निघाली कोरडी
देहूच्या माळावरी मोत्या पवळ्यांचं वाळवान
तुका चालला वैकुंठासी जिजा घालीती लोळण
तुका गेला वैकुंठासी कुनी कुनी पाहिला
नांद्रुकी झाडाखाली जोडा रेशमी राहिला

तुकारामाने वैकुंठाला प्रयाण केल्याची अद्भुतरम्य हकिगत या गीतांनी दिलेली आहे. लहानपणीच इंद्रायणीच्या खोल खड्डयामध्ये स्वत:ला गडप करून आईचा राग शांत करू पहाणाऱ्या तुकोबाने शेवटी करून दाखविलेला अद्भुत चमत्कार इथे मोठ्या सुंदर रीतीने व्यक्त झालेला आहे! तुकाराम वैकुंठाला गेल्याच्या खुणा म्हणून सांडलेली कस्तुरी, उधळलेला बुक्का, झालेला धूर, काळसर मंडपातून वर आलेल्या माळा, मोत्यापोवळ्यांचे घातलेले वाळवण आणि नांद्रुकी झाडाखाली राहिलेला रेशमी जोडा या गोष्टींचा उल्लेख उत्तम प्रकारच्या कल्पनावैभवाचा नमुना म्हणून पहाण्यासारखा आहे. त्यातल्या त्यात तुकारामाची आठवण म्हणून झाडाखाली राहिलेल्या त्याच्या रेशमी जोड्याचा इथे आलेला उल्लेख विलक्षण रोमांचकारी आहे.

तुकारामाच्या वैकुंठगमनामुळे जिजाईला झालेले दु:ख इथे अगदी थोड-क्यात पण एवढ्या चटकदारपणाने वर्णिलेले आहे की, ऐकणाराच्या

मनात तिच्याबद्दल आपोआप जिव्हाळा निर्माण व्हावा आणि मनाला विलक्षण चुटपूट लागावी !

**सातवी माजी ववी सातवा अवतार**
**तुकाराम बोलं न्हाई फिरून संसार**

आठवतील तेवढ्या देवादिकांच्या ओव्या ओळीने गाणाऱ्या स्त्रीने सातव्या क्रमांकाच्या ओवीमध्ये तुकारामाचे केलेले हे स्वभाववर्णन मोठे सुंदर आहे. त्याचप्रमाणे पुन्हा संसार म्हणून नाही अशी त्याच्या भावनेची त्या बाईने केलेली उकल नकळत दुसऱ्या जन्मातील त्याच्या एका निश्चयाचा उल्लेख करून जाते किंवा कसे, अशी शंकाही मनाला चाटून जाते !

तुकाराम एक फार मोठा कवी होऊन गेलेला असला तरी खेडूत स्त्रियांनी त्याच्याबद्दल सांगितलेली हकिगत ही अशी आहे. त्या थोर पुरुषाच्या अभंगांचे वाचन करणे त्यांना जमले नाही. त्या लिहिण्यावाचण्यात अडाणी राहिल्या. त्यामुळे पोथी ऐकूनही त्यांच्या मनावर काही विशेष बिंबले गेले नाही ! आपल्या कुवतीप्रमाणे जेवढे वाटले तेवढे या अडाणी मनाने टिपून घेतले. मात्र त्याचा आविष्कार सहजसुंदर झाला.

सर्वसामान्य स्त्रियांनी देवादिकांच्या विषयी प्रकट केलेल्या या विविध प्रकारच्या भोळ्या भावापेक्षा खास **देवभक्तांनी गायिलेली** अशी **देवादिकांची** आणखी काही गीते मिळतात. ह्या गीतांचे गायन आम जनतेकडून न होता विशिष्ट देवतांच्या भक्तगणांकडूनच तेवढे केले जाते हे या गीतांचे एक प्रमुख वैशिष्ट्य होय. तसेच, देवाला कायमचे जागृत ठेवण्यासाठी म्हणून देवाचे जागरण घालावयाचे हे या गीतांचे गायन करणाऱ्या भक्तांचे प्रमुख कर्तव्य असते.

जेजुरीच्या खंडोबारायाचे किंवा पाली मंगसोळीच्या खंडोबारायाचे भक्त म्हणून **वाघ्या-मुरळींची** ख्याती आहे. खंडोबारायाच्या रंगभोगासाठी व अंगभोगासाठी म्हणून त्यांची इथे नेमणूक झालेली असून बेलभंडार उधळीत नाचगाणे करून देवाचे मनोरंजन करावयाचे हे त्यांचे मुख्य काम असते.

**प्रथम घंटा घेतली हाती नमू गणरायाला**
**नमितो संगं सारजेला करतो प्रार्थनेला**
**पायी पैंजण घागऱ्या वाजती नमिले देवाला**

गणराज आले धावून
युद्ध मांडीले जी दारुण
दैत्य कापिले दुष्ट मर्दून
धावा केला विघ्नहराला
नमन केले हो देवाला
देवा जागरण मांडीले हो
मल्हारी जागरणाला यावे
पाल पेंबरचे मल्हारी
नळदुर्ग कडेपठारचे मल्हारी
गडजेजुरीचे हो मल्हारी
सगळीक देवा यावे
देवा जागरणाला यावे
भक्ताला वारंवार तारावे

वाघ्या-मुरळींनी गायिलेल्या या नमनात खंडोबारायाची गोष्ट सारांशाने आली असून त्यास जागरणाला येण्याबद्दल आवाहन केलेले आहे. मात्र त्यापूर्वी विघ्नहर्ता जो गजानन त्याला या भक्तांनी पहिल्यांदा नमन केले आहे हे इथे जरूर लक्षात घेण्यासारखे आहे.

मुरळी करून शिणगार भंडाराचा जी
तिनं झोक लाविला पिवळ्या पातळाचा जी
हाती धरून चालली घोळ निऱ्याचा जी
पुढं पाऊल टाकी ठोका घाटीचा जी
गळ्यात भंडार सिक्का हाय देवाचा जी
येळकोट बोलती गजर नामाचा जी
पुढं कुत्रा भुंकतो बानूबाईचा जी

या प्रकारची दर बोलागणिकचा मनोभाव प्रकट करणारी वाघ्या-मुरळींची अनेक गीते आहेत. मात्र त्यांच्या गीतांचा विषय फक्त मल्हारीदेवच असतो.

घरात लग्नकार्य झाले म्हणजे 'गोंधळ' घालण्याची महाराष्ट्रात एक जुनी चाल आहे. देवाला जागरण घालून संतुष्ट करावयाचे ही यामागची भावना आहे.

हातात संबळ, डवर, तुणतुणे, टाळ, दिवटी व कवड्यांची माळ घेऊन गोंधळी मंडळी हा गोंधळ घालतात. कुलदैवताचे प्रथम नाव घेऊन त्या दैवताला खूष करीत त्यांचे गाणे रंगते. सुरुवातीलाच,

**उदे बोल वाचे**

**नित्य नाव भवानीचे**

या मंत्रजागराने ही मंडळी देवतेला आवाहन करतात. आणि

**नाचती प्रेमकल्लोळी**

**हरीकृपा जी**

या भावनेने नृत्याला सजवितात.

**लागली लो आंबे लागली लो**

**हेगड्या लो तुजा बागड्या लो**

**मोरेश्वर गणा गोंधळा ये**

**तेहतीस कोटी देवा गोंधळा ये**

या पद्धतीने गोंधळासाठी, नवविवाहितांना मंगल भवितव्याचा आशीर्वाद देण्यासाठी, प्रथम आरंभ करून महाराष्ट्रातील सर्व देवतांना हे गोंधळी गोंधळाला येण्याचे निमंत्रण करतात व अखेरीस

**साती समींद्रा गोंधळा ये**

**नवलाख तारांगण गोंधळा ये**

**धरतरी माते गोंधळा ये**

**आगासी पिता गोंधळा ये**

**राहिले साहिले गोंधळा ये**

या भव्यतेने आपल्या मनोभावाचे प्रकटीकरण करतात.

**मीठ मीरचीचं भांडण**

**ऐका रोज खटखट जी**

**मीरची अंगी लईच ताठा**

**म्हणे मी तिखट जी**

**त्या दोघांनी घरोघरची**

**पुरवली पाठ जी**

तोंडामध्ये घास
जिव्हा झाली लंपट जी
मीरची म्हणे माझ्यावीन
न्हाई कोन मोठं जी
झाला मीठाचा जोर
मीरची झाली खवचट जी
त्या दोघांचा तंटा मिटेना
फिरा हरी कोर्ट जी
खाली पाटा वरती वरुटा
तवा तंटा मिटे जी

या गीताप्रमाणे गोंधळ्यांच्या गीतांचे विषय अनेक असतात. मात्र या सर्व गीतांची उभारणी विनोदावर व अद्‌भुततेवर झालेली असते हे विशेष होय. त्याचप्रमाणे रात्ररात्रभर चालेल एवढ्या पल्लेदार लोककथेची गुंफण करणारे एखादे गीत हे लोक न दमता, न थकता व मोठ्या उभारीने गातात हेही एक आणखी वैशिष्ट्य त्यांचेसंबंधी सांगता येईल.

निरनिराळ्या देवतांची आराधना करताना वासुदेव, भुत्या, पोतराज, भराडी, जोगती इत्यादी वेगवेगळ्या भक्तांनी गायिलेली अशी किती तरी गाणी मिळतात. परंतु इथे फक्त नमुन्यादाखल असा या दोनच भक्तगणांच्या बाबतीत ओझरता उल्लेख केलेला आहे.






**पूर्वीच्या** काळी तिन्हीसांज झाली आणि गुरेवासरे शेतावरून माघारी फिरायची वेळ झाली, म्हणजे लहान लहान मुले घरच्या आजोबा-आजींजवळ गोळा होत व म्हणत, ‘कानी सांग. चांगली झक्कास पाईजे.’ आणि मग त्या मुलांना जवळ घेऊन एखादी कहाणी आजोबा-आजीही मोठ्या हौसेने ऐकवीत.

या कहाण्या कधी लहान असत तर कधी मोठ्या असत ; आणि त्या सांगण्याची धाटणीदेखील मोठी सुंदर असे. कहाणी सुरू झाली म्हणजे प्रत्येक वाक्यानंतर ऐकणाराने ‘हूं’ म्हणत चित्ताची सावधानता दर्शविली पाहिजे असा दंडक असे. त्यामुळे कहाणी एकदोनदा ऐकली म्हणजे ती लगेच आठवणीत जमा होत असे. आजोबा-आजीने सांगितलेली कहाणी मुले मग बरोबरीच्या मुलांना ऐकवीत. एकाच्या तोंडून ऐकलेली ही कहाणी दुसऱ्याच्या मनात ठाण देत असे व त्याप्रमाणे सर्वत्र पसरत जात असे !

वडीलधारी माणसे ज्यावेळी अशा लोकप्रिय कहाण्या सांगत, त्यावेळी त्यांच्या मनामध्ये एक प्रमुख हेतू असा असायचा की, ह्या कहाण्या ऐकून मुलीबाळींना, लेकीसुनांना आणि मुलांना चांगले वळण लागावे. त्यामुळे अशा कहाण्या काही तरी बोध बरोबर घेऊनच जन्माला येत असत.

जुन्या काळची ही कहाणी 'लोककथा' या नावानेही प्रसिद्ध आहे. हि लोककथा म्हणावयाचे कारण असे की, इथे कोणाचेही नावगाव लेखक म्हणू सांगण्यात आलेले नसते. 'अमक्या ठिकाणी अमुक झाले' असाच सारा प्रकार त्याकारणाने एका विशिष्ट प्रसंगावरील असा सामुदायिक जीवनाचाच त एक आविष्कार होतो.

माणूस जन्माला आला आणि त्याला वाचा फुटली की लगेच त्याच्याकडून 'गोष्ट सांगा' म्हणून तगादा सुरू होतो. आपल्या मनात घोळेल ते इतरांनाही सांगायला त्याची धडपड चालू होते. ह्या मानवी भावनेला मग वयाचे बंधन रहात नाही. वय वाढेल तसा हाही भाव वाढतच रहातो. कारण त्या एखाद्या विशिष्ट गोष्टीमध्ये माणूस आपल्या जीवनाचे रहस्य बघू शकतो. शुद्ध व सुबोध जीवनाचे प्रतिबिंब त्याला त्यात गवसते. एवढेच नाही, तर परमेश्वराने निर्माण केलेले जग आणि मानवाने उभी केलेली ही गोष्टीची भावसृष्टी या दोहोंच्या मिश्रणात त्याला आपले जग उभारता येते. त्याचा देह जणू त्यामुळेच गोष्टींच्या श्रवणात व कथनात पोसला जातो ; आणि म्हणूनच या मनोभावनेतून लोककथा वा कहाणी जन्माला आली असली पाहिजे.

लहान लहान सुटसुटीत वाक्ये, आकर्षक क्रियापदे आणि चटकदार भाषा ही लोककथेची वैशिष्टये आहेत. मानवी मनाचे मनोहर विश्लेषण करण्यात तिचा हातखंडा आहे आणि अद्‌भुतरम्य प्रसंगांची उभारणी करून मानवी मन जिंकण्यातही ती कमालीची यशस्वी झालेली आहे.

## पालखी

**संत म्हनती संताला तुमच्या गावचं नाव काय? आमच्या गावचं नाव अळंकापुरी. पालखी महाद्वारी. सोन्याचा पिंपळ देवाच्या दारी. पंधरा वर्सांची समांध घेतली नंदीखाली ग्यानूबांनी. आळंदीचं लोक जमून पालखी आनली चिखली मुशीवरी. पुन्याचं ख्याडपाड आडवं गेलं गावकरी. पालख्या भवानी पेठेवरी. संताला मेजवानी गूळपोळी, शिरापुरी. तोंडी लावाय शाक तरकारी. गनेशटेबल शिपायांची गर्दी भारी. जरीचं निशान भाडभाड करी. चांदी सोन्याचा साज नेवरती महाराजांच्या घोड्यावरी. पताका चालल्यात हारोहारी. टाळ**

मृदंगाची महिमा भारी. अबीर बुक्क्याची गर्दी मनहारी. नगारनौबत गाड्यावरी. ऐका ऐका शिंगाची ललकारी. दोन पालख्यांचा संगम झाला छत्रीवरी. मंमदवाडीवरी आरती करी. फराळ कराय गेलं उरळीवरी. घाट येंगून गेलं करवरी. पाऊस पडं झिरमिरी. आखाडीचा महिमा भारी. खांद्याव पताका भिजल्यात वारकरी. राहुटचा दिल्या माळावरी. पैली आंगूळ भागीरथीवरी. संताला मेजवानी गूळपोळी, शिरापुरी. तोंडी लावाय शाक तरकारी. तिनी पालख्यांचा संगम झाला नीरा नदीवरी. नीरा नदीचं तेज भारी. साडेतीनशे जमून पालख्या नेल्या वाखरीवरी. वाखरीचं रंगान भारी. निवरती महाराजांचा घोडा नाचतो नानापरी. सर्वी यात्रा गेली पुलावरी.

संत म्हणती संताला तुमच्या गावचं नाव काय? आमच्या गावचं नाव पंढरपूर लोटालोटी. तुळशीबनात झाली यात्रेला दाटी. देवा आदी कुंडलीकाच्या घेऊ भेटी. गोपाळपुरी गोपाळकाला. देव कैकांच्या भेटीला गेला. असं पंढरी तिरीथ भारी. गोरा कुंभार, नरहरी सोनार, सावता माळी. नामदेव हारी. उधरून गेले महाद्वारी. काय यात्रा भरली घनदाट. महाद्वाराला जाती वाट. काय यात्रा भरली भारी. चोखूबा देवद्वारी. नामदेव बसल्यात पायरीवरी. कापूर जळतूया हारोहारी. यात्रेनं भरल्या नावा. करा विठ्ठल-रुक्मिनीचा धावा.

संत म्हनतो संताला, असं आपून तिरीथ करू वारंवार. देवासंगं जेवतो चोख्या महार. सावता माळी घाली फुलांचा हार.

■

देवाच्या आळंदीहून निघालेली पालखी पंढरपूरला पोचेपर्यंत काय काय घडले आणि पंढरपुरी काय काय पाहिले, याची साईनसंगीत हकिगत देणारी ही लोककथा मोठी सुंदर आहे. मला ही कथा पुणे जिल्ह्यातील हडपसर गावी मिळाली. या कथेच्या भाषेवर पुणे जिल्ह्यातील मराठी बोलीची बरीच छाप पडलेली आहे.

वारकरी संप्रदायातील स्त्रियांनी 'पालखी'चे केलेले हे मराठमोळा वर्णन चटकदार आहे. ठराविक पद्धतीच्या यमकांची इथे सर्वत्र घेतली गेलेली खबरदारी विलोभनीय आहे! देवाबद्दलचे सारे भाव या छोटया कथेमध्ये व्यक्त झालेले असून भक्तांचे वर्णनही योग्य प्रकारे ग्रथित झालेले आहे.

यात्रेच्या वर्णनाची ही पद्धती उल्लेखनीय असून आकर्षकही झाली आहे.

## धामीन कोका

कोण्या एके काळी एका गावात दोन बायका रहात होत्या. त्या एका घरा रहायच्या. त्यांचं जावाजावांचं नातं. पैकी मोठी जी होती तिला प्रपंचाची भार हौस. ती मोठी हुशार होती. व्यवहारानं वागायची. हाती येईल तो पैसाअडक संसारात घालायची. धाकलीचं तसं नव्हतं. ती मोठी नटारंगी होती. हौस करावं तर तिनंच. मनाला येईल तसं ती करायची.

तर एकदा काय गंमत झाली की, दोघीही माहेरी गेल्या. दोघींनाही त्यांच्य बापानं माहेर केलं. दागदागिने, कपडालत्ता असं काही केलं नाही. पैसाअडक दिला. आवडेल ते घेऊन मुलींनी संतोषी रहावं ही त्याची भावना.

माहेरपण संपलं. दोघीही सासरी आल्या. गुण्यागोविंदानं नांदू लागल्या.

होता होता एक दिवस उजाडला. दोघीही बाजारात गेल्या. बापानं दिलेल्य पैशाची खरेदी करावी म्हणाल्या. चारी पेठा धुंडाळीत फिरल्या.

मोठीनं दुधाला विरजणं, ताकाला डेरा, कालवणाला डेचकी, आंघोळील घंगाळ, म्हशीला पेंड, सासूला खण असं आपलं काय काय घेतलं. धाकलीला ते पटलं नाही. तिनं आपली चमकणारी बाशिंगं घेतली नि घरला आली.

घरी आली तर देव्हाऱ्यावर एक बाशिंग बांधून मोकळी झाली. एक तिन आपल्या कपाळावर बांधलं. ते बघून सगळी हसली. नावं ठेवाय लागली. पण ही ढम्म म्हणीना. बाशिंग बांधूनच कामाला लागली! तितक्यात नवरा आला म्हणाला कसा, 'अग अग! हे ग काय?' तशी ही म्हटली कशी, 'कावो? देवाऱ्यात ठेवलंय बगा जावा!' नवऱ्यानं पुनःपुन्हा तीच गोष्ट केली. हिनं पण तेच तेच उत्तर दिलं. अखेर शेवटी नवरा कावला, रागारागानं उपाशीच निजला. दुसऱ्या दिवशी न बोलताच शेतावर गेला. न्ह्यारी नाही. जेवण नाही.

इकडं तोवर हिनं एक नारळ फोडला. खिसून घेतला. त्याचे कानवले केले. शिजवून खाल्ले. बाकीच्यांना आमटी भाकरी केली. नवऱ्याला भाकरी घेऊन गेली. दोघांची बोलाचाली झाली नाही. मुकाटच तो जेवला.

आणि असं चांगलं आठवडाभर चाललं. मग मात्र एक दिवस तिनं नवऱ्याला कानवला करून नेला. म्हणाली, 'अवो, अवो, धामीन कोका आनलाय. पण

खाशीला तर राती भूत भेटल.' तरी पण तो भ्याला नाही. त्यानं धामीन कोका खाल्ला. आणीक रात्री बघतोय तर खरंच की भूत! तो घाबरला. किंचाळला. भेदरून गेला. 'पुनाच्यान धामीन कोका खानार न्हाई' म्हणाला. भूत गेलं. ह्याच्या जिवात जीव आला.

तर गंमत अशी की, हीच भूत होऊन गेलेली! काजळानं तोंड माखलेलं. भांगात शेंदूर भरलेला. केस मोकळे सोडलेले. दाताला पीठ चिकटवलेलं. घोंगडं नेसलेली. आचकट विचकट बडबड केलेली. नाचधिंगाणा केलेला.

झालं. पुन्हा दुसऱ्या दिवशी तोच प्रकार, धामीन कोका नवऱ्याला देताना तिची हीच भाषा. पण आता हा घाबरला नाही. नेटानं बोलला. तशी ही पण रात्री जोरानं भूत होऊन शेतावर गेली. मोठ्यानं ओरडली. तशी हा धावला. चिमणी घेऊन गेला. उजेडात बघतोय तर ही! तशी ह्यानं तिला बेदम मारली. कातडं सोलून निघस्तोवर फोकळून काढली. तशी ती गहिवर घालून रडायला लागली. सारी वस्ती गोळा झाली.

तितक्यात थोरली तिथं आली. ह्यानं अशानं असं झाल्याचं तिच्या कानावर घातलं. थोरली पुढं झाली. म्हणाली, 'भूताखेतानू पळा रंऽऽ धामीन कोक्याचं हे घर नव्हं! म्होरची वाट धरा . . .' आणीक दाही दिशांना हळदकुंकवाची चिमूट तिनं फेकली. मग हिला घरला घेऊन आली. म्हणाली कशी, 'नवरा देव असतूया बायकूचा. त्येला त्येच्या पायरीनं वागीवलं, तरच तू खरी गरतीची लेक.' हिला आता ते पटलं. नवऱ्यापुढं तिनं नाक घासलं. चूक कबूल केली. थोरलीसारखा संसार मग तिनं केला. दोघं सुखात नांदली. त्यांनी मग रामाचं राज्य भोगलं.

■

या लोककथेने गृहिणीच्या कर्तव्याची जाणीव करून दिलेली आहे. केवळ स्वत:चा विचार न करता नवऱ्याचा आणि घरादाराचाही विचार केला पाहिजे, हे इथे बजावून सांगितलेले आहे. त्यासाठी दोघींच्या संसाराची तुलना केली आहे. त्याचप्रमाणे भुताखेतावरील विश्वासही धुडकावून दिला असून गरतीच्या मुलीचे खरे कर्तव्य शेवटी बोलून दाखविलेले आहे.

या कथेतील सगळे वातावरण गावरान आहे. शेतकऱ्याच्या घरचे आहे. सांसारिक जीवनाची माहिती देणारे आहे.

भाषेच्या दृष्टीनेही ही कथा चित्ताकर्षक झाली असून तिची मांडणीदेखी
मनोहर झाली आहे. या कथेने संसारी बाईला उपदेश केला आहे. त्यामु
अद्‌भुततेचा वासही न लागता ही कथा लोकप्रिय झाली आहे.

ही कथा मला सांगली साताऱ्याकडे मिळाली. त्या भागातील भाषेचा स
त्यामुळे हिच्यावर चढला आहे असे दिसून येईल. ज्यावेळी मला ही क
मिळाली, त्यावेळी ती सांगणाऱ्या बाईने अशी भाषा वापरली की, सा
प्रसंग माझ्या नजरेसमोर त्या त्या क्षणाला उभा रहात गेला! कथा सांग
हीदेखील कला आहे याची साक्ष त्यावेळी मला मिळाली. अशाच काही क
पुढे देत आहे.

## लव आणि अंकुश

**आटपाट नगर होतं. त्याच्या शेजारच्या एका अटंग्या वनातील गोष्ट. फ
जुनी पण मोठी ऐकण्याजोगी. रामाची सीता वनवासात होती. एकटी जगत हो
नाही म्हणायला चिमुकला अंकुश तेवढा जवळ. झाडाझुडुपांच्या सावल
एक बारीकशी खोपटी. ना शेजार ना पाजार. ऋषिमुनींचा आश्रमच काय
जवळपास. बोरी-बाभळी एवढ्याच काय त्या जिवाभावाच्या मैत्रिणी. खा
धरणी आणि वर आभाळ हाच काय तो आधार. ऊनवारा आणि पाऊसपा
यांचीच काय ती विचारपूस. तणांची शेज आणि दगडाची उशी एव
काय ते सामानसुमान. रानफळांची, पालापाचोळ्याची एवढीच काय
अंकुशाला घुटी. झाडाच्या फांदीला टांगलेल्या वल्कलाची झोळी हाच काय
अंकुशाचा पाळणा.**

**पण सीतामाई आनंदानं जगत होती. अंकुशाला उराशी धरून दिवस काढ
रामाची वाट पहात होती. आपलं पावित्र्य ती सांभाळीत होती. आज
उद्या राम येईल ही तिची आशा. तोच तिचा ध्यास. तेवढ्याच पुण्याई
तिचं जगणं.**

**होता होता काय झालं की, लहानग्या अंकुशाला वल्कलांच्या झोळीत निज
सीतामाई नदीवर गेली. अंकुशबाळाची बाळुती आणि अंगडंटोपडं धुवाय
त्यावेळी नदीकाठावरच्या एका झाडावर वानरं बसली होती. सीतामाईनं**

मान केली. बघते तो एक वानरीण आपल्या पिलाला घेऊन पाजत बसलेली. सीतामाईनं पाहिलं मात्र न् आपली कुशी रिकामी बघून तिला भडभडून आलं. अंकुशाच्या आठवणीनं काळीज करपून गेलं. हातातील धुणी न् बाळुती तशीच दगडावर टाकून ती धावत सुटली. जमिनीवर तिचा पाय ठरेना. अंकुशाला केव्हा कुशीत घेईन असं तिला झालं. नाही नाही ते विचार मनात येऊन तिचं काळीज फाटून गेलं. वाऱ्याला मागं सारून तिनं आपली खोपटी गाठली.

इकडे तोवर अंकुशानं रडून रडून आकांत केलेला. सीतामाईनं त्याच्यावर झेप घेतली. कडकडून मिठी मारली. त्या वानरिणीला आपलं पण बाळ दाखवावं म्हणून तिनं त्याला कुशीत घेतला. ती पुन्हा धावत नदीवर आली. तिनं वर मान करून वानरिणीला आपलं बाळ दाखवलं. दोघींची नजरभेट झाली. अभिमानानं दोघींनीही आपापल्या बाळाला प्रेमानं मिठी मारली. दोघीही आनंदून गेल्या.

पण इकडे काय गंमत झाली की, अंकुशाचं रडणं ओरडणं ऐकून धावत आलेले ऋषिकुमार तो झोळीत नाही असं बघून घाबरले. खुद्द ऋषिमुनींचं-देखील धाबं दणाणलं. आता काय करावं? सगळीकडे धावाधाव सुरू झाली. अटंग्या वनाचा काना न् कोपरा सर्वांनी धुंडाळला. वाघसिंहांचीदेखील शपथ घेतली. मोरलांडोरींचासुद्धा कानोसा घेतला. झाडाझुडपांची झडती घेतली. पण नाही. काही केल्या अंकुशाचा पत्ता लागेना. शेवटी नदीकाठचा लव्हाळा उपटून आणून ऋषिमुनींनी हुबेहूब अंकुशासारखाच मुलगा बनवला आणि त्याला झोळीत निजवला. अंकुशासारखा हुबेहूब पोषाख त्याच्यावर चढवला. पण सीतामाई आली नि तिनं हे ओळखलं तर काय होईल या धास्तीनं प्रत्येकाचं एवढंसं तोंड झालं. जो तो श्वास रोखून बसला. देवाची प्रार्थना करू लागला. सीतामाईनं आपल्यावर विश्वासघाताचा आरोप करू नये म्हणून त्यांनी शिकस्त केली.

तेवढ्यात सीतामाई खांद्यावर धुणं टाकून अंकुशाला खेळवीत घरी परतली. खोपटीत येऊन पहाते तो झोळीत बाळ रडतं आहे! हालतं आहे!! तिला नवल वाटलं. कुशीतल्या अंकुशाला तिनं पोटाशी दाबून धरलं. त्याच्या

अंगाखांद्यावरून सारखा हात फिरविला. इतक्यात ऋषिकुमार, ऋषिमुनी जमा झाले. अंकुशासारखाच दुसरा बाळ बघून सर्वांनाच अचंबा वाटला. जुळी भावंडं असावीत तसा त्या दोघांचा तो सारखेपणा ज्यांची त्यांची नजर भांबावून टाकू लागला.

झालं. सीताबाईनं एका कुशीत अंकुशाला घेतला नि दुसऱ्या कुशीत त्या बाळाला घेतला. दोघेही तिला पिऊ लागले! लवाच्या काडीचं बाळ झालं! जिवंत पोर झालं. म्हणून त्याचं नाव लव पडलं! लव अंकुशाच्या जिवावर सीतामाईनं रामाचं राज्य पाहिलं. तर ते तुम्हाआम्हांला पण पहायला मिळो. तिचा हा आनंद तुमचा आमचाही होवो.

■

## गंगास्नान

त्यावेळी खूप थंडी पडली होती. घराबाहेरची हवा अंगाला झोंबत होती. तरी पण गंगानदीवर स्नानासाठी लोक येत जात होते. भल्या पहाटेला उठून गंगास्नान करायला धडपडत होते. गंगेच्या गार पाण्यात उडी मारत म्हणत होते, 'गंगामाई, पुण्य पदरात घाल. पाप पोटात घे. सुखाची सावली आम्हांला असू दे.'

गंगामाईची अशी प्रार्थना रोज रोज चालायची. त्यामुळे एकदा काय झालं की, पार्वती शंकराकडे गेली. म्हणाली, 'महाराज, गंगास्नानाला लोकांनी दररोज का जावं?' पार्वतीच्या प्रश्नाचं शंकराला हसू आलं. त्यानं तिला सांगितलं, 'मी काही सांगायचं त्यापेक्षा प्रत्यक्षच खरंखोटं दाखवतो चल.' मग दोघे मिळून गंगानदीकडे आले. पार्वती एका दगडावर बसून राहिली. शंकरानं भिकाऱ्याचं रूप घेतलं. नदीकडेच्या एका खोल खड्डयात स्वतः जाऊन पडला. तिथून दीनवाण्या नजरेनं वर बघू लागला. काकुळतीनं बोलू लागला, 'महाराज, गरिबाला वर काढा. देव तुमचं भलं करील.'

तो दिवस दिवाळीचा होता. माणसं घाईगर्दीत होती. या भिकाऱ्याकडे लक्ष द्यायला कुणाला वेळ नव्हता. शंकरानं प्रत्येकाला हटकलं. पण कुणी त्याला दाद दिली नाही. जो तो आपल्याच नादात होता. गंगास्नान उरकून व पुण्य

पदरात पाडून घरात आंघोळ करायची सर्वांना घाई झाली होती. या भिकाऱ्याचा विचार कुणाच्याही डोक्यात आला नव्हता !

शेवटी होता होता एक तरुण माणूस त्या रस्त्यानं गंगास्नानाला निघाला. शंकरानं त्याला हाक मारली. तो माणूस थांबला. त्यानं शंकराकडे पाहिलं. 'थांबा. आलो.' म्हणाला. आंघोळीसाठी आणलेलं धोतर फेकून दिलं. खड्ड्यात उडी मारली. त्यासरशी त्याचं अंग जागोजाग खरचटलं. रक्त आलं. पण तो डगमगला नाही. त्यानं शंकराला हलकेच उचलून घेतलं. वर घेऊन आला. म्हणाला, 'देवा, आणखी काही सेवा हवी का?' तसा शंकर त्याच्यावर प्रसन्न झाला. त्यानं आपलं खरं रूप धारण केलं. तो माणूस आनंदला. शंकरापुढं त्यानं लोटांगण घातलं. शंकरानं त्याच्या मस्तकावर हात ठेवला. आशीर्वाद दिला. म्हणाला, 'तू पुरुषोत्तम आहेस. तुझं भलं होईल. खरा पुण्यवान तू होशील. आणि तो पार्वतीसह एकाएकी अदृश्य झाला.'

कैलासावर परत जाताना त्यानं मग पार्वतीला म्हटलं, 'बघितलंस सगळं? लोक फार ढोंगी. स्वतःचं खंडीभर पाप गंगेच्या ओटीत घालून मोकळे होतात ! पुण्य कसं मिळावं त्यांना ? गंगास्नान करायचं ते पाप चुकवावं म्हणून. खरी भक्ती नाही. सोंग सगळं. हां ! तो एकटा माणूस मात्र खरा पुण्यवान. त्याच्या पदरात पुण्य पडेल.'

पार्वती म्हणाली, 'आता समजलं देवा. प्रत्यक्ष डोळ्यांनी बघितलं. खात्री पटली.'

इकडे तो भला माणूस गंगेत स्नान करीत होता. कोवळं ऊन सगळीकडे पसरलं होतं. मनातून तो प्रसन्न होता. देवदर्शन खरं घडलं म्हणत होता. तो खुषीत होता. घरची कुणाची त्याला आठवण येत नव्हती. परोपकार केला हाच त्याचा आनंद. हीच त्याची दिवाळी. हेच त्याचं गंगास्नान.

दिवाळीची आंघोळ तो एकटाच करीत होता. समाधानानं हसत होता. गंगामाई त्याला आपल्या हातानं न्हाऊ घालीत होती! त्याचं कौतुक करीत होती. हा त्याच अपूर्वाईत दंग झाला होता ! त्याला कशाचंच भान राहिलं नव्हतं.

■

## फुटका हंडा

फार दिवस झाले त्या गोष्टीला. आपलं असंच एक गाव होतं. तिथं एक म्हातारी रहायची. मिळेल ती मोलमजुरी करून ती घर पोसायची. तिचा नवरा नुसता देवदेव करीत आयतं खायचा. पोरं गावभर फिरायची. म्हातारीला ते खपायचं नाही. ती पोरांना रागवायची. नवऱ्याला बोलबोल बोलायची. एवढं बोलायची की, तिला पाहिली तरी म्हातारा घाबरून जायचा! अखेरीस एक दिवस म्हातारीनं आपल्या रागाचा कळस केला. तिनं म्हाताऱ्याला घराबाहेर हुसकून म्हटलं, 'आज काही खायला मिळवून आणशील तर बराय! नाही तर काळं तोड करून वाट फुटेल तिकडे जा!'

म्हातारा ते ऐकून चांगलाच हादरला. त्याची बोबडी वळून गेली. हातपाय थरथरू लागले. तरी पण म्हातारीनं हाताला धरून त्याला घालवून दिला. बिचाऱ्याला घरातलं एक मोडकं खुरपं घेऊन जावं लागलं.

होता होता असं झालं की, म्हातारा रानोमाळ भटकला. दिवेलागण झाली तरी त्याला काही गवसलं नाही. तहानेनं, भुकेनं तो व्याकूळ झाला. पण कशाचा म्हणून पत्ताच नाही तर करणार काय? शेवटी एका झाडाखाली बसून अखेरचा उपाय म्हणून आपल्या रोजच्या पुजेतल्या देवाला त्यानं हटकलं, 'आता माझी अब्रू राख तरी नाही तर मला जिवानिशी घेऊन तरी चल!' . . .आणि धरणीवर अंग टाकून देत त्यानं रक्तबंबाळ होस्तोवर आपलं मनगट दाताखाली गच्च धरून ठेवलं.

इतक्यात कुणाचा तरी झाडावर कानोसा आला. म्हातारा वर मान करून बघतो तर त्याच्यासारखाच एक म्हातारा झाडावर बसला होता! 'भूतबित आहे की काय?' म्हाताऱ्याची छाती दडपून गेली. रक्तानं माखलेल्या हाताला माती लावून तो एकदम पळत चालला. पण त्याला कुणी तरी गच्च आवळून धरावं तसं झाल्यानं त्याचा पाय जागचा हालेल तर शपथ! ते ध्यानात येताच म्हातारा देवावर ओरडला, 'किती अंत बघशील? घरात म्हातारीचा कहार नि बाहेर तुझा! . . .डोळे तरी झाकून मोकळा कर मला! . . .नुसता छळवाद नकोरे देवा!' तोच झाडावरचा तो म्हातारा एकदम ह्या म्हाताऱ्याजवळ

येऊन म्हणाला, 'तुला काय पाहिजे?' आणि त्यानं ह्याच्या अंगावरून मायेनं हात फिरवला. त्याचा स्पर्श होताच हा म्हातारा मागं मान वळवून बघतो तो धरणीवरच्या माणसाच्या तिप्पट चौपट दिसणारं असं कुणी तरी त्याच्या अंगावर हात ठेवून उभं होतं! त्यामुळं तो एवढा घाबरला की, धड त्याला तिथून पायदेखील उचलता येईना अगर तोंडही उघडता येईना! ... 'आपली वाचा गेली, आपली शक्ती गेली!' म्हाताऱ्याचं मन त्याला खाऊन घेऊ लागलं.

पण तेवढ्यात तो दुसरा मोठा दिसणारा म्हातारा म्हणाला, 'तुला काय हवं बोल! या क्षणाला मिळेल. मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे! तू ज्या देवाला शिव्या दिल्यास, मायेनं पुजलंस तो मीच! ...'

'काय? देव? ...माझा देव? ...' म्हाताऱ्याला एकदम वाचा फुटली. आनंदानं त्या मोठ्या म्हाताऱ्या देवाच्या पायावर लोळण घेऊन तो पुटपुटला, 'पोटाला काही तरी खायला द्यावं देवा! घरात म्हातारीनं भारी छळ मांडलाय. दिवसभर फिरलो. वणवण भटकलो. पण काही हाताला लागलं नाही... तेव्हा देवा, आजच्या पुरतं दे! वाटेल ते दे देवा...पण माझी अब्रू घालवून मला माणसातून उठवू नको. नामर्द ठरवू नको...'

त्या घटकेला देवाचं रूप बदललं. मोठ्या देवळातल्या देवासारखं त्याचं नाजुक गोंडस रूप झालेलं बघून म्हाताऱ्याला बरं वाटलं. पुन्हा त्यानं देवाच्या पायावर डोकं ठेवून मधाची भिक्षा मागितली. त्यावर देव म्हणाला, 'त्या झाडाखाली जा. तिथं एक हंडा आहे. घेऊन चल. खायला मिळेल. पोटभर सगळ्यांना पुरेल एवढं! चवीचं...' आणि एकाएकी दिसेनासा झाला...

'देवा!' म्हाताऱ्यानं देवाला कवटाळीन म्हणून हात पुढं केले तो सारी दुनिया पोकळ झालेली! 'देव गेला कुठं?' सगळीकडे म्हाताऱ्यानं भिरीभिरी नजर टाकली. पण तो कुठंच दिसेना म्हणताना 'जाऊ दे तो गेला तर. हंडा तरी बघूया!' असा विचार करून तो त्या झाडाखाली गेला. तिथं पहातो तो एक फुटका हंडा त्याच्याकडेच येत असलेला! माणसं चालतात त्याप्रमाणं हंडा चालत आलेला बघून म्हाताऱ्याला एवढी भीती वाटली की, तो जोरानं पळत सुटत पुटपुटला, 'ही काय पिडा माझ्यामागं?'

म्हातारा पुढं नि हंडा मागं अशी पळापळ मग सुरू झाली.

म्हातारीनं दारात येऊन 'अजून कसा म्हातारा आला नाही ?' म्हणून वाट बघितली तोच तो पुढं पळत असलेला आणि मागं फुटका हंडा धावत येत असलेला ! 'अग बाई ग !' म्हातारीला धडकी भरली. नवऱ्याला कोणी देव घातला की, चेटूक केलं या भावनेनं ती म्हाताऱ्याला घरात पळवून नेत दडवून ठेवावं म्हणून पुढं झाली. इतक्यात तो हंडा थांबला आणि त्यातून आवाज आला, 'माझ्याजवळ खायला आहे ! म्हातारे, घे वाटेल तेवढं. पण नवऱ्याला छळू नकोस.'

'आँ !' म्हातारीला अचंबा वाटला. तिनं तोंडात बोट घातलं आणि म्हाताऱ्याला पाठीशी धरून विचारलं, 'तू कोण रे बाबा ?'

फुटका हंडा हसला, 'तुझा बा ! . . . घे खायाला. खा पोट भरून.'

म्हातारीला हे ऐकून नवल वाटलं. 'पण काय आहे बघावं तरी ?' या विचारानं ती पुढं झाली. बघतेय तर खरंच तो फुटका हंडा हिऱ्यामाणकांनी चकाकतेला ! नव्या रुपयांनी भरलेला ! 'देवा रे ! . . . नशीब उजाडलं माजं !' म्हातारीनं आनंदानं म्हाताऱ्याला कुरवाळलं आणि तो हंडा घरात नेऊन पालथा केला. तशी सारं घर त्या हिऱ्यामाणकांच्या उजेडानं माखलं गेलं आणि गावातल्या चोरांची वर्दळ तिथं सुरू झाली !

'अग्गो बाई ! मेल्यांनू भाईर जाता का न्हाई ?' म्हातारीनं एकेका चोराला बेदम बडवावं म्हणून घरातली काठी उचलली आणि चालून आलेलं नशीब सांभाळायची शिकस्त केली . . . इतक्यात काय गंमत झाली की, म्हाताऱ्याला सगळीकडून गुरफटून चोरांनी मारायला सुरुवात केली तसा म्हातारा कळवळून ओरडला, 'देवा देवा ! . . . नको अंत बघूस . . .' तशी काय झालं की, तो फुटका हंडा एकदम त्या साऱ्या चोरांवर तुटून पडला आणि मग त्यांना 'मेलो, मेलो' करीत पळता भुई थोडी झाली !

चोरांनी घराकडे पाठ फिरविली आणि म्हातारीनं घरात नजर वळविली तो पंचपक्वान्न भरून माखलेली ताटं सर्वांच्या पुढं आलेली ! . . . आणि म्हातारा फुटक्या हंड्याला धरून ढेकर देत जेवत असलेला ! . . .

■

## शेंडफळ

फार दिवस झाले आता त्या गोष्टीला. असंच आपलं एक गाव होतं. तिथं एक फार गरीब माणूस रहात होता. रानात जावं, लाकडं तोडून आणावीत आणि बाजारात नेऊन ती विकावीत असा त्याचा उद्योग. त्यावरच त्याचं आयुष्य. त्याच्या संसाराचा तेवढाच आधार. तर अशा या माणसाला चांगल्या सात मुली होत्या. एकीपेक्षा एक देखणी मुलगी. अगदी नक्षत्रासारखी. पण त्यांच्या पोटाला वेळेला मिळायचं नाही. रानावनात भटकावं, मिळेल ते खावं. एकदा काय गंमत झाली की, ह्या मुलींना पुरणपोळी खावीशी वाटली. तशी त्या माणसानं बायकोला म्हटलं, 'अग अग!' तर ती म्हणाली, 'काय म्हणतायसा वो धनी?' त्यावर ह्यानं सांगितलं, 'पोरीस्नी पोळी पाहिजे. करून दे.' तशी तिनं विचार केला. पुरणाच्या सात पोळ्या मोजक्या केल्या. त्या पोरींना खाऊ घातल्या.

संध्याकाळी तो माणूस घरी बघतोय तो आपला हा प्रकार. आता काय करायचं? पुरणपोळी त्याच्या आवडीची पण खावी म्हटलं तर बुटी मोकळी! त्याला भारी राग आला. फडाफडा तो बायकोला बोलला. मारहाण करू लागला. तशा पोरी आडव्या आल्या. त्यांना पण ह्यानं चापटचा मारल्या आणि मग राग थोडा निवल्यावर बायकोला म्हणतो कसा, 'ह्या कारट्यांचा लई तरास. ह्यांना जंगलात सोडून देतो. तिथं मग त्यांना वाघ, सिंह, अस्वल ही मंडळी गपागप खाऊन टाकतील. ह्यांचं पुना नाव नको!'

आणि खरोखरच एक दिवस त्या माणसानं ह्या साती पोरी काढल्या की घरातून बाहेर! बायकोनं पुष्कळ समजूत घातली पण ह्याचा हेका कायम. प्रत्येक पोरीच्या हातात फुलं गोळा करायला परडी देऊन त्यानं सगळ्यांना एका जंगलात आणलं. 'फुलं फळं गोळा करून आणा' म्हणून सर्वांना बजावलं. आणखी स्वतः लाकडं तोडायला म्हणून गेला. जाताना नाही म्हणायला धाकट्या पोरीचा तेवढा मायेनं मुका घेऊन त्यानं एवढीच बडबड केली, 'हे माझं शेंडफळ नाव काढील.'

इकडे ह्या साती मुली दिवसभर जंगलात भटकल्या. मग एका जागी जमल्या. बापाची वाट बघत राहिल्या. जवळची भरलेली परडी निरखीत हसत उभ्या

राहिल्या. पण बघतात तो रात्र झाली तरी बापाचा पत्ता नाही! तो परस्पर घरी गेलेला; तर येईल कसा? पण ह्यांना बिचाऱ्यांना ते कुठलं माहीत? त्या आपल्या त्याच्या वाटेकडं आशेनं डोळे लावून राहिल्या. आता बाप येईल, मग येईल, म्हणून त्यांनी खूप वाट पाहिली. पण बाप काही आला नाही! अखेर शेवटी त्यांनी ते जंगल सोडलं आणि वाट दिसेल तिकडे त्या निघाल्या.

होता होता काय झालं की, वाटेत त्यांना जांभळीचं एक झाड दिसलं. टिप्पूर चांदणं पडलेलं. पोटात दाबून भूक लागलेली. त्याकारणानं मोठी मुलगी सरसर झाडावर चढली. तिनं एकेक जांभूळ पारखून खाली टाकलं. बाकीच्यांनी त्यांचा फन्ना उडवला. पण गंमत अशी झाली की, त्या धांदलीत धाकट्या मुलीच्या वाट्याला एकही जांभूळ आलं नाही! ते मोठीनं बघितलं. तशी तिनं एक जांभूळ धाकटीसाठी म्हणून खाली टाकलं आणि स्वतः खाली उतरली. पण बघतेय तो ते जांभूळ मुंगीनं उचललं. तशी त्या मुंगीच्या मागं ह्या धावल्या. धाकटी मुंगीच्या पाठोपाठ चालली. पण मुंगीनं जांभूळ सोडलं नाही. ती गेली ती थेट एका राजाच्या घरात!

धाकटी तिथं आली. पहातेय तर एक मोठा राक्षस दरवाजात झोपलेला! आता काय करावं? धाकटीनं विचार केला. बहिणींना बाहेरच थोपवून ती हळूच आत वाड्यात गेली. तिथं एका मोठ्या कढईत दूध तापत होतं. धाकटीनं ते रसरसत्या निखाऱ्यावरचं उकळलेलं दूध नेलं आणि राक्षसाच्या तोंडात ओतलं. तशी तो राक्षस तडफडून तडफडून मेला. मग सगळ्याजणी बिनधोक वाड्यात शिरल्या. आत जाऊन काय काय आहे म्हणून बघतात तो सगळा सैंपाक ऊन ऊन असा तयार! सर्वजणींना आनंद वाटला. त्या सगळ्याजणी मग पोटभर जेवल्या.

नंतर त्यांनी तो वाडा बघितला. आत खूप खोल्या होत्या. प्रत्येकीनं एकेक खोली ताब्यात घेतली. आता त्या झोपायला जाणार तेवढ्यात देवघर दिसलं. सगळ्या तिकडे वळल्या. देवघराचं दार धाकटीनं उघडलं, आत रामसीतेची मूर्ती होती. सगळ्याजणी देवापुढं बसल्या. देवाला नमस्कार केला. सीतामाई प्रसन्न झाली. तिनं ह्या मुलींना दर्शन दिलं. धाकटीला कानात म्हणाली, 'कोंड्याच्या खोलीत नीज. तुझं भलं होईल.'

धाकटीला ते पटलं. सीतामाई गुप्त झाली. सगळ्या मुली झोपायला गेल्या. धाकटी कोंडद्याच्या खोलीत गेली. तिथं सगळीकडे मौल्यवान मोहरा होत्या !

इतर मुलींच्या खोलीतही काहीना काही होतंच. कुणाच्या खोलीत मोती, कुणाच्या पोवळी, कुणाच्या हिरेमाणिक असं काही होतं.

एक दिवस सगळ्याजणींनी बेत केला. बापाच्या घरी जायचं ठरवलं. त्यांना आईची फार आठवण आली. प्रत्येकीनं वाड्यातील एकेक हत्ती घेतला. खोलीतला माल हत्तीवर अंबारीत ठेवला आणि निघाल्या.

इकडे तोवर धाकटीनं काय केलं की, सगळ्या मोहरा गोणीत घालून त्यावर शेणमाती लिंपली. आणि मग तीही आपल्या बापाकडे निघाली.

होता होता वाटेत काय झालं की, चोर आडवे आले. त्यांनी सहाजणींची मालमत्ता लुटली. धाकटीच्या मालमत्तेला घाण माखलेली होती म्हणून तिच्या वाटेला कुणी गेलं नाही !

पहिल्या सहाजणी रडत रडत घरी आल्या. त्यांना हात हालवीत आलेल्या बघून बापानं घरात घेतलं नाही ! 'चालत्या व्हा' म्हणाला. तेवढ्यात धाकटी आली. तिनं बापाच्या पुढं सगळ्या मोहरा ओतल्या. बाप आनंदला. म्हणाला, 'माझं शेंडंफळ नशीबवान . . .' आणि मग त्यानं तिला प्रेमानं कुरवाळीत जवळ घेतली.

धाकटी शहाणी होती. तिनं बाकीच्या बहिणींची घडली हकिगत 'अशानं असं झालं' म्हणून बापाच्या कानावर घातली. त्यांना घरात घ्यायला लावलं.

सगळीकडे मग आनंदीआनंद झाला. आई, बाप नि साती मुली असे सगळे सुखानं राहू लागले. ■

## तीन लाल

एक आटपाट नगर होतं. तिथं चार मित्र होते. अगदी एका वयाचेच लहान लहान मुलं. पण एकमेकांवर भारी जीव. एक राजाचा, दुसरा प्रधानाचा, तिसरा सावकाराचा आणि चौथा शेतकऱ्याचा. पण म्हणून कशा एकातही दुजाभाव नाही. सारे एकदिलानं रहायचे. खेळायचे बरोबर. जेवायचे बरोबर. सावलीसारखे एकमेकांना असायचे. पण एक दिवस शेतकऱ्याच्या मुलाच्या बापानं विचारलं, 'बाळ, तू ह्या मुलांची संगत सोडशील का ?'

मुलगा म्हणाला, 'नाही! वाटेल ते झालं तरी नाही.' 'का? नाही का? ह्या श्रीमंताच्या पोराची संगत सोड नि शेतकाम बघ. ह्या पोरांचे चोचले आपल्याला नकोत. समजलं?' त्याच्या वडिलांनी अशी समजूत घातली. पण त्या मुलानं उत्तर देऊन म्हटलं, 'घरातून जा म्हणालात तर जाईन पण हे नाही ऐकायचा.' त्यामुळं त्याच्या बापाला राग आला. रागाच्या भरात त्यानं पोराला 'चालता हो' म्हटलं! . . . आणि मुलगाही खरोखरच चालता झाला.

'ए, मी जातो हे गाव सोडून.' त्या मुलानं बाकीच्या मित्रांना अशी बातमी दिली. ती ऐकून त्या मुलांना नवल वाटलं. म्हणाले, 'असं कसं होईल? जायचंच तर सारेजणच जाऊ या.' पण मग त्या मुलानं घर सोडून जायचं म्हणजे राना-वनातून, काटयाकुटयातून जावं लागेल अशी भीती प्रकट केली. त्याला वाटलं श्रीमंतांची मुलं कसली यायला! पण त्या मुलांनी ह्याला एकटयालाच सोडायचं जिवावर आलं म्हणून आपल्या आईबापांला न सांगताच त्या घटकेला आपापली घरं सोडली! गावही सोडलं. सगळे जण एका रस्त्यानं, एका दिलानं भुकेल्या पोटी निघाले.

होता होता रात्र झाली. जंगलातून जाताना पाय थकून गेले. पोटात भुकेनं धुमाकूळ घातला. मनात भीतीनं कापरं भरलं. चिमणी पोरं ठाऊक नाही ते बघून, अनुभवून घाबरून गेली. . . पण रातकिडयांचा आवाज ऐकून शेत-कऱ्याच्या पोराला धीर आला. आवाजाच्या रोखानं त्या लुकलुकत्या किडयांकडे बघून त्यानं इतरांना त्या झाडाखाली आणून बसवलं, 'झोपा तुम्ही.' त्यानं दगडाची उशी देऊन एकेकाला झोपवीत तोंड वाकडं करून पोटातला उमाळा पुढं केला, 'माझ्यासाठी तुमची झोपमोड. माझ्यापायी तुम्हांला वनवास. माझ्याकरिता तुमची उपासमार.' पण प्रत्येकानं त्याची समजूत घातली, 'वा! असं कसं? तू तिथं आम्ही नि आम्ही तिथं तू. वाईट नको वाटून घेऊस. आम्ही आपखुषीनं आलो. मिळालं तर खाऊ सारे. नाही तर उपाशी राहू या.' त्यामुळं तो शेतकऱ्याचा मुलगा गप्प झाला. बाकीचे थकून गेले होते. त्यांना झोप आली. भुकेल्या पोटावर हाताची मूठ दाबून धरून ते घोरू लागले. पण याला झोप येईना. ह्या राजबिंडया पोरांना उगाच आपण आणलं, त्यांना निष्कारण आपला बेत सांगितला, ही विलक्षण चुटपूट लागली म्हणून तो

कमालीचा अस्वस्थ झाला. बसलेला उठून फेऱ्या घालू लागला. मध्येच त्याच्या डोळ्यांत पाणी आलं. धाय मोकलून रडावं तशी त्यानं देवाला हाक मारली, 'माझा का अंत पहाणार आहेस?... खरा असशील तर धावून ये! नाही तर मेलो आहे असं तरी म्हण म्हणजे मला सुचेल ते करतो...'

त्या मुलाचा आवाज देवानं ऐकला. काळ्याकुट्ट रात्रीनं तोंडावरचा बुरखा मागं सारावा तसं क्षणभर काही साग करीत एक सुंदर देवी त्याच्यासमोर येऊन म्हणाली, 'काय पाहिजे बाळ?' तिला वाटलं, हा मुलगा रत्नंमाणकं मागेल म्हणून पोतंभर रत्नंमाणकं तिनं बरोबर आणली होती. पण त्या मुलानं तिला सांगितलं, 'नुसतं जेवायला दे. बाकीचं काहीएक नको. भुकेनं जीव व्याकुळलाय आमचा.' त्यामुळं ती देवी त्याच्यावर प्रसन्न होऊन म्हणाली, 'बरं आहे. ह्या झाडाच्या मागच्या बाजूला एक आंबा आहे. त्यावर चारच आंबे आहेत. एक पक्का झालेला, दुसरा चांगला होत आलेला, तिसरा थोडा बरा, आणि चौथा कच्चा. यातला पहिला जो खाईल तो राजा होईल. दुसरा खाईल तो प्रधान होईल. तिसरा खाईल त्याच्या तोंडातून लाल पडतील आणि चौथा खाईल त्याला जन्मठेप भोगावी लागेल...' आणि अवचितच गुप्त झाली... हा मुलगा विचार करीत पडला. हळूहळू मग त्यालाही झोप लागली.

दुसऱ्या दिवशी बाकीची सगळी मुलं उठली, आणि खायला काही आहे का म्हणून आपापसात कुजबुजू लागली. तेव्हा हा शेतकऱ्याचा मुलगा म्हणाला, 'तोंड तर धुवा आधी!' त्यामुळं राजाचा मुलगा म्हणाला, 'खायला असेल तरच तोंड धुवू.' मग त्या मुलानं गडबडीनं जाऊन ते चार आंबे आणले आणि कच्चा स्वत:ला ठेवून इतरांना खायला सांगितले. सपाटून भूक लागलेली. त्यामुळं पुढ्यात येईल त्याचा फन्ना उडाला. सगळेजण ते जंगल सोडून पुढं मग निघाले.

होता होता मग ते एका वनातून निघाले. वाटेत ओढा लागला. पाणी बघितल्यावर दिवसभर चालल्यामुळे लागलेली भूक भडकली. राजाच्या मुलानं तोंड धुतलं आणि चूळ टाकली तो तीन लाल बाहेर पडले! त्यानं माणकं पाहिली होती. त्याला त्याची किंमत कळली. गुपचूप त्यानं ते लाल कडोसरीला लावले आणि दुसऱ्या दिवशी सकाळी वाटेवर एक राजधानी

लागली तेव्हा त्यातला एक लाल देऊन प्रधानाच्या मुलाला 'खा
जा' म्हणून गावात धाडलं. तशी 'हो हो आणतो की!' प्रधानाच
लाल घेऊन खाऊ आणायला गावात गेला. ऐटीनं निघाला. दुकानं
लागला. पण पहातो तो रस्त्यावर ही गर्दी उडालेली! चौघडा वाजत अ
गाडीच्या मागोमाग सोंडेत हार धरून हत्तीण निघालेली! ते बघू
चौकशी केली, 'काय आहे आज राजधानीत?' त्यामुळं त्याच रस्त
एक बघ्या म्हणाला, 'सांगतो ऐक. राजा मेलाय आमचा. पण पोटी पु
म्हणून ही हत्तीण ज्याच्या गळ्यात माळ घालील तो राजा म्हणून
येईल. त्याचा पुकार चाललाय. ती बघ हत्तीण आली. मागं हो, भिंतीला

प्रधानाचा मुलगा त्या माणसानं सांगितलं त्याप्रमाणे कुतूहला
हत्तिणीकडे बघत मागं झाला खरा पण 'आ' वासून त्यानं डोळे ता
कारण हत्तीण एकाएकी त्याच्याच पुढ्यात धावली. आनंदानं सोंड पु
तिनं ह्याच्याच गळ्यात माळ घातली तशी साऱ्या गर्दीनं टाळ्यांच
केला. प्रधानाच्या मुलग्यानं पक्का आंबा खाल्ला होता. तो राजा
दिमाखात मिरवणूक निघाली. शिंग वाजलं. नगारा नौबत झडली. प्र
मुलगा सारं विसरून गेला. राजवैभव त्याच्या डोळ्यांत भरलं.
आठवण बुजली.

'इकडे ही बाकीची तीन मुलं त्याची वाट बघून कंटाळली. भुकेनं
झालेली. दम निघेना. शेवटी सावकाराच्या मुलाजवळ एक लाल देऊन रा
मुलानं 'खायला काही आण' म्हणून त्याला गावात धाडलं.

पण प्रधानाचा मुलगा राजा झाला. त्याला प्रधान पाहिजे होता. म्ह
मागणीचा पुकार झाला. हत्तिणीनं मिठाईच्या दुकानाजवळ उभ्या अ
या सावकाराच्या मुलाला माळ घातली. त्यालाही भूल पडली. मित्रांच
राहिलं नाही. आता काय करावं?

बिचारा राजाचा मुलगा आणि शेतकऱ्याचा मुलगा इकडे चिमण
करून वाट पहात होते. कोणीच कसं येईना? त्यांना नवल वाटलं. भूक त्य
लागलेली. आता काय करावं? मोठा पेच पडला. म्हणून शेतकऱ्याचा
'मी खायला आणतो' असं सांगून उरलेला तिसरा लाल घेऊन गावात

एका खाऊच्या दुकानाजवळ गेल्यावर पहिल्यांदा त्यानं आपले ते दोन मित्र कुठं दिसतात का पाहिलं. पण सारं गाव राजवाड्याकडे लोटलेलं. तिथं बघावं तो शुकशुकाट. म्हणून इकडेतिकडे बघत त्यानं एका दुकानाजवळ लाल पुढं केला आणि मिठाई मागितली. तो लाल बघून दुकानदार चकित झाला. 'ह्या पोरानं राजवाड्यातील चोरी केली असली पाहिजे !' अशी त्याला शंका आली. म्हणून ह्यानं कितीही नाही होय म्हटलं तरी दुकानदारानं पोलीस शिपाई बोलावून त्याला पकडलं. तो बंदिवान झाला. जन्मठेपेची सजा त्याच्या वाट्याला आली. कच्चा आंबा असा पावला !

एकही मित्र परत कसा येत नाही या काळजीनं इकडे राजाचा मुलगा भेदरून गेला. गावात काही जादूटोणा असेल अशी त्याला भीती वाटली म्हणून गावात न जाता पळता येईल तेवढं जोरानं पळत तो दुसऱ्या गावाच्या वाटेला लागला.

वाटेत एक शेतकरी डोक्यावर भाकरीचं गाठोडं घेऊन गुरं वळीत चालला होता. तो दिसताच हा राजाचा मुलगा होता तरीही दीनवाणी होऊन त्याच्या पायाशी पडला व म्हणाला, 'फार भूक लागली. खायला दे.' ह्या मुलाचं राजबिंडं रूप बघून तो शेतकरी चपापला. त्यानं लगबगीनं डोक्यावरचं भाकरीचं गाठोडं खाली ठेवून ह्याला खांद्यावर घेत सांगितलं, 'घरी देतो चल. ही भाकरी शिळी आहे.'

होय नाही करीत ते दोघे मग घरी आले. शेतकरी म्हणाला, 'मी फार गरीब झालोय. पण तुझ्यापुरती ताजी भाकरी घरात मिळेल.'

राजाच्या मुलाला भूक फार लागलेली होती. काहीही शिळंपाकंदेखील चाललं असतं. म्हणून शेतकऱ्यानं त्याला तेल माखून आंघोळ घालीत 'मी या गावाचा पाटील होतो, रोज तीन कोट लोकांना दान करायचा पण सारं गमावून बसलो.' असं काही म्हटलं तरी तिकडे त्याचं लक्षच नव्हतं. भाकरी मिळाल्याबरोबर वचावचा खाऊन तो झोपी गेला.

दुसऱ्या दिवशी त्यानं तोंड धुतलं आणि चूळ ठोकली तो पुन्हा तीन लाल पडले. तशी आनंदानं ते त्या पाटलाच्या हवाली करीत त्यानं सांगितलं, 'घ्या, काही उपयोग होईल.'

पाटलाला आनंद झाला. त्याची गरिबी गेली. घरात लक्ष्मी रोज तीन लाल मिळाले. तीन कोट दान आणखी सुरू झाल मुलगा कुठं जायचं कळेना म्हणून तिथेच राहू लागला. पाटल त्याला सांभाळलं.

पण हे सुख एका रस्ता झाडणाऱ्या महारणीच्या डोळ्यांत वेश्येच्या घरी जाऊन तिनं लालाची हकिगत सांगितली. 'हा आण. तू श्रीमंत होशील' असंही म्हटलं. वेश्येच्या तोंडाला कलावंतिणीचा पोषाख टाकून ती साधी शेतकरीण झाली. पाट जाऊन तिनं हा मुलगा आपला असल्याची भाषा काढली. पाटलां मुलगाही तिच्या मागोमाग आला.

घरी आल्यावर रात्री त्या कलावंतिणीनं ह्या मुलाला जेवू नशा पाजली. तिला वाटलं हा ओकला की, लालच लाल हा मुलगा ओकला तर नुसती त्याच्या पोटातील लाल टाकणारी कोय बाहेर पडली! सकाळीदेखील लाल पडले नाहीत! तिर आला. तिनं ह्या मुलाला मारलं आणि पाटलाच्या घराच्या माग त्यात आणून टाकलं.

राजाचा मुलगा पस्तावला. पाटलाकडे जायची त्याला लाज वा राख फासून तो रानावनातून निघाला.

होता होता वाटेत दोन पोरं भांडताना त्यानं पाहिली. कार तो समजलं की, एक फरशी आहे. ती म्हणते, माझ्यावर कोणी बसे म्हणेल तिथं नेईन.' आणि सोन्याची दोरी बांधलेली मोहोरांनी भरं पोतं तिथंच शेजारी आहे, तर ते म्हणतंय की, 'मला रिकामं केलं त भरून जाईन.' तेव्हा त्या दोघात वाद पडला की, यांतलं कोणतं र निकाल लागेना. ज्याला त्याला मोहोरांनी भरलेलं पोतंच हवं. शेव जाऊन देवापुढं कौल मागावा म्हणून ती मुलं निघून गेली पण अखेर तरी माघारी येईनात! राजाचा मुलगा त्यांची वाट बघून कंटाळ त्या फरशीवर बसला आणि हातात ते पोतं धरून एकदम 'पाटलाच्या म्हटल्याबरोबर तिथं येऊन दाखल झाला.

इकडे पाटील पुन्हा भिकारी झालेला. राजाच्या मुलानं तो समोर दिसताच विचारलं, 'कसं काय? ठीक आहे नव्हं पाटील?' पाटलांनी दानसत्र आजच बंद झाल्याची ताजी बातमी दिली. राजाच्या मुलानं ते मोहोरांचं पोतं त्याच्यासमोर ओतलं. पाटील पुन्हा तीन कोटाच्या दानाच्या मागं लागला. आबादीआबाद घरात नांदू लागली. पाटलांची हवेली राजाच्या मुलाला शोभू लागली. झगझगाट झाला.

पण त्या महारणीनं पुन्हा त्या वेश्येला बातमी दिली. तिला आणखी आशा सुटली. मागच्याप्रमाणंच त्या मुलाला तिनं पाटलाच्या घरून खेचून नेलं. सोन्याच्या दोरीचा काही भाग तेवढा त्याच्या मनगटाला गुंडाळला होता तो बरोबर आला. 'मोहरा कुठं आहेत?' तिनं राजाच्या मुलाला दरडावलं. पण तो गप्प राहिला म्हणून हिनं त्याला खूप नशा पाजली. त्या नादात तो मोहरा देईल म्हणून वाट पाहिली. पण तसं लक्षण दिसेना तेव्हा बेदम मारून पाटलाच्या घराच्या मागच्या खंदकात तिनं त्याला आणून टाकलं.

राजाचा मुलगा शुद्धीवर आला तसा कष्टी झाला. देशोधडीला लागावयाचं त्यानं ठरवलं. पाटलाच्या घराकडे पाठ फिरवून तो पाय नेतील तिकडे निघाला. वाटेत त्यानं सहज ती सोन्याची दोरी हाताला रुतली म्हणून सोडली तोच सोन्याच्या राघूत त्याचं रूपांतर झालं. त्यासरशी आकाशवाणी झाली, 'सोन्याच्या राघूशी एक राजकन्या लग्न करणार आहे असा तिनं पण केला आहे होऽऽ'

हा सोन्याचा राघू गावोगाव भटकत राहिला. इंद्राच्या सभेत जाऊन आला. दिसतेल्या झाडावरून उड्या मारीत मिळालेलं खातपीत राहिला.

इकडे एका राजाची लेक जंगलातल्या राजवाड्यात सोन्याच्या राघूची वाट बघत होती. रोज खायची नाही. प्यायची नाही. बोलायची नाही. मोगऱ्याच्या चार फुलांनी राजा तिचं वजन करायचा. पण ती हलकीच भरायची.

होता होता एक दिवस हा सोन्याचा राघू त्या राजवाड्याजवळ आला. बंद काचेच्या खिडकीतून राजकन्येनं त्याला पाहिलं. ती हसली. दार उघडून तिनं हा राघू मोठ्या शिताफीनं पकडला. सोन्याच्या पिंजऱ्यात ठेवला. खाऊपिऊ

घालू लागली. तिचं वजन वाढत गेलं, राजानं गावातील हजारो फुलं आणली तरी वजनाला पुरेनात! काय झालं? कसं झालं? त्याला विचार पडला. त्यानं लेकीला विचारलं. तिनं सोन्याच्या राघूची गोष्ट सांगितली, 'करीन तर ह्या राघूशीच लग्न करीन' म्हणाली. राजा कष्टी झाला. सोन्यासारखी रूपवती मुलगी राघूशी लग्न करणार हे त्याला पटेना, पण मुलीनं हट्ट घेतला. एका रात्री राघूचा राजपुत्र झालेला तिनं बघितला होता. त्याच्या खांद्यावर मान टेकून तिनं लग्नाचं वचन मागितलं होतं. तिला आता दम निघेना. 'लग्नाची तयारी करा' म्हणून राजाजवळ तिनं घाई केली. राजानं नाइलाजानं लग्नमंडप उभारला. गावोगावचे राजे लग्नाला आले. बोहल्यावरच्या सोन्याचा राघू नवरदेवाचे जागी बघून सगळे हसले. सर्वांनी राजकन्येचं मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण शेवटी ह्या राघूशीच तिचं लग्न लागलं.

लग्न लागल्याबरोबर राघूचा राजपुत्र झाला! त्याचं रूप कुणाच्या डोळ्यात मावेना. राजा तर आनंदानं वेडाच झाला. त्यानं भरपूर संपत्ती, हजारो नोकरचाकर, शेकडो घोडे नि हत्ती लेकीला माहेरपणाला दिले. निम्मं राज्य देऊन त्यानं आपल्या लेकीला निरोप दिला.

नवे राजाराणी आपल्या घरी निघाले. राजाच्या मुलाला आठवण झाली. आपल्या लव्याजम्यानिशी तो पाटलाच्या घरी आला. पाटील पुन्हा गरीब झालेला. त्याच दिवशी त्याचं दान थांबलेलं. राजपुत्रानं त्याला ओळख देऊन भरपूर संपत्ती दिली. पुन्हा तीन कोट दान सुरू झालं.

राजपुत्राला मित्रांची आठवण झाली. शेजारच्या राजधानीवर आपण चालून येत असल्याची युद्धाची घोषणा रणशिंगानं दिली. तो युद्धास तयार झाला. पण त्या राजधानीतील तो राजा आपल्या प्रधानासह ह्या राजाकडे सामोरा येऊन म्हणाला, 'युद्ध आम्हांला नको. आम्ही आमचं राज्य आपल्या हवाली करतो.' महाराजांचा आवाज राजपुत्रानं ओळखला. हत्तीवरून खाली उतरून व त्या राजास आलिंगन देऊन ह्यानं म्हटलं, 'मित्रा! ओळखलं नाहीस?'

पण राजानं व प्रधानानं ह्या राजाला ओळखलं नाही. टकामका ते बघतच राहिले. शेवटी आपल्या राणीची ओळख करून देत राजपुत्रानं सारी घडलेली

हकिगत सांगितली. ओळखी पटल्या. आनंदीआनंद झाला. पण राजपुत्राला शेतकऱ्याच्या मुलाला शोधायचे होते. त्याच्यापायी त्याला वनवास भोगावा लागला ही खंत लागली होती. गावात चौकशी सुरू झाली. सारे कैदी सोडले, सारे बंदिवान मोकळे केले. जन्मठेपेच्या माणसांत शेतकऱ्याचा मुलगा आढळला. राजपुत्रानं त्याला ओळखलं. त्याचे हालहाल झालेले बघून तो कष्टी झाला. त्यानं त्याला जवळ ओढून आलिंगन दिलं. पण त्याला ओळख लागेना. अखेरीस राजपुत्रानं सारी आठवण दिली. शेतकऱ्याचा मुलगा हसला. पोटभर हसला. त्याचा आनंद गगनात मावेना, पुन्हा चौघे एक झाले.

सर्वांची संपत्ती तिघांनी एकत्र केली व तिची वाटणी त्या राजकन्येच्या हातानं करून चौथा भाग शेतकऱ्याच्या मुलाला देऊ केला. सगळेजण हसत खेळत, नाचत बागडत, पुन्हा आपल्या गावी आले. आपापल्या आईवडिलांच्या पायांवर त्यांनी लोळण घेतली. सर्वत्र आनंदीआनंद झाला. गावाला जत्रेचं स्वरूप आलं. गावोगावचे लोक नव्या राजाराणीला भेटायला आले. त्यांचा संसार सुखाचा झाला, तसा तो तुमचा आमचाही होवो.

आमची कहाणी संपली. तिनं राया इंद्राची गोष्ट दिली.



लोककथेचा साजशृंगार हा या परीचा आहे. भारतीय वाङमयाचा तो एक श्रेष्ठ असा अलंकार आहे. लोकांच्या काळजाला जाऊन भिडण्यात तिचा हातखंडा आहे. मग तिचे कथन स्त्रियांचेकडून होवो किंवा पुरुषांचेकडून होवो. तिचा प्रभाव हा सारखाच रहातो. लोककथा ही त्यामुळेच ललित वाङमयाची एक अधिष्ठात्री देवता बनली आहे.

लोकगीते, लोककथा किंवा लोकसाहित्य यांची निर्मितीच्या वेळची स्फूर्ती ही अगदी स्वाभाविक किंवा नैसर्गिक अशी असते. या निर्मितीला कशाचा आधार घ्यायची गरज भासत नाही. एखाद्या जमिनीत रुजविलेल्या बियाला स्वाभाविकपणे अंकुर फुटावा आणि त्याचे विशाल वृक्षात रूपांतर व्हावे, त्याप्रमाणे किंवा निसर्गनिर्मित कारंजाप्रमाणे ह्या साहित्याचा जन्म होतो. थोडक्यातच बोलावयाचे पण साता जन्मांची भाषा करावयाची हा या

वाङमयाचा स्वभावधर्म आहे. त्यामुळे ह्या वाङमयाला जन्म देणारी व पालनपोषण करणारी मंडळी ही लिहायला वाचायला शिकलेली नव्हती य कोठेच बाधा आली नाही. उलट त्यामुळे एक प्रकारे त्यांनी आपल्या सद्भ जिवाभावाच्या बोलण्याने, ह्या वाङमयाला साजिवंत केले! भारतीय जीव आविष्कार मराठी लोकवाङमयाने प्रामाणिकपणे केला आहे. इथे कस भाडभीड किंवा संकोच कोणी राखलेला नाही अगर संकोचित जगालाही केलेला नाही. जे काही इथे आहे ते विशाल जीवनाची अनुभूती देणारे आहे आणि हाच या साहित्याचा सर्वश्रेष्ठ गुणधर्म होय.



